# रामायणावर नवा प्रकाश

लेखक :

**श्री. भास्करराव विठोजीराव जाधव**



२६ जून १९५१
प्रथम स्मृतिदिन

किंमत ५ रु.

# निवेदन

श्री. भास्करराव विठोजीराव जाधव यांच्या पहिल्या पुण्यतिथीला "रामायणावर नवा प्रकाश" हा त्यांच्या वाल्मीकि रामायणावरील संशोधनात्मक लेखांचा संग्रह वाचकांच्या हातीं देतांना आम्हांस अत्यंत आनंद होत आहे. श्री. भास्करराव जाधव यांच्या दुःखद निधनानंतर महाराष्ट्रांतील बऱ्याच विचारवंत मंडळींकडून त्यांच्या लेखांचा संग्रह प्रसिद्ध करण्याबद्दल जाहीरपणें व वैयक्तिक रीत्या आम्हांस विनंति करण्यांत आली. चाहत्या मंडळींच्या सदिच्छेनुसार अशा लेखसंग्रहाच्या प्रकाशनाच्या खर्चाची जबाबदारी श्री. भास्करराव जाधव यांच्या सुपुत्रांनीं मोठ्या आनंदानें स्वीकारली.

श्री. भास्करराव यांचे विविध विषयांवरचे लेख सुमारें २०–२५ वर्षांच्या कालांत निरनिराळ्या नियतकालिकांतून प्रसिद्ध होऊन गेले होते. यांपैकीं कांहीं नियतकालिकांचें प्रकाशन सध्या बंद आहे. प्रसिद्ध होऊन गेलेल्या लेखांचीं कात्रणें संग्रहीं नव्हतीं. अशा परिस्थितींत लेख गोळा करण्याचें कार्य अवघड होतें. विविध विषयांवरचे लेख बऱ्याच मंडळींच्या साहाय्यानें गोळा झाले. त्यांतून एका स्वतंत्र विषयावरचे लेख निवडून "रामायणावर नवा प्रकाश" हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

श्री. भास्करराव जाधव बुद्धिप्रामाण्यवादी होते. तसेंच त्यांना देव आणि भक्त याप्रमाणेंच इतर कोणत्याहि बाबतींत मध्यस्थाची जरूरी वाटत नसे. यामुळें प्रस्तुत लेखसंग्रहाचें महत्त्व आम्हीं प्रतिपादन न करतां वाचकांनीं बुद्धीच्या कसोटीनेंच या संग्रहांतील लेखांविषयीं स्वतंत्रपणें मतें बनवावींत असें आम्हांस वाटतें.

श्री. भास्करराव जाधव यांचें जीवन सर्व दृष्टीनें चारित्र्यसंपन्न व शील-संपन्न असें एखाद्या तपस्व्यासारखें होतें याची जाणीव त्यांच्या निकट-वर्तीयांखेरीज इतर कोणासहि असणें शक्य नव्हतें. म्हणून तें सारांश-रूपानें या लेखसंग्रहाच्या प्रारंभीं देण्यांत येत आहे.

रामायण व इतर विषयांवरील बरेच लेख "ज्ञानमंदिर" मासिकांतून प्रसिद्ध झाले होते. या मासिकाच्या जुन्या फाईली दैनिक "पुढारी"चे संपादक श्री. गणपतराव जाधव यांनीं मिळवून दिल्याबद्दल व त्यांनीं या लेखसंग्रहाच्या प्रकाशनाच्या सुरवातीपासून निरनिराळ्या प्रकारें मार्गदर्शन व साहाय्य केल्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. श्री. भास्करराव यांचे लेख प्रसिद्ध झालेल्या जुन्या मासिकांचे अंक शोधून काढणें, ते लेख उतरून घेणें, जीवनवृत्ताची माहिती गोळा करणें हें काम जितकें जिकीरीचें तितकेंच अवघड होतें. ही जबाबदारी श्री. गोविंदराव वि. जाधव, श्री. बापूसाहेब भा. जाधव व श्री. आप्पासाहेब भा. जाधव यांनीं आपल्या निरनिराळ्या व्यवसायांतून वेळ काढून, जर पार पाडली नसती तर हा संग्रह श्री. भास्करराव जाधव यांच्या पहिल्या पुण्यतिथीला वाचकांच्या हातीं देणें अशक्य झालें असतें. हें कार्य त्यांनीं कृतज्ञताबुद्धीनें जरी केलें असलें तरी त्यांच्या परिश्रमाचें महत्त्व कमी होत नाहीं.

या लेखसंग्रहाच्या प्रकाशनाच्या कामीं ज्या मंडळींनीं आपुलकीनें साहाय्य केलें त्यांचा उल्लेख करणें जरूरीचें आहे. मुंबईचे श्री. र. गो. सरदेसाई, श्री. श्री. रा. टिकेकर, श्री. अनंत हरि गद्रे, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचे व्यवस्थापक, श्री. जी. एस्. सबनीस | (कोल्हापूर बँक मुंबई शाखा), श्री. पु. श्री. काळे (आर्टिस्ट) व श्री. बाबूराव मालपेकर, 'दीनमित्र'कार श्री. मुकुंदराव पाटील, कोल्हापूरचे श्री. वि. स. खांडेकर, भाई माधवराव बागल, डॉ. पी. सी. पाटील, श्री. दिनकर द. पाटील या मंडळींनीं जें हरप्रकारें साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. तसेंच "ज्ञानमंदिर", "महाराष्ट्र शारदा", "किर्लोस्कर",

"स्त्री" व "मनोहर" या मासिकांच्या संपादकांनीं व संबंधित मंडळींनीं लेख पुनर्मुद्रित करण्यास परवानगी दिल्याबद्दल त्यांचेहि आम्ही आभारी आहोंत. आमचे मित्र श्री. सी. गो. सरदेसाई यांनीं श्री. भास्करराव जाधव यांच्या जीवनवृत्ताची सजावट, लेखसंग्रहाचीं प्रुफें तपासणें या बाबतींत जें साहाय्य केलें त्याबद्दल आम्ही त्यांचेहि आभारी आहोंत. श्रीज्ञानेश्वर प्रेसचे मालक श्री. भाऊसाहेब सहस्रबुद्धे यांनीं पुस्तकछपाई व बांधणी सुबक व मुदतींत करून दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणें उचित होईल.

"रामायणावर नवा प्रकाश" या लेखसंग्रहाच्या वाचकवर्गाकडून होणाऱ्या स्वागतावरच श्री. भास्करराव जाधव यांच्या इतर लेखांचें प्रसिद्धी-करण अवलंबून आहे, एवढेंच निवेदून, श्री. भास्करराव जाधव यांच्या सुशील पत्नी व त्यांचे सुपुत्र यांच्या वतीनें श्री. भास्करराव जाधव यांच्या पहिल्या पुण्यतिथीला हा लेखसंग्रह आदरपूर्ण भावानें सुहृद वाचकांपुढें आम्ही सादर करतों.

कोल्हापूर
ता. २६ जून १९५१

सी. रा. तावडे
केशवराव आ. भोंसले

# श्री. भास्करराव जाधव
## यांचा
## जीवनपट

| | |
|---|---|
| १८६७ | ता. १७ जून सोमवार रोजीं नागांव येथें जन्म. |
| १८८८ | मॅट्रिक परीक्षा पहिल्या नंबरनें उत्तीर्ण. |
| १८९२ | बी. ए. पहिला वर्ग. |
| १८९३–९४ | एल्फिन्स्टनचे फेलो. |
| १८९४ | एम्. ए. पहिला वर्ग. |
| १८९५ | कोल्हापुरास असिस्टंट सरसुभे म्हणून नेमणूक. |
| १८९७ | एल्एल्. बी. |
| १९०१ | 'मराठा दीनबंधु' पत्र सुरू. |
| १९०४–१८ | कोल्हापूर नगरपालिकेचे सर्वाधिकारी. |
| १९०७ | धारवाड येथील मराठा शिक्षण परिषदेचे स्वागताध्यक्ष व प्रणेते. |
| १९११ | पुणें येथें भरलेल्या मराठा विद्यार्थी संघाच्या पहिल्या संमेलनाचे अध्यक्ष. |
| १९११–१२ | सत्यशोधक समाजाची स्थापना. |
| १९१३ | अर्बन बँकेची स्थापना. |
| १९१७ | कोल्हापूर नगर वाचन मंदिराचे अध्यक्ष. |
| १९१९ | पार्लमेंटरी कमिशनपुढें साक्ष. |
| १९२१ | कोल्हापूर दरबारांतून सेवानिवृत्ति. मुंबई कायदे कौन्सिलांत सरकारतर्फे नियुक्ति व ब्राह्मणेतर पक्षाची स्थापना. |
| १९२३ | मुंबई इलाख्याचे शिक्षण मंत्री. |
| १९२६ | विधिमंडळाचे लोकनियुक्त सभासद. |
| १९२८–३० | मुंबई इलाख्याचे शेतकी, अबकारी या खात्याचे मंत्री. |
| १९३०–३१ | गोलमेज परिषदेस आमंत्रण. दोन परिषदांना हजर. |
| १९३१–३४ | मध्यवर्ती विधिमंडळांत निवड. |
| १९३५ | मुंबई साहित्यसंमेलनाचे स्वागताध्यक्ष. |
| १९४५–४६ | कोल्हापुरास मंत्रिपदावर नेमणूक. |
| १९५० | कोल्हापुरास भरलेल्या सत्यशोधक समाज परिषदेचे प्रवर्तक. |
| १९५० | ता. २६ जून सोमवार रोजीं कोल्हापूर येथें मृत्यु. |



**नामदार भास्करराव जाधव**

जन्मः-

जेष्ठ शु. पौर्णिमा सोमवार

१७ जून १८६७.

मृत्युः-

आषाढ शुक्लपक्ष एकादशी शके १८७२

सोमवार २६ जून १९५०.

# जीवनवृत्त

सत्यशोधक समाजाची प्रतिष्ठा वाढविण्याच्या कामीं, मराठा समाजाची संघटना करून त्यांच्यांत जागृति निर्माण करण्यासाठीं आणि समाजांत जे सामाजिक अन्याय रुढ झाले होते ते नष्ट करण्याकरितां महाराष्ट्रांत ज्यांचे श्रम कारणीभूत झाले त्यांत श्री. भास्करराव जाधव यांचें स्थान अनन्य-साधारण आहे. प्रतिकूल परिस्थितींतून त्यांनीं शिक्षण संपादन केलें व सर्व परीक्षा सन्मानपूर्वक उत्तीर्ण झाले. मुंबई इलाख्याचे पहिले मराठा मंत्री होण्याचा मान त्यांनीं मिळविला. सहकारी चळवळीसारख्या उपयुक्त चळवळींचे ते प्रणेते आहेत. बहुजनसमाजावर गतानुगतिकतेमुळें जे संस्कार झाले व ज्यामुळें त्याची प्रगति खुंटली ते आपल्या बुद्धिवादी विचारसरणीनें नाहींसे करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. किंबहुना त्यांनीं जें जें केलें तें तें बहुजनसमाजाची उन्नति व्हावी, त्याचें योग्य स्थान त्यास प्राप्त व्हावें या तळमळीनें केलें. त्यांचें साहित्य, राजकारण, औद्योगिक चळवळी, कोणतीहि बाब घेतली तरी त्यांत त्यांचा हा हेतु अगदीं स्पष्टपणें प्रतिबिंबित झालेला दिसतो. एकप्रकारें भास्करराव जाधवांचें चरित्र म्हणजे गेल्या चार तपांतील बहुजनसमाजाच्या विकासाचा इतिहास होय असें म्हटलें तर फारशी अतिशयोक्ति होणार नाहीं.

महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांमधील कार्यकर्त्या व्यक्तींना आत्मचरित्र लिहिण्याचें अगत्य अजूनहि वाटत नाहीं. त्यामुळें इतरांनीं आपल्या दृष्टिकोनांतून लिहिलेलीं त्यांचीं चरित्रें वाचकांना वाचावीं लागतात. एक थोर सत्यशोधक, मराठा समाजांतील निरलस कार्यकर्ते व समाजांतील अन्यायामुळें ज्यांचें लिखाण उत्स्फूर्त झालें असे एक व्यासंगी लेखक या नात्यांनीं श्री. भास्करराव जाधव यांचा लौकिक आहे. राजकारण, समाजकारण, शिक्षण, साहित्य, उद्योगधंदे इत्यादि क्षेत्रांतील त्यांची कामगिरी मार्गदर्शक नि लक्षांत रहावी अशी आहे. अशांचें आत्मचरित्र म्हणजे त्या काळचा एक चालताबोलता इतिहासच असतो. श्री. भास्करराव जाधव

यांनाहि शेवटीं शेवटीं स्वतःसंबंधीं लिहून ठेवण्याची ओढ लागली असावी असें दिसतें. त्यांनीं आपल्या बालपणींच्या हकीकती लिहिल्या आहेत त्या तशाच पुढें देण्यांत आल्या आहेत.

## थोडा पूर्व इतिहास

“कोल्हापूर येथें आपल्या मालकीचें घर असावें म्हणून शाहूपुरींत जागा मिळवून तीवर १९०१ सालीं घर बांधलें. कामावर देखरेख आमचे वडील तीर्थरूप विठोजीराव यांची होती. घरास ‘जदुबन’ असें नांव ठेवून तें घराच्या पुढील अंगास मराठींत व इंग्रजींत खोदवून त्याखालीं अनुक्रमें शक व सन हीं खोदविण्यांत आलीं. आमचे तीर्थरूपां-कडून समजलेली घराण्याची माहिती पुढील पिढीकरितां येथें लिहीत आहें.

“आमचे आजे नागोजीराव. त्यांचे वडील चंद्रराव. त्यांचे जनक शिवाजीराव. शिवाजीराव व चंद्रोजीराव यांचेबद्दल हकीकत समजली नाहीं. नागोजीराव यांनीं फलटणींत नोकरी केली. गळ्यांत अडकविण्याचा रेशमी बाण आमच्या घरांत होता. ठासून भरण्याच्या बंदुकीच्या उपयोगीं नियमितच दारू एक बारापुरती देणारी बाटलीहि असे. ते प्रथमतः महाड तालुक्यांतील बिरवाडी गांवीं येऊन राहिले. तेथें त्यांनीं भोसले घराण्यांतील गहिना नांवाच्या मुलीशीं लग्न केलें. तिचें नांव उमाबाई असें ठेविलें होतें. तेथें त्यांनीं कांहीं जमीनहि खरेदी केली. त्यांना दोन पुत्र व दोन कन्या अशीं अपत्यें होतीं. ज्येष्ठ कन्या लहानपणींच वारलीं. विठोजीराव हे ज्येष्ठ पुत्र. त्यांचें लग्न १०।११ वर्षांच्या वयास केलें होतें. पण ती मुलगी थोड्याच काळांत मरण पावली. दुसरा विवाह विसाव्या वर्षीं झाला.

“नागोजीराव यांस सही करण्यापुरतें लिहितां येत असे. पण आपल्या मुलास विद्या मिळाली पाहिजे याविषयीं त्यांना आस्था होती. म्हणून त्यांनीं बिरवाडी सोडली व महाडास येऊन राहिले. तेथें त्यांनीं नव्या पेठेंत जागा घेऊन घर बांधलें व चांभारखिंडी आणि महाड कसब्याच्या काकरतळें भागांत शेतजमीन घेतली. नागोजीराव हे उंचेपुरे, अंगानें जाडजूड व वर्णानें गोरे असे होते. त्यांचा आवाज भरदार असून बोलणें

गोड असे. यामुळें महाडास रहाण्यास आल्यावर थोड्याच दिवसांत त्यांची छाप पडून ते बरेच लोकप्रिय झाले व गांवांतल्या प्रतिष्ठितांत त्यांची गणना होऊं लागली. ते हरहुन्नरी होते. शिलाईचें काम त्यांना उत्तम प्रकारचें येत असे. पटवेगिरीचें व रफूचें कामहि त्यांना चांगलें येई. मोत्यांची परीक्षाहि चांगली असे. मोतीं विकण्याकरितां ते पुष्कळ फिरत.

"महाडास वीरेश्वराचें देवस्थान प्रसिद्ध आहे. सरकारांतून त्या देवस्थानास बरीच मोठी रकम दरसाल मिळते. देवस्थान चिरेबंदी बांधीव असून बरेंच मोठें आहे. देवळाच्या आंतील व बाहेरील भिंती टाकीनें चांगल्या घडविल्या आहेत. देवळाच्या गाभाऱ्याशिवाय बाहेर बसण्याची एक मोठी जागा आहे. इतकें दगडी बांधकाम झाल्यावर देवळापुढें विस्तीर्ण असा मंडप आहे. त्याची लांबीरुंदी ६०×४० पेक्षां कमी नाहीं. सभामंडपाच्या शेवटीं उंच चौथऱ्यावर मोठ्या बैलाच्या आकाराचा असा नंदी आहे. सभामंडपास माडी असून तेथें बायकांना बसण्याची सोय आहे. महाशिवरात्रीपासून उत्सवास सुरवात होते. उत्सव बरेच दिवस चालतो. उत्सवांत निरनिराळ्या ठिकाणच्या हरिदासांचीं कीर्तनें, पुराणिकांचीं पुराणें व अनेक नायकिणींचीं नाचगाणीं होत. जत्राहि मोठी भरते. त्या दिवसांत कापडाचीं व भांड्यांचीं मोठमोठीं दुकानें लागत असत. त्यांतील बरीचशीं दुकानें मोठमोठ्या पेठांतून येत आणि या व अनेक जिनसांचा व्यापार लाखो रुपयांचा चाले. पेण तालुक्यांतील आपटे या गांवीं आलेला पनवेलचा शिंग्या आपण येत्या महाडच्या जत्रेंत नवीन शिंग खरेदी करूं असें मजजवळ बोलल्याचें आठवतें. पनवेल हें गांव मुंबईपासून सुमारें ४० मैलांवर आहे व महाडपासून सुमारें ७५ मैलांवर आहे. यावरून त्या काळीं महाडच्या जत्रेचें व तेथील उत्सवाचें महत्त्व लक्षांत येईल.

"या उत्सवांत हरदास व गुणीजन यांची हजेरी लावणें, त्यांचीं गाणीं व कीर्तनें करविणें, त्यांचा देवस्थानाकडून योग्य सन्मान करविणें, अशा समारंभास हजर राहणाऱ्या थोर व प्रतिष्ठित मंडळींस त्यांच्या दर्जाप्रमाणें योग्य जागीं बसविणें, समारंभांत गडबड न होईल अशी व्यवस्था करणें हें काम किती महत्त्वाचें आहे हें सांगण्यास नकोच. असें महत्त्वाचें काम

उपरी असतांहि नागोजीरावांना मिळालें होतें; व हें काम त्यांचेकडे आमरण राहिलें. त्यांच्या पश्चात् आमचे वडील विठोजीराव यांनीं बरींच वर्षे चालविलें. नोकरीनिमित्तानें दुसरे गांवीं गेल्यावर तें काम करण्यास दुसऱ्या माणसाची नेमणूक झाली. हें काम केवळ उत्सवांतच करावें लागे असें नाहीं. देवळांत कीर्तनें व इतर सभा केंव्हांहि झाल्या तरी त्यांची व्यवस्था नागोजीरावच करीत. त्या काळीं नाटकें, ललितें वगैरे देवळाच्या सभामंडपांत होत. त्या काळीं बायका बसण्याच्या भागांत गडबड झाल्यास, मुलें रडल्यास नागोजीरावांची 'गप्प' म्हणून आरोळी ऐकल्याबरोबर शांतता होई व बायकांचीं भांडणें थांबत असें आमच्या आईकडून मीं अनेक वेळां ऐकलें आहे.

"महाडची व्यापारी पेठ त्या काळीं फार मोठी होती. देशावरील भुसारमाल व कापड यांचा व्यापार मोठ्या प्रमाणावर चालत असे. सुगीच्या दिवसांत मालानें लादलेले दोनदोन तीनतीन हजार बैल रोज येत. असा क्रम सहासात महिने चालत असे. महाड ही एक मोठी उतारपेठ होती. हा माल महाड बंदरांतून मुंबई व इतर प्रांतांत जात असे. फिट्जिराल्ड घाट बांधल्यावर गाड्यांची वाहतूक सुरू झाली, व बैलांचे तांडे कमी होत चालले. तरी माझ्या लहानपणीं पांचपांचशें बैलांवरून माल येई हें मीं पाहिलें आहे. गाड्या सुरू झाल्यावर कांहीं वर्षांनीं बैलांची वाहतूक अगदीं बंद पडली व तळावर हजार हजार गाड्या आलेल्या दिसत असत.

"मराठी राज्याच्या ऐन अमदानींत महाड हें बंदर सातारा व पुणें या दोन राजधान्यांना सारखेंच महत्त्वाचें होतें. यामुळें तेथील व्यापार मराठी राजवटीपासूनच भरभराटीचा होता. पुष्कळ मारवाडी व गुजराथी व्यापारी कायम वस्ती करून महाडांत मराठेशाहीपासून राहिले आहेत; आणि हे कापडाचा व्यापार मोठ्या प्रमाणावर करीत. नागपूरच्या पेठेंतीलहि माल आणवला जाई, आणि तो बहुधा उंटावरून येत असे. असे दहादहा, वीसवीस उंट लादून एकएका व्यापाऱ्याचा माल येई. माझ्या लहानपणींदेखील असे उंट आलेले मीं पाहिले आहेत. बहुतेक सर्व पेठांचा

माल महाडचे व्यापारी आणीत असत व महाड येथें हा व्यापार फार मोठ्या प्रमाणावर चाले.

" मारवाडी व गुजर व्यापारी कापड खरेदी करण्याकरितां दूरदूरच्या पेठांत स्वतः जात किंवा विश्वासू गुमास्ते पाठवीत. शुभ मुहूर्तावर निघण्याचें महत्त्व त्या वेळीं फार असल्यामुळें ज्योतिष्याकडून तो वेळ काढून त्या वेळीं निघणें प्रवासाच्या दृष्टीनें शक्य नसल्यास त्या शुभ वेळीं प्रस्थान काढून कोणत्या तरी दुसऱ्याच्या घरीं ठेवण्याची वहिवाट असे. प्रस्थान काढून ठेवण्यांत आमचें घर विशेष पसंत असे. बाहेर देशीं जाणाऱ्या गाड्या रात्रीं आठ वाजल्यावर निघत असत. प्रवासास निघणारा माणूस त्या वेळीं घराबाहेर पडून आमच्या घरीं येऊन ठेवलेलें प्रस्थानाचें वस्त्र घेऊन जात असे; व त्या वेळीं एक नारळ प्रस्थान देणाऱ्या बाईच्या हातांत ठेवीत असे. ही वहिवाट आमची आई तेथें होती तोंपर्यंत चालू राहिली.

" महाडास आल्यावर नागोजीरावांनीं मुलास तेथील सरकारी शाळेंत घातलें. विठोजीराव व त्यांचा धाकटा भाऊ गणपतराव आणि त्यांची बहीण गंगाबाई इतकीं मुलें त्यांना होतीं. हीं तीन्ही मुलें शाळेंत जात असत. विठोजीराव व गणपतराव यांची बुद्धि कुशाग्र असल्यामुळें त्यांची अभ्यासांत चांगलीच प्रगति झाली; व तीं हुषार मुलें आहेत असें सर्व म्हणूं लागले. त्या वेळीं शाळा तपासणीदार अधिकारी युरोपिअन असत व त्यांच्या नजरेस एकादा हुषार विद्यार्थी पडल्यास ते त्याचा पुढील अभ्यास व्हावा म्हणून द्रव्यद्वारा मदत करीत. यामुळें आपली हुषारी दिसावी अशी पुष्कळांची इच्छा असे.

" विठोजीराव शाळेंत असतांना इन्स्पेक्टर येण्याचा दिवस आला. ह्या मुलाची हुषारी साहेबाच्या नजरेस आल्यास तो त्याच्या पुढील इंग्रजी शिक्षणाची तजवीज करील व हा कुणबटाचा पोरगा पुढें मामलेदार, मुन्सफहि होईल; त्याच्यापुढें ब्राह्मण कारकुनास वाकून रामराम करावा लागेल अशी भीति पडल्यामुळें ही आपत्ति टाळण्याकरितां शिक्षकवर्गानें विचार करून विठोजीरावांस फर्माविलें कीं, तूं उद्यां शाळेंत येऊं नकोस. या कारणानें विठोजीरावांस शाळेंत येतां आलें नाहीं, व त्यामुळें त्यांची हुषारी इन्स्पेक्टरच्या नजरेस आली नाहीं. पुढें मास्तरांनीं कांहींतरी दोष लावून

विठोजीरावांस शाळेंतून काढून टाकलें. यानंतर महाडापासून ३।४ मैलांवरील " नातें " या गांवच्या शाळेंत ते जाऊं लागले. इतकें दूर जाऊन परत येण्याचे श्रम त्यांना पुढें झेपेनात; व तेथील शिक्षणहि कनिष्ठ दर्जाचें होतें. त्यामुळें त्यांनीं शाळा सोडली. याप्रमाणें शिक्षणाची सोय नाहींशी झाल्याकारणानें १५ वर्षांच्या वयास विठोजीरावांनीं घर सोडलें व ते बेळगांवकडे पायींच निघाले. अनंत कष्ट करून आपलें पोट भरून त्यांनीं कांहीं शिक्षण मिळविलें. मग बांधकामाची माहिती करून घेतली. पूल, घर वगैरेचे प्लान काढणें व बांधकाम करून घेणें ते जाणत असत व करीत.

" विठोजीरावांना विसावें वर्ष लागल्यावर त्यांच्याकरितां वधूशोधन सुरू झालें. मोतीं विकण्याकरितां नागोजीराव जवळच्या प्रांतांतून फिरत. त्यांना नागांव, तालुके अलिबाग येथील गोविंदराव चव्हाणांची मुलगी पसंत पडली. सन १८५९–६० च्या सुमाराची ही गोष्ट आहे. त्या वेळीं नागोजीरावांनीं चव्हाणांस आपला निश्चय सांगितला. ते म्हणाले, " मुलाचें पहिलें लग्न मीं त्याच्या दहावे वर्षीं ज्योतिष्यांचें मत घेऊन, सगळे गुण जमवून त्यांच्या मतानें योग्य अशा वधूशीं केलें. पण ती मुलगी एक वर्षाचे आंतच वारली. माझा आतां ज्योतिषशास्त्रावर विश्वास राहिलेला नाहीं; म्हणून मुलीची पत्रिका मी पहाणार नाहीं व माझ्या मुलाचीहि दाखविणार नाहीं. आपला हा प्रीतिसंबंध जुळवावा अशी माझी इच्छा आहे." गोविंदरावांनींहि ती गोष्ट कबूल केली. आणि हा विवाह उभयपक्षीं श्रेयस्कर झाला. ह्या वेळेपासूनच लग्नकार्य जुळविणेच्या प्रसंगीं गेल्या ९० वर्षांत आमच्या घराण्यांत ज्योतिष्याचा सल्ला घेण्यांत आलेला नाहीं. प्रवासास जातेवेळींहि शुभ मुहूर्त पाहाण्याचें खूळ आमचे घरांत नाहीं.

## माझा जन्म व शिक्षण

" आमच्या वडिलांचें लग्न नागांव येथें झालें. लग्नानंतर पांच वर्षांनीं आमची थोरली बहीण साळूबाई ही जन्मली. तिच्या पाठीवर तीन वर्षांनीं सन १८६७ सालीं जून महिन्याच्या १७ तारखेस सोमवारीं ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमा शके १७८९ ह्या दिवशीं माझा जन्म झाला. हे दोन्ही जन्म नागांव येथेंच झाले. आम्ही दोघेंहि नातवंडें नागोजीरावांचीं मोठीं

आवडतीं होतों. मी तीन वर्षांचा असतांनाच त्यांचा नवज्वरानें अंत झाला. त्यापूर्वीं दररोज संध्याकाळीं ते आम्हांला कांहींतरी खाऊ देत याची मला आठवण आहे.

" सन १८६६ सालच्या सुमारास आमचे चुलते गणपतराव यांचा क्षयानें अंत झाला. त्यांचें वडील बंधूंवर ( विठोजीरावांवर ) फार प्रेम होतें, व तसेंच आमच्या आईवरहि होतें. आमचे वडील विठोजीराव त्या वेळीं येऊं शकले नाहींत. मरणापूर्वीं बरेच वेळां " मी दादांच्या पोटीं येईन " असें म्हणत असत. ही गोष्ट पुष्कळांना माहीत होती व मरणानंतर स्नान घालतांना ठकूबाई बागडे या म्हातान्या बाईनें " तूं पुन्हां पोटीं येणार असें म्हणतोस तर मी आतां खूण करत्यें ती घेऊन ये " असें म्हणून पाणी तापविण्याच्या भांड्याच्या तळची मशी आपल्या बोटावर घेऊन प्रेताच्या डाव्या कानशिलावर खूण केली. पुढें एकदोन वर्षांनीं माझा जन्म झाला, आणि खूण केल्या जागीं काळा डाग माझ्या डाव्या कानशिलावर आईला दिसून आला. याचें सर्वांना फार आश्चर्य वाटलें. मी मोठा झाल्यावर त्या डागाबद्दल वारंवार बोलणें निघे व ठकू बागडेनेंहि खूण केल्याचें माझ्या समक्ष अनेक वेळां सांगितलें आहे. अशा प्रकारच्या डागाला " लासें " म्हणतात. हें लासें जन्मापासूनचें असतें.

" मी पांच वर्षांचा झाल्यावर मला शाळेंत घातलें. शाळा खासगी होती. ती पिंगळे या नांवाच्या गृहस्थानें आमच्या शेजारच्या मारुतीच्या देवळांत काढली होती. पाटीपूजन वगैरे होऊन वडील मला शाळेंत ठेवून घरीं गेले. थोड्याच वेळानें पंतोजीनें छडीचा प्रयोग मजवर केला. त्याबरोबर मी रडत रडत घरीं आलों; व त्या शाळेंत जाणार नाहीं असें आईवडिलांस बजाविलें.

" बाबाजी लिंबाजी शिर्के हे आमच्या वडिलांचे दोस्त. त्यांचे वडील पेन्शनर सुभेदार मेजर होते. बाबाजीराव हे हुन्नरी, बोलण्याचालण्यांत हुषार होते; व त्यांचा मजवर लोभ होता. त्यांनीं मला विचारलें, " मी शाळा काढतों; तूं माझ्या शाळेंत येशील का ? " मीं त्यांना सांगितलें, " तुम्ही मला केव्हांहि मारणार नाहीं आणि माझा धडा झाल्याबरोबर मला बाहेर जाऊं देईन असें कबूल कराल तर मी तुमचे शाळेंत येईन.

"याप्रमाणें कबुली मिळाल्यावर मी त्यांच्या शाळेंत जाऊं लागलों. त्यांनीं मला ममतेनें शिकविलें. मूळाक्षरें, बाराखड्या व इतर उजळणीहि यांचे धडे रोज सकाळीं एक व संध्याकाळीं एक असे तयार करीं. संध्याकाळीं परवचा म्हटला जाई. याप्रमाणें सहा महिन्यांत सारी उजळणी, औटकी, एकोत्री व रेघांचें गणित यासुद्धां तयार झालें. पुढें बाबाजीराव आजारी पडले व शाळा बंद झाली. मग मी सरकारी शाळेंत दुसऱ्या इयत्तेंत दाखल झालों.

"तेथें पंढरीनाथ सुदामे हे ब्राह्मण गृहस्थ हेडमास्तर होते. ते सुधारक मताचे होते. त्या काळीं "सुधारक" ही एक शिवी होती. ते फार उदार मताचे असून माझ्यावर त्यांचें प्रेम होतें. ते आमच्या वडिलांचे मोठे स्नेही होते. सरकारी शाळेंत माझा अभ्यास इयत्तेप्रमाणें चालत असे. पंढरीनाथांना महार वगैरे अस्पृश्यांनीं शिकावें असें फार वाटे. म्हणून त्यांनीं त्यांचीं मनें वळवून कांहीं मुलें शाळेंत आणलीं. गांवामध्यें याबद्दल मोठा गवगवा झाला व इतर मुलें शाळेंत येईनात. वडिलांच्या सांगण्यावरून मी मात्र शाळेंत जात असें. इतर कांहीं थोडीं मुलें येत. थोड्याच दिवसांत डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टर आले व त्यांनीं महारमांगांच्या मुलांकरितां निराळी शाळा देववून, शाळा पूर्वीप्रमाणेंच चालावी अशी योजना केली. पंढरीनाथ सुदामे यांच्या भावाचे दोन मुलगे त्यांच्याकडे शिकण्यासाठीं होते. त्यांतील धाकटा सीताराम सखाराम सुदामे ह्याची व माझी चांगलीच गट्टी जमली. आम्ही बरोबरच शिकत होतों. श्री. पंढरीनाथ सुदामे यांचीं मतें इतकीं उदार व प्रगत होतीं कीं, त्यांनीं आपल्या एका बालविधवा सुनेस शिक्षण देऊन स्वावलंबी केलें होतें.

"या सुमारास फिट्‌जिराल्ड घाट तयार झाला व महाडहून महाबळेश्वरास गाडीतून येण्याजाण्यास सुरवात झाली.

"नेक नामदार फिट्‌जिराल्ड गव्हर्नरसाहेब हे महाडहून दरसाल महाबळेश्वरीं जाऊं लागले. दासगांवला लॉंचनें उतरतां येत असे. तेथून महाबळेश्वर फक्त ४१ मैल; म्हणून कांहीं दिवस हा रस्ता महाबळेश्वराकरितां जवळचा होता.

" आमच्या आईबरोबर नागांवास गेल्या वेळीं ३।४ महिने मी तेथील शाळेंत जात असें. बाणकोटचा धक्का बांधण्याच्या कामावर आमच्या वडिलांची नेमणूक झाल्याकारणानें मी थोडे दिवस तेथील शाळेंत गेलों. पुढें तें काम पुरें होऊन त्यांची नेमणूक हरणईस झाल्यावर तिकडे मी गेलों व तेथील शाळेंत कांहीं महिने मी ४ थ्या इयत्तेंत होतों. तेथून राजापूरला नळाचें पाणी आणण्याच्या कामावर वडिलांची नेमणूक झाली, तिकडे त्यांचेबरोबर जावें लागलें. धरणाचें काम चालू होतें तोंपर्यंत शाळेंत जाण्यास सवड झाली नाहीं. परंतु तें काम पुरें झाल्यावर आम्ही गांवाजवळ राहण्यास आलों. तेव्हां रोज सकाळीं गांवांत शाळेस जावें; दुपारीं तेथें लेलेबाईच्या खाणावळींत जेवावें व संध्याकाळीं मुक्कामाला परत यावें असा क्रम उन्हाळ्याचे २।३ महिने चालला होता. पण पुढें आम्ही गांवांतच राहायला गेल्या कारणानें खाणावळीचा त्रास चुकून दोन्ही वेळां घरचें जेवण मिळूं लागलें. या वेळीं माझें वय ११ वर्षांचें होतें व मी ५ व्या इयत्तेंत शिकत होतों.

" राजापुराहून आम्ही महाडास परत आलों. वडील काम पुरें होई-पर्यंत मागें राहिले. आम्ही भाड्याचा मचवा केला होता. त्यांत सर्व सामान भरून आम्हीहि त्यांत बसलों. मचवा खारव्यांचा होता. सर्व खलाशी एका कुटुंबांतील होते. त्यांच्या घरीं त्यांनीं एक दिवस मुक्काम केला. आम्हांलाहि तेथेंच उतरावें लागलें. घरचे मुख्य पुरुष दोन भाऊ होते व त्यांच्या कुटुंबांत लहानमोठी ८५ मंडळी होती. आमच्या आईला त्या कुटुंबाच्या एकोप्याविषयीं फार आदर वाटला.

" तेथून निघून जैतापुराहून आम्ही समुद्रांत आलों व उत्तर दिशेकडे जाऊं लागलों. परंतु उत्तरेकडून जोराचा वारा असल्यानें आमची गति फारच मंद झाली, व दोन दिवसांत आम्ही रत्नागिरीपर्यंतच पोंचलों. ओकून ओकून आमचे फार हाल झाले. तेव्हां आमच्या आईनें मचवा रत्नागिरीस घेण्यास सांगितलें. तेथें आम्ही सर्व उतरलों व आगबोटीनें बाणकोटपर्यंत जाऊन पुढें लॉंचनें दासगांवास उतरून महाडास गेलों. सामान मचव्यानें मागाहून ८।१० दिवसांनीं आलें. या प्रवासांत जे

अनुभव आले त्यांत आमच्या आईचा करारीपणा व हिंमत हीं चांगलींच दिसून आलीं.

"घरीं आल्यावर मी महाडच्या शाळेंत जाऊं लागलों. ६ वी इयत्ता ही अखेरची असून ती परीक्षा पास झाल्याबरोबर सरकारी नोकरींत प्रवेश होई. पण त्या परीक्षेस बसण्यास १८ वर्षें पुरीं व्हावीं लागत. माझा सगळा अभ्यास झाला होता. पण वय केवळ १२ वर्षांचें! यामुळें परीक्षेस बसतां येईना. माझ्याबरोबरीचीं मुलें परीक्षेला बसून पास होऊन नोकरीलाहि लागलीं; पण मला एकाच वर्गांत तोच तोच अभ्यास घटवीत रखडावें लागलें.

"या सुमारास पंढरीनाथ सुदामे यांनीं आपल्या घरीं गणपतीचा उत्सव नवीन धर्तीवर मोठ्या थाटानें केला. मुलांचा मेळा तयार करून त्यांचेकडून पदें म्हणवून घेतलीं जात. गणपतीपुढें रोज कांहीं ना कांहीं कार्यक्रम होत असे. हा सगळा प्रकार लोकांना अगदीं नवीन होता. अनंतचतुर्दशी दिवशीं विसर्जनाच्या वेळेस गणपतीमागून खुद्द हेडमास्तर, इतर सर्व शिक्षक मंडळी व गांवांतील कांहीं प्रमुख प्रतिष्ठित गृहस्थ अशी मिरवणूक राजाच्या तळयावरून निघून वीरेश्वराच्या देवळावरून नदीवर राजाच्या घाटावर गेली. हा उत्सव महाडांत बराच गाजला. परंतु दुसरी गणेशचतुर्थी येईपर्यंत पंढरीनाथांची बदली भिवंडी येथें झाली. त्यामुळें तसा उत्सव महाडकरांस पुन्हां पहावयास मिळाला नाहीं.

"सन १८९३ सालीं श्री. टिळकांनीं सार्वजनिक गणेशोत्सव पुणें येथें सुरू केला. त्यापूर्वीं बारा तेरा वर्षें पंढरीनाथांनीं उत्सव महाडास सुरू केला होता ही गोष्ट विसरतां कामा नये.

"मराठी सहावी इयत्ता पास होऊन तलाठी होण्याची आकांक्षा, वय कमी असल्यामुळें पुरी करतां येईना व इंग्रजी शिक्षणाची सोय त्या वेळीं महाड येथें नव्हती. हा पेंच पंढरीनाथ सुदामे यांच्या बदलीनें सुटला. त्यांनीं भिवंडीस जातांना आपला पुतण्या सीताराम यास बरोबर घेतलेंच, परंतु मी व गणपती अर्जुना भोजने या दोन मराठे मुलांस व पर्वते नांवाच्या एका ब्राह्मण मुलासहि नेलें. हा प्रवास आम्हां सर्वांना फार गमतीचा वाटला. नागोठण्यापर्यंत बैलगाडीनें, तेथून धरमतरीपर्यंत मचव्यानें व

घरमतरीहून मुंबईपर्यंत आगबोटीनें, तेथून कल्याणपर्यंत आगगाडीनें व भिवंडीपर्यंत टांगा, होडी व टांगा अशा रीतीनें पुरा झाला. त्या वेळीं मुंबई बघावयास मिळाली नाहीं व आगगाडीचा प्रवास रात्रीं झाल्यानें त्याचीहि कांहीं कल्पना आली नाहीं. भिवंडीच्या शाळेंत ३।४ महिने काढल्यावर आमच्ये वडिलांस राईमुरघेकडे नोकरी लागल्यानें मी तिकडे गेलों. पुढें मला इंग्रजी शिकण्यासाठीं मामांच्या घरीं ठेवण्यांत आलें. "मुगभाट प्रायव्हेट इंग्लिश स्कूल" या शाळेंत इंग्रजी शिकण्यास सुरवात झाली. सीताराम सुदामे हा सहावी इयत्ता पास होऊन पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजमध्यें गेला व पुढें त्यानें नगर जिल्ह्यांत शिक्षकाची नोकरी धरली. गणपती भोजने हाहि सहावी इयत्ता पास होऊन त्यानें महाड येथें शिक्षकाची नोकरी पत्करली. पर्वते याचें काय झालें तें कळलें नाहीं.

"मुगभाट प्रायव्हेट इंग्लिश स्कूलमधून मी खेतवाडींतील विल्सन हायस्कूलमध्यें शिकण्यास गेलों. तेथून अलिबागच्या शाळेंत गेलों. आमच्या थोरल्या मामांचीं दोन मुलें माझ्याबरोबर शिकत होतीं. पुढें नागांव येथें राहून आम्ही अलिबागच्या शाळेंत रोज जात असूं. त्या वेळीं साखर व अलिबाग या दरम्यान पूल नव्हता. तरीनें खाडी ओलांडावी लागे. इंग्रजी शाळेच्या विद्यार्थ्यांना तरीची "फी" पडत नसे. ही सवलत शिक्षणास उत्तेजन देणारी होती. यापुढें वर्ष दीड वर्ष शिक्षण बंद पडलें होतें. प्रकृति चांगली नव्हती हें एक व शिवाय वडिलांची नोकरी डहाणू व जव्हार यांच्या मध्यावर एका खेडेगांवीं होती, त्यामुळें जवळचीं पुस्तकें वाचून वेळ काढावा लागे. हा मधला काळ संपवून वडील मुंबईस येऊन कामाठीपुऱ्यांत राहिले. तेथें एका सद्गृहस्थाच्या वशिल्यानें फणसवाडीच्या सरकारी शाळेंत तिसऱ्या इयत्तेच्या ज्यूनियर क्लासांत नांव घातलें. माझा तिसऱ्या इयत्तेचा अभ्यास झाला होता. पण सीनियर क्लासांत घेण्याचें हेडमास्तरनें नाकारलें. पण तिसऱ्या इयत्तेंत मला एकंदर सहाच महिने काढावे लागले. मी क्लासांत दाखल होऊन २।३ दिवस झाल्यावर एज्युकेशनल इन्स्पेक्टर परीक्षा घेण्यास आले. तेव्हां क्लासेस बदलून सीनियरचीं मुलें ज्यूनियर तिसरीच्या वर्गांत, तिसरीच्या ज्यूनियर वर्गांतील मुलें दुसरीच्या सीनियर वर्गांत अशा रीतीनें सर्व मुलांची

पिछेहाट केली, व परीक्षा सुरू झाली. मी तिसरीच्या ज्यूनियर वर्गांतच राहिलों. परीक्षेंत मी सर्व विषयांत पास होऊन माझा नंबर बराच वर आला. तेव्हां हेडमास्तरनें मोठ्या खुषीनें मला वरच्या वर्गांत घातलें. त्या वेळीं जगन्नाथ शंकरशेटची शाळा व फणसवाडीची शाळा अशा दोन मराठींतून इंग्रजी शिकविणाऱ्या शाळा गिरगांवांत असत. तिसऱ्या इयत्तेची परीक्षा एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें होत असे, व पास झालेल्या मुलांना चौथ्या इयत्तेंत घेत असत. यामुळें या दोन शाळांची मोठी स्पर्धा लागून राहिली होती. जगन्नाथ शंकरशेट शाळेचे हेडमास्तर, प्रख्यात लेखक विनायक कोंडदेव ओक हे होते. फणसवाडी शाळेचे हेडमास्तर प्रख्यात शांताराम मंगेश धुमे हे होते. हे शांताराम एम्. डी. अशी आपली सही करीत असत. या दोन मास्तरांची स्पर्धा कोणाचीं मुलें जास्त पास होतात व वरचा नंबर पटकावतात यांत लागली होती. चांगलीं मुलें आपल्या शाळेंत यावींत असे प्रयत्न दोन्ही शाळांतून चालत व शिक्षणहि कसून देण्यांत येई. शांताराम धुमे हे हेडमास्तर झाल्यापासून फणसवाडी शाळेचा दर्जा वर चढला होता. व तिच्यांतीलच मुलें जास्त पास होत व वरचा नंबर पटकावीत. परीक्षा नेहमींप्रमाणें एल्फिन्स्टन हायस्कुलांत झाली. मराठी शाखेंतील या दोन शाळा, गुजराती शाळा, व गुजराती शाखेंतील दोनतीन शाळा अशा सर्व मुलांची परीक्षा एकदां झाली तींत माझा पहिला नंबर लागला व एल्फिन्स्टन हायस्कूलच्या चौथ्या इयत्तेच्या ज्यूनियर वर्गांत माझा प्रवेश झाला व मला फीहि एकच रुपया ठरली.

"आमचे वडील नोकरीसंबंधानें पुन्हां काठेवाड (सौराष्ट्र) मधील वळा नामक एका लहान संस्थानांत मुख्य ओव्हरसिअर म्हणून गेल्या-कारणानें, शिक्षणांत व्यत्यय येतो कीं काय अशी भीति पडली. याच वेळीं कामाठीपुऱ्यांत व्यंकू बाळ या नांवाचे एक मोठे बिल्डिंग कॉंट्रॅक्टर होते व स्वामी रामय्या व्यंकय्या अय्यावारू हे त्यांचे एक भागीदार होते. सदर रामय्या स्वामी यांची आमचे वडिलांशीं दाट मैत्री होती. ते आमच्या वडिलांस मोठ्या भावासारखा मान देत. त्यांनीं मला आपले घरीं ठेवून घेतलें. ते कामाठीपुऱ्यांत ८ व्या गल्लींत रहात असत. तेथून धोबी तलावा-वरील एल्फिन्स्टन हायस्कुलांत रोज पायानें जावें लागे.

" एल्फिन्स्टन हायस्कुलांत चौथ्या, पांचव्या इयत्तेच्या प्रत्येक क्लासांत दरमहा तीन रुपयांची व सहाव्या व सातव्या इयत्तेंत दरमहा चार रुपयांची स्टायपेंड मिळत असे. एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें मी साडेचार वर्षें होतों; तेवढ्या मुदतींत फक्त दोन वेळां ही स्टायपेंड मिळाली नाहीं. एक वेळ मी तापानें सात आठ दिवस आजारी होतों. दुसऱ्या वेळेस आमची आई महाडास फार आजारी होती म्हणून तिकडे जावें लागलें. माझ्याबरोबर स्पर्धा करणारा चिंतामण पांडुरंग बापट या नांवाचा मुलगा होता. १८८७ च्या जून महिन्यांत आम्ही दोघेहि सातव्या इयत्तेच्या ज्यूनियर वर्गामध्यें गेलों. परीक्षेला फक्त पांच महिन्यांचा अभ्यास होता. अभ्यास बरोबर होणार नाहीं म्हणून मी परीक्षेला बसण्याचें धाडस केलें नाहीं. बापट यानें तें धाडस केलें व तो पासहि झाला. पण त्याचा नंबर फार खालीं आला व त्याला पुढील परीक्षांत सेकंड क्लासहि कधीं मिळाला नाहीं. एकदोन गोतेहि मिळाले. अशा तऱ्हेनें एकंदरींत त्याचें नुकसान झालें. त्याचा माझा स्नेह त्याच्या मरणापर्यंत टिकला. सांगली संस्थानांत त्यांनीं मोठी जबाबदारीची नोकरी केली व नांवहि कमावलें. "

## मॅट्रिक व पुढील शिक्षण

श्री. भास्कररावांच्या वरील आत्मपर निवेदनावरून कोणत्या बिकट आणि प्रतिकूल परिस्थितींत त्यांनीं शिक्षण संपादन केलें याची कल्पना येते. भास्कररावांचे वडील विठोजीराव यांना कामानिमित्त मुंबई व इतर ठिकाणीं वास्तव्य करावें लागे. स्वतः उपजत हुषार, कसबी व हरहुन्नरी असूनहि केवळ आपणांस शिक्षण नसल्यामुळें आपण मागें पडलों याची तीव्र जाणीव त्यांना होती. मागसलेल्या वर्गांची होत असलेली शैक्षणिक, धार्मिक व सामाजिक कुचंबणा त्यांना अतिशय प्रखरतेनें जाणवे. तेव्हां आपणाला जें शिक्षण मिळूं शकलें नाहीं तें आपल्या मुलांना मिळवून द्यायचें असा त्यांचा निर्धार होता. १८८८ सालच्या मॅट्रिक परीक्षेंत श्री. भास्करराव पहिल्या नंबरानें उत्तीर्ण झाले आणि त्यांच्या वडिलांनीं जी महत्त्वाकांक्षा बाळगली होती ती एकप्रकारें सफल झाली. श्री. भास्कर-रावांच्या शिक्षणास उशिरां सुरवात झाल्यामुळें मॅट्रिक होण्यास इतका वेळ

लागला. ही परीक्षा सुरू होण्याच्या अगोदर दोनच दिवस त्यांचा दोन वर्षांचा आवडता धाकटा भाऊ यशवंत हा वारला होता. मॅट्रिक परीक्षेचे वेळीं त्यांची जगन्नाथ शंकरशेटची संस्कृत स्कॉलरशिप केवळ तीन गुणांनीं हुकली. ते व इतर कांहीं विद्यार्थी ज्या ठिकाणीं परीक्षेस बसले होते त्या ठिकाणीं संस्कृतची प्रश्नपत्रिका वाटण्यास पंधरा मिनिटें उशीर झाला होता व विद्यार्थ्यांच्या तक्रारीवरून परीक्षक प्रो. जिनसीवाले यांनीं ठराविक वेळ संपल्यानंतर पंधरा मिनिटें जास्त वेळ देण्यांत येईल असें अभिवचन दिलें होतें. तथापि तेथील सुपरवायझरनीं ठराविक वेळेसच सर्व उत्तर-पत्रिका गोळा केल्या व भास्कररावांचा एक दहा गुणांचा प्रश्न राहून गेला होता.

आपल्या मॅट्रिकच्या पुढील शिक्षणासंबंधीं श्री. भास्करराव स्वतःच लिहितात, “ मॅट्रिक पास झाल्यावर मी विल्सन कॉलेजांत गेलों. तेथें १५ रु. ची स्कॉलरशिप व डेक्कन मराठा असोसिएशनकडूनहि तेवढीच स्कॉलरशिप मिळत असे. मॅट्रिकच्या वर्गांत असल्यापासून वडिलांनीं गिर-गांवांत बिऱ्हाड केलें होतें. त्यांचेजवळ मी रहात असें. प्रीव्हियस व फर्स्ट बी. ए. या परीक्षा पहिल्या वर्गांत विल्सन कॉलेजमधून झाल्या. त्या वेळीं विल्सन कॉलेज हें हल्लीं ज्या ठिकाणीं विल्सन हायस्कूल आहे तेथें भरत असे व नंतर त्याच वर्षीं तें चौपाटीवरील नवीन इमारतींत गेलें. १८९२ सालीं मी एल्फिन्स्टन कॉलेजांत गेलों व तेथून बी. ए. ची परीक्षा पास झालों. १८९३ व ९४ सालीं मी दक्षिणा फेलो होतों, तेव्हां दरमहा ६० रु. मिळत असत. पहिल्या वर्षीं इंग्रजी शिकविण्याचें काम माझेकडे होतें व दुसऱ्या वर्षीं गणित हा विषय होता. पहिले वर्षीं फर्स्ट एल्एल्. बी. ची टर्म भरून परीक्षेस बसून पास झालों. दुसरे वर्षीं सेकंड एल्एल्. बी. ची टर्म भरण्यास सुरवात केली. आमचे प्रिन्सिपाल हॉथार्नथ्वेट मोठे कडक शिस्तीचे होते. ते दर शनिवारीं एम्. ए. चा क्लास गणित विषयाचा घेत असत. बी. ए. झाल्यावर फेलोशिपच्या दोन वर्षांत गलांडे हे माझे सहाध्यायी होते. तेहि गणित विषय घेऊन फर्स्ट क्लासमध्यें पास झाले होते. आमचा दोघांचा विचार एम्. ए. चा अभ्यास करावयाचा नव्हता. परंतु शनिवारच्या क्लासला जाण्यापुरतें वाचावें लागे. १८९४ सालच्या

एम्. ए. च्या परीक्षेस मीं फॉर्म भरला नव्हता. परंतु गलांडे यांनीं आपला फॉर्म भरला असें कळल्यावर मींहि आपला फॉर्म युनिव्हर्सिटीला दिला व अभ्यासाला सुरवात केली. पुढें मी पास झालों व गलांडे पडले."

एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें भास्करराव दोन वर्षें फेलो होते. त्या सुमारास दक्षिण विभाग कमिशनरचे कचेरींत हेडक्लार्कची जागा रिकामी झाली होती. त्या जागेचा पगार रु. १९५ होता. त्या वेळच्या कमिशनरनीं एल्फिन्स्टनचे प्रिन्सिपाल यांस पत्र पाठवून त्यांच्या कॉलेजमधील एखाद्या हुषार पदवीधराची शिफारस करण्यास लिहिलें होतें. प्रिन्सिपालनीं श्री. मोबेदजी व श्री. भास्करराव या दोघांचीं नांवें सुचविलीं होतीं. श्री. मोबेदजी हे त्या वेळीं एम्. ए. प्रथम श्रेणींत पास झाले होते व भास्करराव बी. ए. असून फेलो होते. श्री. मोबेदजी एम्. ए. म्हणून त्यांची निवड झाली. पुढें ते कलेक्टरच्या हुद्यावरून रिटायर झाले.

बडोद्याचे श्रीसयाजीराव महाराज यांनाहि भास्कररावांची शैक्षणिक प्रगति माहीत झाली होती. त्यांच्यासारखा मनुष्य आपल्या संस्थानांत यावा ही इच्छा महाराजांना होती. त्यांनीं श्री. खासेराव जाधव यांचेमार्फत श्री. भास्कररावांकडे विचारणा केली. श्री. भास्करराव यांस अधिक शिक्षणाकरितां ते विलायतेस पाठविण्यास तयार होते. मात्र विलायतेहून परत आल्यावर भास्कररावांनीं बडोदें संस्थानांतच नोकरी केली पाहिजे अशी अट होती. ही अट भास्कररावांना पसंत नसल्यानें त्यांनीं महाराजांस नकार दिला. त्यावेळेस त्यांचा विचार कोठेंच नोकरी करण्याचा नव्हता. तर एल्एल्. बी. होऊन स्वतंत्र धंदा करावा व समाजसेवा करावी असा त्यांचा हेतु होता. त्याचप्रमाणें रामायण, महाभारतादि ग्रंथांचें अध्ययन करून त्यांवरील आपले विचार लोकांपुढें मांडावे असा त्यांचा हेतु होता. आपले हे विचार त्यांनीं १८९३।९४ सालच्या दैनंदिनींत नोंदले आहेत. त्या वेळीं कांहीं वर्षें ते आपली रोजनिशी लिहीत असत.

## कोल्हापुरास आगमन

१८९४ सालीं ते एम्. ए. झाले व एल्एल्. बी. च्या अभ्यासाकरितां मुंबईस राहिले होते. विठोबीराव त्यावेळेस सुरतेस नोकरी करीत होते.

याच वेळीं कोल्हापूरचे श्रीशाहू छत्रपति यांस अधिकारसूत्रें मिळालीं होतीं व त्यांची इच्छा आपल्या प्रजेमध्यें शिक्षणाचा प्रसार करावा अशी होती. संस्थानांतील ब्राह्मण व प्रभूवर्गाशिवाय इतर वर्गांत शिक्षणाचा प्रसार झाला नव्हता. आपल्या राज्यांत मागासलेल्या वर्गांतील अधिकारीवर्ग निर्माण झाल्याशिवाय आपल्या प्रजेच्या कल्याणाचे व उन्नतीचे कोणतेहि प्रयत्न सफल होणार नाहींत याची जाणीव महाराजांना होतांच त्यांनीं सुशिक्षित मराठा व तत्सम वर्गांतील लायक तरुणांचा संग्रह करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें महाराजांनीं त्यावेळचे आपले हुजूर चिटणवीस श्री. रघुनाथराव सबनीस (नंतरचे दिवाण सर रघुनाथराव सबनीस) यांचेमार्फत भास्कररावांबरोबर पत्रव्यवहार सुरू केला. पहिल्या दोनतीन पत्रांस भास्कररावांनीं उत्तरहि दिलें नाहीं. शेवटीं त्यांना एक रजिष्टर पत्र पाठवून निदान महाराजांस भेटण्यास तरी या म्हणून विनंति केली होती. महाराज इतके आपुलकीनें बोलावीत आहेत तर त्यांना नुसतें भेटून यावें, अवमान करूं नये अशी विठोजीरावांनीं आज्ञा केली. त्याप्रमाणें भास्करराव १८९५च्या जुलै अगर आगष्ट महिन्यांत कोल्हापूरला गेले. आगाऊ कळविलें असल्यावरून स्टेशनवर सरकारी गाडी घेऊन श्री. बळवंतराव दिलवर आले होते. खास पाहुणे म्हणून भास्कररावांची व्यवस्था नव्या वाड्यावर केली होती. दोनतीन दिवसांनंतर ही श्रीशिवछत्रपतींची गादी आहे व येथें राहिल्यास मराठा समाजाची सेवा करण्याची संधि मिळेल असें सांगण्यांत आलें. श्री. भास्कररावांचे मनांत बहुजनसमाजाच्या सेवेच्याच विचारांचें प्राबल्य झालें होतें. मागसलेपणामुळें आपल्या समाजाचें कसें नुकसान होत आहे, हें त्यांस दिसत होतें व तसा त्यांना अनुभव आला होता. आपल्या वडिलांना ते हुषार असतांहि शिक्षणास कां व कसें मुकावें लागलें याचीहि त्यांना पूर्ण जाणीव होती. तेव्हां होतां होईल तेवढें स्वतंत्रच रहावें असा विचार त्यांचे मनांत होता व सध्यां एल्‌एल्. बी. चा अभ्यास चालू आहे तेव्हां ती परीक्षा झाल्यावर पाहूं असें सांगून ती वेळ मारून नेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण श्रीशाहूमहाराज कसले खट! त्यांनीं सांगितलें कीं, 'तुमची आम्ही असिस्टंट सरसुभे म्हणून दरमहा रु. १५० वर नेमणूक केली आहे व परीक्षेकरितां तुम्हांस तीन महिन्यांची

भर पगारी रजा दिली असून तो सर्व पगार तुम्हांस आगाऊ मिळण्याची व्यवस्था होईल.' शाहूमहाराजांची ही आत्यंतिक कळकळ पाहून अशा धन्याच्या हाताखालीं समाजसेवेची संधि खात्रीनें मिळेल असें त्यांस वाटलें तर नवल नाहीं. अशा रीतीनें भास्करराव यांचा कोल्हापूरशीं संबंध जडून आला.

एल्एल्. बी. ची शेवटची टर्म भरून आल्याबरोबर भास्करराव आपल्या कामावर हजर झाले. या नोकरीवर रुजू होण्याच्या वेळच्या परिस्थिती-संबंधीं लिहितांना भास्करराव म्हणतात, "कै. राजाराम खंडेराव वैद्य हे सरसुभे होते. ते खालसामध्यें नांवाजलेले पेन्शनर डेप्युटी कलेक्टर होते. त्यांनीं मला रेव्हिन्यू कामाची चांगली माहिती दिली, व मला चांगल्या प्रकारें वागविलें. १८९६ च्या जूनमध्यें त्यांनीं आपलें काम सोडलें व त्यांचे जागीं श्री. रघुनाथ व्यंकाजी सबनीस, त्यावेळचे हुजूर चिटणीस यांची नेमणूक झाली. त्यांच्याहि हाताखालीं मला काम करण्यास मिळालें. १८९७ सालीं एल्एल्. बी. च्या परीक्षेस जाऊन आलों. तेव्हां प्लेगची सांथ असल्यामुळें क्वारंटाईनमध्यें बरेच दिवस बसावें लागेल असें वाटत होतें. परंतु कोल्हापुराहून तांतडीनें हुकूम गेल्यामुळें माझी सुटका एक दिवसांतच झाली. मला फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेटचे अधिकार देण्यांत आले व डिस्ट्रिक्ट ऑफिसरच्या जागीं नेमणूक झाली. १८९८ च्या डिसेंबरच्या २ तारखेस बापूसाहेबाचा जन्म कोल्हापुरास झाला. पुढें पांच सहा दिवसांनीं गोविंदराव मुंबईस परीक्षा देऊन उदगांवच्या क्वारंटाईनमध्यें एक दिवस राहून किणीच्या क्वारंटाईनमध्यें त्याला आणलें. माझा मुक्काम त्याच वेळीं तेथें ठेवल्यामुळें त्याची जेवणाची सोय झाली. किणीस आल्या-वर त्याची माझी भेट झाली, तेव्हां त्यानें मोठ्या उत्सुकतेनें विचारलें, "बाळ माझ्याइतकें काळें आहे काय?"

"वडगांवची प्लेग कामगिरी, १८९९ सालची दुष्काळ कामगिरी, १९०१ च्या खानेसुमारीची स्पेशल कामगिरी वगैरे माझेकडे आल्या होत्या. १९०२ सालीं श्रीशाहूमहाराज किंग एडवर्डच्या राज्यारोहणाप्रीत्यर्थ विलायतेस गेले होते. त्यावेळीं सरसुभे यांचा चार्ज माझ्याकडे आला होता. १९०८ सालीं श्रीमंत राजकन्या आक्कासाहेब महाराज यांच्या

विवाहासाठीं काशीहून कांहीं पंडित आणण्याकरितां मी श्री. गुंडोपंत पिशवीकरांना बरोबर घेऊन गेलों होतों व गागाभट्ट वंशांतील एक पंडित व आणखी कांहीं पंडित घेऊन आलों. नंतर राजकन्येचा विवाह मोठ्या थाटानें झाला. १९०९ सालीं श्रावण महिन्यांत तीर्थरूप विठोजीराव यांचें देहावसान झालें. आम्ही दोघेहि बंधु जवळ नव्हतों. मी तर संध्याकाळीं त्यांची परवानगी घेऊन बेळगांवास गेलों होतों. ते त्या दिवशीं संध्याकाळीं फिरूनहि आले होते; पण रात्रीं घटसर्पाचा विकार होऊन पहाटेस प्राणोत्क्रमण झालें. नातू जवळ होता. १९१० च्या एप्रिलच्या ४ तारखेस श्री. आक्कासाहेब महाराज यांस पुत्ररत्न ( सध्याचे श्रीछत्रपति शहाजी महाराज ) झालें. पुढें दोन दिवसांनीं ता. ६ ला आमच्या घरांत दुसऱ्या मुलाचा जन्म झाला. त्याचें नांव विठोजीराव–बाबासाहेब असें ठेविलें. ''

श्री. भास्कररावांनीं करवीर दरबारांत १८९५ ते १९२१ अशी सव्वीस वर्षें नोकरी केली. त्या अवधींत असिस्टंट सरसुभे, डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट, असिस्टंट जज्ज, नायब दिवाण, सरसुभे, म्युनिसिपालिटीचे सर्वाधिकारी वगैरे जागांवर काम केलें. त्याच वेळेस श्री. बापूसाहेब महाराज यांच्या आग्रहावरून सीनियर कागल जहागिरींत जजाचेंहि काम विनावेतन केलें. त्या उभयतांचा स्नेह असल्याकारणानें वेतनाचा प्रश्न आला नाहीं. याशिवाय वरचेवर स्पेशल कामगिऱ्या निघत असतच.

## कोल्हापुरचे दुसरे शिल्पकार

म्यु. पा. चे सर्वाधिकारी या नात्यानें श्री. भास्कररावांची कोल्हापूर शहरची सेवा अत्यंत अमोल अशी झाली. तीबद्दल श्री. जे. पी. नाईक यांनीं लिहिलेल्या ' कोल्हापूर नगरपालिकेचा इतिहास ' या पुस्तकांतील उतारा देणें अप्रस्तुत होणार नाहीं. श्री. नाईक ' सर्वाधिकाऱ्यांचा काल ' या ७ व्या प्रकरणांत लिहितात, " इ. स. १८८९ ते १९०४ या कालांत नगरपालिकेंत फार अव्यवस्था माजल्यामुळें ती बरखास्त करून सर्व अधिकार श्री. भास्करराव जाधव यांस देण्यांत आले. १९०४ ते १९१८ पर्यंत ते सर्वाधिकारी होते. नगरपालिकेचा कारभार त्यांचेकडे

देण्यांत आल्यानंतर खळबळ उडणें अपरिहार्य होतें. त्या वेळीं नगरपालिकेंत ब्राह्मण समाजाचें प्राधान्य होतें. कारण त्या वेळीं ब्राह्मण हेच बहुंशीं सुशिक्षित असल्यामुळें नगरपालिकेसारख्या सार्वजनिक कार्यांत त्यांचेंच प्राबल्य असल्यास त्यांत नवल नाहीं. यामुळें नगरपालिका बरखास्त करून तिचा अधिकार एका मराठा जातींतील पदवीधराकडे दिला ही गोष्ट तत्कालीन ब्राह्मण समाजाला अपमानास्पद वाटली व केवळ जातीच्या अभिमानामुळें प्रेरित होऊन त्यांनीं या घटनेविरुद्ध खळबळ उडविण्याला प्रारंभ केला. त्यांनीं अनेक सभा भरविल्या व दरबारकडे अर्ज व शिष्टमंडळें पाठविलीं. पण हा जातीय अभिमानानें प्रेरित होऊन झालेला विरोध फार काळ टिकणें शक्य नव्हतें. श्री. भास्करराव जाधव यांनीं अविश्रांत परिश्रमानें व असामान्य कर्तव्यतत्परतेनें नगरपालिकेंत इतकें स्पृहणीय स्थित्यंतर घडवून आणलें कीं त्यांच्या नेमणुकीविरुद्ध पुढें कोणालाहि आक्षेप घेण्याला जागा राहिली नाहीं. इतकेंच नव्हे तर दरबारनें घडवून आणलेली घटनाच इष्ट आहे, असें सर्वांना लौकरच वाटूं लागलें व या नेमणुकीबद्दलचा विरोध हळूंहळूं कमी होत गेला.

श्री. भास्करराव यांनीं प्रारंभीं नगरपालिकेच्या अंतर्गत व्यवस्थेकडे लक्ष पुरविलें व पुढीलप्रमाणें सुधारणा केल्या:—

१. वसूल रकमेची स्वतंत्र पावती देणें.

२. जमाखर्चाच्या पद्धतींत सुधारणा करून मासिक, त्रैमासिक व वार्षिक जमाखर्च ४८ तासांत कोणालाहि उपलब्ध केले.

३. वसूल बाकीचें दोन वर्षांचें थकलेलें काम पुरें करून कर व वसुली याविषयींची माहिती कोणालाहि व केव्हांहि मिळण्याची व्यवस्था केली.

४. थकबाकीच्या वसुलींत सुधारणा केल्यानें न. पा. च्या उत्पन्नांत भर पडली.

५. लोकांचे अर्ज, तक्रारी व इतर प्रकारचीं शिल्लक राहिलेलीं कामें तावडतोब निकालांत काढलीं.

६. न. पा. चें रेकॉर्ड व्यवस्थित लावलें. या कागदपत्रांच्या आधारें १८५४ ते १९०६ पर्यंतचा न. पा. चा सुसंगत असा इतिहास लिहिला.

श्री. जाधवराव यांच्या कामाची पद्धत प्रशंसनीय होती. ते दररोज सकाळीं घोडयावरून गांवांत फिरत व कोठें कांहीं दोष आढळल्यास ते तात्काळ दूर करण्याची दक्षता घेत. त्यांनीं शहरसुधारणेचा एक कार्यक्रम पुढें ठेवला. तो त्यांच्याच शब्दांत थोडक्यांत खालीलप्रमाणें आहेः—

" या अवस्थेंत पुढील कालांत कोल्हापूर शहरच्या गरजा काय होतील हें सांगणें अशक्य आहे. शहर व नगरपालिका यांची चांगल्या प्रकारें प्रगति होत आहे. व्यापाराची वाढ होत आहे. जीवनांतील रहाणीचा दर्जा वाढला आहे. शहरांतील शिक्षणांत अपेक्षेइतकी नसली तरी पुष्कळ वाढ झाली आहे. यामुळें नवीन गरजा वाढत आहेत, व त्या पुरविण्याची आवश्यकता भासत आहे. म्हणून सर्व काळांत उपयुक्त ठरेल अशा सुधारणेची योजना तयार करणें अशक्य आहे. तथापि माझ्या मतें आजच्या आवश्यक गरजा पुढीलप्रमाणें आहेतः—

१. आरोग्याची सुधारणा.

२. नगररचनेंतील सौंदर्याची वाढ.

३. सार्वजनिक सुखसोयी.

यासाठीं खालील गोष्टी करणें आवश्यक आहेः—

१. चांगल्या पद्धतीवर ड्रेनेजचें काम पुरें करणें.

२. गलिच्छ वस्ती व उपद्रवकारक उद्योग शहराबाहेर नेणें.

३. शहराबाहेर घरें बांधण्यास उत्तेजन देणें.

४. प्रकाश व मोकळी हवा मिळण्याकरितां बांधकामाचे नियम करणें.

नगररचनेच्या व लोकांच्या सुखसोयीच्या दृष्टीनें उपयुक्त असा हा कार्यक्रम आपल्यापुढें ठेवून तो तडीस नेण्याबाबतींत श्री. जाधवराव यांनीं अतोनात श्रम घेतले.

त्यांच्या कारकीर्दीत पुढीलप्रमाणें महत्त्वाच्या गोष्टी झाल्याः—

१ **फेरिस मार्केट**—या प्रेक्षणीय इमारतीनें नागरिकांच्या सोयींत व नगराच्या सौंदर्यांत चांगली भर घातली. कर्नल फेरिस यांनीं नगरपालिकेची प्रशंसनीय प्रगति घडवून आणल्यामुळें त्यांचें एकादें स्मारक नगरपालिकेनें करणें उचित होतें.

२ भंग्यांचा संप- पूर्वी भंग्यांवर कसलेंहि नियंत्रण नव्हतें. ते वाटेल तसें काम करीत. तेव्हां शिस्तीसाठीं नियम केल्यामुळें भंग्यांनीं पगार कमी व काम जास्त या सबबीवर संप केला. पण श्री. जाधवरावांनीं मुंबईहून तात्काळ नवीन भंगी आणवून तो संप मोडला. त्यामुळें नोकरवर्गावर चांगला वचक बसला.

३ प्लेगच्या कालांतील सोयी-श्री. जाधवराव यांनीं प्लेगच्या दिवसांत फार मोठी कामगिरी केली. १९०४-०५ सालीं प्लेगचे फार मृत्यु होत. त्या वेळीं गोरगरिबांस प्रेतें जाळण्याची फार मोठी पंचाईत पडे. त्यांतच लाकडाच्या व्यापाऱ्यांनीं लाकडांचा दर भरमसाट वाढविला. त्यामुळें प्रेतें जाळणें अशक्य झालें व लोक तीं पुरूं लागले. म्हणून श्री. जाधवराव यांनीं लाकडाचे दर निश्चित केले व प्रेतें जाळण्याची व्यवस्था सुलभ केली. स्मशानाचा रस्ता चांगला केला. स्मशानांतच लाकडें मिळण्याची व्यवस्था केली व प्रेतें जाळण्यासाठीं व लोकांना उभे रहाण्यासाठीं दोन शेड्स् बांधल्या. सारांश, याप्रमाणें भूतदयात्मक बुद्धीनें त्यांनीं बहुमोल कामगिरी करून लोकांचा दुवा घेतला.

४ अर्बन बँक-श्री. जाधवराव यांच्या कारकीर्दीतील एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे 'अर्बन को-ऑपरेटिव्ह सोसायटी' या संस्थेची स्थापना ही होय. सन १९११-१२ सालीं महाराष्ट्रांत सार्वत्रिक बँका बुडण्याची जणूं कांहीं एक सांथच आली होती. त्यामुळें लोकांचा बँकेवरचा विश्वास उडत चालला होता. तथापि लोकांना कर्ज मिळण्याच्या बाबतींत एखाद्या बँकेची जरूरी होतीच. म्हणून श्री. जाधवराव यांनीं बँक असें न म्हणतां 'अर्बन को-ऑपरेटिव्ह सोसायटी' असें नांव देऊन १९१३ सालीं ही संस्था स्थापन केली. पुढें या सोसायटीचें महत्त्व फार वाढलें.

त्यांच्या कारकीर्दींत घडून आलेल्या शाहूपुरीच्या वसाहतीच्या भरभराटीकडे अंगुलीनिर्देश करावा लागेल. ही वसाहत जरी १८९६ मध्यें कल्पिली गेली तरी श्री. भास्कररावांच्या वेळेपर्यंत तिच्याकडे कुणीं फारसें लक्ष दिलें नाहीं. असिस्टंट सरसुभे म्हणून काम करीत असतांनाच त्यांस शाहूपुरी वसाहत कमिटीचे सभासद नेमलें. शहराबाहेर येऊन वसाहत करणें लोकांस पसंत नव्हतें. वसाहत करणारांस उत्तेजन मिळावें म्हणून

निरनिराळ्या सवलती ठेविल्या गेल्या. शिवाय सर रघुनाथराव सबनीस, भास्करराव जाधव यांच्यासारख्या अधिकारी मंडळींनीं लोकांस उदाहरणा-दाखल स्वतः वसाहतींत जागा घेतल्या. भास्कररावांनीं ही वसाहत वाढविण्या-साठीं बरेच प्रयत्न केले व त्यांत यश येऊन १९२० पर्यंत या वसाहतीची फारच वाढ झाली. सध्या ती व्यापाराची मोठी उतारपेठ झाली आहे.

येथवर केलेल्या विवेचनावरून श्री. जाधवराव यांची चौदा वर्षांची कारकीर्द म्हणजे नगरपालिकेच्या इतिहासांतील दुसरें सुवर्णयुग आहे असें म्हणतां येईल. कोल्हापूर शहरांत रा. ब. माधवराव बर्वे यांच्यानंतर इतकें स्पृहणीय काम कोणीं केलेलें नव्हतें. म्हणून श्री. जाधवराव यांना कोल्हापूरचे दुसरे शिल्पकार ( The Second Builder of Kolhapur ) असें म्हणतां येईल व त्यांच्या महत्कार्याबद्दल कोल्हापूरची जनता त्यांची सदैव ऋणी राहील. ”

संस्थानची नोकरी म्हणजे त्यांतील प्रजेची सेवा हें श्री. जाधवराव यांचें ध्येय होतें. मागसलेल्या वर्गांत शिक्षणप्रसार करणें, त्यांच्यांत स्वत्वाची जाणीव उत्पन्न करणें, त्यांची मानसिक गुलामगिरी नष्ट करणें, त्यांच्या रहाणीचा दर्जा वाढविणें इत्यादि उद्दिष्टें त्यांनीं आपणासमोर ठेविलीं होतीं, व तदनुसार त्यांनीं आपल्या परीनें अनंत श्रम घेतले. श्रीशाहूमहाराजां-सारख्या राष्ट्रपुरुषाच्या सान्निध्यांत त्यांनीं आपल्या नोकरीचा तसा उपयोग करून घेतला. मराठा समाजांत शिक्षणाचा प्रसार होण्याकरितां वसति-गृहाची फार मदत होईल हें महाराजांच्या ध्यानीं येतांच व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंग सुरू झालें. बरींच वर्षें त्याची व्यवस्था श्री. जाधवरावांकडेच होती. तसेंच अस्पृश्य, प्रभु, जैन, लिंगायत, मुसलमान इत्यादि वर्गां-साठीं वसतिगृहें सुरू करण्यांत श्री. जाधवरावांनीं पुढाकार घेतला. श्री. आण्णा बाबाजी लठ्ठे यांस कोल्हापूर सोडावें लागल्यामुळें जैन बोर्डिंगवर एक प्रकारें गंडांतरच आलें होतें. त्या वेळीं श्री. जाधवरावांनीं व्यवस्थापक मंडळाचें प्रमुखत्व स्वीकारून तें ऊर्जितावस्थेस आणलें.

अस्पृश्यांबद्दल अनुकंपा त्यांना पूर्वीपासूनच होती. स्पृश्यास्पृश्य असा भेद त्यांनीं कधींहि पाळला नाहीं. त्यांचेवरील सामाजिक अन्याय दूर

व्हावेत यासाठीं सतत प्रयत्न केले. त्यांना संस्थानांत व बाहेरहि नोकऱ्या देवविल्या. गांवोगांवीं त्यांच्यासाठीं पाणी पुरवठ्याच्या व इतर अडचणींची समक्ष पाहणी केली. श्रीशाहूमहाराजांनीं सर्व महारांच्या वतनी जमिनी पुढें रयतावा करून दिल्या.

वर्तमानपत्राशिवाय लोकजागृति होत नसते हें तत्त्व ओळखून श्री. जाधवरावांनीं 'मराठा दीनबंधू' या नांवाचें एक वर्तमानपत्र सुरू करून तें स्वतः नुकसान सोसून २।३ वर्षें चालविलें. त्यावेळीं मागसलेल्या वर्गांत विद्येचा प्रसार अगदींच कमी असल्यानें भरपूर आश्रयाशिवाय तें चालविणें शक्य नव्हतें.

अशा तऱ्हेचीं निरनिराळीं कार्यें चालू असतांनाच कोल्हापुरांत 'राजोपाध्ये प्रकरण' फार गाजलें. राजोपाध्ये हे छत्रपतींचीं धार्मिक कार्यें उरकणारे भटजी. त्यासाठीं त्यांना वंशपरंपरागत इनाम होतें. तथापि ते छत्रपतींसह सर्व मराठ्यांना शूद्र म्हणून लेखीत असल्यानें त्यांचीं धार्मिक कार्यें क्षत्रियांस साजतील अशीं वेदोक्त पद्धतीनें न करतां पुराणोक्त करीत असत. शाहूमहाराजांस अर्थातच तें अपमानकारक वाटलें व आपलीं सर्व धार्मिक कार्यें वेदोक्त पद्धतीनेंच झालीं पाहिजेत अशी त्यांनीं राजोपाध्यांस आज्ञा केली व अवज्ञा झाल्यास उत्पन्न जप्त होईल असेंहि बजावलें. राजोपाध्यांनीं तें नाकारलें; तेव्हां त्यांचें उत्पन्न जप्त करणें भाग पडलें. या कामांत श्री. जाधवरावांनीं निरनिराळे ग्रंथाधार काढून छत्रपति हे क्षत्रियच आहेत व त्यांचे धार्मिक विधि वेदोक्त पद्धतीनेंच झाले पाहिजेत, राजोपाध्ये हे छत्रपतींचे नोकर असून त्यांची आज्ञा पाळणें हें राजोपाध्यांचें कर्तव्यच आहे; तेव्हां कर्तव्यच्युतीबद्दल शिक्षा करणें ही छत्रपतींच्या अधिकारांतील गोष्ट आहे असें पूर्णपणें सिद्ध केलें. यासाठीं त्यांस निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास करून आधार जमवावे लागले. राजोपाध्ये प्रकरण म्हणजे बहुजन-समाजाच्या जागृतीची नुसती सुरवात होय. शाहूमहाराजांसहि "ब्राह्मण्य" म्हणजे काय त्याची पूर्ण कल्पना आली.

## पहिली मराठा शिक्षण परिषद

मराठा समाजांत शिक्षणाचा प्रसार होण्यासाठीं जागृति करणें अवश्य होतें. त्यासाठीं श्री. जाधवराव यांनीं अनेक लेख लिहिले. निरनिराळ्या

पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन अशा संघटित प्रयत्नांची किती आवश्यकता आहे तें प्रतिपादलें. या प्रयत्नांमुळें पहिली मराठा शिक्षण परिषद धारवाड येथें १९०७ मध्यें श्री. खासेराव जाधव यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत आली. ती भरविण्यापूर्वीचा इतिहास त्या परिषदेचे स्वागताध्यक्ष या नात्यानें श्री. भास्कररावांनीं आपल्या भाषणांत सांगितला आहे. त्या वेळची कार्यकर्ती मंडळी स्वार्थत्यागी, समाजाचें कल्याण पहाणारी, निरपेक्ष व स्वतःचा बडेजाव न सांगणारी अशी होती. वास्तविक धारवाड परिषदेचा स्वागताध्यक्ष तेथील रहिवासी असणेंच योग्य होतें. परंतु त्या मंडळींनीं भास्कररावांस अत्यंत आग्रह करून स्वागताध्यक्ष केलें. यावरूनच भास्कररावांच्या निरपेक्षपणाची कल्पना येईल. या परिषदेंत श्री. भास्कररावांना सेक्रेटरी म्हणून निवडलें. दुसरी परिषद नाशीक येथें भरविण्याचें ठरलें होतें. ती तयारी करण्यासाठीं 'दीनबंधू' पत्राचे मालक रा. बिंजे हे तेथें जाऊन राहिले. पण दुर्दैवानें त्यांचा बळी कॉलऱ्यानें घेतला. परिषदेवर हें मोठेंच संकट आलें. कॉलऱ्याच्या सांथीमुळें नाशकास परिषद भरविणें अशक्य झालें. परंतु कांहीं झालें तरी सुरू केलेल्या उपक्रमांत खंड पडूं नये या इच्छेनें श्री. भास्करराव मुंबईस गेले व तेथील प्रमुख मराठा मंडळीस भेटून तेथें दुसरी परिषद भरविण्याचें निश्चित केलें. देवास मोठ्या पातीचे तुकोजीराव महाराज यांस अध्यक्ष नेमिलें होतें. पण ऐनवेळीं ते येऊं न शकल्यामुळें श्री. खासेराव जाधव यांसच पुन्हां अध्यक्ष व्हावें लागलें.

तिसरी परिषद उमरावतीस भरण्याचें ठरलें. प्रथमपासूनच म. शि. परिषदेचा व कोल्हापूरचा जिव्हाळ्याचा संबंध होता. श्री. भास्करराव हे स्वागताध्यक्ष व सेक्रेटरी होते. श्रीशाहूमहाराजांनीं धारवाडच्या परिषदेस देणगीहि दिली होती. या वेळीं एक निराळीच परिस्थिति निर्माण झाली. देवासचे महाराज श्री. तुकोजीराव यांचें नांव अध्यक्ष म्हणून जाहीर झालें. परंतु बडोदेकर मंडळींना कोल्हापूरचें पुढारीपण पसंत नव्हतें व त्या दृष्टीनें त्यांनीं धोरण आंखलें. बडोद्यापैकीं फक्त श्री. खासेराव जाधव यांचाच परिषदेशीं निकट संबंध होता. अध्यक्ष निवडण्याच्या अधिकारावरून बडोदा व कोल्हापूर असे पक्ष पडले व शेवटीं श्रीतुकोजीराव महाराज हे न

आल्यानें बडोद्याचे श्री. संपतराव गायकवाड यांच्या अध्यक्षतेखालीं हें उमरावतीचें अधिवेशन पार पडलें.

या वेळीं राजकीय वातावरण बरेंच गरम झालें होतें व त्यांतच म. शि. प. च्या या अधिवेशनांत बडोदेकरांच्या धोरणामुळें मामुली स्वरूपाचा राजनिष्ठेचा ठराव येऊं शकला नाहीं. यामुळें म. शि. प. वर अल्पवयांतच सरकारी अवकृपा होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां परिषदेच्या हिताच्या दृष्टीनें राज्यकर्त्यांचा दृष्टिकोन स्वच्छ रहावा या दृष्टीनें शाहूमहाराजांनीं दुसरी परिषद भरवावी अशी श्री. भास्कररावांस आज्ञा केली. शिवाय कोल्हापूरकर मंडळींस व खुद्द श्रीशाहूमहाराजांस व्यक्तिशः वैषम्य वाटण्या-सारख्या गोष्टी अमरावतीच्या परिषदेंत घडल्या होत्या. तेव्हां त्यांचा अशा तऱ्हेचा दृष्टिकोन बनणें साहजिक होतें. भास्कररावांचा तर यांत व्यक्तिशः अपमान झाला होता. कारण श्रीतुकोजीराव यांस अध्यक्ष करण्यांत त्यांचाच पुढाकार होता. परंतु त्यांना दुसरी परिषद भरविणें इष्ट वाटलें नाहीं. कारण त्यांच्यापुढें दुसराच महत्त्वाचा प्रश्न उभा होता. राजनिष्ठेचा ठराव गाळला गेला या गोष्टीला त्यांनीं मुळींच महत्त्व दिलें नाहीं. परंतु एकंदर सर्वसाधारण मराठा समाजाच्या दृष्टीनें दुसरी निराळी परिषद भरविणें ही गोष्ट अत्यंत अनिष्ट होती. यामुळें मराठा समाजांत कायमची दुफळी व वैयक्तिक वैमनस्य माजलें असतें. हा दृष्टिकोन त्यांनीं श्रीशाहूछत्रपतींना समजावून दिला व छत्रपतींनींहि मराठा समाजाचें कल्याण लक्षांत घेऊन आपला आग्रह सोडला व हें उपस्थित झालेलें वादळ शमलें. यावरून श्री. भास्करराव समाजाचें कल्याण दृष्टीपुढें कसें ठेवीत असत हें स्पष्ट होईल.

पहिल्या महायुद्धाचे वेळींहि भास्करराव यांची कामगिरी प्रशंसनीय अशी झाली. साम्राज्य सरकारचा पराभव झाल्यास त्याचे दूरवर परिणाम हिंदुस्थानास भोगावे लागतील याची जाणीव सर्व जाणत्या लोकांस होती. यासाठींच महात्माजीहि सरकारास आपण होऊन साह्य करण्यास पुढें सरसावले. सर्व संस्थानिकांनींहि आपापली जबाबदारी उचलली. अशा वेळीं श्रीशाहूमहाराजांचा पाय सर्वांपुढें होता हें लिहावयास नकोच. कोल्हापूरचे छत्रपति म्हणजे मराठ्यांचें आधिदैवत! त्यांत शाहूमहाराजांसारखा राष्ट्रपुरुष गादीवर! तेव्हां मराठा समाजावर त्यांचें केवढें प्रभुत्व होतें तें

न लिहितांहि कळण्यासारखें आहे. ब्रिटिश अमदानींत अनेक वर्षें शांततेंत गेल्याकारणानें मराठा समाजांतील लढाऊ वृत्तीचा लोप झाला कीं काय, अशी शंका येण्याइतका तो समाज थंड होता. साम्राज्य सरकार मराठ्यांची योग्यता ओळखून होतें. त्यांनीं श्रीशाहूमहाराजांच्या साह्यानें मराठ्यांची लढाऊ वृत्ति जागृत केली. मराठा पलटणींनीं रणांगणावर कसें शौर्य गाजविलें याचा इतिहास सर्वांस माहीत आहेच. पहिल्या महायुद्धांत 'कुतल-अमारा'चा वेढा अतिशय संस्मरणीय असा झाला. या किल्ल्यांत जनरल टौनशेंडच्या हुकमतीखालील ६००० मराठा फौज—इतर फौजेबरोबर—वेढली गेली व अन्नाचा तुटवडा पडल्यानें कुमक येईपर्यंत किल्ला कसा लढवावा याची पंचाईत पडली. सर्व तऱ्हेचा झाडझाडोरा खाऊन झाला होता व घोडे मारून खाल्ल्याशिवाय दुसरा इलाज शिल्लक राहिला नाहीं. मराठा पलटणींनीं धर्मबाह्य म्हणून घोड्याचें मांस खाण्याचें नाकारलें. सरकार मोठ्याच पंचाईतींत पडलें व त्यांनीं श्रीशाहूमहाराजांस मराठा पलटणींचें मन वळविण्यास विनंति केली. महाराजांनीं ताबडतोब भास्कररावांचा सल्ला घेतला. त्यांनीं क्षत्रियांस घोड्याचें मांस निषिद्ध नाहीं व छत्रपतींची आज्ञा हीच धर्माज्ञा आहे असे पुराणांतून व इतिहासांतून दाखले काढून दिले. त्याप्रमाणें महाराजांनीं एक आज्ञापत्र तयार करून "परत आल्यावर मी तुम्हांस माझ्या पंक्तीला घेईन" असें मराठा पलटणींना आश्वासन दिलें. त्या वेळीं महाराजांची ही आज्ञा खरी आहे हें पटण्यासाठीं श्री. भास्कररावांनीं त्या पलटणींत असलेले आपले आप्त सुभेदार दत्ताजीराव खानविलकर (नंतर ले. कर्नल) व हावलदार पांडुरंगराव देसाई (नंतर सुभेदार) यांस स्वदस्तुरचीं पत्रें दिलीं. तें आज्ञापत्र व तीं पत्रें विमानांतून किल्ल्यांत टाकण्यांत आलीं. मराठा पलटणींनीं त्या आज्ञेनुसार घोड्याचें मांस खाल्लें. वेळेवर मदत न येऊं शकल्यामुळें 'कुतल-अमारा' पडला व त्या शूर सेनेस शत्रूच्या कैदेंत जावें लागलें. महायुद्ध संपल्यावर जेव्हां या मराठा पलटणी परत मायदेशीं आल्या त्या वेळीं शाहूमहाराजांनीं दिलेल्या वचनाप्रमाणें मोठ्या समारंभानें त्यांचेबरोबर सहभोजन केलें. यावरून छत्रपति हे मराठ्यांचे धर्ममार्गदर्शक होते हें सिद्ध झालें. या विषयावर श्री. भास्कररावांनीं पुढें कांहीं लेखहि लिहिले.

संस्थानी वातावरणांत त्यांचा निभाव लागणार नाहीं, असें त्यांच्या इष्टमित्रांस नेहमीं वाटे. पण प्रथमपासूनच त्यांनीं आपलें काम, सचोटी, सत्यप्रियता, राजनिष्ठा व लोकसेवा यांचा असा कांहीं दर्जा करून ठेवला, कीं छत्रपतींपासून तों त्यांच्या प्रजाजनापर्यंत त्यांच्या चारित्र्याविषयीं, प्रामाणिकपणाविषयीं व न्यायप्रियतेविषयीं सर्वांची पूर्ण खात्री होती.

कामाशिवाय राजवाड्यावर अंमलदारांनीं जाऊन यावयाचें अशी प्रथा संस्थानांतून असे. या प्रथेला श्री. जाधवराव व फारच मोजकी मंडळी अपवाद असत. महाराजांनीं बोलाविल्याशिवाय अगर कामाशिवाय ते राजवाड्यावर जात नसत. बरोबर एकादें पुस्तक अगर वर्तमानपत्र असायचें. भेटीस वेळ असेल तर त्याचें वाचन चालू असायचें. ही गोष्ट छत्रपतींच्या लक्षांत येतांच तेच स्वतः जाधवरावांच्या बंगल्यावर येत व त्यांना घेऊन जात. काम संपल्यावर परत आणून सोडीत.

महाराजांनीं श्री. जाधवरावांची पारख बरोबर केली होती. प्रत्येक महत्त्वाच्या कामांत ते त्यांचा सल्ला घेत असत. हिंदुस्थान सरकारच्या संस्थान खात्यांतील व मुंबई सरकारशीं संबंध असलेल्या कामगिरीवर त्यांचीच नेमणूक होई. या कामीं जी तसलमात घापरण्यांत येई तिचा जमाखर्च ते नियमितपणें सादर करीत. श्रीशाहूमहाराजांचा भास्कररावांवर किती विश्वास होता हें खालील पत्रावरून दिसून येईल:—

Camp Rukadi,
Monday, 18-2-17.

My dear Jadhavrao,

Let me thank you for helping me with daring and moral courage on Sunday. I do not know what I could have done without you. I wish many of my officers could help me like this. Again thanking you for the zeal and courage you showed.

Yours very sincerely,
*Shahu Chhatrapati.*

## सातारा येथें वकिली

कोल्हापूर दरबारच्या नोकरींतून मुक्त होऊन १९२१ सालीं जाधवराव वयाच्या चोपन्नाव्या वर्षीं सातारा येथें वकिली करण्यासाठीं आले. सर्व-साधारण हिंदी माणसाचें हें वय म्हणजे विश्रांतीचें. पण सदैव काम आणि व्यासंग यांत व्यग्र असलेल्या व्यक्तीस स्वस्थ बसणें शक्य नसतें. नियमित दिनचर्या व निर्व्यसनीपणा यामुळें त्यांची प्रकृति निकोप राहून काम करण्याचा उत्साह व व्यासंगी वृत्ति कायम होती.

कायद्याची परीक्षा देऊन तेवीस वर्षें झालेलीं. तेव्हां पुनः वकिली आणि तीहि एका जिल्हा कोर्टांत करण्याची पाळी आली. तथापि नेहमींच्या अभ्यासू वृत्तीनें त्यांनीं कायद्यांच्या पुस्तकांची तात्काळ उजळणी करून आपल्या वकिलीचा थोड्याच काळांत चांगला जम बसविला. श्री. रघुनाथराव राणे व श्री. आत्माराम भिकाजी आचरेकर या दोघा तरुणांस मदतीस घेतलें.

वकिली करतांना जाधवरावांनीं केवळ पैशाकडे दृष्टि कधींहि ठेवली नाहीं. पक्षकाराची बाजू खरी असून त्याचेवर अन्याय होत आहे असें दिसलें तरच ते वकीलपत्र घेत. त्यांचे पक्षकार नेहमीं शेतकरी व मागस-लेल्या वर्गांतीलच लोक असत. त्या वेळीं सर्वत्र ब्राह्मणी वर्चस्व असे. अंमलदार ब्राह्मण, वकील ब्राह्मण व वादीप्रतिवादीहि ब्राह्मण अगर शेट-सावकार असायचे. अशा परिस्थितींत गरीब शेतकऱ्यास अगर इतर गरिबांस न्याय मिळणें कठीण जाई. चांगला वकील मिळणें तर अशक्यच. तेव्हां पैशाच्या दृष्टीनें जाधवरावांना कितपत लाभ होत असेल याची कल्पनाच केलेली बरी. मोबदल्याच्या बाबतींत पक्षकाराच्या ऐपतीवर व प्रामाणिकपणावर ते विश्वास टाकीत. कित्येकदां फीचे पैसे बुडत, पण त्याकडे त्यांनीं दुर्लक्षच केलें.

तीस वर्षांपूर्वी सातारा जिल्ह्यांत वाहतुकीचीं साधनें फारच अपुरीं होतीं. मोटार सर्व्हिस फार तुरळक व फक्त कांहीं तालुक्यांच्या गांवांना. राजकीय व सामाजिक जागृति करण्यासाठीं जाधवरावांना जिल्हाभर खेडोपाडीं दौरे काढावे लागले. मिळेल तें वाहतुकीचें साधन व जरूर तर घोड्यावरून वा पायीं जावयाचें, व्याख्यानें द्यावयाचीं, चर्चा करावयाच्या,

स्थानिक पुढाऱ्यांना मार्गदर्शन करावयाचें हीं कामें त्यांनीं उत्साहानें, कार्यनिष्ठेनें व निरलसपणें केलीं. त्यामुळें भास्करराचांचें नांव खेडोपाडीं व महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांत पोहोंचलें. बहुजनसमाज खडबडून जागा झाला; त्याला आपल्या संख्यासामर्थ्याची जाणीव झाली; शिक्षणाचें व एकीचें महत्त्व पटलें.

१९१९ मध्यें हिंदुस्थानास डोमिनियन स्टेटस देण्याकरितां जी पार्लमेंटरी कमिटी बसली होती, त्या वेळेपासून श्री. जाधवरावांच्या राजकारणास खरी सुरवात झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. या घटनेचें महत्त्व शाहूमहाराज पूर्णपणें जाणून होते व मागसलेल्या वर्गांचा प्रतिनिधि जर तेथें गेला नाहीं तर त्या वर्गांचें फार नुकसान होईल याबद्दल त्यांना शंका नव्हती. यासाठीं महाराजांनीं जाधवरावांस पाठविण्याची सरकारकडे खटपट केली व त्याप्रमाणें ते विलायतेस गेले. तेथें त्यांनीं हिंदुस्थानांतील बहुजन-समाज म्हणजे काय याची माहिती तेथील लोकांस विशेषतः लेबर पार्टीच्या सभासदांस करून दिली व मागसलेल्या वर्गांचे प्रतिनिधी न आल्यास बहुजनसमाजाचें नुकसान होईल असें त्यांस पटविलें. या बाबतींत त्यांची मुख्य प्रधान मि. रॅमसे मॅक्डोनाल्ड यांचेशीं चर्चा झाली. त्या वेळीं मॅक्डोनाल्ड म्हणाले कीं, मागसलेल्या वर्गानें दुसऱ्याच्या मदतीवर अवलंबून न राहतां स्वतःच्या पायावर उभें राहिलें पाहिजे. मजूर पक्षानें कोणाच्या मदतीची अपेक्षा केली नाहीं. आज तो आपल्या पायावर उभा आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, मजूर पक्षाकडून विशेष मदतीची अपेक्षा करूं नये. जाधवरावांनीं सांगितलें कीं, "तुमचें म्हणणें खरें आहे. परंतु मी जरी स्वतःच्या पायावर उभा राहिलों तरी माझ्या मुलाला कार्यक्षम करण्याची जबाबदारी माझेवर राहतेच व तशी मदत करणें हें माझें कर्तव्यच ठरेल. हिंदुस्थानांतील बहुजनसमाज अतिशय मागसलेला आहे. त्यास आतां कोठें स्वत्वाची जाणीव होत आहे. अशा स्थितींत इंग्लंडच्या सत्ताधारी मजूर पक्षाचें हिंदुस्थानांतील बहुजनसमाजास साह्य करणें हेंच कर्तव्य ठरतें." इंग्लंडमध्यें केवळ मराठ्यांच्याकरितांच खास जागा मागणें एकंदर धोरणाच्या हिताचें दिसेना. तेव्हां मराठे व तत्सम जातींकरितां त्यांनीं तेथें वकिली केली. त्यांच्या खटपटीमुळें मागसलेल्या वर्गांस

कायदेमंडळांत कांहीं जागा मिळाल्या व तेथें बहुजनसमाजाचे तुरळक प्रतिनिधी दिसूं लागले.

## ब्राह्मणेतर पक्षाची स्थापना व मंत्रिपद

१९२२ सालीं मुंबई सरकारनें त्यांना लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचें सरकारी सभासदत्व दिलें. तेथील प्रत्येक ठरावावर बहुजनसमाजाच्या वतीनें सभागृहास त्यांनीं माहिती दिली. त्या कौन्सिलमध्यें ब्राह्मणेतर सभासदांची संख्या अत्यंत थोडी होती. तरीसुद्धां त्यांना पक्षसंघटनेची कल्पना देऊन पुढील निवडणुकीची रूपरेखा आंखून दिली.

१९२३ सालची मुंबई कौन्सिल निवडणूक फार महत्त्वाची झाली. सुधारणेचा हप्ता मिळाला, त्यांतील कांहीं खातीं लोकनियुक्त मंत्र्यांच्या स्वाधीन केलीं गेलीं. कॉंग्रेस पक्षहि फारच मोठ्या प्रमाणावर संघटित झाला होता. सत्यशोधक समाज चळवळ व प्रसार यामुळें ब्राह्मणवर्गाचा अत्यंत कडवा विरोध व राग निर्माण झाला. ब्राह्मणेतर उमेदवारास व विशेषतः जाधवरावांना विरोध करून निवडणुकींत यशच मिळूं द्यावयाचें नाहीं असा चंग बांधला गेला. खुद्द सातारा जिल्ह्यांत श्री. भाऊसाहेब सोमण व रा. ब. रावजी रामचंद्र काळे हे "जुने आणि जाणते" वकील व अत्यंत वजनदार व्यक्ती यांना उभे करण्यांत आलें. जाधवराव व खा. ब. कूपर हे ब्राह्मणेतर पक्षातर्फे उभे राहिले.

बहुजनसमाजानें आपलें इमान राखलें. श्री. सोमण, जाधवराव व खा. ब. कूपर या क्रमानें यशस्वी उमेदवार निवडून आले. मागसलेल्या वर्गांत राजकीय हक्कांची जाणीव होऊं लागली व याचा परिणाम म्हणजे कायदेमंडळांत ब्राह्मणेतर पक्षाची स्थापना. या निवडणुकींत ब्राह्मणेतर पक्षाचे तेरा सभासद निरनिराळ्या जिल्ह्यांतून निवडून आले. जाधवरावांनीं त्यांची पक्षसंघटना करून सरकारास या पक्षास मान्यता देणें भाग पाडलें. साहजिकच या पक्षाचें नेतृत्व जाधवरावांच्याकडे आलें. पक्षनेते या नात्यानें सरकारनें त्यांना 'शिक्षण व आरोग्य'मंत्रि नेमलें.

पक्षाचे सभासद अगदींच अनभिज्ञ व कांहीं तर तरुण. तेव्हां अशा लोकांची संघटना टिकवायची हें अवघड काम होतें. परंतु या पक्षानें

परिस्थितीच्या मानानें पुष्कळच चांगलें काम केलें. त्यांचाच पुढारी मंत्रि-मंडळांत असल्यानें नेहमीं या पक्षाला सरकारशीं सहकार्य करावें लागे. परंतु बहुजनसमाजाच्या हिताच्याविरुद्ध एकादी गोष्ट घडत असली तर या पक्षानें सरकारच्या विरुद्धहि मत दिलें आहे. अशा रीतीनें मागसलेल्या वर्गांचें हित या पक्षानें पाहिलें. संख्या लहान, त्यांत पुढारलेल्या वर्गांतील लोकांचा विरोध; अशा स्थितींत सरकारशीं मिळतें घेण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. या पक्षावर नोकरीच्या मागें लागणारा पक्ष अशी टीका होत असे. परंतु त्यांत वैषम्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. सर्व नोकऱ्या वरिष्ठ जातींतील लोकांच्या हातीं, त्यामुळें सर्व सत्ता त्यांच्याच हातांत. तेव्हां मागसलेल्या वर्गांचें नुकसान सहजासहजीं करतां येत असे. कोणतीहि नोकरी ही आपली मत्ता आहे अशी कोती कल्पना पुष्कळ ब्राह्मणांची होती. याचें एक ठळक उदाहरण देतां येईल. १९२७ सालीं श्री. सी. रा. तावडे यांची पुणें ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपाल म्हणून नेमणूक झाली. त्यावर एका ब्राह्मण गृहस्थांनीं "अरेरे, एक ब्राह्मण कुटुंब बुडालें!" असे उद्गार काढले. या गृहस्थांचें रा. तावडे यांच्याशीं शत्रुत्व होतें असें नाहीं. त्यांनीं त्यांना कधीं पाहिलेंहि नाहीं. परंतु नोकरी ही पुढारलेल्या वर्गांचीच मत्ता आहे असा त्यांचा प्रामाणिक समज होता, म्हणून असे उद्गार त्यांच्या तोंडांतून आले. यावरून समाजाची मनोरचना कशी होती हें स्पष्ट होईल. अर्थात् जर मागसलेल्या समाजाला वर यायचें होतें तर त्याला सत्ता मिळाल्याशिवाय तें शक्य नव्हतें. तेव्हां त्या समाजांत अधिकाधिक नोकऱ्या मिळणें हें समाजहिताच्या दृष्टीनें योग्यच होतें. म्हणून ब्राह्मणेतर पक्ष केवळ नोकरीच्याच मागें लागला अशी टीका व्यर्थ आहे. नोकरी मिळविणें हें पक्षाचें साध्य नव्हतें, तर साधन होतें. यामुळें बहुजनसमाजाचा अधिकारी वर्गांबरोबर जास्त संबंध आला व एकंदर प्रगतीच्या दृष्टीनें तें योग्यच होतें.

जाधवरावांच्या या नेमणुकीनें बहुजनसमाजांत जरी चैतन्य नि उत्साह निर्माण झाला तरी ब्राह्मणवर्गांतून, वृत्तपत्रांतून त्यांच्यावर टीकेचा, उपहासाचा, कुचेष्टेचा नुसता वर्षाव झाला. 'भास्कऱ्या दिवाण झाला' या ध्रुवपदाचीं अनेक पद्यें रचलीं जाऊन तीं जाहीर मेळ्यांच्या कार्यक्रमांतून

गायलीं जाऊं लागलीं. अनेक तऱ्हेच्चीं व्यंगचित्रें प्रसिद्ध झालीं. परंतु जाधवरावांनीं असल्या प्रकाराची व अपप्रचाराची दखलसुद्धां घेतली नाहीं. इतके जरी प्रकार चालू झाले, तरी त्यांनीं अधिकाराच्या जोरावर कोणाहि ब्राह्मणावर अन्याय केला नाहीं. ज्याची बाजू खरी असेल मग तो कोणत्याहि जातीचा असला तरी त्याच्यासारखा न्याय मिळे. त्या वेळीं गोऱ्या नोकरशाहीचा वरचष्मा फार असे. गोऱ्या चिटणिसा (सेक्रेटरी) ला सरळ गव्हर्नरपर्यंत जातां येत असल्यानें त्याच्या वरिष्ठ मंत्र्याची फार कुचंबणा होई. जाधवरावांनीं आपल्या गोऱ्या चिटणिसाची मिजास कधींच चालूं दिली नाहीं.

जीं खातीं त्यांच्याकडे होतीं त्यांची त्यांनीं समग्र माहिती करून घेतली. सर्व इलाखाभर दौरे काढले व प्रत्येक प्रकरणाचा स्वतः अभ्यास व चौकशी करून तें निकालांत काढलें. सरकारी वरिष्ठ नोकऱ्यांतून ब्राह्मणेतर उमेदवारांना शिरकाव मिळावा यासाठीं अहर्निश खटपट केली. कौन्सिलपुढें येणारें कोणतेंहि बिल किंवा ठराव असेल त्याचा सांगोपांग विचार व अभ्यास करून आपल्या पक्षाचें मत ते ठरवीत. ब्राह्मणेतर पक्षाचें संख्याबल लहान असल्यानें कित्येक लोकहिताच्या बिलांबाबत त्यांना सरकारी व मुसलमान सभासदांच्या गटांचें साहाय्य घ्यावें लागे.

१९२६ सालीं पुन्हां कौन्सिल निवडणूक झाली. याच सुमारास ब्राह्मणेतर पक्षांत फाटाफूट सुरू झाली. सातारा जिल्ह्यातर्फे जाधवराव पुन्हां निवडणुकीस उभे राहिले. याहि खेपेस विरोध कांहीं कमी नव्हता. रा. ब. रा. रा. काळे, कराडचे वकील श्री. लक्ष्मणराव देशपांडे व खा. ब. कूपर हे उभे होतेच. शिवाय खास मराठ्यांकडून जाधवरावांना विरोध होऊन मतें फुटावीं यासाठीं सातारा येथील एक तरुण वकील श्री. रा. बा. शिंदे यांना उभें करण्यांत आलें. श्री. आचरेकर हे कोल्हापूर दरबारच्या नोकरींत होते. तेहि रजा घेऊन निवडणुकीस उभे राहिले. त्यांना कोल्हापूरची मदत होती व तिकडच्या मोटरी जाधवरावांस मिळूं नयेत अशा खटपटी झाल्या. सातारा जिल्ह्यांतील मतदारांवर कोल्हापुरांतील त्यांच्या नातेवाईकांकडून दडपण आणण्याचे प्रयत्न झाले. परंतु साताऱ्यानें जाधवरावांना पहिल्या नंबरानें निवडून दिलें व त्यांच्या सेवेचा गौरव केला.

याच निवडणुकींत पुणें जिल्ह्यांतून श्रीमंत खासेसाहेब पवार (नंतर ज्यूनिअर देवासाधिपति) हे निवडून आले. त्यांना ब्राह्मणेतर पक्षानें नेता निवडून मंत्रिपद त्यांच्या पदरांत पडावें अशी पक्षांतील कांहीं सभासदांची मनीषा व खटपट होती. दुही निर्माण झाल्यामुळें ब्राह्मणेतर पक्षास दिवाणपदास मुकावें लागलें.

थोड्याच अवधींत श्रीमंत खासेसाहेब यांनीं राजकारणांतून अंग काढून घेतलें व पक्षांत पुन्हां एकी झाली.

दिवाणपदावर नसतांनाहि जाधवरावांनीं कौन्सिलमध्यें पहिल्याप्रमाणेंच निरलसपणें काम सुरू ठेवलें. ज्या मतदारांनीं निवडून दिलें, त्यांची बाजू जोरदारपणें पुढें मांडावयाची, त्यांच्या हिताला बाधक अशा कोणत्याहि बिलास, ठरावास व कायद्यास कसून विरोध करावयाचा यांत अंतर पडूं दिलें नाहीं.

१९२८ सालीं पक्षांत एकी झाल्यावर त्यांची पुन्हां दिवाणपदावर नेमणूक झाली. या खेपेस "शेतकी, अबकारी व जंगल" हीं खातीं त्यांच्याकडे सोंपविण्यांत आलीं. दिवाण असतांनादेखील त्यांचें लेखन, वाचन व व्यासंग सुरूच असे. या वेळची त्यांची विशेष उल्लेखनीय कामगिरी म्हणजे इम्पीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रीसर्चची स्थापना करण्यांत घेतलेला पुढाकार ही होय. मंत्रिपदावरून निवृत्त झाल्यानंतरहि अनेक वर्षें ते त्याचे सभासद होते. कामांतून सवड काढून मराठा शिक्षण परिषद, डेक्कन मराठा असोसिएशन, श्रीशिवाजी मराठा सोसायटी, श्रीशिवछत्रपति स्मारक समिति, सत्यशोधक समाज वगैरे संस्थांचीं कामें ते पहातच होते.

१९३० सालच्या निवडणुकींत जाधवराव दिल्ली येथील लेजिस्लेटिव्ह असेंब्लीसाठीं मध्यविभागा (पुणें, सातारा, सोलापूर, नगर, खानदेश वगैरे जिल्हे) तर्फे उभे राहून निवडून आले. मुंबई कौन्सिलमधील ब्राह्मणेतर पक्षाचीं सूत्रें त्यांनीं पक्षाचे उपनेते सर सिद्धाप्पा टोटाप्पा कंबळी यांच्याकडे सोंपविलीं.

असेंब्लीच्या कामासाठीं दिल्ली व सिमला येथें त्यांचें बराच काळ वास्तव्य झालें. तेथील हिंदुस्थान सरकारांतील एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर्स,

व्हाईसरॉय, इतर वरिष्ठ सनदी अधिकारी व असेंब्लींतील प्रख्यात पुढारी यांच्याशीं त्यांचा स्नेह झाला. श्री. नियोगी यांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या डेमोक्रॅटिक पक्षाचे ते उपनेते होते. आर्मी बिलाच्या चर्चेच्या वेळीं सरकारच्याविरुद्ध मत दिल्यास त्यांच्या द्वितीय चिरंजिवाचें नुकसान होणार हें स्पष्ट दिसत असूनहि त्यांनीं तसें मत दिलें व नुकसान पत्करलें. परंतु मोहाला ते बळी पडले नाहींत.

१९३१ सालीं पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेसाठीं त्यांची प्रतिनिधि म्हणून निवड झाली व ते दोनदां विलायतेस गेले.

राजकारणाचा ओघ वेगळ्या दिशेनें वळतांच जाधवरावांनीं आपलें वेगळें कार्यक्षेत्र निवडलें. सहकारी चळवळीशीं त्यांचा फार पूर्वींपासून संबंध होताच. या कालांत त्यांनीं विमा कंपन्या व बँका यांच्या कार्यपद्धतींचा अभ्यास केला.

१९३७ सालीं जाधवराव पुन्हां राजकारणांत पडण्याचा योग आला होता. मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीसाठीं परळ विभागातर्फे ते निवडणुकीस उभे राहिले. पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं.

१९३०।३१ नंतर अखिल हिंदुस्थानच्या राजकारणाला निराळें वळण लागलें. महात्मा गांधींच्या प्रभावी नेतृत्वाखालीं काँग्रेस संघटना बलिष्ठ होऊन इतर लहान पक्ष निष्प्रभ झाले. लिबरल पक्षासारखा जुना व प्रसिद्ध विद्वान पुढाऱ्यांचें नेतृत्व लाभलेला पक्ष जिथें हतप्रभ झाला तेथें ब्राह्मणेतर पक्षासारख्या नवीन व अनभिज्ञ पक्षाचा काय पाड ? दुसरेंहि महत्त्वाचें कारण होतें नि तें म्हणजे महाराष्ट्राच्या पांचवीस पूजिलेली आपसांतील दुही ! १९३० सालानंतर या पक्षास एकत्र संघटित ठेवूं शकणारा पुढारीहि निर्माण झाला नाहीं. तेव्हां राजकीय पक्ष म्हणून ब्राह्मणेतर पक्षाची इतिश्री क्रमप्राप्तच होती. ब्राह्मणेतर पक्ष कालांतरानें जरी नाहींसा झाला तरी त्यामुळें जाधवरावांचें राजकारण अयशस्वी झालें असें म्हणतां येणार नाहीं. त्यांची दूरदृष्टि इतरांस नव्हती. मागसलेल्या वर्गांचा शिक्षणाशिवाय तरणोपाय नाहीं व ती जबाबदारी घेण्यास लायक होण्याच्या आधीं राजसत्ता हातीं आली तर बहुजनसमाजाचा तरणोपाय नाहीं हें त्यांचें मत आज उत्कटतेनें खरें ठरलें आहे.

## सत्यशोधक समाज

बालपणापासून श्री. जाधवरावांस सत्यप्रियता व सत्यशोधनाची आवड होती. त्यांतच कै. रामय्या व्यंकय्या अय्यावारू, रा. ब. लोखंडे इत्यादि मंडळींकडून त्यांस म. ज्योतिबा फुले यांच्या सत्यशोधक तत्त्वज्ञानाची ओळख झाली. त्यांनीं म. फुल्यांच्या लिखाणाचें परिशीलन, अभ्यास व चिंतन केलें. धार्मिक गुलामगिरीमुळें जातिभेद, वर्णव्यवस्था, अंधश्रद्धा इत्यादि गोष्टी निर्माण होऊन बहुजनसमाज दारिद्र्याच्या, अज्ञानाच्या व वैचारिक अपंगतेच्या गर्तेत खिचपत पडला असून त्याला वर काढण्यासाठीं प्रथम मानसिक व धार्मिक गुलामगिरी नष्ट झाली पाहिजे हा जो संदेश महात्मा फुल्यांनीं दिला त्यांत श्री. जाधवरावांस आपल्या सत्यशोधनाच्या उर्मीचें साफल्य सांपडलें. ब्राह्मणी वर्चस्वाचा व विषमतेचा त्यांच्या वडिलांस झालेला त्रास त्यांस प्रत्यक्ष माहीत होता. अर्थातच महात्मा फुले यांच्या तत्त्वज्ञानांतच बहुजनसमाजाचें खरें कल्याण आहे हें त्यांस ताबडतोब पटल्यास नवल नाहीं. एकादी गोष्ट पटली कीं, त्यांत हिरिरीनें, आत्मीयतेनें आणि निष्ठेनें पडावयाचें हा त्यांचा स्वभावविशेष होता. तदनुसार त्यांनीं १९११।१२ सालीं कोल्हापुरास सत्यशोधक समाजाची स्थापना केली. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांना श्री. आण्णा बाबाजी लठ्ठे व प्रो. महादेव गणेश डोंगरे हे सहकारी लाभले. समाजाचे मूलभूत सात नियम तयार करून १९११ सालीं श्री. रामय्या व्यंकय्या यांच्या अध्यक्षतेखालीं पुणें येथें पहिली सत्यशोधक समाज परिषद भरविली. हें समाजाचें कार्य त्यांनीं अगदीं अखेरपर्यंत चालू ठेवलें. कारण बहुजनसमाज जबाबदारी स्वीकारण्यास पात्र होण्यासाठीं त्याची मानसिक, आर्थिक व शैक्षणिक उन्नति झाली पाहिजे हें त्यांचें ठाम मत होतें.

सत्यशोधक समाजाच्या चळवळीमुळें जी जागृति झाली तिच्यामुळें मागसलेल्या वर्गांस माणुसकीची जाणीव होऊन पुढारलेल्या वर्गाविषयीं जो न्यूनगंड त्यांच्या ठिकाणीं निर्माण झाला होता, त्यावरच आघात झाला. त्या अनुषंगानें ब्राह्मणेतर चळवळहि फोंफावली. या सर्वांगीण जागृतीस सत्यशोधक समाजाची चळवळ कारणीभूत झाली यांत शंका नाहीं.

सामाजिक सुधारणा आधीं कीं राजकीय सुधारणा आधीं हा वाद आतां जरी नाममात्र राहिला असला तरी इतिहासानें या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. धार्मिक व मानसिक गुलामगिरी नाहींशी झाल्यावर राजकीय गुलामगिरी टिकाव धरूं शकत नाहीं. यासाठीं मनावरचें धार्मिक दडपण प्रथम गेलें पाहिजे. हें काम सत्यशोधक समाजानें केलें. दुसरी गोष्ट म्हणजे राजकीय सत्ता मिळण्याआधीं बहुजनसमाजांत शिक्षणाचा प्रसार होणें फार महत्त्वाचें आहे, नाहींतर सर्व सत्ता गोऱ्या नोकरशाहीऐवजीं पुढारलेल्या व पैसेवाल्या लोकांच्या हातीं जाऊन बहुजनसमाज तसाच गुलामगिरींत खितपत राहील असें जाधवरावांचें ठाम मत होतें. हें मत आतां प्रकर्षानें खरें ठरूं पहात आहे. इंग्रज गेल्याबरोबर सर्व सत्ता पुढारलेल्या व पैसेवाल्या लोकांच्या हातीं गेली असून आजचे आमचे लोकप्रिय म्हणवून घेणारे राज्यकर्ते प्रजेपासून पार दुरावले आहेत. जनतेच्या हिताचे कायदे होत नाहींत. शिक्षणाच्या वगैरे ज्या सोयी पूर्वीच्या राजवटींत होत्या त्या आतां नाहींशा झाल्या आहेत. शिक्षण ही श्रीमंतांची चैनीची वस्तु झाली असून मागसलेल्या वर्गास ती एक दुर्मिळ वस्तु झाली आहे. शिक्षण इतकें महागडें झालें आहे कीं, सामान्य माणसाला तें आपल्या मुलांबाळांस द्यावयाची शक्ति राहिली नाहीं. ही वस्तुस्थिति पाहिली म्हणजे जाधवरावांचें मत किती अचूक होतें हें ध्यानांत येईल. यासाठींच त्यांनीं राजकीय आकांक्षेकडे थोडेंफार दुर्लक्ष करून समाजाची मानसिक गुलामगिरी कशी नाहींशी होईल व त्यांत शिक्षणाचा प्रसार कसा वाढेल याकडे जास्त लक्ष दिलें. हें त्यांचें मत कितीहि अचूक असलें तरी त्यांत नेत्रदीपक भपका नसल्यानें त्यांची कामगिरी तितकीशी आकर्षक वाटली नाहीं.

शिवाय त्यांच्या समाजसेवेंत बुवाबाजी व जाहिरातबाजी यांस बिलकुल थारा मिळाला नाहीं. मानसिक गुलामगिरी नष्ट करण्यासाठीं त्यांनीं आमरण कष्ट केले. तेव्हां आपल्या राजकारणांत वा समाजकारणांत बुवाबाजीच्या स्वरूपाची गुलामगिरी आणणें त्यांना पसंत पडणें शक्य नव्हतें. जें मनाला पटलें त्याप्रमाणें करायचें, मग तें लोकांस आवडो अगर न आवडो. आपण सर्वज्ञ आहोंत, आपण म्हणूं तेंच खरें असा हेका त्यांनीं कधींच धरला

नाहीं. बुवाबाजीची त्यांना किती विलक्षण चीड होती याचें एक क्षुल्लक दिसणारें असें उदाहरण देतां येईल. कोल्हापूरला नोकरी धरल्यानंतर ते विंचवाचें विष उतरविण्याचे प्रयोग करीत. त्यामुळें पुष्कळ लोकांचा समज झाला कीं, जाधवरावांस मंत्रविद्या अवगत आहे. त्यांनीं पुष्कळ सांगून पाहिलें कीं, यांत मंत्रतंत्र कांहीं नाहीं, तुमचा समज अगदीं चुकीचा आहे. मी मंत्रतंत्र जाणत नाहीं. पण लोकांची अंधश्रद्धा इतकी बसली कीं, ते ही गोष्ट मानावयास तयार होईनात. कोणत्याहि तऱ्हेनें ही अंधश्रद्धा नाहींशी होत नाहीं हें पाहिल्यावर त्यांनीं विंचू उतरण्याचें सोडून दिलें. मित्रास्नेष्टांनीं त्यांना सांगून पाहिलें कीं, लोकांना जर तुमच्यावरील अंधश्रद्धेमुळें गुण येत असेल तर तुम्हीं त्यांचें दुःख कां कमी करूं नये ? त्या वेळीं ते म्हणाले कीं, विंचवाच्या विषापेक्षां हा धर्मभोळेपणा फार घातक आहे. तो ठेवून उपयोगी नाहीं. ही गोष्ट ते सत्यशोधक समाजाच्या चळवळींत पडण्यापूर्वी अनेक वर्षें आधींची आहे. यावरून अंधश्रद्धेवरील त्यांचे विचार स्पष्ट होतात.

पहिल्या सत्यशोधक परिषदेंतील ठराव, भाषणें वगैरे सर्व काम श्री. जाधवराव यांच्याच मार्गदर्शनाखालीं झालें. त्या वेळीं सत्यशोधक समाज म्हणजे सामान्य लोकांची ब्राह्मणद्वेषाची चळवळ असेंच मानलें जाई. यामुळें या चळवळींत काम करण्यास मराठा जातींतील नामांकित माणसें राजी नसत. पदवीधर लोकहि या चळवळीपासून दूर रहात. अशा बिकट प्रसंगीं भास्करराव जाधवांसारखा एम्. ए. एल्एल्. बी. झालेला विद्वान् गृहस्थ समाजांतील सामान्य माणसांच्या पंक्तींत जेवावयास बसतो हें पाहून सर्व मंडळीस आश्चर्य, आनंद व अभिमान वाटूं लागला.

एके काळीं अत्यंत गाजलेलें कुलकर्णी लीलामृत हें पुस्तक भास्करराव जाधव, लठ्ठे, डोंगरे, सबनीस यांच्या खटपटीनें कोल्हापुरास प्रसिद्ध झालें. कोल्हापुरांतील सत्यशोधक समाजाच्या चळवळीमुळें तेथें विरुद्ध पक्षांत भयंकर खळबळ माजली. जाधव, लठ्ठे, डोंगरे यांना पायबंद घातल्या-वांचून ही चळवळ बंद पडणें शक्य नाहीं हें हेरून त्या पक्षानें महाराजां-पर्यंत तक्रारी नेल्या. याचा परिणाम असा झाला कीं, उक्त तिघाहि व्यक्तींनीं १९१४ त सत्यशोधक समाजाचे राजिनामे दिले. याबाबत

कोल्हापुराबाहेरील लोकांत गैरसमज होऊं नये म्हणून भास्कररावांनीं श्री. मुकुंदराव पाटलांना पाठविलेल्या ता. १४।१०।१४ च्या पत्रांत ते म्हणतात, "सत्यशोधक समाजाचें काम कोल्हापुरांत तूर्त तरी चालविणें कठीण झाल्यानें आम्हांस तसें प्रसिद्ध करावें लागलें., गांवोगांव जाऊन सभा भरवून उपदेश करण्याचें काम बंद ठेवावें लागलें आहे. सत्यशोधक समाजासंबंधानें आमची कोणाचीहि आस्था कमी झालेली नाहीं. परिषद किंवा मोठी सभा कोठें भरल्यास पूर्वीप्रमाणेंच हजर राहून काम करण्याचा मी प्रयत्न करीन." ते संकटास डगमगून काम टाकून देणारे गृहस्थ नव्हते. रंग पालटणारेहि नव्हते. त्यांचे विचार दूरगामी आणि दृढ असत. त्यामुळेंच त्यांना आपल्या धोरणाची धरसोड केल्याचा पश्चात्ताप करण्याचा किंवा त्या पश्चात्तापावर शहाणपणाचा मुलामा चढविण्याचा प्रसंगच आला नाहीं. त्यांच्यामागें दिवाणपदासारखीं जबाबदारीचीं कामें असतांहि ते वेळ काढून, सत्यशोधक मताचे लेख, पत्रकें वगैरे लिहीत असत. समाजसेवेची आत्यंतिक तळमळ त्यांना अगदीं अखेरपर्यंत होती. शेवटीं विकलांग होऊन अंथरुणावर खिळले तरीहि सत्यशोधक समाज परिषद भरवून ती पार पाडण्याकडे त्यांनीं आपलें सर्वस्व केंद्रित केलें होतें ही गोष्ट सर्वांना विदितच आहे. त्यांच्यासारखा सुशिक्षित, व्यासंगी, विद्वान् सत्यशोधक चळवळीस लाभल्यानें त्या चळवळीस एक प्रकारची प्रतिष्ठा प्राप्त झाली. सत्यशोधक समाजाविषयींची त्यांची निष्ठा वरकरणी अथवा हंगामी नव्हती. ती त्यांच्या जीवनाशीं एकरूप झाली होती. म्हणूनच जाधवराव म्हणजे सत्यशोधक समाज असें समीकरणच पडलें.

## कांहीं ब्राह्मण स्नेही

श्री. जाधवराव ब्राह्मणांचे द्वेष्टे होते असा त्यांचेबद्दल गैरसमज पसरविण्यांत आला आहे. परंतु ते ब्राह्मणांचा ते ब्राह्मण म्हणून कधींच द्वेष करीत नसत. ब्राह्मणांतील पुष्कळ व्यक्तींबद्दल त्यांना आदर होता व पुष्कळ ब्राह्मण सद्गृहस्थ त्यांचे खास मित्र होते. त्यांच्या स्वतःच्या इंग्रजी शिक्षणाची सुरवात पंढरीनाथ सुदामे या ब्राह्मण शिक्षकाचे हातून झाली हें त्यांच्या आत्मनिवेदनांत आलेंच आहे. श्री. पंढरीनाथांबद्दल ते अतिशय आदरानें बोलत असत. एल्फिन्स्टन हायस्कूलमधील एक शिक्षक

श्री. नरहर बाळकृष्ण जोशी यांचें भास्कररावांवर त्यांच्या हुषारीमुळें फार प्रेम होतें. त्यांच्याशीं भास्कररावांची दाट मैत्री झाली होती. श्री. जोशी त्यांचेकडे येऊन पाहुणचार घेत. ते सरकारी नोकरींतून मुक्त झाल्यावर कांहीं दिवस सौराष्ट्रांत शिक्षकाचें काम करूं लागले. त्यानंतर ते श्री. विष्णुपंत विजापूरकर यांनीं स्थापन केलेल्या समर्थ विद्यालयांत येऊन दाखल होण्याकरितां कोल्हापुरास आले. तेव्हां त्यांनीं भास्कररावांचा सल्ला घेतला. श्री. भास्कररावांनीं त्यांना सांगितलें कीं, "आपला स्वभाव मला माहीत आहे व समर्थ विद्यालयाच्या चालकांसहि मी ओळखतों. आपला संबंध या विद्यालयाशीं फार काल टिकेल असें मला वाटत नाहीं." व तसेंच घडलें. श्री. जोशी यांस त्यांच्या आप्तेष्टांनीं समर्थ विद्यालय सोडण्याचीं कारणें प्रसिद्ध करावीं असा सल्ला दिला. श्री. जोशी यांस तसें करणें पसंत पडलें नाहीं. तथापि खासगी माहितीकरितां म्हणून त्यांनीं एक २५।३० पानी टिप्पण तयार करून प्रथम श्री. भास्करराव यांचेकडे पाठविलें व तें पाहून झाल्यावर पुण्यास पाठविण्यास सांगितलें. यावरून श्री. जोशी हे भास्कररावांस—जरी ते त्यांचे विद्यार्थी होते तरी—किती मान देत असत हें दिसून येईल.

श्री. जाधवराव एल्फिन्स्टन कॉलेजचे फेलो असतांना काशीचे एक विद्वान् पंडित दुर्गाप्रसाद यांचा मुक्काम कांहीं महिने मुंबईत होता. श्री. भास्करराव दररोज त्यांचेकडे जाऊन निरनिराळ्या विषयांवर चर्चा करीत असत. ही चर्चा संस्कृतमध्यें चालत असे; कारण पंडितजींस मराठी अगर इंग्रजी येत नसे व भास्कररावांना हिंदी येत नव्हतें. सदर पंडितजी एक प्रख्यात ज्योतिषी होते व त्यांचेकडे मोठमोठे लोक येत असत. श्री. भास्कररावांचा त्यांच्याशीं दाट स्नेह जुळला होता तरी त्यांनीं स्वतःचे भविष्याबद्दल पंडितजींना कांहींहि विचारलें नाहीं. पंडितजींना फार आश्चर्य वाटलें. तसें त्यांनीं बोलूनहि दाखविलें. श्री. भास्कररावांनीं "आपला ज्योतिषावर विश्वास नाहीं म्हणून स्वतःबद्दल विचारण्याचें कांहीं कारण नव्हतें" असें स्पष्टपणें सांगितलें. नंतर पंडितजींनीं एक प्रश्नकुंडली स्वतः मांडून (कारण भास्कररावांनीं जन्मतिथि दिली नव्हती) त्यांची एक मोठी जन्मपत्रिका तयार करून दिली.

सुरतेस त्यांचे वडील रहात होते, त्यांच्या शेजारींच श्री. बाळशास्त्री म्हणून एक विद्वान् पंडित रहात असत. ते तेथें शास्त्रार्थ सांगत व पुष्कळ विद्यार्थ्यांस संस्कृत शिकवीत असत. ते दोन्ही डोळयांनीं आंधळे होते, परंतु त्यांची स्मरणशक्ति फार तीव्र होती. मे महिन्याच्या सुटींत श्री. भास्कररावांनीं त्यांचेकडे सिद्धांतकौमुदीचा अभ्यास केला.

वेदशास्त्रसंपन्न आबाभट साधले हे भास्कररावांचे वेदांताचे गुरु. त्यांचेवर भास्कररावांचें निस्सीम प्रेम होतें व ते त्यांस गुरुजी म्हणत असत. गुरुजींचा मुक्काम भास्कररावांकडे महिनोमहिने असे. त्यांचेजवळ त्यांनीं वेदांतसूत्रें, दशोपनिषद, बृहत् योगवासिष्ठ वगैरे संस्कृत ग्रंथ व विवेकसिंधु, परमामृतासारखे मराठी वेदांतपर ग्रंथ यांचें सूक्ष्म अध्ययन केलें. गीतेमध्यें वेदांत फार कमी आहे, तेव्हां वेदांतासाठीं वरील ग्रंथांचें अध्ययन करणें अवश्य आहे असें गुरुजी यांचें मत होतें. ईशमांडुक्य व छांदोग्य उपनिषदें श्री. भास्कररावांना मुखोद्गत होतीं. श्री. भास्करराव मिनिस्टर असतांनाहि ऑफिस बंद झाल्यावर ठाकूरद्वारला जितेकरांच्या चाळींत गुरुजींच्या बिऱ्हाडीं तास दोन तास घालविल्याशिवाय त्यांचा एकहि दिवस गेला नाहीं.

मूळचे कुरुंदवाडचे व नंतर सांगलीस स्थायिक झालेले श्री. वे. शा. सं. बाबाशास्त्री वाटवे हे एक विद्वान् गृहस्थ व नामांकित वैद्य होते. आयुर्वेदाच्या पाठाप्रमाणें ते औषधें तयार करीत असत. तेहि भास्कररावांचे आमरण स्नेही होते. ते स्वतः अतिशय कर्मठ होते तरी ते भास्कररावांकडेच उतरत असत व त्यांची स्वतंत्र अशी व्यवस्था ठेविली जात असे. श्री. बाबा वाटवे यांनीं "कल्पित कलिवृत्तादर्श पुराण" या नांवाचा एक संस्कृत ग्रंथ लिहिला होता. त्याचें हस्तलिखित त्यांनीं प्रथम भास्कररावांकडे शुद्धीकरणास दिलें व नंतर तो छापला. श्री. बाबाशास्त्री यांचे मरणानंतर त्यांचे पुत्र श्री. भास्करशास्त्री यांनींहि जुनाच ऋणानुबंध चालू ठेवला होता.

सांगलीचे प्रख्यात राजवैद्य आबासाहेब सांभारे यांचाहि भास्कररावांशीं असाच अकृत्रिम स्नेह होता. ते कोल्हापूरला आले म्हणजे त्यांचा मुक्काम जाधवरावांचे बंगल्यावरच असायचा. ते अतिशय निःस्पृह होते.

सुप्रसिद्ध प्रो. राजारामशास्त्री भागवत यांचा श्री. भास्कररावांशीं फार स्नेह होता. त्यांचा पत्रव्यवहार नेहमीं चाले व ते 'मराठा दीनबंधू'साठीं लेखहि पाठवीत असत. व्याख्यानासाठीं ते कोल्हापूरला आले असतांना दरबारकडून त्यांची सर्व व्यवस्था ठेवण्यांत आली होती. परंतु ते दरबारचे पाहुणे म्हणून न राहतां भास्कररावांकडे उतरले.

महाड येथील प्राथमिक शाळेंत श्री. गोपाळराव जोशी या नांवाचे शिक्षक होते. त्यांचे चिरंजीव श्री. पी. जी. जोशी हे एरंडोल येथें प्रसिद्ध वकील आहेत. श्री. जाधवराव मिनिस्टर असतांना श्री. पी. जी. जोशी मुंबई कायदेमंडळाचे सदस्य होते व ते ब्राह्मणेतर पक्षावर नेहमीं कडक टीका करीत असत. श्री. भास्करराव खानदेशांत दौऱ्यावर गेले असतांना त्यांनीं एरंडोल येथें जाऊन श्री. गोपाळराव जोशांना अचानक भेट दिली. आपला एक काळचा विद्यार्थी एवढ्या मोठ्या पदास चढूनहि आपणास विसरला नाहीं हें पाहून श्री. जोशांना काय वाटलें असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. पी. जी. जोशी जरी राजकारणांतील प्रतिस्पर्धी होते तरी त्यांचा व जाधवरावांचा घरोबा तुटला नाहीं. त्यांचे सहाध्यायी गलांडे हेहि त्यावेळीं एरंडोलासच रहात होते. त्यांचीहि श्री. जाधवरावांनीं भेट घेतली. त्यांच्या चिरंजिवास पूर्व खानदेशांत नोकरी लागली, त्यावेळीं जोशी व गलांडे यांस मुद्दाम जाऊन भेटण्यास बजाविलें.

मुंबईचे हायकोर्ट वकील श्री. केशव आपा पाध्ये यांच्याशीं तर भास्कररावांचा ४० वर्षांचा स्नेह होता. सत्यशोधक समाजाच्या कार्यकर्त्यांवर नेहमीं बालंटें यायचीं व लग्नप्रसंगीं भटजीस न बोलाविल्याकारणानें भिक्षुक वर्गांत खूपच खळबळ उडे. आपल्या हक्कावर गदा येत आहे असे दावेहि कोर्टांत लागले, तेव्हां श्री. पाध्ये वकील यांनीं हे दावे कोर्टांत लढविले व भटजींच्या हक्कावर गदा येत नाहीं असे कोर्टानें निवाडे दिले.

१९१८ सालीं श्री. श्रीपादशास्त्री हसूरकर आपला अभ्यास आटोपून सांख्यसागर, वेदांतरत्न, न्यायतीर्थ वगैरे पदव्या पटकावून आले. त्यांची व जाधवराव यांची वेदांतावर खूप चर्चा चाले. श्रीपादशास्त्री त्या वेळीं नेहमीं म्हणत कीं, आबासाहेबांकडून (भास्करराव) वेदांतासंबंधीं फारच शिकण्यासारखें आहे व आपण त्यांचेकडून पुष्कळच शिकलों.

अशीं उदाहरणें शेकड्यांनीं व हजारोंनीं देतां येण्यासारखीं निघतील. सांगायचें तात्पर्य हेंच कीं, जाधवराव ब्राह्मणांचे द्वेष्टे मुळींच नव्हते. पण ब्राह्मणशाहीचे ते पक्के विरोधक होते. एका जातीनें दुसऱ्या जातीवर धार्मिक, सामाजिक अन्याय करावा हें त्यांस खपत नव्हतें. याच तत्त्वानुसार क्षात्रजगद्‌गुरूंच्या निर्मितीस व्यक्तिशः त्यांनीं कधींच पाठिंबा दिला नाहीं. कारण एका भिक्षुकशाहीऐवजीं दुसरी निर्माण करणें हें त्यांच्या तत्त्वाच्या विरुद्ध होतें.

## औद्योगिक कामगिरी

राजकारणनिवृत्ति ठरविल्यानंतर भास्कररावांनीं मुंबई येथें "आराम" नांवाची इमारत बांधून तेथें वास्तव्य केलें. वय सत्तरीच्या घरांत आलेलें, तथापि काम करण्याचा उत्साह कमी झाला नव्हता. वयाच्या मानानें प्रकृति सुदृढ होती. यानंतर त्यांनीं व्यापार हें कार्यक्षेत्र निवडलें.

ज्याप्रमाणें समाजाला शिक्षणाची व मानसिक गुलामगिरी नष्ट होण्याची जरूरी होती त्याप्रमाणेंच समाजाची आर्थिक परिस्थिति सुधारण्याची आवश्यकता होती हें श्री. भास्करराव जाधव यांनीं जाणलें होतें. यासाठीं सहकारी चळवळीवर त्यांचा अत्यंत विश्वास होता व ती चळवळ कोल्हापूर संस्थानांत प्रथम त्यांनीं सुरू केली. ज्यांत समाजहित आहे व ज्यायोगें समाजाची प्रगति होईल असें त्यांना वाटे त्या त्या गोष्टी प्रत्यक्षांत उरत-विण्याचा ते शिकस्तीचा प्रयत्न करीत असत. सहकारी चळवळीचें महत्त्व पटतांच त्यांनीं कोष्टी लोकांची एक सहकारी संस्था स्थापन करून त्यांच्या-कडून हातमागावर खादी काढविली. या हातमागावरील खादीचे कपडे ते स्वतः पुष्कळ वर्षें वापरीत असत. त्यांनीं त्या वेळीं परदेशी कापड मुळींच वापरलें नाहीं, असें म्हणण्यास हरकत नाहीं. महात्मा गांधींच्या चळवळींत खादीला प्राधान्य दिलें गेलें व खादीचें महत्त्व त्या वेळीं लोकांस पटून ती वापरणें हें देशभक्तीचें एक ठळक लक्षण मानलें जाऊं लागलें. श्री. भास्करराव महात्माजींच्या खादी चळवळी आधीं कित्येक वर्षें खादी वापरीत असत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सहकारी चळवळ त्यांनीं चालू केली व अखेरपर्यंत ती त्यांनीं चालविली. कोणताहि नवा उपक्रम सुरू करायचा म्हटलें कीं आपल्या देशांत त्यांत

अनेक अडचणी निर्माण होतात. पुढें त्याची उपयुक्तता जनतेस पटली म्हणजे त्याचा प्रसार सुगम होतो. भास्कररावांनीं सुरू केलेली सहकारी चळवळ पुढें चांगली फोंफावली. याचें श्रेय भास्कररावांना देणेंच वाजवी ठरेल.

१९३०-३१ सालीं गोलमेज परिषदेकरितां जाधवराव विलायतेस गेले तेव्हां त्यांनीं इंग्लंड व स्कॉटलंड येथील अनेक सहकारी संस्थांना मुद्दाम भेटी देऊन त्यांच्या कामकाजाची माहिती घेतली होती. परदेशांतील औद्योगिक चळवळीकडे त्यांचें कटाक्षानें लक्ष असे. त्यांचे चिरंजीव कर्नल विठोजीराव जपानमधून परत आल्यावर तिकडील औद्योगिक विकासाची माहिती घेऊन श्री. जाधवरावांनीं मच्छीमारीसंबंधीं 'को-ऑपरेटिव्ह फिशरिंग इन जपान' या मथळ्याखालीं बॉम्बे को-ऑप. क्वॉर्टर्लीमध्यें एक माहितीपूर्ण लेख लिहिला होता.

बॉम्बे प्रॉ. को-ऑ. बँकेचे ते पुष्कळ वर्षे डायरेक्टर होते. को-ऑ. इन्स्टिट्यूटचे ते अध्यक्ष होते. सहकारी चळवळीचे ते एक तज्ञ म्हणून समजले जात होते. ग्वाल्हेर संस्थानांत सहकारी चळवळीबाबत नेमलेल्या समितीचे ते एक सदस्य होते. मराठा शि. प. तर्फे स्थापन झालेल्या मराठा एज्युकेशनल को-ऑ. सोसायटीचे ते प्रमुख संस्थापक असून मुंबई मराठा मार्केट पीपल्स को-ऑ. बँक ही त्यांच्याच देखरेखीखालीं स्थापन झाली. या बँकेच्या व्यवहारांत त्यांनीं जातीनें लक्ष घालून ती ऊर्जितावस्थेस आणली व तिचे कार्यकर्ते तयार केले. ता. २३।४।१९३९ रोजीं तिच्या संचालक मंडळावरून निवृत्त होतांच बँकेनें त्यांचा फारच मोठा सत्कार करून त्यांना मानपत्र अर्पण केलें. अखेरपर्यंत ते बँकेच्या सल्लागार मंडळावर होते.

आज औद्योगिक क्षेत्रांत महत्त्व प्राप्त झालेल्या व भरभराटीस चढलेल्या अनेक संस्थांचे जाधवराव संस्थापक व प्रणेते होते. अशा संस्थांत कोल्हापूरच्या कोल्हापूर स्टेट को-ऑपरेटिव्ह बँक ( आतां कोल्हापूर डिस्ट्रिक्ट सेंट्रल को-ऑप. बँक ), शेतकरी सहकारी संघ, कोल्हापूर को-ऑपरेटिव्ह होलसेल सोसायटी, कोल्हापूर को-ऑप. ॲग्रिकल्चरल इम्प्लीमेंट सोसायटी, व बॉम्बे प्रॉव्हिन्शीयल को-ऑप. मॉर्केटिंग सोसायटी, बॉम्बे प्रॉव्हिन्शीयल

को-ऑप. लँड मॉर्गेज बँक, बॉम्बे को-ऑप. इन्श्यु. सोसायटी या संस्थांचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल.

सहकारी चळवळीचें शिक्षण देणारी एकहि संस्था नाहीं ही उणीव लक्षांत घेऊन जाधवरावांनीं करवीर इलाखा सहकारी मंदिर ही संस्था स्थापन केली व एक फार मोठी उणीव दूर केली.

या कालांत भास्कररावांचा इतर बँकांशींहि संबंध आला. इंटर-नॅशनल बँक ऑफ इंडियाच्या पहिल्या संचालक मंडळाचे ते अध्यक्ष होते. रिझर्व बँक ऑफ इंडियाच्या मुंबई प्रांताच्या संचालक मंडळावरहि त्यांनीं काम केलें होतें.

विमा क्षेत्रांतहि भास्कररावांचें लक्ष होतेंच. इंडियन ग्लोब, वॉर्डन, विक्रम वगैरे विमा कंपन्यांच्या संचालक मंडळांचे ते अध्यक्ष व अनेक वर्षें डायरेक्टर होते.

पुण्याच्या डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशननें भास्कररावांना विद्यार्थीदशेंत कांहीं अल्पकाल शिष्यवृत्ति दिली होती. या संस्थेबद्दल त्यांना सदैव कृतज्ञता वाटत असे. या शिष्यवृत्तीची त्यांनीं अनेकपटींनीं फेड केली. या संस्थेचे ते अनेक वर्षें सेक्रेटरी, अध्यक्ष व शेवटीं विश्वस्त होते. या संस्थेबाबतच्या कृतज्ञतेचें प्रतीक म्हणून त्यांच्या कुटुंबियांपैकीं अनेक व्यक्ती या संस्थेच्या तहहयात सभासद आहेत.

त्याचप्रमाणें मराठा भ्रातृमंडळ, श्रीशिवाजी मराठा सोसायटी या संस्थांशीं त्यांचा सुरवातीपासून सतत संबंध होता. या सर्व शैक्षणिक व सामाजिक चळवळींचा प्रभाव अखिल महाराष्ट्र, वऱ्हाड येथें पडून अनेक शिक्षणसंस्था व वसतिगृहें अस्तित्वांत आलीं. शिक्षणाचा प्रसार बहुजनसमाजांत अशा प्रकारें होऊं लागला व त्याचा परिपाक म्हणजे कर्मवीर भाऊराव पाटील यांची रयत शिक्षणसंस्था व मुंबईची बॉम्बे एज्युकेशन लीग ( आतां मराठा मंदिर ) या संस्था होत. या संस्थांशीं श्री. भास्करराव यांचा अत्यंत निकटचा संबंध होता.

मुंबईच्या मोशन पिक्चर सोसायटीचे ते कांहीं वर्षें अध्यक्ष होते.

कोल्हापूरच्या नगरवाचनमंदिराशीं त्यांचा घनिष्ट संबंध होता. ज्या

इमारतींत सध्यां हें वाचनालय आहे ती इमारत भास्कररावांच्या देखरेखी-खालीं बांधण्यांत आली. प्रा. राजारामशास्त्री भागवत वगैरेंचीं व्याख्यानें या संस्थेमार्फत होण्यास जाधवरावांचेच परिश्रम कारणीभूत आहेत. संस्थेचा वृत्तांत प्रसिद्ध करण्यासाठीं जी समिति नेमण्यांत आली होती त्रींत भास्कररावांचा समावेश करण्यांत आला होता. संस्थेचे ते उपाध्यक्ष व अध्यक्षहि होते. त्यांच्या कारकीर्दींत संस्थेंत अनेक उपयुक्त सुधारणा झाल्या.

## साहित्याविषयक कार्य

जाधवरावांचा पिंड साहित्यिकाचा नसला तरी विचाराची बुद्धिवादी बैठक नि समाजांतील अन्यायाबद्दलची स्वाभाविक चीड यामुळेंच त्यांनीं लेखन केलें. तें तळमळींतून उत्स्फूर्त झालें असल्यानें वाचकांवर त्याचा इष्ट तो परिणाम घडून आला. समाजांत पूर्वीं घर करून राहिलेल्या अनेक समजुतींना व कल्पनांना त्यांच्या लिखाणानें धक्के दिले व त्यामुळेंच त्यांचें लेखन सदैव खळबळ माजविणारें झालें. 'रामायणा'वर त्यांनीं एक छोटासा लेख लिहिला नि त्यानें एवढी खळबळ माजविली कीं, त्याचें अक्षरशः रामायण झालें. 'रामायणा'चें संशोधन आणि अभ्यास आपण कोणत्या दृष्टिकोनांतून केला याची कल्पना प्रस्तुत ग्रंथांत श्री. जाधवरावांनीं अनेकदा दिली आहे. याच विषयावर व्याख्यान देतांना त्यांनीं आपली भूमिका स्पष्ट केली होती. ते म्हणाले, "मी सत्यशोधक आहें. सत्याचा शोध करीत रहायचें ही एक मला खोड लागली आहे. 'बाबावाक्यं प्रमाणम्' अशी माझी मनोवृत्ति कांहीं दिवस होती. या वृत्तीनें लहानपणीं भाबडेपणानें पुराणें वाचलीं, देवळांत जाऊन श्रवणहि केलीं. पण पुढें इंग्रजी विद्येशीं परिचय होऊं लागला आणि पूज्य रामय्या व्यंकटय्यासारख्या विचारवंतांचें उदाहरण डोळ्यासमोर आल्यानें कोणत्याहि गोष्टीची छाननी करावी अशी इच्छा होऊं लागली. भोळ्याभाबड्या बहुसंख्य अशा अडाणी लोकांची धर्मश्रद्धा कायम आहे. धर्मभोळेपणा आमच्या लोकांत पद्धतशीरपणें पसरविण्यांत आला आहे. तो कायम रहावा म्हणून हरदास, भजनी मंडळें, नाटककार, सिनेमावाले वगैरेंचे प्रयत्न चालू आहेत. धर्मग्रंथांत सांगितलेल्या गोष्टींची चिकित्सा मुळींच करावयाची नाहीं, त्यांतील खरें-खोटें, संभवनीय-

असंभवनीय यांचा विचार करतां कामा नये ही भावना झाल्यामुळें जें लिहिलें असेल तें भक्तिभावानें खरें मानावयाचें अशी संवय लागून आमची विचार-शक्ति नष्ट झाली. पुष्कळच वर्षे न वापरलेल्या शस्त्रावर जशी तांब चढते तशी स्थिति आमच्या बुद्धीची झाली आहे. धर्माचें दडपण झुगारून दिल्याशिवाय आमच्या प्रगतीच्या वाटा मोकळ्या होणार नाहींत. ग्रहणें कशीं लागतात याची उपपत्ति समजली असूनहि आजचे कांहीं विद्वान् ग्रहणांत स्नान करून जप करीत आहेत; ग्रहण सुटण्यासाठीं राहूकेतूच्या नांवें दानें देत आहेत; म्हणून आम्हांला प्रथम बुद्धिस्वातंत्र्य मिळविलें पाहिजे. आमच्या धर्मग्रंथांचा अभ्यास जिज्ञासु बुद्धीनें करणें देशोन्नतीच्या दृष्टीनें आवश्यक आहे."

त्यांनीं जें लेखन केलें तें या भूमिकेवरूनच केलें. आपलें मत अगर विचारसरणी व्यक्त केली असतां बहुजनसमाजाचें हित होईल, त्याची प्रगति होईल, त्याची ज्ञानलालसा वाढेल ही आत्यंतिक तळमळच त्यांना लेखनास उद्युक्त करी. आपणास जें पटेल तेंच बोलायचें हा त्यांचा स्वभाव त्यांच्या साहित्यांतहि उत्कटतेनें आढळतो. जें प्रामाणिकपणें त्यांना वाटलें तें कुणाचीहि पर्वा न करतां धैर्यानें त्यांनीं मांडलें. म्हणूनच त्यांच्या लिखाणांत मौलिकता अधिक आहे.

त्यांचें साहित्य फारच थोडें आहे. पण त्याचें सामर्थ्य जबरदस्त आहे. याचमुळें साहित्यिकांतहि ते मान संपादूं शकले. संस्कृतचा गाढ व्यासंग आणि संशोधक वृत्ति यांचा प्रत्यय बहुतेक त्यांच्या लिखाणांत प्रकर्षानें येतो. या त्यांच्या गुणांचा गौरव, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या बत्तिसाव्या वार्षिक समारंभाचें अध्यक्षस्थान त्यांना देऊन करण्यांत आला. या प्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें तें आजहि वाखाणलें जात आहे. सामान्यपणें अशा अध्यक्षपदावरून चार साहित्यविषयक गप्पा मारल्या जातात असा अनुभव आहे. हीं भाषणें थोड्याच कालावधीनंतर बहुधा विसरलीं जातात. परंतु भास्कररावांनीं 'मराठे व त्यांची भाषा' या विषयावर अत्यंत अभ्यासपूर्ण, मार्गदर्शक, संशोधनपर व नवे विचार मांडणारें बहारदार भाषण केलें व एक नवीन प्रथा पाडली असें म्हटलें तर तें खास अतिशयोक्तीचें ठरणार नाहीं. हें भाषण मुळांतूनच वाचलें पाहिजे. मराठ्यांचा इतिहास, त्यांच्या

चालीरीति, इतर प्रांतांपेक्षां महाराष्ट्रांत दिसून येणारीं वैशिष्ट्यें, मराठ्यांचीं नांवें, मराठ्यांचे देव, मराठ्यांची भाषा इत्यादि अनेक विषयांची सोपपत्तिक व साधार चर्चा या प्रबंधांत करण्यांत आली आहे. या व्याख्यानाच्या संशोधनपर स्वरूपामुळें त्यास महत्त्व प्राप्त झालें असून त्या विषयावरील अधिकारी वाङ्मय म्हणून अजून त्याचा निर्देश केला जातो.

व्यक्तिगत मतांत ते पुरोगामी होते. श्री. र. धों. कर्वे यांच्या कार्याविषयीं व ध्येयनिष्ठेविषयीं त्यांना फार आदर व कौतुक वाटे. " समाजस्वास्थ्य " मासिकांत त्यांचे लेख प्रसिद्ध होत व त्या मासिकाचे ते प्रथमपासून नियमित वाचक व वर्गणीदार होते. ' र. धों. 'नीं सुरू केलेलें कार्य हें अत्यंत उपयुक्त असून त्यांत समाजाचें कल्याण आहे, असें त्यांचें स्पष्ट मत होतें.

भास्कररावांचें स्फुट लेखनहि बरेंच आहे. ऐतिहासिक, पौराणिक व सामाजिक अशा विविध विषयांवर त्यांनीं लेखन केलें. संस्कृतज्ञ असूनहि अगदीं सोपी पण परिणामकारक मराठी भाषा ते लिहीत व बोलत. भाषा सोपी असण्याकडे त्यांचा कटाक्ष असे. सोपी भाषा कशी असावी असें त्यांचे एक स्नेही गु. बाबर यांनीं त्यांना विचारलें. तेव्हां ते म्हणाले कीं, तुम्ही आपला लेख प्रथम आपल्या बायकोस वाचून दाखवा. तिला जे शब्द समजणार नाहींत त्यांच्याऐवजीं तिला समजतील असे शब्द वापरा म्हणजे तुमची भाषा आपोआप सोपी होईल. विषयाची तयारी, तर्कशुद्ध मांडणी, मुद्देसूदपणा व विचारांची सखोलता हीं त्यांच्या लेखन–वक्तृत्वाचीं वैशिष्ट्यें होत. महाराष्ट्रांत सर्वत्र त्यांचीं अनेक जाहीर व्याख्यानें झालीं आहेत. त्यांत पुणें येथील श्री. चित्रावशास्त्री यांच्याशीं झालेला जाहीर वाद फारच गाजला.

१९३५ सालीं श्री. वि. स. खांडेकर यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईस भरलेल्या साहित्य सम्मेलनाचे भास्करराव स्वागताध्यक्ष होते.

" तर्खडकर प्राइझ " साठीं जी निवड समिति होती तिचे भास्करराव बरींच वर्षे सभासद होते.

श्री. भास्कररावांनीं लिहिलेल्या लेखांपैकीं कांहीं महत्त्वाचे नि निवडक लेख व ते कोठें प्रसिद्ध झाले हें पुढें देत आहों. जिज्ञासूंनीं ते लेख अवश्य

वाचावे. म्हणजे श्री. जाधवराव यांचे अनेक लेखनविशेष, त्यांची विशिष्ट शैली व समाजहिताची दृष्टि यांचा वाचकांना उत्कृष्ट परिचय घडेल.

१ मराठे व त्यांची भाषा—विविधज्ञानविस्तार, ऑगस्ट–सप्टेंबर १९३१.

२ एकलिपी—ज्ञानमंदिर.

३ श्रीशंकराचार्यांचें जगद्गुरुत्व—ज्ञानमंदिर, १ ऑगस्ट १९३५.

४ जगद्गुरु श्रीशंकराचार्य—ज्ञानमंदिर, १५ मार्च १९३५.

५ वेदोत्पत्तीवर नवा प्रकाश—महाराष्ट्र शारदा, ऑक्टोबर, नोव्हेंबर व डिसेंबर १९३७, जानेवारी १९३८.

६ महादेव—किर्लोस्कर, जानेवारी १९४४.

## पुनश्च करवीर

१९४०सालीं श्रीराजाराम छत्रपति महाराज निवर्तल्यानंतर कोल्हापूरला रीजन्सी कौन्सिलची कारकीर्द सुरू झाली. १९४५ च्या सुरवातीस मि. ए. एन्. मिचेल, ओ. बी. ई., आय. सी. एस. हे रीजन्सी कौन्सिल-मध्यें पंतप्रधान होते. कौन्सिलचे एक मंत्रि रा. ब. डॉ. पी. सी. पाटील यांची कारकीर्द संपल्यावर त्यांच्या जागीं रेव्हेन्यू मिनिस्टर म्हणून येण्या-साठीं पंतप्रधानांनीं जाधवरावांना पाचारण केलें. त्या पत्रांत असेंहि लिहिलें कीं, ‘आपण करवीर दरबारचे एक जुने व अनुभविक अधिकारी असल्यानें बाल छत्रपतींच्या नव्या राजवटीची घडी बसविण्यासाठीं दरबार आपणांस पाचारण करीत आहे.’

एप्रिल १९४५ मध्यें जाधवराव रीजन्सी कौन्सिलमध्यें रेव्हेन्यू मिनिस्टर म्हणून दरमहा पंधराशें रुपये पगार व दोनशें रुपये वाहनभत्ता यावर दाखल झाले. तेथील काम त्यांना अपरिचित नव्हतेंच. शिवाय मुंबई इलाख्यांत दोनदां मंत्रिपदावर काम केल्याचा अनुभव होताच. आपल्या खात्याचीं सूत्रें हातीं घेतांच सर्व शिलकी कामें प्रथम निकालांत काढलीं. तत्पूर्वीच्या राजवटींत ज्यांच्याबाबत धडधडीत अन्याय झाले होते त्या व्यक्तींना शक्य ती कायदेशीर मदत देऊन त्यांचीं प्रकरणें रीजन्सी कौन्सिल-मध्यें घसाला लाविलीं.

रीजन्सी कौन्सिलच्या बैठकीपूर्वी त्या बैठकींत पुढें येणाऱ्या सर्व कामांबाबत कागदपत्रें वाचून त्यावर ते टीपा तयार करीत व नंतर आपलीं मतें प्रतिपादन करीत. याच कालांत त्यांचे चिरंजीव कोल्हापूर स्टेट फोर्सचे कमांडंट होते. त्यांच्याविषयीं जे ठराव रीजन्सी कौन्सिलपुढें आले त्या ठरावांवर मत देण्याचें त्यांनीं नाकारलें. आपल्या निःस्पृहपणास बाध येईल अशा सर्व गोष्टी ते कटाक्षानें टाळीत.

१९४६ च्या ऑगस्टमध्यें त्यांची नजर अधु होऊं लागली. आपणास ऑफिसांत समाधानकारक काम करतां येत नाहीं असें वाटतांच त्यांनीं मंत्रिपदाचा राजीनामा दिला. त्या वेळचे कोल्हापूरचे पंतप्रधान सर ऑस्टिन व पोलिटिकल एजंट कर्नल हार्वे यांनीं त्यांना कामावर रहाण्याचा फार आग्रह केला; पण कामांत ढिलाई किंवा चुकारपणा हा त्यांच्या मनाला मानवण्यासारख्या नसल्यानें सप्टेंबर १९४६ पासून त्यांनीं काम सोडलें.

## रामराम पाव्हणं

जवळजवळ पाऊण शतक सतत वाचन–लेखन यांत मग्न असलेल्या, ज्ञानार्जन हाच नाद, व्यासंग हेंच व्यसन आणि तत्त्वचिंतन हाच छंद केलेल्या व्यक्तीच्या मनाला अधु दृष्टीमुळें वाचन बंद होतांच किती यातना झाल्या असतील! पण भास्कररावांनीं आपल्या मनाची, नेहमींच्या आयुष्यविषयक तत्त्वज्ञानानें, तयारी केली. आपल्या बंगल्यांत होणारा आपला वावर कोणाच्याहि मदतीशिवाय करतां यावा याचा त्यांनीं सराव केला. जन्मभर स्वतःचीं कामें स्वतः केलेलीं, तीं अंधत्व आल्यावर दुसऱ्याकडून करवून घ्यावयाचीं ही कल्पना त्यांना सहन झाली नाहीं. नजर उतरली तरी स्वावलंबनाची हिम्मत उतरली नाहीं. शेवटच्या आजारापर्यंत सर्व विधि, कपडे बदलणें, आपलें टाइम–पीस रोज रेडिओबरोबर लावून त्यास चावी देणें, आपलें दाढीचें सामान वापरून, धुऊन, पुसून ठराविक जागीं ठेवणें वगैरे बाबतींत ते पूर्ण स्वावलंबी होते. स्वतः वाचण्याचें बंद होतांच दुसऱ्याकडून वाचून घेण्याचें सुरू केलें. हें वाचन करण्यास मराठी चौथींत असलेल्या नातीपासून थोरापर्यंत कोणीहि चाले. कोणी उच्चार चुकीचा केला तर थांबवून शांतपणें दुरुस्त उच्चार सांगत.

या कालांत घराव्यतिरिक्त एकच विरंगुळयाची जागा म्हणजे सर र. व्यं. सबनीस यांचा "श्रीराजाराम प्रसाद." तेथें रोज संध्याकाळीं दोन अडीच तास बैठक. सरसाहेबांच्या माडीवर पोहोंचेपर्यंत पांच वळणें व एक गोल जिना असे. पण भास्करराव तो सरावानें न अडखळतां जात व येत. दोघांचा पंचावन्न वर्षांचा स्नेह. एकाच मालकाच्या सेवेंत दोघांनीं पाव शतक घालविलें. दोघेहि संस्कृताचे प्रेमी. संस्थानी बुजबुजाटांत नोकरी करूनहि दोघे अपहार, अन्याय आणि अभिलाष यांपासून अलिप्त राहिलेले श्रीशाहूछत्रपतींचे हे शेवटचे दोन शिलेदार जुन्या आठवणी रंगवीत काव्यशास्त्रविनोदांत मग्न होऊन आयुष्याचा संध्याकाल व्यतीत करीत असत.

१७ सप्टेंबर १९४८ रोजीं सरसाहेबांनीं या जगाचा निरोप घेतला. भास्कररावांचा अखेरचा समवयस्क स्नेही आणि घराबाहेरील एकमेव विसाव्याची जागा गेली.

ब्यारेंशीवें वर्ष वयाला लागलेले, पण एक दृष्टि सोडून बाकी भास्कररावांची प्रकृति चांगली होती. गच्चींत नियमित फेऱ्या घालणें व ठराविक आसनांचा व्यायाम १९५० च्या पंधरा मेपर्यंत सुसूत्रतेनें चालू होता.

१६।१७ मेची रात्र. पहांटे अडीच वाजतां भास्कररावांना पक्षघाताचा पहिला झटका आला. डावी बाजू लुळी पडली. वाचा अडखळूं लागली. शक्य असलेले सर्व वैद्यकीय उपाय सुरू झाले. त्या वेळीं त्यांची पुतणी डॉ. सौ. सरल भोसले ही कोल्हापुरच्या दवाखान्यांत लेडी डॉक्टर होती. तिनें जातीनें शुश्रूषा केली. तिला नोकरी संभाळून शुश्रूषा करणें शक्य नव्हतें. तेव्हां भास्कररावांची डॉक्टर कन्या राजकोटहून आल्यावर तिनें शुश्रूषा आपल्या हातांत घेतली. अशा विकलावस्थेंत त्यांच्या मनांत तळमळ कसली तर त्यांच्याच प्रेरणेनें ता. २८ मे रोजीं भरणारी सत्यशोधक समाज परिषद! त्या परिषदेसाठीं स्वतःचें भाषण तसल्या अवस्थेंत लिहवून घेतलें. त्याचा मथळा "रामराम पाव्हणं" असा होता. जणुं कांहीं आपल्याबरोबर खांद्यास खांदा लावून काम केलेल्या सहकाऱ्यांचा त्यांना व्यक्तिशः शेवटचा निरोप घ्यायचा होता. स्वतःस परिषदेला जातां येणें शक्य नव्हतें म्हणून चिरंजिवांना पाठवून तें भाषण वाचलें गेलें. भाषण वाचलें

जात असतांना सारा श्रोतृवृंद गहिंवरून आला. समाजसेवेची ही तळमळ आणि तत्त्वनिष्ठेची ही परिसीमा !

जूनच्या पहिल्या तारखेस त्यांच्या सर्वांत कनिष्ठ कन्येचें लग्न ठरलें होतें. स्वतःची ही अवस्था पाहून सर्व कुटुंबांत काळजीचें आणि चिंतेचें वातावरण पसरलें आहे असें दिसतांच त्यांनीं सर्वांना सांगितलें कीं, या लग्नांत विघ्न येणार नाहीं. त्याप्रमाणें कार्य पार पडलें.

उतार वयांत पक्षघाताचा झटका म्हणजे किती यातना व किती क्लेश ! पण ते त्यांनीं वीरवृत्तीच्या कठोरतेनें सहन केले. सर्व उपाय निमूटपणें करवून घेतले.

जूनच्या दुसऱ्या व तिसऱ्या आठवड्यांत त्यांच्या स्थितींत अनुकूल असा फरक दिसून आला. वाणी पुष्कळच सुधारली; डावा हात व पाय त्यांना वर उचलतां येऊं लागले. सर्वांना आशा वाटली. पण विधिघटना वेगळी होती.

भास्करराव एखाद्या तत्त्वज्ञासारखे जगले आणि तत्त्वज्ञासारखीच त्यांनीं हा देह सोडण्याची तयारी केली. सर्वांना जवळ बोलावून "मीं माझ्या आयुष्यांतील सर्व जबाबदाऱ्या संपविल्या आहेत. माझी कसलीहि इच्छा अतृप्त राहिलेली नाहीं. माझ्यासाठीं रडण्यासारखें मीं कांहीं करून ठेविलें नाहीं. माझ्या अवसानानंतर कसल्याहि तऱ्हेचा धार्मिक विधि करायचा नाहीं. अस्थी पंचगंगेंतच सोडायच्या." असे खऱ्या सत्यशोधकासारखे उद्गार काढले.

पंचावन्न वर्षें जिनें त्यांच्या आयुष्याची सोबत केली, संसार उभा करून तो पतीला झळ न लागूं देतां केला त्या सहचारिणीला त्यांनीं तितक्याच शांतपणानें सांगितलें, "तुझ्या आणि माझ्या सर्व जबाबदाऱ्या संपल्या आहेत. आपल्या दोघांच्या भाग्यासारखं भाग्य कोणाचं आहे ? आपलीं सर्वच मुलं गुणी, प्रेमळ व आज्ञाधारक आहेत. यापरतं तुला काय पाहिजे ? माझ्यासाठीं दुःख करायचं नाहीं."—

यानंतर त्यांनीं संसारांतून मन काढून घेतलें. निरवानिरवीची अशी कोणतीहि गोष्ट काढली नाहीं. जरुरीपुरतें बोलत, पण कशांत जीव गुंतला आहे असें त्यांनीं दर्शविलें नाहीं.

शनिवार ता. २३ जूनपासून त्यांना उचकी सुरू झाली. कोणत्याहि उपायानें ती बंद होईना. तीन दिवसरात्र उचकी सहन केली.

सोमवार ता. २६ जून रोजीं रात्रौ ९-४० वाजतां जमलेल्या सर्वांकडे एकवार पाहिलें. उजवा हात वर करून "आशीर्वाद" हा शब्द उच्चारला आणि त्या महान विभूतीनें या नश्वर जगाचा त्याग केला.

## व्यक्तिविशेष

श्री. जाधवराव यांच्या स्वभावाचें परिशीलन केल्याशिवाय त्यांच्या सर्व कार्याचें स्वरूप समजणार नाहीं. लहानपणापासून त्यांचा स्वभाव शांत, कांहींसा अबोल व परक्या व्यक्तीस घुमा वाटण्यासारखा असे. जात्याच ज्ञानसंपादनाकडे जबरदस्त ओढा असल्यामुळें मिळेल तो सारा वेळ ते विद्यार्जनांत व्यतीत करीत. त्यांची मनोरचना पूर्वींपासून तत्त्वप्रधान होती. आपलें काम, अखंड वाचन-लेखन यांत ते कायावाचामनेंकरून सर्वस्वीं गुंतलेले असत. सरकारी काम सांगोपांग आणि कसोशीनें करून बाकीचा वेळ वाचनांत जाई. भेटीस आलेल्या व्यक्तीशीं कामापुरतें, मुद्यास धरून व बेतशीर बोलत. याव्यतिरिक्त कधीं मित्रमंडळींचा, गप्पाष्टकांचा अड्डा नाहीं, क्लब, जिमखाना नाहीं कीं पत्ते, गंजिफांची चक्की नाहीं. घरांत कांहीं पहाणें, व्यवस्था करणें, किंवा धोरण आंखणें या दृष्टीनें संसार असा त्यांनीं केलाच नाहीं. १९०५ सालापर्यंत महिन्याचा पगार कचेरींतील शिपाई त्यांच्या वडिलांकडे आणून देई. त्यांच्यानंतर घरचा सर्व कारभार "मोठ्या आई"-त्यांच्या मातोश्री-१९१५ पर्यंत पहात. त्यानंतर त्यांच्या पत्नी "मानीसाहेब" या गृहव्यवस्था पहात. त्यांत भास्कररावांनीं कधींहि लक्ष घातलें नाहीं किंवा मतभेद दर्शविला नाहीं. आपला ठराविक पोषाख- मलमलचा पटका, बंद कॉलरचा कोट, सदरा, इराफ विजार, पायांत वहाणा अगर स्लिपर किंवा शू हा बाहेर जाण्याचा व घरांत धोतर व खादीचा अगर ट्विलचा सदरा व वहाणा, त्यांनीं अखेर-पर्यंत कायम ठेवला. मिनिस्टर झाले तरी या पोषाखांत बदल झाला नव्हता. फक्त १९१९ सालीं विलायतेंत कांहीं सूट वापरले, पण दुसऱ्या खेपेस म्हणजे १९३० व १९३१ सालीं विलायतेंतहि आपला हिंदी पोषाख कायम ठेवला.

श्री. भास्करराव यांचा पिंडच तत्त्वज्ञानाचा होता. तत्त्वांची केवळ पोपटपंची त्यांनीं कधींहि केली नाहीं तर ते त्याप्रमाणें वागले. जसें बोलायचें तसें चालावयाचें हा त्यांचा बाणा असे. दुसऱ्यावर कांहीं उपकार केले तर त्याची वाच्यता चुकूनसुद्धां व्हायची नाहीं. पी. सी. पाटील, मुकुंदराव पाटील वगैरे अनेक सद्‌गृहस्थांना ज्या सरकारी पदव्या मिळाल्या त्याचें बव्हंशीं श्रेय भास्कररावांना आहे. पण या गोष्टीची जाणीव त्यांनीं केव्हांच करून दिली नाहीं. कालांतरानें या गोष्टी उजेडांत आल्या. त्याचप्रमाणें दुसऱ्यानें केलेल्या अपकाराबद्दलहि चकार शब्द तोंडांतून निघायचा नाहीं. १९०६ सालीं कांहीं मत्सरग्रस्त लोकांनीं त्यांचेवर मारेकरी घातले होते. आयुष्याची दोरी बळकट म्हणूनच ते त्यांतून वांचले. परंतु या अपकाराबैद्दल कधींदेखील कोणाबद्दल त्यांनीं एक अवाक्षरहि काढलें नाहीं. पुढें अनेक वर्षांनीं मुंबईस मिनिस्टर असतांना जरी या कृतीबद्दल सूड घेणें त्यांना सहजशक्य झालें होतें तरी दया भाकल्यावर उदार अंतःकरणानें त्यांनीं क्षमा केली. या एकाच प्रसंगावरून त्यांच्या क्षमाशील वृत्तीची चांगलीच कल्पना येईल. साधी रहाणी व उच्च विचारसरणी हें त्यांचें वैशिष्ट्य होतें.

रोज सकाळीं १० व सायंकाळीं ८-८॥ वाजतां जेवायचा त्यांचा प्रघात होता. जेवतांनाहि वृत्तपत्राचें वाचन चालूच असायचें. कोणी पाहुणे पंक्तीला असले तरच वाचन बंद. खाण्यापिण्याबाबत कसलाहि चोखंदळपणा नसे. फक्त तिखट त्यांना वर्ज असे. मात्र परक्या ठिकाणीं तिखट जेवण्याची पाळी आली तर जेवतहि असत. यजमानास अडचणींत टाकीत नसत. चहा, कॉफी वगैरे पेयें ते कधींच घेत नसत. विलायतेंतहि या नियमाला अपवाद केला नाहीं. निरसें दूध, गोड ताक व लिंबाचें सरबत हीं त्यांचीं नेहमींचीं पेयें. धूम्रपान अगर मद्यपान कधींहि केलें नाहीं. नियमित व्यायाम व आहार, थंड पाण्याचें स्नान, निर्व्यसनीपणा व शांत मनोवृत्ति यामुळें त्यांचें आरोग्य शेवटपर्यंत उत्तम स्थितींत राहिलें. लहानपणीं जरी त्यांची प्रकृति अशक्त होती तरी व्यायामानें त्यांनीं आपलें शरीर चांगलें कमाविलें होतें.

एक न्यायप्रिय, निःपक्षपाती, शांत पण शिस्तप्रिय अधिकारी असा त्यांचा लौकिक होता. कोणत्याहि खात्यांत नेमणूक होतांच प्रथम तेथील नोकरवर्गांत वक्तशीरपणापासून कामसूपणापर्यंत शिस्त लावायची, त्यांना काम शिकवायचें व सामान्य जनतेच्या सुखसोयीकडे त्यांना लक्ष द्यावयास लावायचें असा त्यांचा प्रघात होता. न्यायखात्यांत अगर महसूल खात्यांत 'जाधवरावांनीं दिलेला निकाल वरिष्ठ कोर्टांत अगर हुजूर अपिलांत फिरणें कठीण' असा लौकिक त्यांनीं संपादन केला होता. त्यांच्या न्यायप्रिय व निःपक्षपाती स्वभावाचेंच हें द्योतक होतें. नोकर निवडतांनादेखील ते त्याच्या जातीपेक्षां गुणाकडेच अधिक पहात. ब्राह्मण उमेदवार ब्राह्मणेतर उमेदवारापेक्षां लायक असेल तेव्हां त्यांनीं ब्राह्मणांचीच निवड केल्याचीं कैक उदाहरणें दाखवितां येतील.

अशिस्टंट सरसुभे व सरसुभे असतांना वार्षिक दौऱ्याच्या वेळीं खेडोपाडीं जाऊन प्रत्यक्ष परिस्थितीची व पिकांची पहाणी करीत! खेडेगांवांतील बाजारचे दिवशीं ते बाजारची पहाणी करीत. त्या वेळीं पट्टेवाला बरोबर घेत नसत. त्यामुळें खेडेगांवच्या लोकांना कोणी सरकारी अधिकारी आले आहेत याची जाणीव होत नसल्यानें ते आपापले व्यवहार नेहमींप्रमाणें न दचकतां करीत. ह्यामुळें जाधवरावांना लोकांचे नित्याचे व्यवहार सहज पहावयास मिळत. केवळ खात्यांतील चौकशीवर अवलंबून न राहतां प्रत्येक प्रकरणीं स्वतः चौकशी करून निर्णय देत. यामुळें ज्याप्रमाणें त्यांना परिस्थितीचें यथायोग्य ज्ञान होत असे त्याचप्रमाणें लोकांचा विश्वास त्यांना संपादन करतां आला.

आपल्या हाताखालील नोकरांवर ते कसलीं बंधनें लादीत नसत. त्याचीं राजकीय मतें भिन्न असलीं तरी त्याबद्दल त्यांचा विरोध नसे.

बालपणापासूनच राष्ट्रीय दृष्टिकोनांतून पहाण्याची त्यांना संवयच लागली होती. समाजाचें आणि पर्यायानें राष्ट्राचें हित करीत असतांना त्यांत स्वतःचें अनहित होत असलें तरी ते त्याची पर्वा करीत नसत. ते एल्‌फिन्स्टन कॉलेजचे फेलो असतांना डॉ. भांडारकर युनिव्हर्सिटीचे व्हाईस चॅन्सेलर होते व मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस हे चॅन्सेलर होते.

त्यांची मुदत संपली होती व ह्याच चॅन्सेलरच्या अध्यक्षतेखालीं पदवीदान समारंभ व्हावा म्हणून नेहमींच्या तारखेच्या आधीं ८ दिवस समारंभाची तारीख ठरविण्यांत आली. त्या वेळीं कांहीं पदवीधर विद्यार्थ्यांना हें कृत्य पसंत नव्हतें आणि त्यांनीं त्या अवेळीं भरणाऱ्या पदवीदान समारंभावर बहिष्कार घालण्याचें ठरविलें. भास्कररावहि या बहिष्कारांत सामील होते.

जाधवराव मिनिस्टर असतांना एकदां सर्जन जनरलची जागा खालीं झाली व तीवर कर्नल कुकडे यांचा हक्क होता. गोऱ्या चिटणिसानें कारकुनी करून ती जागा आपल्या सजातीय आय्. एम्. एस्. ला मिळण्याची खटपट चालू केली व यासाठीं रजा रद्द करवून त्याला बोलविण्यांत आलें व मिनिस्टरच्या सहीचा हुकूम काढण्याची घाई केली. जाधवरावांनीं त्या प्रकरणाचा चांगला अभ्यास केला व सर्जन जनरलच्या जागेवर कर्नल कुकड्यांचीच नेमणूक झाली पाहिजे असें प्रतिपादलें. हें प्रकरण गव्हर्नर-पर्यंत गेलें. परंतु चिटणिसाच्या कारकुनीस यश न येतां क. कुकड्यांची नेमणूक झाली. त्याचप्रमाणें प्रो. ताकाखाव यांची L. E. S. मध्यें नेमणूक झाली. ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें डॉ. नाडगीर, डॉ. उगन, डॉ. दलाल वगैरे नामांकित डॉक्टरांस पहिले हिंदी प्रोफेसर म्हणून नेमिलें. अशीं अनेक उदाहरणें आहेत. प्रत्येक ठिकाणीं जाधवरावांची राष्ट्रीय वृत्ति सदैव जागरूक असे.

जाधवरावांनीं चिटणीसाची कारकुनी चालू दिली नाहीं हें खरें असलें तरी त्याला अगर आपल्या हाताखालील मोठ्या अधिकाऱ्यास कमीपणा येईल असें ते कांहीं करीत नसत. त्यामुळें त्यांचा नोकरवर्गावर वचक राहूनहि कोणाहि अधिकाऱ्याला हीनगंड उत्पन्न होत नसे व त्यामुळें कामकाज चांगलें चाले. अशा वेळीं ते कोणालाहि कमीपणा न येईल असें युक्तिप्रयुक्तीचें धोरण राखीत.

मि. बलुच हे मुसलमान गृहस्थ शेतकी खात्यांत मोठ्या जागेवर होते व त्यांचेवर कांहीं तोहमत येऊन त्यांना सस्पेंड केलें होतें. श्री. जाधवरावांनीं त्यांच्या प्रकरणाचा नीट अभ्यास केला, तेव्हां त्यांना आढळून आलें कीं या प्रकरणांत अन्याय झालेला आहे. त्यांनीं सेक्रेटरीस पटवून दिलें कीं,

वर शेतकी खात्याचे डायरेक्टर (मि. टी. एफ्. मेन) यांस थोडें जरी कायद्याचें ज्ञान असतें तर त्यांनीं समजून उमजून अशी बेकायदा गोष्ट केली नसती. ताबडतोब मि. बलुच यांस नोकरीवर बोलावून कोणासहि कमीपणा न येतां हें प्रकरण मिटलें. अशाच रीतीनें जंगल खात्याचे अधिकारी मि. दत्त यांचेंहि प्रकरण निकालांत निघालें. यापेक्षांहि जास्त मनोरंजक असे प्रकरण रा. ब. पी. सी. पाटील यांचे बाबतींत होऊन नाजूक परिस्थिति उत्पन्न झाली होती. आणि विशेष म्हणजे जाधवराव व पाटील हे दोघेहि मराठा असल्यामुळें पाटलांच्यासारखा निकाल लागल्यास त्यांचेवर वशिले-बाजीचा आरोप होणें अगदीं साहजिकच होतें. त्या वेळीं श्री. पाटील हे प्रोफेसर ऑफ् ॲग्रिकल्चर इकॉनॉमिक्स (शेतकी अर्थशास्त्राचे प्रोफेसर) होते. त्या वेळचे शेतकी खात्याचे डायरेक्टर डॉ. एच्. एच्. मॅन यांनीं शेतकी–अर्थशास्त्र या विषयासाठीं रा. ब. पाटील यांस पुण्याच्या आसपासच्या पिकांच्या उत्पादनखर्चाबाबत खरी माहिती व आंकडे गोळा करण्यास सांगितलें. रा. ब. पाटील यांनीं मोठ्या मेहनतीनें ही माहिती गोळा करून शेतीमुळें शेतकरी केवळ नुकसानींतच अधिकाधिक जात आहे असें सिद्ध केलें. शेतकी खात्यानें हें पत्रक १९२७ चें १४९ वें पत्रक म्हणून प्रसिद्ध केलें. डॉ. मॅननीं त्या पत्रकास प्रस्तावनाहि लिहिली. पुढें डॉ. मॅन यांचे जागीं मि. टी. एफ्. मेन हे डायरेक्टर झाले. बार्डोलीच्या चळवळींत कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं या पत्रकाचा चांगलाच उपयोग करून घेतला व जमीन महसूल कमी करण्याबाबत जोराची चळवळ सुरू केली. अशा तऱ्हेचें पत्रक शेतकी खात्यानें प्रसिद्ध करणें अत्यंत चुकीचें आहे असें मि. मेन यांचें मत झालें व त्यांनीं ताबडतोब या पत्रकाचा प्रसार न करण्याचा हुकूम काढला. यावर रा. ब. पाटलांनीं मेनसाहेबाची समजूत काढण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. हें पुस्तक म्हणजे शास्त्रीय संशोधन असून शेतकी अर्थशास्त्राचे प्रोफेसर म्हणून ज्या खऱ्या गोष्टी आपल्या नजरेस आल्या त्याच त्यांत दाखविल्या आहेत असें सांगितलें. परंतु मेनसाहेबांनीं तें न ऐकतां उलट कांहीं अपमानास्पद शब्द काढले. साहजिकच रा. ब. पाटील यांस सरकारकडे तक्रार करावी लागली. जाधवरावांनीं ही केस त्या खात्याचे सेक्रेटरी मि. बेल यांचेकडे चौकशीसाठीं

दिली व कांहीं महत्त्वाचे मुद्दे काढून त्यांवर त्यांचें मत मागितलें. मि. बेल हे एक रेव्हिन्यू खात्यांतील अनुभवी असे सनदी नोकर होते.

रा. ब. पाटील यांचें संशोधन शास्त्रीय व अचूक होतें असें श्री. जाधवराव व मि. बेल यांस आढळून आलें. शिवाय मि. मेन यांनीं रा. ब. पाटलांसारख्या एका वरिष्ठ अधिकाऱ्यास विनाकारण बोल लावला असें मि. बेल यांस वाटलें. तेव्हां जाधवरावांनीं स्वतः निकाल न देतां मि. बेल यांसच तसें करण्यास सांगितलें. सरकारनें मि. मेन यांस रा. ब. पाटील यांची माफी मागावयास लावली आणि रा. ब. पाटलांस आपलें संशोधन अद्यावत् करण्यास सांगून तें एका नवीन पत्रिकेंत घालावयास सांगितलें व मि. मेन यांनीं ज्या पत्रकास बंदी घातली होती तें प्रसिद्ध करण्याचा आग्रह धरूं नये अशी रा. ब. पाटलांस विनंति केली. अशा रीतीनें मि. मेन यांची नाचक्की टळली. या प्रसंगानें श्री. जाधवराव यांचा चतुरस्रपणा दिसून आला. आपल्या सेक्रेटरीला या महत्त्वाच्या प्रकरणाचा निकाल देण्याची संधि देऊन त्याचेवरील आपला विश्वास दाखविला, रा. ब. पाटील यांस न्याय मिळाला, मि. मेन यांची नाचक्की टळली व रा. ब. पाटील हे मराठा म्हणून त्यांच्या बतीनें निकाल दिला गेला अशी ओरड करण्यास विरोधकांस संधि मिळाली नाहीं.

आपणास जें प्रामाणिकपणें वाटतें तें बोलून दाखविण्यास श्री. जाधवराव कचरत नसत. ते शेतकीमंत्री असतांना व्हाईसरॉयच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलबरोबर कांहीं प्रश्नांबाबत चर्चा करावयास त्यांना जावें लागलें. शेतकी तज्ज्ञ म्हणून रा. ब. पाटील त्यांचेबरोबर गेले. लॉर्ड विलिंग्डन हे व्हाईसरॉय होते. तेव्हां गार्डन पार्टीच्या वेळीं व्हाईसरॉय त्यांना म्हणाले कीं, "देशांत शांतता नांदावयास काय केलें पाहिजे ?" जाधवरावांनीं तात्काळ त्यांना उत्तर दिलें कीं, "Your Excellency, unless and until the people control the Revenue and Finance portfolios, they will not rest." हें उत्तर ऐकल्याबरोबर आजूबाजूचे लोक अगदीं चकित होऊन गेले. कारण तोंपर्यंत कोणीहि अशा तऱ्हेचे स्पष्टोद्गार व्हाईसरॉयसमोर काढण्यास धजलें नव्हतें.

वशिलेबाजी श्री. जाधवरावांना पसंत नसे. अशा कामीं ते कुणाचाहि मुलाहिजा ठेवीत नसत. ते मंत्री असतांना युरोपियन लोकांचें प्रस्थ फार असे. सामान्यपणें हिंदी मंत्रीसुद्धां हाताखालच्या युरोपियन गृहस्थास मान देत व त्याचा शब्द शक्य तों उचलून धरीत. जाधवराव यास अपवाद होते. ते मंत्री असतांना फारब्रदर नांवाचा एक युरोपियन व्हेटर्नरी खात्याचा मुख्य ( सुपरिंटेंडेंट ) होता. ही जागा डायरेक्टरची व्हावी अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती. त्यानें त्या दिशेनें प्रयत्न केले व वारंवार भेटून जाधवरावांना या बाबतींत गळ घातली. पण जाधवरावांनीं "तशी वेळ अद्याप आली नाहीं" असें सांगितलें. तथापि त्यानें आपलें निवेदन चालूच ठेविलें. तेव्हां श्री. जाधवराव यांनीं एक वृत्तपत्र घेतलें आणि फारब्रदरकडे पूर्ण दुर्लक्ष करून ते वाचूं लागले. त्या प्रसंगीं तेथें हजर असलेल्या कांहीं गृहस्थांना श्री. जाधवराव यांनीं एका युरोपियनाशीं असें वागावें याचें आश्चर्य वाटलें. त्यांपैकीं एकानें जाधवरावांचे सेक्रेटरी श्री. जोशी, आय्. सी. एस्. यांना तसें बोलून दाखविलें. तेव्हां जोशी म्हणाले, "मेहरबानी समजा, जाधवरावांनीं त्यांना हाकून लाविलें नाहीं !"

पूर्वी कोल्हापूर संस्थानांत पंचवीस–तीस रुपये पगारदार अंमलदारास रावसाहेब व दीड–दोनशें रुपये पगारदार अंमलदारास रावबहादूर म्हणावयाची ( व कागदोपत्रीं लिहिण्याची ) प्रथा असे. त्याप्रमाणें जाधवरावांना रावबहादूर असें संबोधिलें जाई. तथापि सरकारमान्य कोणत्याहि पदवीचा त्यांनीं केव्हांहि स्वीकार केला नाहीं. एखादा अपवाद सोडून मुंबई सरकारचे सर्व एक्झिक्युटिव्ह कौन्सिलर्स व दिवाण यांना 'सरकी' मिळाली. त्याच क्रमानुसार जाधवरावांना 'नाइटहुड' मिळण्याबद्दल दोन वेळां गव्हर्नरनें शिफारस करण्याचें ठरविलें; पण दोन्ही वेळां त्यांनीं हा मान साभार नाकारला. याबद्दल त्यांच्या एका रावबहादूर स्नेह्यांना अगदीं मनापासून वाईट वाटलें व मुद्दाम भेट घेऊन ते म्हणाले, "काय हें नामदारसाहेब ! अहो, नाईटहुडसाठीं लोक जीव टाकतात आणि पाण्यासारखा पैसा खर्चतात. अन् तुम्ही ही चालून आलेली पदवी नाकारताहांत !" भास्कररावांनीं शांतपणें उत्तर दिलें, "अहो रावबहादूर

तुम्ही म्हणतां तें खरें आहे. पण मी 'मिस्टर' असतांना पदव्यांसाठीं इतरांची शिफारस करूं शकतों हें काय कमी आहे!"

मुंबईचे गव्हर्नर, व्हाईसरॉय व इतर मोठमोठ्या ऑफिसरांच्या व भास्कररावांच्या ओळखी होत्या व कांहींशीं तर दाट स्नेह होता. क्लब, बार, जिमखाना, रेसेस, पार्ट्या, मेजवान्या वगैरे वर्तुळांत अशा पुष्कळ ओळखी होतात व वाढतात; पण जाधवराव यांपैकीं कोणत्याहि "छंदांत आणि फंदांत" नसतांना वरील सर्व वरिष्ठ अंमलदारांनीं त्यांच्याशीं स्नेह ठेवून पत्रव्यवहार करावा, यावरून जाधवरावांच्या विद्वत्तेची आणि कर्तृत्वाची बूज त्यांना होती असें दिसून येतें.

विधिमंडळाच्या निवडणुकीच्या वेळीं इतर उमेदवार सामान्यपणें आचरणांत आणीत असलेल्या मार्गाचा ते कधींच अवलंब करीत नसत. ते मतदारांना स्वच्छच सांगत, "माझी आजपर्यंतची लोकसेवा, माझीं मतें आणि मागसलेल्यांसाठीं मी जें तुमचा प्रतिनिधि म्हणून कौन्सिलांत काम करणार तें लक्षांत घेऊन आम्हांला तुमचीं मतें द्या. मतदारांस नेण्यासाठीं मोटारी, टांगे यांची सोय करणें मला शक्य नाहीं. तेव्हां तुम्हांस तुमचा प्रतिनिधि पाहिजे असेल तर घरच्या बैलगाड्या घेऊन मतदान करण्यास गेलें पाहिजे." या उद्गारांत त्यांचा स्वभाव स्पष्ट प्रतिबिंबित होत असे व जनता त्यांना निवडून देई.

विधिमंडळांत उत्तरें देतांना श्री. जाधवरावांच्या भाषणांत कधींच पाल्हाळ नसे. अगदीं मुद्देसूद, जरूरीपुरतें उत्तर ते देत. एखाद्या सभासदानें उपप्रश्न विचारून उपहास करण्याचा प्रयत्न केल्यास ते असें कांहीं खोंचदार, मर्मभेदक नि विदारक उत्तर देत कीं विचारणारा शरमिंदा व्हावा. पुष्कळांना लांबलचक भाषणें करण्याची, मुद्यास बगल देऊन वाद करण्याची हाव असते. श्री. जाधवराव पार्लमेंटरी शिस्तीचे भोक्ते असल्यानें ते जरी कमी बोलत तरी त्यांत आशय खूप व माहिती विपुल असे.

शिक्षणमंत्री असतांना श्री. जाधवरावांनीं एका शाळेला भेट दिली. त्यावेळीं तेथील हेड मास्तरांनीं फारच उत्तम सरबराई ठेविली व शेरेबुक पुढें करून चांगला शेरा मागितला. श्री. जाधवरावांनीं "चिवडा चांगला

होता, पेढेहि उत्तम खव्याचे होते" अशा तऱ्हेचा शेरा दिला. मास्तरांचें तोंड पहाण्यालायक झालें. परत आल्यावर श्री. जाधवरावांचे बरोबर गेलेल्या मित्रानें असा शेरा देण्याचें कारण विचारलें. तेव्हां ते म्हणाले, "अहो, शिक्षणमंत्र्यानें नुसता चिवडा खाऊन मास्तरांना त्यांच्या अपेक्षे-प्रमाणें शेरा दिला असता तर डेप्युटी इन्स्पेक्टरला अगर इन्स्पेक्टरला आपलें खरें मत व्यक्त करतां आलें असतें का? मास्तरनें आपल्या अकले-प्रमाणें चांगलें डोकें लढविलें होतें." यावरून आपल्या हाताखालील अगदीं लहानशा अधिकाऱ्याचीसुद्धां आपल्यामुळें कुचंबणा होऊं नये याबद्दल ते जपत असत हें दिसून येईल.

इन्स्पेक्टरच्या हुद्यावर असलेली एक पार्शी बाई सरकारी कामानिमित्त श्री. जाधवराव यांच्या घरीं त्यांना भेटावयास आली. त्यावेळीं भास्कररावांनीं एक चड्डी व दंडकें एवढाच पोषाख केला होता व त्या पोषाखांतच तिची भेट घेतली. अनेकांना हें कसेंसेच वाटलें व त्यांच्या एका स्नेह्यानीं तसें बोलूनहि दाखविलें. तेव्हां जाधवराव म्हणाले, "अगोदर सूचना देऊन ती आली असती तर मी व्यवस्थित पोषाख करून तिची भेट घेतली असती. तिला जर तशी आवश्यकता वाटली नाहीं तर मी तरी औपचारिकपणा कशाला पाळूं?"

प्रो. दस्तूर इतिहास हा विषय शिकवीत असत. त्या वेळची इतिहास शिकविण्याची पद्धत म्हणजे तारखा, सन व घडलेली हकीकत समजाऊन सांगणें अशी असे. कांहीं दिवस श्री. जाधवरावांना तो विषय शिकवावा लागला. तो शिकवितांना त्यांनीं विद्यार्थ्यांना निराळीच दृष्टि दिली व रूढ पद्धत बदलली. त्यामुळें विद्यार्थ्यांच्या मनावर तो विषय ठसला व त्याचे दीर्घकाल ठसे राहिले. त्या वेळच्या विद्यार्थ्यांना ग्रीसचा इतिहास असे. तो शिक-वितांना जाधवराव त्या देशाशीं आपल्या देशाची तुलना करून विद्यार्थ्यांना विषय समजाऊन देत. पाट्रिशियन व प्लेब्स यांसंबंधीं माहिती देतांना आपल्याकडील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद हा तसाच कसा आहे हें ते मोठ्या मार्मिकपणें विशद करीत. समाजांतील रूढ अन्यायाविरुद्ध जेथें जेथें शक्य होतें तेथें तेथें त्यांनीं विरोध दर्शविला व इतरांच्या मनांत तो निर्माण करण्याचा प्रयत्न केला याचें हें उत्कृष्ट प्रत्यंतर आहे.

श्री. जाधवराव यांना एखादी गोष्ट पटली कीं, कुणाचीहि पर्वा न करतां, होणाऱ्या निंदेस न जुमानतां ते तिचा उघड प्रचार करीत व स्वतः शक्य तेथें भाग घेत. तमाशा हें शिक्षणाचें उत्कृष्ट माध्यम आहे याची त्यांना जाणीव होती. सत्यशोधकी चळवळीच्या कामीं या हत्याराचा प्रभावी उपयोग करून घेण्यांत आला होता. तथापि तत्कालीन प्रतिष्ठित लोक सत्यशोधकी तमाशास जाण्यास कचरत असत. श्री. जाधवराव अगदीं उघडपणें जात असत. त्यांचें मनोधैर्य कांहीं वेगळेंच होतें. आपल्या मुलीच्या लग्नाचे वेळीं त्यांनीं विवाहमंडपांत सत्यशोधकी तमाशे करविले होते. आपलें उद्दिष्ट ज्या मार्गानें साध्य होईल तो मार्ग अवलंबिण्यास ते मुळींच माघार घेत नसत. अजून तमाशास जाण्यास समाजांतील प्रतिष्ठित लोक धजत नाहींत. मग त्या वेळीं लग्नसमारंभांत सत्यशोधकी तमाशा करावयास केवढें मानसिक बल पाहिजे होतें याची कल्पनाच केलेली बरी. आपल्या मताबद्दल दृढ विश्वास असल्याचेंच हें द्योतक होय.

आंतरजातीय विवाहास त्यांचा पाठिंबा होता व तसे विवाह व्हावेत याकरितां ते सदैव सहाय्य करीत. श्री. गोविंद चिमणाजी भाटे यांनीं एका मराठा मुलीबरोबर विवाह केला तेव्हां श्री. जाधवराव यांनीं कन्यादान केलें.

जाधवरावांच्या साध्या नि सरळ आयुष्यांत पैज मारणें हा प्रकार नव्हताच. तथापि एक पैज स्वीकारून त्यांनीं ती जिंकली. तो प्रकार असा—

१९३० सालीं तत्कालीन व्हाईसरॉय लॉर्ड अर्विन यांच्याकडे जाधवरावांना मेजवानीचें आमंत्रण होतें. त्या वेळीं कायदेभंगाची चळवळ जोरावर असून कॉंग्रेस पक्षाच्या सर्व प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या धरपकडी सुरू होत्या. त्यावर बोलणें सुरू होऊन संभाषणाचा ओघ त्या वेळचे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे अध्यक्ष श्री. विठ्ठलभाई पटेल यांच्याकडे वळला. लॉर्ड अर्विननीं विचारलें, "मिस्टर जाधवराव, तुमचें काय मत आहे? मिस्टर विठ्ठलभाई पटेल यांना अटक होईल कीं नाहीं?" जाधवरावांनीं उत्तर दिलें, "मी विठ्ठलभाईंना जितकें ओळखतों त्यावरून ते अटक करून घेणार नाहींत असें मला वाटतें." लॉर्डसाहेब म्हणाले, "असें कसें शक्य आहे? सर्वच प्रसिद्ध कॉंग्रेसमन अटकेंत जात आहेत. मी पैज लावून सांगतों विठ्ठलभाईंना अटक खात्रीनें होणार." जाधवराव उद्गारले, "मी स्वीकारतों ही

पैज." लॉर्डसाहेबांनीं ए. डी. सी. ला बोलाविलें व ही पैज त्यास लिहून घेण्यास सांगितलें. थोड्याच दिवसांनीं विठ्ठलभाई पटेल विलायतेस निघून गेले व त्यांना अटक झाली नाहीं. राजमुकुट शिक्क्याचें एक पाकीट कोल्हापूरच्या पत्त्यावर आलें व त्यांतून एक पांच रुपयांची नोट व लॉर्ड अर्विनच्या सेक्रेटरीच्या सहीचें नामदार व्हाईसरॉय यांच्या आज्ञेनुसार हे पैजेचे पैसे पाठवीत आहे, असें पत्र आलें.

श्री. जाधवराव दिवाण झाले व त्यांना दरमहा चार हजार रुपये पगार मिळूं लागला. तथापि त्यांचा स्वभाव, राहणी, पोषाख, व्यासंग, शांत वृत्ति, स्थितप्रज्ञता यांत कसलाहि फरक पडला नाहीं. युरोपियनाशीं नित्य संबंध येणारे त्या वेळचे लोक घरीं काटे, चमचे वापरीत. श्री. जाधवरावांनीं या सुधारणा घरीं आणल्या नाहींत. उलट पूर्वींचीच पद्धत चालू ठेविली.

अखेरचीं पंचवीस वर्षें भास्करराव आपल्या मुलांशीं व कुटुंबियांशीं अत्यंत खेळीमेळीनें वागले. पूर्वी गृहकार्यांत लक्ष द्यावयास त्यांना फुरसतच मिळत नसे. पण पुढें पुढें त्यांच्या स्वभावांत बदल होत गेला व त्याची त्यांना जाणीवहि होती. सकाळीं दहा व रात्रौ आठाच्या ठोक्यांना जेवणारे भास्करराव मुलांच्यासाठीं दुपारीं दीड व रात्रौ दहापर्यंत आपणहून थांबूं लागले. तत्पूर्वींच्या नोकरी व राजकारणाच्या कालांत त्यांच्या विनोदास अवसर नव्हता; पण अखेरच्या वीस वर्षांत त्यांच्या संभाषणांत विनोद हा महत्त्वाचा भाग झाला. आधींच समाधानी वृत्ति आणि त्यांत सत्त्वशील व संसारदक्ष पत्नी नि गुणी मुलें यांची भर पडल्यावर त्यांचा संसार (स्वतः न करतांहि) सुखाचा व समृद्धीचा झाला यांत नवल नाहीं! कोल्हापुरांत जाधवरावांचें कुटुंब ही एक "संस्था" आहे व कित्येक घरांतून या कुटुंबाचीं उदाहरणें देण्यांत येतात.

भास्कररावांचे वडील विठोजीराव व मातुःश्री लक्ष्मीबाई यांस साळूताई, भास्करराव, कृष्णाबाई, चंद्राबाई, गोविंदराव, यशवंतराव, व लहानपणींच वारलेल्या दोन मुली अशीं एकंदर ८ अपत्यें झालीं. त्यांचे धाकटे बंधु श्री. गोविंदराव हे फर्स्ट क्लास सबजज म्हणून रिटायर झाले. त्यांनींहि आपली नोकरी अत्यंत निःस्पृहपणें करून भास्कररावांचाच कित्ता गिरविला.

त्यांनीं ज्या ज्या ठिकाणीं नोकरी केली तेथील सामान्य जनतेनें त्यांना दुवाच दिला. प्रसंगीं वरिष्ठांचा रोष पत्करूनहि त्यांनीं गरिबांना न्यायदान केलें.

भास्कररावांना मातृसुख बराच काल ( त्यांच्या वयाच्या शहात्तराव्या वर्षापर्यंत ) लाभलें. त्यांच्या मातोश्री श्री. लक्ष्मीबाई यांचें शिक्षण त्या कालांत होण्याची कांहींच शक्यता नव्हती. पण त्यांच्या घराशेजारीं एक शाळा होती. तेथें रोज 'पर्वचा' चाले. तो ऐकून सर्व उजळणी, तोंडचे हिशेब व व्यवहारांत उपयुक्त अशीं गणितें त्यांनीं आत्मसात् केलीं. त्या शेजारच्या मुलांकडून धुळाक्षरें शिकल्या व छापील मराठी मजकूर त्या वाचूं लागल्या. हें वाचन त्यांनीं १९२५ सालापर्यंत म्हणजे वयाच्या ऐंशीव्या वर्षापर्यंत चालू ठेवून बहुतेक सर्व उपलब्ध वाङ्मय व नियतकालिकें वाचून काढलीं. तरी पण त्यांना लिहायला आलें नाहीं. लहानपणापासून संसाराची स्वतंत्र जबाबदारी त्यांनीं पार पाडली होती. त्यांचा स्वभाव अत्यंत मानी, शिस्त कडक परंतु अंतःकरण प्रेमळ होतें. कोणाच्याहि उपयोगीं पडायला त्यांचें पाऊल पुढें असे. मोठ्याई ऊर्फ बडीमा जुन्या पिढींतल्या असूनहि भास्कररावांच्या पुरोगामी विचारांना, सत्यशोधक समाज मतांना व जातिभेदविच्छेदनाला त्यांनीं केव्हांहि विरोध केला नाहीं. आपल्या घरचीं सर्व धार्मिक कृत्यें, लग्नकार्यें वगैरे त्यांनीं मराठा पुरोहितांकडून करवून घेतलीं. आपल्या नातीला ( डॉ. ताराबाई ) उच्च शिक्षणासाठीं विलायतेला पाठविण्यासाठीं पहिला पुढाकार त्यांनीं घेतला. त्यांनीं १५ नातवंडें व २५ परतवंडें पाहिलीं. त्या वयाच्या सत्त्याण्णवाव्या वर्षीं ता. ८ मे १९४३ रोजीं कोल्हापूर येथें मरण पावल्या. शेवटपर्यंत त्यांची प्रकृति अगदीं निकोप होती.

भास्कररावांचें कौटुंबिक जीवन जितकें प्रदीर्घ तितकेंच सुखाचें गेलें आहे. त्यांची वृत्ति संसारी माणसासारखी नसल्यानें त्यांनीं गृहव्यवस्थेंत कधीं मन घातलें नाहीं, किंवा ढवळाढवळ केली नाहीं. १९१२ सालापासून आजतागायत गृहव्यवस्थेची संपूर्ण धुरा त्यांच्या पत्नीनीं—मानीसाहेब यांनीं—वाहिली. आपल्या व्यासंगी, सदैव कामांत व्यग्र असणाऱ्या व तत्त्वशील पतीला घरांतील प्रमेयें व कटकटी यांपासून त्यांनीं सदैव अलिप्त

ठेविलें. ही पत्नीची योग्यता भास्कररावांनीं सदैव जाणली. १९४६ साल
मार्च महिन्यांत भास्करराव–भागीरथीबाई यांच्या विवाहास पन्नास वर्षें पू
झालीं. हा विवाह–सुवर्ण–महोत्सव त्यांच्या सर्व निकटच्या आप्तांनी
मोठ्या थाटानें व उत्साहानें, जाधव कुटुंबाशीं ज्यांचा घरोबा व ऋणानुबं
बरोबर पन्नास वर्षांचा होता त्या सर र. व्यं. सबनीस यांना बोलावू
साजरा केला. त्या दिवशीं भास्कररावांचे करवीरांतील सर्व स्नेही, ऋणानुबंधी
दरबारचा जुना व तत्कालीन नोकरवर्ग व इतर प्रतिष्ठित नागरिक यांनी
येऊन या दांपत्याचें अभिनंदन व अभीष्टचिंतन केलें. त्यांच्या मुलामुलींनी
व आप्तेष्टांनीं यानिमित्त जी रक्कम जमविली त्यांत तितकीच भर घालू
लोकोपयोगी संस्थांना मदत देण्यांत आली. कौटुंबिक जीवनाचें हें ए
अनामिक, अभिनव नि आदर्श उदाहरण म्हणून नमूद करण्यासारखे
आहे. त्यांत गृहजीवनाचा आनंद आहे, त्याचप्रमाणें त्याची अनुकरणी
स्मृति आहे.

भास्करराव यांच्या कौटुंबिक जीवनांत त्यांना जें सौख्य व स्वास्थ
लाभलें त्याचें सर्व श्रेय त्यांच्या सुशील पत्नी श्री. मानीसाहेब उर्फ भागीरथी
बाई यांनाच द्यावें लागेल. अगदीं लहानपणीं श्री. मानीसाहेब यांनी
विवाहबद्ध होऊन जाधव घराण्यांत प्रवेश केला. श्री. भास्करराव जाधव
यांचा सर्व वेळ विद्याव्यासंग, राज्यकारभार, सामाजिक व राजकीय चळवळी
यांतच जात असे. संसारांत लक्ष घालण्यास त्यांना वेळ सांपडणें कठीण
होतें. त्यामुळें कुटुंबांतील सर्व प्रकारची जबाबदारी श्री. मानीसाहेब यांच्या
वरच पडत असे. संसारांतील इतर बाबींबरोबरच मुलांचें शिक्षण व मुलांना
योग्य वळण देणें इत्यादि महत्त्वाच्या गोष्टी मानीसाहेबांनीं आपल्या पतीच्या
इच्छेनुसार पार पाडल्या. श्री. जाधवरावांच्या कट्टर सत्यशोधकी मतांना
विरोधी असें कांहींहि घरीं होऊं द्यावयाचें नाहीं याची त्या खबरदारी घेत
यावरून त्यांची संसारकुशलता दिसून येते. श्री. भास्करराव यांचें खाण्या
पिण्याकडे विशेष लक्ष नसे. नेमलेल्या वेळीं ताटांत येईल तें, ठराविक तेवढेंच
खावयाचें असा त्यांचा रिवाज होता. एखादा जिन्नस आवडतो तो आजच्या
जेवणाला करा असें त्यांनीं कधींहि सांगितलें नाहीं किंवा मेजवानीच्या वेळीं
एखादा पदार्थ आवडीनें त्यांनीं जादा खाल्ला असें कधींहि झालें नाहीं.

जाधव पतिपत्नी व अपत्यें



कॅ. आनंदराव, ले. कर्नल विठोजीराव, श्री. हिंदुराव, श्री. आप्पासाहेब
डॉ. कु. ताराबाई, श्री. भागीरथीबाई, कै. भास्करराव, सौ. सत्यवतीबाई तावडे, सौ. मीरा शिंदे, सौ. सुलभा माने.

श्री. भास्करराव निरीश्वरवादी होते तर श्री. मानीसाहेबांचा ईश्वरावर विश्वास आहे. कौटुंबिक संभाषणांतून व वादविवादांमधून श्री. भास्करराव आपला निरीश्वरवाद अट्टाहासानें मांडीत; परंतु आपल्या विद्वान पतीच्या मताशीं विसंगत असें मानीसाहेब केव्हांच वागल्या नाहींत. निधनापूर्वी एक महिना श्री. भास्करराव आजारानें अंथरुणावर खिळून पडले होते. आपला अंतकाल जवळ आल्याची त्यांना पूर्ण कल्पना होती. आपल्या पत्नींना हांक मारून ते वारंवार सांगत, " बाईसाहेब, माझा आजार बरा होण्यासाठीं देवाला नवस किंवा उपासतापास करूं नका. " अशा प्रसंगींहि श्री. मानीसाहेबांनीं आपल्या पतीच्या मताविरुद्ध कोणतीच गोष्ट केली नाहीं. यांतच मानीसाहेबांच्या जीवनाचा श्रेष्ठपणा दिसून येतो. या पतिपत्नींचा पन्नास वर्षांचा जीवनसंसार आदर्श असा आहे. श्री. मानीसाहेबांच्या तोंडून त्यांच्या दीर्घकालीन संसारपटांतील गोष्टी ऐकतांना कोणाचेंहि मन रंगून जाईल अशा त्या आठवणी मनोहर आहेत. त्यांचा संग्रह करून प्रसिद्ध करण्यांत आला तर मराठी साहित्यांत एक मौल्यवान भर पडेल. आदर्श पत्नी व आदर्श माता या दोन्ही नात्यांनीं आपलें कर्तव्य कुशलतेनें पार पाडून त्यांनीं जाधव घराण्याचा लौकिक वाढविण्यास आपल्या पतीला जोड दिली यांत वाद नाहीं.

भास्कररावांना अपत्यसुखाचा भरपूर लाभ झाला. चार मुलगे व चार मुली असा त्यांचा परिवार आहे. थोरले चिरंजीव हिन्दुराव ऊर्फ बापूसाहेब इनकम टॅक्स ऑफिसर आहेत. दुसरे ले. क. विठोजीराव लष्करांत आहेत. तिसरे आप्पासाहेब कोल्हापूर येथें साऊंड एंजिनियर असून चौथे मेजर आनंदराव हेहि लष्करांत आहेत. थोरल्या कन्या सौ. सत्यवतीबाई तावडे ( प्रि. सी. रा. तावडे, M. A. T. Ed., B. E. S. (I) retired यांच्या पत्नी ), दुसऱ्या डॉ. ताराबाई या राजकोट येथें स्वतंत्र वैद्यकीय व्यवसाय, दवाखाना व प्रसूतिगृह चालवितात. तिसऱ्या सौ. सुलभाबाई माने ( श्री. पांडुरंगराव माने, B. E. A.M.I. E. B. S. E. ( I ) एक्झिक्युटिव्ह एंजिनियर मुंबई यांच्या पत्नी ), व चौथ्या सौ. मीराबाई शिंदे ( श्री. शंकरराव बी. शिंदे, B. A. असि. फायर सुपरिंटेंडेंट, पुणें लष्कर यांच्या पत्नी ) या होत.

भास्करराव वेदांताचे नुसते जडाभ्यासी नव्हते. या वेदाध्ययनामुळें त्यांची वृत्ति अतिशय शांत झाली होती व ती कशानेंहि ढळली नाहीं. दुःखाघातानें ते कधीं खचून गेले नाहींत आणि सुखाच्या वेळींहि त्यांची शांत वृत्ति कधीं ढळली नाहीं. १९२६ सालीं " तुम्हांस मिनिस्टर नेमतां येत नाहीं " हें वृत्त जितक्या शांत चित्तानें त्यांनीं ऐकलें तितक्याच शांत वृत्तीनें १९२८ सालीं त्यांना मिनिस्टर नेमल्याचें वृत्त त्यांनीं ऐकलें. १९२६ सालीं त्यांना मिनिस्टर नेमलें नाहीं हें जाहीर झाल्याबरोबर त्याच दिवशीं त्यांच्या एका खानदेशी तथाकथित मित्रानें मिनिस्टर न नेमल्याबद्दल फोनवर त्यांचें अभिनंदन केलें. त्या वेळीं जाधवरावांनीं उलट त्या मित्राची मनीषा पूर्ण झाल्याबद्दल त्याचें अभिनंदन केलें व तेंहि अगदीं शांत चित्तानें !

याच वृत्तीच्या बळावर एकीकडे प्रत्यक्ष मृत्यूशीं झगडत असतां ते सत्यशोधक समाज परिषद भरविण्याची खटपट करीत होते. आपणास शक्य होती ती देशसेवा नि समाजसेवा आपण प्रामाणिकपणें केली याचें समाधान त्यांना लाभलें होतें म्हणूनच कोणतीहि विवंचना त्यांना राहिली नव्हती. एक न्यायप्रिय अधिकारी, प्रामाणिक देशभक्त, व्यासंगी लेखक, निरलस कार्यकर्ता, आदर्श नि चारित्र्यसंपन्न सद्गृहस्थ, म्हणून त्यांची कीर्ति अमर आहे. आपल्या जीवनानें समाजकार्याचें एक अनुकरणीय उदाहरण त्यांनीं घालून दिलें. एखाद्या विषयाची आत्यंतिक तळमळ लागली म्हणजे माणूस केवढें कार्य करूं शकतो याचें जाधवरावांचें आयुष्य म्हणजे एक प्रात्यक्षिक आहे.

—*—

Sir K. V. Reddy was making enquiries about you. He leaves here tomorrow for Madras where he is appointed an Executive Counciller, His son has also come here.

Yours affectionately

B. Jadhav [illegible]

" सर्व मनुष्यें एकाच ईश्वराचीं लेंकरें आहेत, त्यांचें व माझें बंधुत्वाचें नातें आहे हें जाणून वागण्याचा मी नित्य प्रयत्न करीन; देवाची भक्ति, पूजा, उपासना वगैरे करितांना तसेंच धर्मविधी करितांना मी कोणाही मध्यस्थाची जरूर ठेवणार नाहीं; व असें वागण्याविषयीं इतरांचें मन वळविण्याचा मी झटेन; माझ्या मुलांमुलींस विद्या शिकविल्याशिवाय मी राहणार नाहीं; राज्यकर्त्याशीं राजनिष्ठेनें वागेन; अशी सर्वसाक्षी सच्चिदानंद परमात्म्याला स्मरून मी प्रतिज्ञा करितों. ह्या माझ्या पवित्र उद्देशसिद्धीस नेऊन जन्माचें सार्थक करण्यास परमात्मा मला साह्य देवो."

~~[illegible]~~

~~[illegible]~~

~~[illegible]~~

~~[illegible]~~

~~[illegible]~~

~~[illegible]~~

~~[illegible]~~

[illegible]

[illegible]

श्री. भास्कररावांचें हस्ताक्षर

# रामायणापासून हिंदुस्थाननें गिरविलेला धडा



रामायण व महाभारत हे आर्यांचे मोठे आवडते इतिहास आहेत. यांत जसें लिहिलें आहे तसें घडून आलें, असें पुष्कळ लोक मानतात. भारती युद्धापूर्वीं राम होऊन गेला, अशी समजूत आहे. तसें असल्यास रामायणाची शिकवण भारती वीरांनींहि घेतली असावी.

रामायणापासून बंधुप्रेमाचा धडा घ्यावा, असें सांगण्यांत येतें. राम, भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न, हे चार बंधू; यांचें परस्पर प्रेम अति गाढ होतें. राम वडील म्हणून तोच राज्यास अधिकारी, यासाठीं आईनें आपणाकरितां मिळविलेल्या राज्याचाहि त्याग भरतानें केला. लक्ष्मणानें रामाची व शत्रुघ्नानें भरताची सेवा एकनिष्ठेनें केली, वगैरे उदाहरणें दाखवून बंधुप्रेम हाच रामायणाचा मुख्य विषय असें प्रतिपादिलें जातें.

यांतील लक्ष्मण व शत्रुघ्न हे सुमित्रेपासून दशरथास झालेले पुत्र. सुमित्रा ही राज्यकन्या नव्हती. म्हणजे ती हलक्या कुलांतील होती. तिचे पुत्र राज्यास अधिकारी नव्हते. म्हणून राज्यास अधिकारी अशा राजपुत्रांची सेवा त्यांनीं करावी, हें उचितच होतें.

आजच्या काळींहि खानजाद अनौरस पुत्र, औरस पुत्रांची सेवा करणारे राजकुलांत व सरदार घराण्यांत आढळून येतात.

आतां भरत–राम यांचें प्रेमच शिल्लक राहतें. पण रामायणांत प्रसिद्ध अशा भावांच्या आणखी दोन जोड्या आहेत. पहिली वाली व सुग्रीव यांची आणि दुसरी रावण व बिभीषण यांची. यांना कुंभकर्ण हा तिसरा भाऊ होता.

वालीनें सुग्रीवाच्या बायकोचा अभिलाष धरला, असें एक कारण उभयतांतील वादाचें सांगण्यांत येतें. पण त्या काळीं भावाच्या बायकोवर एक प्रकारें हक्कच चालत होता. वालीला मारल्यावर सुग्रीवानें वालीची बायको आपल्या जनानखान्यांत ठेवली हें रामायणच सांगतें. भावाच्या मालमत्तेवर धाकट्या भावाचा वारसा साहजिकच येतो; व बायकोची योग्यता मालमत्तेइतकीच होती. रावणाच्या पश्चात् मंदोदरीला बिभीषणानें आपल्या जनान्यांत दाखल केली, ती याच न्यायानें.

सुग्रीव व वाली यांचें मुख्य भांडण राज्याच्या वांटणीचें होतें. वाली वडील; त्याचा हक्क श्रेष्ठ. सुग्रीव धाकटा; त्याला हिस्सा कसा मिळावा ? हिस्सा मिळत नाहीं, तर वालीचा काटाच काढून टाकल्यास आपणास सबंध राज्य मिळेल, हें सुग्रीवास पटलें. या कामीं मारुतीसारख्या त्याच्या मंत्र्याची संमति होती.

सुग्रीव, वाली, मारुती वगैरे सर्व अनार्य मंडळी; व राम–लक्ष्मण हे आर्य. आपल्या भावास मारणेसाठीं अनार्य सुग्रीवानें आर्य रामाची मदत घेतली. त्याचे हातून वालीस मारवून रामाचा हस्तक, सेवक वगैरे नातें पतकरून वालीचें राज्य सुग्रीवानें बळकाविलें.

रामाची बायको सीता रावणानें जबरदस्तीनें आणली म्हणून रामानें लंकेवर स्वारी केली. त्या कामीं सुग्रीव व त्याचे सेवक रामासाठीं फार झटले, व युद्धांत त्यांनीं मर्दुमकी केली. त्या वेळीं रावणाचा भाऊ बिभीषण हा रामाच्या पक्षास मिळाला, व लंकेंतील सर्व भेद त्याचेकडून झाला आहे. रामाची बायको आणली हें अनीतीचें कृत्य रावणानें केलें म्हणून बिभीषण रामाकडे गेला, असें कारण देण्यांत येतें. पण तें कारण समाधानकारक नाहीं. दुसऱ्याची बायको जबरदस्तीन नेणें, यांत अनीतिकारक किंवा अधर्म्य असें त्या काळीं मानलें जात नसे. बरें, तशी गोष्ट गैर आहे असें त्या काळीं मानीत, असें वादाकरितां घेऊन चाललें, तरी शत्रूला फितूर होण्याचें काम जें बिभीषणानें केलें आहे, तें तर अगदींच अयोग्य व असमर्थनीय आहे. परदेशच्या परक्या शत्रूस मिळून त्याचेकडून आपल्या भावास मारविणें हा देशद्रोह आहे. या द्रोहाचें पातक बिभीषण व सुग्रीव या दोघांच्याहि शिरावर येत आहे.

हनुमान ऊर्फ मारुती यानें रामाची सेवा एकनिष्ठेनें केली आहे. याबद्दलहि रामायणांत मोठें रसभरित वर्णन केलेलें आहे.

राम हा विष्णूचा अवतार आहे असें मानण्यांत येतें, व यामुळें मारुती हा भक्तश्रेष्ठ समजला जातो. पण रामास अवतारांत अलीकडे घातलें आहे. त्यापूर्वीं तो केवळ माणूस होता. तो वीर, शूर, मोठा नेता होता. पण सुग्रीव, मारुती वगैरेंच्या दृष्टीनें तो परदेशी होता. त्याची मदत घेऊन सुग्रीवानें जसा देशद्रोह केला, तसाच रामाची सेवा करून मारुतीनें देशद्रोहच केला असें म्हणावें लागतें.

आपल्या दायादांची खोड मोडण्यासाठीं परक्यांची मदत बेशक घ्यावी, असा आचार सुग्रीव व बिभीषण यांनीं सुरू केला. त्यांचा कित्ता प्रथमतः पांडवांनीं कौरवांशीं लढतांना गिरविला. पुढील इतिहासांत तर या देशद्रोह्यांची फारच मोठी सेना नजरेस पडते. अलेक्झांडर ऊर्फ शिकंदर याच्या काबूल येथील छावणींत हिंदुस्थानांतील बऱ्याच देशचे राजपुत्र नजराणे घेऊन हजर होते; व हिंदुस्थानावर स्वारी करा आम्ही मदत देतों, असें विनवीत होते. त्यांची यादी इतिहासांत आहे. मुसलमानांच्या बावटळीस या सुग्रीव–बिभीषणानुयायी देशद्रोह्यांनींच जोर आणिला आहे. हिंदुस्थानचा सर्व इतिहास देशद्रोहाच्या काळ्या काजळानें माखला आहे. आमच्या देशाचा व लोकांचा अधःपात मुख्यत्वें या कारणानें झाला आहे.

आपल्या देशावर स्वारी करून येणाऱ्या बलिष्ठ राजाची सेवा करण्यांत गैर कांहीं नाहीं, उलट तें काम चांगलें, अशी शिकवण हनुमानाच्या वर्तनापासून आमच्या या हिंदुस्थानांतील सर्व देशांनीं व प्रांतांनीं व लोकांनीं घेतली आहे. परकीयांच्या स्वाऱ्यांस सुग्रीव व बिभीषण यांच्या अनुयायांनीं केवळ क्षुद्र स्वार्थासाठीं मदत केली व परकीयांचे पाय आमच्या देशांत रोवले. त्यानंतर ते पाय चिरस्थायी करण्यास व त्यांची सत्ता जास्त जास्त फैलावण्याचे कामीं हनुमान–मारुतीचे अनुयायी पुढें सरसावले. पूर्वीचा काळ सोडून देऊन अगदीं अलीकडील काळ घेतला, तरी मुसलमान बादशहास रजपूत, मराठे वगैरे लढाऊ जातींच्या सरदारांचा कधींहि तुटवडा पडला नाहीं. परकीय धन्याची सेवा अत्यंत इमानानें

केली पाहिजे, हा परमभक्त मारुतीनें घालून दिलेला धडा यांनींहि अतिशय इमानानें गिरवून आपल्या स्वामिभक्तीचें प्रदर्शन मोठ्या दिमाखानें करून, आपला देश जिंकण्याच्या परकीयांच्या उद्योगास उत्साहानें हातभार लाविला आहे. सर्व हिंदुस्थानच्या नकाशास तांबडा रंग देण्याच्या कामीं प्रथम सुग्रीव व बिभीषणाच्या पावलांवर पाऊल टाकणारे व त्याचेबरोबरच मारुतीचे शिष्य असे पुढें आले. अशा लाखों हिंदी सैन्याच्या मदतीवरच मुसलमान बादशहास किंवा इंग्लंडच्या राजास आपलें साम्राज्य वाढवितां व राखतां आलें आहे.

आपल्या भावावर परक्याची स्वारी झाली आहे; आपला धाकटा भाऊ बिभीषण केवळ स्वार्थानें शत्रूस फितूर झाला आहे, हें पाहून आपलें कर्तव्य म्हणून देशाच्या स्वातंत्र्यरक्षणासाठीं व बंधुप्रेमानें लढणारा, निःस्वार्थी देशभक्त कुंभकर्ण नजरेस येतो. पण आजपर्यंतच्या पुराण सांगणाऱ्यांनीं किंवा कथा करणाऱ्या हरिदासांनीं या देशभक्ताची व त्याच्या बंधुप्रीतीची वाखाणणी केव्हांच केली नाहीं. उलट तो झोपाळू म्हणून त्याची टवाळी करून त्याला तिरस्कारार्हच केलें आहे. याउलट फितुरी, स्वार्थी, देशद्रोही अशा बिभीषणास व परकीयांची सेवा एकनिष्ठेनें करणाऱ्या हनुमानास, चिरंजीव करून त्यांच्यासारखे भगवद्भक्त व्हावें, असाच उपदेश आज हजारों वर्षें आमच्या अडाणी लोकांस केला जात आहे. या उपदेशाचा परिणाम सर्व देशांतील व प्रांतांतील लोकांवर किती झाला आहे, हें विस्तारानें सांगणेची जरूरी नाहीं. केवळ मराठ्यांचाच अलीकडला इतिहास चाळल्यास कुंभकर्णाचा कित्ता गिरविणारा

बंधुभक्त व देशभक्त एखादा सांपडेल, पण बिभीषणाचे अनुयायी निदान दहा तरी मिळतील.

रामायणाची ही शिकवण आमच्या देशाच्या ऱ्हासाचें मुख्य कारण आहे, इकडे फार थोड्यांचें लक्ष जातें; व त्याबद्दल स्पष्टपणें बोलण्यास पुढें येणारा फार विरळा. रामाचे व रामभक्तांचे असतील नसतील ते गुण गाऊन, त्यांच्या वाईट कृत्यांचें लंगडें समर्थन करून आपल्या रामभक्तीचें प्रदर्शन करणारे रावापासून रंकापर्यंत आढळतील !!

–ज्ञानमंदिर, जानेवारी १९३५.

# टीकाकारांस उत्तर

'रामायणापासून हिंदुस्थाननें गिरविलेला धडा' या मथळ्याखालीं 'ज्ञानमंदिरा'च्या जानेवारीच्या अंकांत मीं एक लहानसा लेख लिहिला होता. त्यावर टीका करणारे एकंदर ११ लेख संपादकांकडे आले. त्यांतील महत्त्वाचे तीन लेख (श्री. सरवटे बी. ए. एल्एल्. बी., श्री. महादेव भिकाजी केळकर व श्री. भी. ना. धारवाडकर, गुलबर्गा यांचेकडून आलेले) मार्चच्या अंकांत प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. या तिहींतहि माझ्या लेखावर सडकून टीका केली आहे. सदर लेखांचीं प्रूफें माझ्या नजरेखालीं घालण्यांत आलीं व त्यांवर मीं उत्तरहि तयार केलें. सदर तीन लेखांबरोबरच हें माझें उत्तरहि प्रसिद्ध करावें असा प्रथम विचार होता; पण एकाच विषयाकडे जवळ जवळ निम्मा अंक खर्चीं पडल्यास वाचकांस विषयवैचित्र्य चाखण्यास मिळणार नाहीं, असें दिसल्यावरून माझा लेख एप्रिलच्या अंकासाठीं मागें ठेवण्यांत आला. हें माझें उत्तर वाचण्यापूर्वीं तिसरे अंकांत प्रसिद्ध झालेले तीनहि लेख वाचकांनीं पुनः वाचून पहावेत अशी विनंति आहे.

माझ्या टीकाकारांपैकीं दोन तरी वकील आहेत. प्रतिपक्षाच्या पुराव्यांत खोडून टाकण्यासारखें फारसें नसल्यास त्यावर अपशब्दांचा भडिमार करण्याची बऱ्याच वकिलांची रीत आहे. या कामीं श्री. सरवटे यांनीं ती स्वीकारली असें मी म्हणत नाहीं; परंतु त्यांनीं योजिलेलीं विशेषणें तसा भास उत्पन्न करतात. पहिल्याच पारिग्राफांत माझ्या शोधास 'अपूर्व,' विधानांस 'निराधार,' अनुमानांस 'सदोष,' दाखल्यांस 'भ्रामक' आणि विचारसरणीस 'विकृत' अशीं शेलकीं विशेषणें लावूनहि त्यांच्या मनास समाधान वाटलें नाहीं. 'ठोकून देतों ऐसाजे' रीतीनें लिहिणारा, स्वतःकडे स्पष्टवक्ते–शहाणपणाचा मक्ता घेणारा, व विरुद्ध मत असणाऱ्यांची मूर्ख व असमंजस म्हणून टवाळी करणारा, अशीं मजविषयीं निराधार विधानें करणें त्यांना योग्य दिसलें. इतक्यानेंहि त्यांची तृप्ति

झाली नाहीं म्हणून 'त्यांच्या म्हणण्याचा भाव 'सर्वस्वीं चुकीचा,' 'बुद्धिपुरःसर विपर्यास' असेहि आरोप करण्यापर्यंत त्यांची मजल गेली आहे. 'एकदां डोळ्याला काबीळ झाली म्हणजे सर्वच विपरीत दिसूं लागून मनुष्य कसें बहकत बोलूं लागतो याचा हा नमुना आहे' अशी माझी कींव करण्याचा उदारपणाहि त्यांनीं दाखविला आहे. आपल्या पत्राच्या अखेर 'रा. जाधव यांनीं जाणूनबुजून इतिहासाचा विपर्यास व वाचकांचा बुद्धिभेद केला आहे' असें लिहून आपल्या त्वेषाचा पारा बऱ्याच अंशांनीं वर चढविला आहे. माझा लेख त्यांच्या सात्त्विक त्वेषास कारणीभूत झाल्याबद्दल मी दिलगीर आहें.

श्रीयुत महादेव भिकाजी केळकर यांनीं अपशब्दांचा प्रयोग केला नाहीं व आपलें म्हणणें शक्य तितक्या जोरदार, पण साध्या भाषेंत मांडलें आहे, याबद्दल त्यांचें अभिनंदन करतों. टीका तत्त्वशोधनाकरितां असावी, ही मर्यादा त्यांनीं चांगली पाळली आहे. पण रामायणाचें त्यांचें वाचन बरेच दिवसांचें जुनें दिसतें; त्या वाचनानें मनावर झालेले संस्कार त्यांनीं आपल्या टीकेंत दिले आहेत.

श्री. भी. ना. धारवाडकर यांचा मूळचा लेख फारच मोठा होता. त्यांत संपादकांनीं पुष्कळच छाटाछाट केली आहे. या छाटाछाटींत बरेचसे अपशब्द निघून गेले. त्यांचा उल्लेख व त्यावर चर्चा मी करूं इच्छीत नाहीं. तथापि उरलेल्या भागांतहि अपशब्दांचा भरणा बराच आहे. या शिव्यांचा मासला म्हणून न छाटलेलें एक वाक्य देणें येथें अयोग्य होणार नाहीं. "आर्यांच्या आवडत्या राष्ट्रीय इतिहासावर निरर्थक काळी शाई ओतणाऱ्या कुंभकर्णपक्षपाती श्री. भास्कररावांनीं मूळ रामायणांतील ती कथा पुनः एकवार लक्षपूर्वक वाचावी." सबंध पत्र छापलें गेलें नाहीं, हे वाचकांवर संपादकांचे उपकारच आहेत.

"कुंभकर्णपक्षपाती जाधव" अशी नवीन शिवी आपल्या कल्पनेनें योजून रा. धारवाडकर यांनीं तिचा प्रयोग बरेच वेळ केलेला, छाटाछाट करून राहिलेल्या भागांत आहे. "जाधवप्रिय कुंभकर्ण" असाहि प्रयोग रुचिवैचित्र्यानें एकवेळ केलेला आढळतो.

तीनहि टीका मुळाकडे पुनः शांतपणें न पहातां सात्त्विक त्वेषांत पूर्वीच्या वाचनाच्या आठवणींवरून लिहिलेल्या दिसतात. या उत्तरांत मीं जे मुळांतील श्लोक दिले आहेत, त्यांवरून पुनः विचार करून पाहिल्यास या तिघांस व बाकीच्या टीकाकारांस माझ्या म्हणण्यास मुळांत चांगलाच भक्कम आधार आहे, असें दिसून येईल, असा भरंवसा आहे.

माझ्या लेखावरची बरीचशी टीका गैरसमजुतीची आहे. माझ्या लेखाचा मथळा "रामायणापासून हिंदुस्थाननें गिरविलेला धडा" हा आहे. रामायणाची शिकवणच तशी आहे, असा आरोप मीं केलेला नाहीं. हिंदुस्थानच्या लोकांच्या मनोरचनेंतील कांहीं दोषांमुळें त्यांना सुग्रीव, बिभीषण व हनुमान यांचें अनुकरण करावेंसें वाटलें असें माझें म्हणणें. तें बरोबर आहे कीं नाहीं याचा निर्णय प्रसिद्ध झालेल्या तीन टीका, त्यांतील मुद्दे व त्यांवरील उत्तर हीं पाहून सूज्ञ करतीलच.

रामचरित्र समजण्यास वाल्मिकि रामायण हा महत्त्वाचा ग्रंथ आहे हें खरें. पण त्याबाहेर कांहीं पहातां कामा नये असें म्हणतां येणार नाहीं. अगोदर या रामायणाचें प्रामाण्य किती अंशापर्यंत मानावें हा प्रश्न प्रथम पुढें येतो. रामायणांत जें जें सांगितलें आहे, तें तें पूर्णपणें जसें घडलें तसेंच लिहिलें आहे, असें म्हणणारे कांहीं आहेत. मला हें मत मान्य नाहीं, हें मी स्पष्टपणें प्रथमच नमूद करतों. माझ्या विचारशक्तीला पटेल तें व इतरत्र उपलब्ध असलेल्या पुराव्यावरून खरें ठरेल तेवढेंच मला मान्य आहे. विचारशक्तीला न पटणारी गोष्ट रामायणांत कितीहि विस्तारानें सांगितलेली असो, ती मान्य करणें योग्य दिसत नाहीं.

वाल्मिकीला रामचरित्राची प्रथम कांहींच माहिती नव्हती. ती त्याला नारद मुनीकडून कळली. त्याचा विचार करीत ते शिष्यांसह स्नानास गेले असतां, पारध्यानें क्रौंच जोडप्यांतील नरास मारल्यामुळें मादीचा आक्रोश ऐकून वाल्मिकीला शोक झाला व श्लोकबद्ध शापवाणी त्याच्या मुखांतून बाहेर पडली. पुढें ब्रह्मदेव भेटीस आले व रामचरित्र वर्णन करण्यास त्यांस आज्ञा झाली.

तच्चाप्यविदितं सर्वं विदितं ते भविष्यति ।
न ते वागनृता काव्ये काचिदत्र भविष्यति ॥

असा वरहि दिला. नंतर

ततः पश्यति धर्मात्मा तत्सर्वं योगमास्थितः ।
पुरा यत्तत्र निर्वृत्तं पाणौ आमलकं यथा ।।
तत्सर्वं तत्त्वतो दृष्ट्वा धर्मेण स महामतिः ।
अभिरामस्य रामस्य तत्सर्वं कर्तुमुद्यतः ।।

योगसामर्थ्यानें त्याला मागील हकीगत जशी घडली तशी दिसली, असें लिहिलें आहे. ही गोष्ट कांहींना खरी वाटेल. माझ्यासारखे ती अक्षरशः मान्य करीत नाहींत. वाल्मीकि हे श्रेष्ठ कवि असल्यानें त्यांनीं आपल्या कल्पनेनें एकेक प्रसंग आपलेपुढें उभा केला, व हकीकत वर्णिली हें कबूल आहे. उदाहरणार्थ, महाभारतांतील लहानशा कथेच्या आधारानें भारवी कवीनें 'किरातार्जुनीय' हें महाकाव्य लिहिलें. कविकल्पनेनें वर्णिलेली गोष्ट घडली असेल किंवा नसेल. वास्तविक प्रकार काय हें अन्य बाहेरच्या पुराव्यावरूनच ठरवावें लागेल.

रामायणांत लिहिलेली सर्व हकीकत अक्षरशः खरी आहे, असें मानणाऱ्यांना माझें मत रुचणार नाहीं, हें उघडच आहे; व त्यांचेकरितां हें उत्तरहि नाहीं. माझे विचार त्यांचे मतानें पाखंडीच. पण श्रीमंत बाळासाहेब पंतप्रतिनिधींसारखे पुराणसंस्कृतीचे व सनातनधर्माचे अभिमानीहि या पाखंडमतास अनुसरणारे आहेत, ही आश्चर्याची, तशीच अभिनंदनीय गोष्ट आहे. ज्ञानमंदिराच्या पहिल्याच अंकांत श्रीमंतांचा "राष्ट्रोन्नतीचा एकच उपाय" या मथळ्याचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत पान १० वर म्हटलें आहे: "दशरथ राजाला मुलें होत नव्हतीं, तर कुलोपाध्याय वसिष्ठमुनींनीं अरण्यांतील दिव्य वनस्पतींचें ज्ञान असणारा ऋष्यशृंग आणवून पुत्रकामेष्टि यज्ञ केला व त्यानें पायस म्हणजे दुधांतून घेण्याचें औषध तयार केलें. त्यायोगानें साठ वर्षांवर वय गेलेला दशरथ व त्याच्या तीन राण्या, यांची प्रकृति मूल होईल अशी केली. बलशुद्धि, वीर्यशुद्धि व गर्भाशयशुद्धि केली, आणि योग्य काळीं त्या तीनहि राण्यांना मुलें झालीं."

मुलें होत नव्हतीं तीं झालीं, येवढी कथा श्रीमंतांस मान्य. पुत्रकामेष्टि यज्ञाच्या प्रभावानें मुलें झालीं ही रामायणांतील अद्‌भुत कथा श्रीमंतांस पटली नाहीं. त्यांनीं काय झालें असावें हें आपल्या विचारशक्तीनें ठरवून बलशुद्धि, वीर्यशुद्धि व गर्भाशयशुद्धि करणारें औषध तयार केलें असें प्रतिपादिलें आहे.

अहिल्येच्या कथेचा विचार श्रीमंतांनीं कसा केला आहे पहा. (पानः ११) "वाटेनें गौतमाश्रम उजाड पडलेला पाहून रामानीं विश्वामित्रास कारण विचारलें. तेव्हां विश्वामित्रांनीं अहिल्येच्या इंद्रकृत-धर्षणाची हकीकत सांगितली. एकवार कळून न कळून पातक झालें त्याच्या प्रायश्चित्तार्थ अनेक वर्षें अत्यंत खडतर तपाचरण करणाऱ्या अहिल्येला रामानीं पाहिलें. असली तेजस्वी स्त्री समाजकार्य सोडून केवळ स्वपूनीती-साठीं तप करते, हें पाहून रामानीं गौतम ऋषींची प्रार्थना करून पति-पत्नीचा एकोपा घडवून आणला. हा लोकसंग्रह तेजस्वी माणसाचे हातून चूक झाली तरी त्यांना पश्चात्ताप झाल्यावर समाजांत मिळवून घेऊन समाजकार्य करावयास लावणें, हें राष्ट्रांतील नेत्यांचें कार्य रामायण काळीं होत होतें तें या कथेवरून स्वच्छ दिसतें."

"इतर कसल्याहि प्रकारचा आहार न करितां केवळ वायुभक्षण करून व राखेंत पडून राहून तूं हजारों वर्षें स्वतःच्या रूपानें कोणत्याहि प्राण्याच्या दृष्टोत्पत्तीस न येतां या आश्रमांत पडून राहशील" असा शाप होता. रामदासासारखे या स्थितीला शिळेची स्थिति म्हणतात. 'अहल्या शिळा राघवें मुक्त केली.' शाप हजारों वर्षें पडून राहण्याचा होता, इत्यादि विचारास न पटणारी गोष्ट बाजूला सारून समाजकार्यावर मुख्य दृष्टि ठेवून अहिल्योद्धाराचें तत्त्व श्रीमंतांनीं निर्भयपणें प्रतिपादिलें आहे, याबद्दल मी त्यांचें अभिनंदन करितों. तात्पर्य, रामायणासारखे ग्रंथ वाचतांना भाविकपणा जरा बाजूस सारून विचारशक्तीला वाव दिला पाहिजे, हें तत्त्व श्रीमंतांस मान्य आहे.

या उत्तरांत वाल्मीकि रामायणांतील पुष्कळच श्लोक माझ्या म्हणण्याच्या पुराव्यासाठीं मला द्यावे लागले व संस्कृत न समजणाऱ्याकरितां मराठी भाषांतरहि बहुतेक ठिकाणीं दिलें आहे. या कामीं कै. काशीनाथ वामन

लेखाची वाईकर यांनीं 'मोदवृत्ता'चीं पुरवणी म्हणून प्रसिद्ध केलेल्या भाषांतराचा उपयोग केला आहे.

माझ्या लेखाचा मुख्य रोख सुग्रीव व बिभीषण यांनीं राज्यलोभानें बंधुद्रोह करून परक्याच्या मदतीनें आपल्या भावांचा नाश करविला व हनुमानानें या कामीं सुग्रीवास साह्य करून आणि परकीयाची सेवा करून जें देशघातकी उदाहरण घालून दिलें त्यावर होता. श्री. सरवटे यांनीं सुमित्रेच्या गौण प्रश्नावर बराच खल केला आहे. तिचें वकीलपत्र घेऊन "जशी कौसल्या व कैकेयी तशीच सुमित्रा ही राजकन्या होती" असें विधान ते ठासून करतात. कौसल्या व कैकेयी या राजकन्या होत्या हें मला मान्य आहे. कारण त्यांच्या नांवांचाच तो अर्थ आहे. कोसल देशच्या राजाची पुत्री ती कौसल्या, केकय देशच्या राजाची पुत्री ती कैकेयी. त्यांचें राजकन्यात्व सिद्ध करण्यास अन्य पुरावा नको. पण सुमित्रा कोणत्या राजाची मुलगी हें श्रीयुत सरवटे सांगण्याचें टाळतात. उलट "सुमित्रा राजकन्या नसून हलक्या कुळांतली होती, हा शोध श्री. जाधव यांस कोठें लागला?" असा सवाल करतात; व "श्रीवाल्मीकि रामायणांत तर कोठेंहि असा उल्लेख नाहीं" असा निर्वाळा देतात.

हा शोध मला रामायणांतच लागला. सुमित्रा हें नांवच सांगतें कीं, ती राजपुत्री नव्हती. कौसल्या व कैकेयी या दोन राजकन्या–राजपत्नींना पायस निमेंनिम वाटून दिल्यावर प्रत्येकीच्या वांटणींतील चौथा हिस्सा सुमित्रेस दिला आहे. यावरून ती त्यांच्यापेक्षां कमी दर्जाची, पण यज्ञ-कर्मांत भाग घेण्याच्या योग्यतेची होती, असें उघड होतें. बालकांडाच्या १४ व्या सर्गांत ३३ व ३४ पर्यंत श्लोकांत अश्वमेध यज्ञांत कौसल्येनें तीन तरवारींनीं घोड्याला मारून त्याजवळ एक रात्र काढली असा आशय आहे. पुढील ३५ वा श्लोक

"होताध्वर्युस्तथोद्गाता हयेन समयोजयन् ।
महिष्या परिवृत्त्याथ वावातां अपरां तथा ॥"

असा आहे. महिषी, परिवृत्ति व वावाता अशा स्त्रियांना होता, अध्वर्यु व उद्गाता यांनीं "समयोजयन्" केलें. (अश्लील असल्यानें भाषांतर

न देणें बरें ). येथें परिवृत्ति व वावाता या दोन स्त्रिया शूद्रजातीच्या, असें विनायक जनार्दन ओकांच्या गीर्वाण लघुकोशांत याच श्लोकाचा आधार देऊन सांगितलें आहे. पण हें बरोबर दिसत नाहीं. परिवृत्ति व वावाता, या भिन्नभिन्न पारिभाषिक शब्दांचा भिन्न अर्थ असणेंच योग्य आहे. जास्त शोध करितां रामायणाच्या टीकेंत ऐतरेय ब्राह्मणभाष्याचा उतारा घेतला आहे, त्यावरून उलगडा झाला. वावाता ही शूद्रजातीय नसून मध्यमजातीय द्वितीय भार्या आहे.

" राज्ञां हि त्रिविधा स्त्रियः उत्तममध्यमाधमजातीयाः। उत्तम जातेः क्षत्रियाया महिषीति नाम मध्यमजातेः वैश्याया वावातेति अधमजातेः शूद्रायाः परिवृत्तिरिति । "

यांतील सुमित्रा ही वावाता होती. तिला $\frac{२}{८}$ हिस्सा पायसांतील मिळाला. पण कौसल्या व कैकेयी यांतील प्रत्येकीस $\frac{३}{८}$ मिळाला आहे. सुमित्रेला पायस कमी मिळालें व तेंहि प्रत्येकीच्या वाट्यांतलें. यावरून त्या दोघींपेक्षां तिची योग्यता कमी होती, हें स्पष्ट आहे. या पायसाच्या वाटणीवरून राम हा तीन अष्टमांशाचा व लक्ष्मण हा एक अष्टमांशाचा असें होतें. तसाच संबंध भरत शत्रुघ्न यांचा. म्हणूनच लक्ष्मण हा रामाची व शत्रुघ्न हा भरताची सेवा करीत होता. १८ वे सर्गांत ३१।३२ श्लोक पहा :

" यदा हि हयमारूढो मृगयां याति राघवः ।
अथैनं पृष्ठतोऽभ्येति सधनुः परिपालयन् ॥ "

तसाच " भरतस्यापि शत्रुघ्नो लक्ष्मणावरजो हि सः ।
प्राणैः प्रियतरो नित्यं तस्य चासीत्तथा प्रियः ॥ "

" सुमित्रेचे पुत्र लक्ष्मण, शत्रुघ्न हे, वडील बंधु विद्यमान असतां राज्यास अधिकारी नव्हते...वडील बंधु जिवंत असतां धाकट्याचा राज्यावर अधिकार नसतो, ही गोष्ट निराळी. त्या रीतीनें भरताचाहि राज्यावर अधिकार नव्हता " असें श्री. खरटे म्हणतात. पण भरतानें लक्ष्मणाप्रमाणें रामाची कधीं सेवा केली नाहीं. उलट त्याचीच सेवा

शत्रुघ्न करीत होता. यावरून लक्ष्मणशत्रुघ्नांचा दर्जा रामभरताच्या बरोबरीचा नव्हता इतकेंच माझें सांगणें.

राम व लक्ष्मण यांची बरोबरीची योग्यता आहे असें दुसरेहि मानीत नसत. हे दोघे भाऊ सुग्रीवाचे पाहुणे असतांना किष्किंधाकांडाच्या ८ व्या सर्गांतील १२।१३।१४ श्लोकांत यासंबंधानें महत्त्वाचा उल्लेख आहे. राम व महाबलाढ्य लक्ष्मण उभे राहिलेले पाहून

" स ददर्श ततः सालं अविदूरे हरीश्वरः ।
सुपुष्पमीषत्पत्राढयं भ्रमरैरुपशोभितम् ॥
तस्यैकां पर्णबहुलां शाखां भंक्त्वा सुशोभितम् ।
रामस्यास्तीर्य सुग्रीवो निषषाद स राघवः ॥
तावासीनौ ततो दृष्ट्वा हनुमानपि लक्ष्मणम् ।
शालशाखां समुत्पाट्य विनीतमुपवेशयत् ॥ "

पानांनीं भरलेली एक फांदी मोडून सुग्रीवानें जमिनीवर टाकली व ते दोघे ( राम व सुग्रीव ) तीवर बसले. ( लक्ष्मणाला बसण्याला सुग्रीवानें आसन दिलें नाहीं. ) त्याचा सेवक हनुमान यानें एक फांदी मोडून तीवर ते दोघे त्या दोघांचे सेवक बसले. सुग्रीव रामाला बरोबरीच्या नात्यानें वागवितो. लक्ष्मणास तसें वागवीत नाहीं. त्याला विनीत हें हेतुगर्भ विशेषण वाल्मिकीनें योजलें आहे. तो रामाचा सेवक म्हणून समजून सेवकाकडून त्याची सरबराई होत आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पांचव्या सर्गांत रामसुग्रीवाची प्रथम भेट होऊन सख्य झालें, त्या वेळींहि असेंच घडल्याचा स्पष्ट उल्लेख आहे. यावरून हें वर्तन जाणून बुजून होतें असें म्हणणें भाग पडतें.

'लक्ष्मण व शत्रुघ्न औरस असतां त्यांना अनौरस पुत्रांच्या सेवेचा दाखला कसा देतां येईल ?' असा सरवटे यांचा प्रश्न आहे. त्यास उत्तर " साधर्म्यमुपमा भेदे. " भेद असून साधर्म्य असेल तेव्हां उपमा म्हणावी हें आहे. दृष्टांत देतांना साधर्म्य पाहिजे, पण भेदहि पाहिजे. तसें नसेल तेथें उपमा होत नाहीं.

माझ्या मागच्या लेखानें बऱ्याच इसमांस धक्का बसला असें दिसतें. याहि लेखानें तसाच एक धक्का देतों. कौसल्या म्हणजे कोसल देशाची राजपुत्री. दशरथ हा कोसलचा राजा. यावरून कौसल्या ही त्याची सख्खी, सावत्र, किंवा निदान चुलत बहीण तरी असावी, असा तर्क पुष्कळ विद्वानांनीं केला आहे. सूर्यवंशांत सख्ख्या बहिणीशीं विवाह करण्याचा आचार होता. जैन व बुद्ध यांच्या ग्रंथांत दशरथ व कौसल्या आणि राम व सीता हीं भावंडें असल्याविषयीं स्पष्ट उल्लेख मोठ्या अभिमानानें केलेला आहे. या आधारांवरून सीता व राम हीं बहीणभावंडें होतीं, असें डॉ. सरकार यांनीं प्रतिपादन केलें आहे. याच आधारानें "प्राचीन आर्य संस्कृति" या मथळयाचे माझे दोन लेख फेब्रुवारी व मार्च १९३४ च्या 'समाजस्वास्थ्यां'त प्रसिद्ध झाले आहेत.

इजिप्तमध्यें राजघराण्यांत बहिणीला पट्टराणी करण्याची परंपरा पुष्कळ शतकें चालू होती.

"उत्कट बंधुप्रेमाचा धडा भरताच्या द्वारें तर रामायण देतें कीं नाहीं?" असा प्रश्न श्री. सरवटे यांनीं केला आहे. ही गोष्ट पहिल्या लेखांतच मला कबूल आहे. भरताच्या प्रेमाविरुद्ध एक अक्षरहि त्या लेखांत मिळणार नाहीं. पण आतां ओघानेंच आलें म्हणून सांगावें लागतें. आजहि बंधुप्रीतीचें उदाहरण देतांना रामलक्ष्मणाची जोडी असें म्हणतात. हे दोघे भाऊ रामभरतासारखे आहेत असें बंधुप्रीति वर्णितांना कोणीहि म्हणत नाहींत.

अरण्यकांडाच्या ४५ व्या सर्गांत राम कांचनमृगाच्या मागें गेल्यानंतर "हा सीते, हा लक्ष्मणा" अशी आर्तवाणी ऐकून रामाच्या सुरक्षिततेची सीतेला काळजी लागली व त्याच्या मदतीस जा असें तिनें लक्ष्मणास सांगितलें. तो जाईना, तेव्हां ती त्यास कठोर वचन बोलली. तें २२–२७ या सहा श्लोकांत दिलें आहे. ती म्हणते,

नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत् ॥ २३ ॥
त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु ।
सुदुष्टत्वं वने राममेकमेकोऽनुगच्छसि ॥ २४ ॥

मम हेतोः प्रतिच्छन्नः प्रयुक्तो भरतेन वा ।
तन्न सिध्यति सौमित्र तवापि भरतस्य वा ॥ २५ ॥

अर्थ—हे लक्ष्मणा, नेहमीं आपलें स्वरूप गुप्त ठेवून वागणाऱ्या तुझ्या-सारख्या दुष्ट शत्रूचे ठिकाणीं अशी पापबुद्धि असणें हें कांहीं आश्चर्य नव्हे. तूं अत्यंत दुष्ट आहेस आणि माझ्या( प्राप्ती )करितां, अथवा भरतानें सांगितलें असल्यामुळें, आपलें स्वरूप गुप्त ठेवून वनामध्यें असलेल्या एकट्या रामाच्या मागोमाग तूं एकटा जात आहेस; परंतु हे लक्ष्मणा, तुझा अथवा त्या भरताचा तो मनोरथ सिद्धीस जाणार नाहीं. २३।२४।२५.

यावरून सीतेच्या मनांत लक्ष्मण व भरत या उभयतांच्या शुद्ध हेतू-विषयीं किल्मिष होतें, तें या प्रसंगानें तिच्या तोंडून बाहेर पडलें. तिच्या दृष्टीनें तरी या बंधुप्रीतीविषयीं संशय होताच.

आतां सुग्रीवाच्या कथेचा विचार करूं. श्री. सरवटे यांनीं त्याचें वकील-पत्र घेऊन त्याची बाजू फारच उचलून धरली आहे. "वाली किष्किंधेंत राज्य करीत असतां मायावी नामक राक्षसाशीं त्याचें द्वंद्वयुद्ध झालें. त्यांत तो राक्षस भिऊन पळाला. तेव्हां त्याच्या पाठलागास वाली व सुग्रीव हे बंधु गेले. पुढें मायावी एका विवरांत शिरला. तेव्हां त्या विवराच्या मुखाशीं सुग्रीवाला बसवून, मी परत येईपावेतों येथेंच माझी वाट पहात बैस; असें त्यास बजावून, वाली विवरांत शिरला. पुढें बराच काळ लोटला पण वाली परतला नाहीं, व एक रक्ताचा लोंढा विवरांतून बाहेर वाहत आला. त्यावरून वाली आंत मारला गेला, अशी सुग्रीवाची समजूत होऊन, तो किष्किंधेस परत आला. वाली मेल्याचें वर्तमान ऐकून मंत्र्यांनीं सुग्रीवास राज्यावर बसविलें. कांहीं काळानंतर मायावी व त्याचा बंधुवर्ग यांस मारून वाली विवराबाहेर आला; तों तेथें त्यास सुग्रीव आढळला नाहीं. तो किष्किंधेस परत येतो तों, तो राज्य करीत असल्याचें त्यास दिसून आलें. तेव्हां सुग्रीवानें आपणाशीं कपट केलें असें वाटून तो क्रोधानें संतप्त झाला." अशी थोडक्यांत हकीकत श्री. सरवटे देतात.

रामायणांत जसें लिहिलें तसेंच घडलें असलें पाहिजे, सुग्रीव रामभक्त, त्याचेकडे दोष कसा असणार? वगैरे विचारसरणी ज्याची असेल त्यास

वालीच लबाड, भांडखोर, आततायी, त्याला झालेलें शासन योग्य, असें वाटेल. पण थोडा विचार केल्यास सुग्रीवाच्या वर्तनावर कांहीं दुसरा प्रकाश पडतो कां पाहूं.

रक्ताचा लोंढा विवरांतून बाहेर वहात आला, तेव्हां वाली आंत मारला गेला अशी सुग्रीवाची समजूत झाली. कां ? वालीनें मायावीला मारणें जास्त संभवनीय नाहीं काय ? "बराच काळ लोटला तरी वाली परत आला नाहीं" अशा वेळीं भावाच्या मदतीस विवरांत शिरणें हें सुग्रीवाचें कर्तव्य होतें. वालीच्या हुकुमाप्रमाणें बाहेर राहिला म्हणावें तर तो परत येईपर्यंत तेथेंच रहावयाचें होतें. वाली मेल्याची खात्री करून न घेतां व त्याच्या प्रेताच्या दहनाची कांहीं तजवीज न करितांच विवराचें दार बंद करून सुग्रीव पळून गेला व राज्यावर बसला हेंहि गैरच. वालीला अंगद नांवाचा पुत्र होता. त्याला गादीवर न बसवितां आपणच राज्याचा अधिकारी झाला. यामुळें वाली क्रोधानें संतप्त होणें साहजिक होतें. श्रीयुत सरवटे यांनीं दिलेल्या हकीकतीवरूनच सुग्रीवाचा कावा दिसून येत आहे. ही हकीकत सुग्रीवानेंच रामाला आपला चांगुलपणा दिसावा म्हणून स्वतःच्या-तर्फे सांगितली आहे. तेव्हां खऱ्या हकीकतींतील कांहीं मुद्दे गळावयाचेच.

सुग्रीवाची व रामाची भेट कशी झाली तें विस्तारानें सांगण्याची आवश्यकता नाहीं. रामलक्ष्मण आलेले पाहून सुग्रीव घाबरला व हे कोण याची चौकशी करण्यास त्यानें हनुमानास पाठविलें. हनुमानानें त्या दोघांची पुष्कळ स्तुति करून भावानें हाकून लावलेला सुग्रीव नांवाचा धर्मात्मा वीर आहे त्यानें पाठविलेला मी हनुमान आहें, तो आपणां दोघांबरोबर सख्य करूं इच्छितो, असें त्यांस कळविलें. रामाच्या सांगण्यावरून लक्ष्मण हनुमानाशीं भाषण करूं लागला. तो म्हणाला, "आम्हांला सुग्रीवाचे गुण माहीत आहेत. आम्ही त्यालाच हुडकीत आहोंत. तूं सांगशील त्याप्रमाणें आम्ही वागूं." हें ऐकून हनुमान हर्षित झाला.

ततः प्रहृष्टो हनुमान्कृत्यवानिति तद्वचः ।
श्रुत्वा मधुरभावं च सुग्रीवं मनसा गतः ॥

भाव्यो राज्यागमस्तस्य सुग्रीवस्य महात्मनः ।
यदयं कृत्यवान्प्राप्तः कृत्यं चैतदुपागतम् ॥

( कि. कां. सर्ग ४ श्लोक १।२ ) अर्थ– तदनंतर सुग्रीवासंबंधानें रामाचें सौम्य भाषण श्रवण करून व सुग्रीवाचें रामाशीं कांहीं कार्य आहे असें जाणून सुग्रीवाचा मनोरथ आतां परिपूर्ण होईल असें मनामध्यें आल्यामुळें हनुमानाला हर्ष झाला आणि तो मनामध्यें म्हणाला, " त्या महात्म्या सुग्रीवाला राज्यप्राप्ति अवश्य होणार. कारण, हा महापुरुष कांहीं कार्याच्या उद्देशानें येथें आला आहे. " पुढें लक्ष्मणाकडून रामाचें काम म्हणजे सीतेचा शोध करणें हें समजल्यावर हनुमानानेंहि सुग्रीवाचें काम सांगितलें :

" स हि राज्याच्च विभ्रष्टः कृतवैरश्च वालिना ।
हृतदारो वने त्रस्तो भ्रात्रा विनिकृतो भृषम् ॥
करिष्यति स साहाय्यं युवयोर्भास्करात्मजः ।
सुग्रीवः सह चात्माभिः सीतायाः परिमार्गणे ॥

( सर्ग ४ श्लो. २७।२८ ). अर्थ–तो सुग्रीव भ्रात्या वालीशीं वैर बांधून असल्यामुळें राज्यापासून भ्रष्ट झालेला आहे व स्त्रीचा अपहार करून भ्रात्यानें त्याला अत्यंत दुःख दिलें असल्यामुळें तो आतां त्रस्त होऊन वनांत वास्तव्य करीत आहे. ॥ २७ ॥ तस्मात् तो सूर्यपुत्र सुग्रीव सीतेच्या शोधासंबंधानें आम्हांसहवर्तमान तुमचें साहाय्य करील. ॥ २८ ॥

हनुमानाच्या शिष्टाईची सुनावणी रामाकडे करतांना लक्ष्मण म्हणाला :

" कपिः कथयते हृष्टो यथाऽयं मारुतात्मजः ।
कृत्यवान्सोऽपि संप्राप्तः कृतकृत्योसि राघव ॥ ४।३१ " ॥

" हे रघुवंशजश्रेष्ठा रामा, हा वायुपुत्र वानर आनंदित होऊन सांगत आहे, त्याप्रमाणें त्या सुग्रीवाचेंहि कार्य व्हावयाचें आहे, ह्यामुळें आपलें कार्य झाल्यासारखेंच आहे. " पहिल्याच भेटीस सुग्रीव रामाकडून वचन मागतो :

रोचते यदि मे सख्यं बाहुरेष प्रसारितः ।
गृह्यतां पाणिना पाणिर्मर्यादा बध्यतां ध्रुवा ॥

" एकमेकांचें कार्य शेवटास नेण्याविषयीं कधींहि न फिरणाऱ्या अशा निश्चयाची प्रतिज्ञा होऊं द्या." हें सख्य पुढें अग्निसाक्षिक झाल्यावर सुग्रीव आपलें कार्य सांगत आहे. ( कि. कांड सर्ग ५ श्लोक २३।२४ )

वालिना निकृतो भ्रात्रा कृतवैरश्च राघव ॥
वालिनो मे महाभाग भयार्त्तस्याभयं कुरु ।
कर्तुमर्हसि काकुत्स्थ भयं मे न भवेद्यथा ॥ २४ ॥

" भ्रात्या वालीनें माझा पराजय केलेला आहे, आणि मी त्याच्याशीं वैर बांधलेलें आहे. तस्मात् हे ककुत्स्थकुलोत्पन्ना महाभाग्यवान रामा, भयग्रस्त झालेल्या मला वालीपासून फिरून भीति न राहील अशा रीतीनें आपण माझ्या भयाचा नाश करा." तात्पर्य, वालीला स्वर्गास पाठवा.

माझी बायको मला परत मिळवून द्या, व माझा भावाशीं समेट करा, असें सुग्रीव सांगत नाहीं. सुग्रीवाचें मागणें स्पष्ट आहे. माझा भाऊ मारून मला गादीवर बसवा. राम त्याच्या भाषणाचा भावार्थ समजला व सुग्रीवाला हंसत हंसत म्हणाला,

एवमुक्तस्तु तेजस्वी धर्मज्ञो धर्मवत्सलः ।
प्रत्यभाषत काकुत्स्थः सुग्रीवं प्रहसन्निव ॥ २५ ॥
उपकारफलं मित्र विदितं मे महाकपे ।
वालिनं तं वधिष्यामि तव भार्यापहारिणम् ॥ २६ ॥

अर्थः—याप्रमाणें सुग्रीवानें सांगितलें असतां धर्मवेत्ता व धर्मवत्सल असा राम सुग्रीवाला हंसत हंसत म्हणाला, " हे महावानरा, उपकाररूप फल प्राप्त करून देणाऱ्याला मी मित्र समजत असतों. तस्मात्, तुझी भार्या हरण करून नेणाऱ्या त्या वालीचा मी वध करीन."

रामाचें भाषण ऐकल्यावर सुग्रीवानें अतिशय संतुष्ट होऊन आपला मुख्य मनोरथ रामाला उघडपणें कथन केला. तो म्हणाला,

तव प्रसादेन नृसिंह वीर ।
प्रियां च राज्यं च समाप्नुयामहम् ॥

तथा कुरु त्वं नरदेव वैरिणं ।
यथा न हिंस्यात्स पुनर्ममाग्रजम् ॥

"हे पुरुषश्रेष्ठा वीरा, तुझ्या कृपेमुळें प्रिया व राज्य हीं मला प्राप्त होतील. यास्तव मला तो पुनरपि दुःख न देईल अशा रीतीनें त्या माझ्या वैरी ज्येष्ठ भ्रात्याची, हे प्रजाधिपते, आपण व्यवस्था लावा." अशा रीतीनें स्पष्ट शब्दांत राज्य मिळविण्याच्या इराद्यानें वालीला मारण्याचा बेत झाला होता. पण श्री. सरवटे म्हणतात, "त्याच्या सर्व भाषणांत कोठेंहि राज्यलोभाचें चिन्ह दिसत नाहीं." डोळे मिटल्यावर दिसणें शक्य नाहीं.

इतक्यावरच न थांबतां "वालीचा सूड घेण्यासाठीं रामाचें साहाय्य घेण्यांत सुग्रीवानें अति निंद्य वर्तन केलें, ह्या आपल्या मताच्या पुष्टीकरणासाठीं त्यांच्या भांडणाची ही उपपत्ति श्री. जाधव यांनीं कल्पनेनें काढली आहे. म्हणून सुग्रीवाचें वर्तन निंद्य दाखविण्यासाठीं त्याच्या पदरीं राज्याचा लोभ बांधणें...अवश्य होतें. म्हणूनच तें मुळांत आधार नसतां केलें आहे," असा मजवर आरोप केला आहे. सुग्रीवाला राज्यलोभ होता असें मीच म्हणत नाहीं. राम व लक्ष्मण तसें समजतात, हनुमान तसेंच सांगतो व खुद्द सुग्रीव मला राज्य मिळवून द्या, माझा वैरी मारा, असें पांचदहा वेळ तरी विनवून मागतो. सुग्रीवाला जिवानिशीं मारण्याचा वालीचा केव्हांहि विचार नव्हता. ( कि. सर्ग १६ श्लो. ७।८ ) वाली म्हणतो,

दर्पं चास्य विनेष्यामि न च प्राणैर्वियोक्ष्यते ॥
अहं ह्याजिस्थितस्यास्य करिष्यामि यदीप्सितम् ।
वृक्षैर्मुष्टिप्रहारैश्च पीडितः प्रतियास्यति ॥ ८ ॥

अर्थः— "हे तारे, त्याचा गर्व नाहींसा करीन, तूं भय बाळगूं नको; तो कांहीं माझ्या हातून प्राणाला मुकणार नाहीं. सारांश संग्रामामध्यें स्थित असलेल्या ह्या सुग्रीवाची व्यवस्था मी तुझ्या इच्छेप्रमाणेंच करीन, म्हणजे वृक्ष आणि मुष्टिप्रहार ह्यांनीं ताडित होऊन तो परत जाईल."

वाली रामाच्या बाणानें मरणपंथास लागला असतां त्याचे सेवक सैरावैरा पळूं लागले; त्यांस तारा म्हणते—

"राज्यहेतोः स चेद् भ्राता भ्रात्रा क्रूरेण पातितः ।
रामेण प्रसृतैर्दूरान्मार्गणैर्दूरपातिभिः ॥"

"लांबून वेध करणाऱ्या व दूर उभे राहून रामानें सोडलेल्या बाणांनीं जर क्रूर भ्रात्या सुग्रीवानें राज्याकरितां भ्रात्याचा वध केला असेल तर पळून काय उपयोग ?"

वाली मरण पावल्यावर सुग्रीवाला स्मशानवैराग्य आलें व तो शोक करूं लागला. त्यांत त्याच्या अंतःकरणापासून पश्चात्तापाचे निघालेले उद्गार या प्रकरणावर चांगलाच प्रकाश पाडतात. (सर्ग २४)

"क्रोधादमर्षादतिविप्रधर्षाद्भ्रातुर्वधो मेऽनुमतः पुरस्तात्" (६)

भ्रात्यानें माझा अतिशयच पराभव केला असल्याकारणानें क्रोधामुळें व असहिष्णुतेमुळें पूर्वीं मला त्याचा वध होणें बरें वाटलें होतें.

"न त्वां जिघांसामि चरेति यन्मामयं महात्मा मतिवानुवाच ।
तस्यैव तद्राम वचोनुरूपम् । इदं वचः कर्मच मेऽनुरूपम् ॥८॥

"मी तुझा घात करणार नाहीं, तूं चालता हो" असें जें हा विचारी महात्मा मला म्हणाला, तें त्याचें म्हणणें त्यालाच योग्य असून, हें माझें वधरूप कर्म व तो वध घडवून आणणारें भाषण मात्र मलाच योग्य आहे." आणखी अवतरणें देण्याची जरूरी नाहीं.

राज्याचा लोभ सुग्रीवाच्या पदरीं आधाराशिवाय बांधला, हा श्री. सरवटे यांचा आरोप खरा का खोटा याचा निर्णय वाचक करतीलच.

भावाला मारण्यासाठीं रामाची मदत घेतली व क्षत्रियांच्या युद्धनियमांस झुगारून देऊन रामानें वालीला मारलें यांतहि कांहीं गैर नाहीं, असें ज्यांस वाटतें त्यांची खात्री करण्याचें सामर्थ्य आमच्या अंगीं नाहीं. क्षत्रियाचा धर्म न्यायानें युद्ध करणें हा आहे. पदातीबरोबर पदातीनें, स्वाराबरोबर स्वारानें, रथीबरोबर रथीनें युद्ध करावयाचें. दोघे युद्धांत गुंतले असतां तिसऱ्यानें शस्त्र टाकावयाचें नाहीं. असें असतांहि सुग्रीव व वाली द्वंद्व-युद्ध करीत असतां रामानें दुरून अंतरावरून झाडाआडून बाण मारून वालीचा प्राण घेतला, हें कृत्य अगदीं अधर्म्य झालें आहे. इतकेंच नव्हे

तर दोघे भाऊ सारखे दिसत असल्यानें ( सर्ग १२ श्लो. ३८।३९ )

अभिज्ञानं कुरुष्व त्वमात्मनो वानरेश्वर ।
येन त्वामभिजानीयां द्वंद्वयुद्धमुपागतम् ॥
गजपुष्पीमिमां फुल्लां उत्पाट्य शुभलक्षणम् ।
कुरु लक्ष्मण कण्ठेऽस्य सुग्रीवस्य महात्मनः ॥
ततो गिरितटे जातामुत्पाट्य कुसुमायुताम् ।
लक्ष्मणो गजपुष्पीं तां तस्य कण्ठे व्यसर्जयत् ॥

अर्थः—" हे वानरराज, तूं स्वतःविषयीं कांहीं तरी ओळखतां येण्यासारखी खूण करून ठेव, म्हणजे द्वंद्वयुद्धामध्यें गुंतलेल्या तुला मी ओळखून काढीन. हे लक्ष्मणा, शुभलक्षणांनीं युक्त अशी ही प्रफुल्लित झालेली नागपुष्पी लता उपटून तूं या महात्म्या सुग्रीवाच्या कंठामध्यें घाल." असें रामानें सांगितल्यावरून लक्ष्मणानें तसें केलें.

यावरून वालीला कसें मारावें, याविषयीं राम, सुग्रीव व मारुती यांचा कट झाला होता, व रामानें केवळ मारेकऱ्याचें काम केलें, असें दिसून येतें. सुग्रीवाची बायको परत दे नाहीं तर माझ्याशीं युद्ध कर, असें आव्हान रामानें दिलेलें नाहीं. तसें केलें असतें तर रामावरचा दोष कांहीं तरी गेला असता. असा समेट जमवून आणून भावाभावांचें ऐक्य करून दिलें असतें तर रामाची कीर्ति झाली असती. पण असा समेट सुग्रीवास पसंत नसावा. तसा प्रयत्न करण्यास त्यानें सुचविलेंहि नाहीं. त्यास वालीचा कांटा काढून टाकावयाचा होता.

रामालाहि सुग्रीवाचें साह्य सीताशुद्धीच्या व पुढील कामासाठीं पाहिजे होतें. सुंदरकाण्ड श्लोक ७–११ यांत अशोकवनांत सीता हनुमानाच्या दृष्टीस पडल्यावर त्याचे मनांत आलेले विचार दिले आहेत. त्यांत वालीवधासंबंधीं दोन आहेत :

अस्याः हेतोर्विशालाक्ष्या हतो वाली महाबलः ॥ ७ ॥
ऐश्वर्यं वानराणां च दुर्लभं वालिपालितम् ।
अस्या निमित्ते सुग्रीवः प्राप्तवाँल्लोकविश्रुतः ॥ ११ ॥

विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या या सीतेकरितांच महाबलाढ्य वालीचा वध झाला. ॥ ७ ॥ जगद्विख्यात सुग्रीवालाहि वालीनें रक्षिलेलें वानरांचें दुर्लभ ऐश्वर्य हिच्यामुळेंच प्राप्त झालें आहे. ॥ ११ ॥

सुग्रीवाला राज्याभिलाष नव्हता असें म्हणणारांनीं त्याचें पुढील वर्तन विचारांत घ्यावें. वालीला एक वयांत आलेला पराक्रमी व वकीली करण्याच्या लायकीचा सुबुद्ध असा पुत्र होता. त्यास राज्यावर न बसवितां तो आपणच राज्यावर बसतो. यावरून राज्य बळकावणें हा त्याचा हेतु मूळपासून होता असें सिद्ध होतें.

भावाच्या बायकोवर हक्क मानीत असत असें मीं लिहिलें, तें ' ठोकून देतों ऐसाजे ' या प्रकारांतील असा मजवर आरोप आहे. यासंबंधाचा दाखला महाभारतांतून देण्याचा मी प्रयत्न करणार आहें. कारण महाभारत हा पांचवा वेद आहे.

वेदः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
एतच्चतुष्टयं प्रोक्तं साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥

असें मनूचें वचन आहे. तसेंच याज्ञवल्क्याचेंहि आहे. वेदांतील किंवा स्मृतींतील वचन आढळत नसेल व सदाचाराचा म्हणजे थोर लोकांनीं एखादी गोष्ट आचरल्याचा दाखला असेल तर ती गोष्ट धर्म्य समजावी. सद्‌गृहस्थांनीं आचरणांत आणलेली गोष्ट इतरांस मान्य होते व थोड्याच काळांत सर्वत्र रूढ होते.

देवांचे गुरु बृहस्पति हे मोठे थोर, विद्वान, सर्वमान्य गृहस्थ होते. ते अन्याय्य, अधार्मिक असें कृत्य करतील असें म्हणणें धाष्ट्यांचें आहे. त्यांच्या कृत्याचा कोणी निषेधहि केलेला नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांच्या कृत्यांत अडथळा करणाऱ्या गर्भास त्यांनीं दिलेला शापहि अमलांत आला, असें महाभारतकार कंठरवानें सांगत आहेत. (महाभारत, आदिपर्व अध्याय १०४).

उतथ्यस्य यवीयांस्तु पुरोधास्त्रिदिवौकसाम् ।
बृहस्पतिर्बृहत्तेजाः ममतामन्वपद्यत ॥ १० ॥

( नानासाहेब वैद्यांचें भाषांतर ). 'उतथ्याचा धाकटा भाऊ मोठा तेजस्वी बृहस्पति देवांचा पुरोहित होता, तो संभोगाच्या इच्छेनें ममतेपाशीं गेला.'

उवाच ममता तं तु देवरं वदतां वरम् ।
अंतर्वत्नी त्वहं भ्रात्रा ज्येष्ठेनाऽऽरम्यतामिति ॥ ११ ॥

तेव्हां वक्त्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या आपल्या दिराला ममता म्हणाली, 'तुझ्या ज्येष्ठ बंधूच्या ( समागमापासून ) मी गरोदर आहें, म्हणून तूं मागें सर.' ॥ ११ ॥

"अमोघरेतास्त्वं चाऽपि द्वयोर्नास्त्यत्र संभवः ।
तस्मादेवं गते त्वद्य उपारमितुमर्हसि ॥ १३ ॥"

"तुझें वीर्य फुकट जाण्याचें नाहीं, आणि दोन गर्भांची सोय ( माझ्या उदरामध्यें ) होणें शक्य नाहीं. यासाठीं तूं आतां परत जावेंस हेंच तुला योग्य आहे." ॥ १३ ॥

दिराचा हक्क तिला मान्य होता. गर्भवती आहे एवढीच तिची हरकत. 'मी तुझ्या भावाची बायको. तूं माझेकडे कां येतोस?' असें ती म्हणत नाहीं, हें ध्यानांत घ्यावें.

एवमुक्तस्तदा सम्यग्बृहस्पतिरुदारधीः ।
कामात्मानं तदाऽऽत्मानं न शशाक नियच्छितुम्
संबभूव ततः कामी तया सार्धमकामया ॥ १५ ॥

असें तिनें योग्य सांगितलें असतां बृहस्पति जरी उदार मनाचा होता, तरी तो कामातुर झालेलें आपलें मन आवरूं शकला नाहीं. ॥ १४ ॥ कामातुर असलेला बृहस्पति तिची इच्छा नसतांहि तिच्याशीं रत झाला. ॥ १५ ॥

व्यासमहर्षींनीं या कथेंत बृहस्पतीची निंदा केली नाहीं. त्याला बृहत्तेजा, वदतांवर, महाभाग, उदारधी, भगवान्, ऋषि इत्यादि सन्मानाचीं विशेषणें लावलीं आहेत. यावरून बृहस्पतीचें कृत्य अधर्म्य असें भगवान् व्यासास किंवा इतर कोणासहि वाटलें नाहीं. देवसभेतील त्याच्या गुरुत्वास

हानि आली नाहीं. एकंदरींत भावाच्या बायकोवर दिराचा हक्क सर्वसंमत होता असें स्पष्ट होतें.

वालीला मारून राज्य बळकाविल्यावर सुग्रीवास राज्याभिषेक झाला. त्यासमयीं त्यानें रुमीचा आनंदानें स्वीकार केला. वालीच्या जनानखान्यांत राहिल्यानें तिला कांहीं भ्रष्टपणा आला असें त्यानें किंवा दुसऱ्या कोणीं मानलें नाहीं. यावरून भावाच्या बायकोवर दिराचा हक्क मान्य होता असें अनुमान निघतें.

सुग्रीवाची बायको रुमी ही वालीनें बळकाविली म्हणून तो वध्य झाला असें कांहीं प्रतिपादितात. पण असें करण्यास वालीसहि कांहीं कारण होतें कीं नाहीं, याचा विचार करीत नाहींत. तसें कारण घडलें असावें असा तर्क होतो. वालीवधानंतर सुग्रीव राज्यावर बसल्यावर हनुमान त्याचेकडे गेल्याचें वर्णन २९ वे सर्गांत आहे. त्यांतील चौथा श्लोक—

स्वां च पत्नीं अभिप्रेतां तारांचापि समीप्सितां ।
विहरन्तमहोरात्रं कृतार्थं विगतज्वरम् ॥

असें सुग्रीवाचें वर्णन आहे. यावरून तारा ही त्याला मिळून बरेच दिवस झाले होते असें दिसतें. राज्याभिषेकानंतर थोड्याच दिवसांत ही गोष्ट घडली असावी. म्हणजे मृत भावाच्या बायकोवर हक्क सर्वमान्य असल्यानें रुमीसारखीच तीहि झाली. हा साहजिक आचार लक्षांत घेतला तर प्रथमत: वाली मेल्याची बातमी घेऊन सुग्रीव किष्किंधेस आला आणि त्याला राज्याभिषेक झाला तेव्हांहि तारा त्याच्या उपभोगांत असणें साहजिक आहे. पुढें वाली परत आल्यावर त्यानें सुग्रीवास हाकून देतांना त्याच्या बायकोस ठेवून घेतली; असा हा मोबदला असण्याचा संभव आहे.

तर्कानें संभवनीय ठरविलेला तारेचा उपभोग खराच होता, असा पुरावा रामायणांत किष्किंधा कांडाच्या ४६ व्या सर्गांत मिळतो. वालीचें व आपलें वैर कसें उत्पन्न झालें ही हकीकत तेथें सुग्रीवानें आणखी एक वेळ रामास सांगतांना,

"राज्यं च सुमहत्प्राप्य तारां च रुमयासह ।
मित्रैश्च सहितस्तस्य वसामि विगतज्वरः ॥"

अर्थ—" आणि अतिशय मोठें वानरराज्य व रुमेसहवर्तमान तारा प्राप्त झाल्यावर त्या वालीच्या मित्रांसह मी निर्भय होऊन तेथें राहूं लागलों." असें नववे श्लोकांत सुग्रीवानें कबूल केलें आहे. हा पूर्वीचा व्यवहार लक्षांत घेतला म्हणजे वालीनें सुग्रीवाची बायको ठेवून घेतली म्हणून त्यानें मोठा अपराध केला असें म्हणणें योग्य नाहीं. हा त्यांचा आचारच होता.

वानरांच्या सैन्याची मदत सीतेच्या शोधासाठीं व लंकेवर स्वारी करण्यासाठीं रामाला पाहिजे होती. वाली राज्यावर असेपर्यंत ही मदत मिळणें शक्य नव्हतें. कारण आपली हजारों किंवा लाखों प्रजा दुसऱ्याच्या कामासाठीं कोणता राजा युद्धांत मारण्यासाठीं देईल? ज्याच्याबर मोठे उपकार झाले आहेत असाच ताटाखालचें मांजर झालेला राजा उपयोगीं पडेल. हें लक्षांत घेऊन रामलक्ष्मणांनीं सुग्रीवाचें सख्य संपादिलें व आपल्या कामाकरितां वालीचा खून पाडला. म्हणूनच हनुमान म्हणतो,

" अस्या हेतोर्विशालाक्ष्याः हतो वाली महाबलः ॥ "

एखाद्या राजाच्या अंतर्गत राजकारणांत व भांडणांत शेजारच्या राजानें हात घालतां कामा नये अशी राजनीति आहे. पण स्वार्थ साधण्यासाठीं राजांनीं कोणतीं पातकें करण्याचें वर्जिलें आहे!

'नाहं जानामि केयूरे' या श्लोकाच्या आधारावर लक्ष्मणानें सीतेच्या तोंडाकडे कधींहि पाहिलें नव्हतें अशी ग्वाही देतांना ही गोष्ट शक्य आहे काय, याचा विचार झाला नाहीं. कैक वर्षें अरण्यांत एकत्र रहात असतां सीतेच्या मुखाचें चुकूनहि अवलोकन करण्याचा प्रसंग येऊं नये हेंच आश्चर्य. पण ही गोष्ट खरी मानल्यास लक्ष्मणाचा आपल्या चारित्र्यावर भरंवसा नव्हता असें म्हणावें लागतें. मी तिचें मुख पाहिल्यास काममोहित होईन अशी भीति असल्यानेंच त्यानें मुद्दाम मुखावलोकन टाळलें असलें पाहिजे. या बाबतींत हनुमान श्रेष्ठ ठरेल. 'माझें मन शुद्ध असल्यामुळें परस्त्रीनिरीक्षणापासून मला दोष लागणार नाहीं' असें हनुमंतांनीं आपल्या शंकेचें समाधान केलें, असें सरवटेच म्हणतात.

श्री. सरवटे म्हणतात, " वस्तुतः सुग्रीवानें रामाची मदत घेतली यांत गैर काय केलें? एका राजानें दुसऱ्या राजाची किंवा व्यक्तीची आपल्या

भावाविरुद्ध मदत घेऊं नये, असा राजनीतिशास्त्राचा त्रिकालाबाधित सिद्धांत आहे काय ?" प्रश्न योग्य आहे. तसा त्रिकालाबाधित सिद्धांत नाहीं. पण स्वाभिमानी राष्ट्रांत तसा आचार आहे. आमचा शेजारी अफगाणिस्तान देश पहा. तेथील राज्यावर कोणीं बसावें याच्याविषयीं तंटे होतात; लढाया होतात; खूनहि पडतात. त्यांत शेजाऱ्याला हात घालण्यास वाव मिळत नाहीं. कोणत्याहि पक्षातर्फे परकी इसम लढाईत मिळावयाचा नाहीं. कारण कोणीहि परक्याची मदत घेतां कामा नये, असा त्यांचा आचार आहे. तसा आचार नसता तर कोणत्या तरी एका पक्षास इंग्रजांनीं मदत दिली असती व आज काबूलवर युनियन जॅक फडकलें असतें. आमच्या या दुर्दैवी राष्ट्रांत खासगी द्वेषाचा सूड घेण्यासाठीं पाहिजे त्याची मदत घ्यावी असें प्रतिपादणारे महात्मे प्राचीन काळपासून आजपर्यंत पुढें येत आहेत; म्हणूनच आम्ही आज हजारों वर्षें परक्यांच्या लाथा खात आहोंत.

' सुग्रीव व बिभीषण यांनीं रामाची मदत घेतल्यानंतर त्यांच्या देशावर रामाच्या साम्राज्याचें जूं बसून त्यांना परतंत्रता आली नाहीं ' असा एक मुद्दा पुढें आला आहे.

" सुग्रीवानें रामाचा हस्तक सेवक हें नातें पत्करिलें असें म्हणण्यासहि कारण नाहीं. दोघांचा मित्रत्वाचा तह झाला...सुग्रीवापासून रामानें खंडणी घेतली नाहीं " असें श्री. सरवटे म्हणतात. श्री. केळकर म्हणतात, " राम नेहमीं त्यास बरोबरीच्या नात्यानें संबोधीत. " श्री. धारवाडकरहि म्हणतात, " वालीला मारून मित्रकार्य केल्यानंतर किष्किंधेला ( Protectorate ) संरक्षणाखालचें संस्थान बनवून गोड घांस रामानें बाजूस काढून ठेवला नाहीं. "

पण आजपर्यंत स्वतंत्र असलेलें किष्किंधेचें वानरराज्य यापुढें परतंत्र झालें असें वाल्मीकि वर्णित आहे. वाली व सुग्रीव यांचा बाप मरण पावल्यावर कोणाहि दुसऱ्या राजाच्या परवानगीशिवाय वाली गादीवर बसला. पण सुग्रीवाच्या इच्छेप्रमाणें वालीला मारल्यावर पुढें राजा कोणास करावें, याविषयीं रामाची मंजुरी घेण्यांत आली. पहाः—सर्ग २६ श्लोक ४ मध्यें मारुती रामास विनंति करितोः

" भवत्प्रसादात् काकुत्स्थ पितृपैतामहं महत् ।
वानराणां सुदंष्ट्राणां संपन्नबलशालिनाम् ॥
महात्मनां सुदुष्प्रापं प्राप्तं राज्यमिदं प्रभो ।
भवता समनुज्ञातः । .... ....
अर्चयिष्यति माल्यैश्च रत्नैश्च त्वां विशेषतः ।
कुरुष्व स्वामिसंबंधं वानरान्संप्रहर्षय ॥ "

अर्थः—उत्तम दंष्ट्रा आणि समृद्ध बल यांनीं युक्त असलेल्या महात्म्या, वानरांचें परंपरागत सुग्रीवाला दुष्प्राप्य राज्य आपल्या प्रसादानें त्यास प्राप्त झालें आहे. आपल्या परवानगीनें तो नानाप्रकारचे सुगंध, औषधी व पुष्पें आणि रत्नें यांनीं तुझें यथाविधि पूजन करील. स्वामी या नात्यानें सुग्रीवाचा वानरांशीं संबंध घडवून तूं त्यांना आनंद दे." हनुमानाला राम म्हणाला,

" सुग्रीवो वानरर्षभः ।
प्रविष्टो विधिवद्वीरः क्षिप्रं राज्येऽभिषिच्यताम्" ॥११॥

या वानरश्रेष्ठ सुग्रीवाला राज्याभिषेक व्हावा. पुढें

" रामः सुग्रीवमब्रवीत् ॥
वृत्तज्ञो वृत्तसंपन्नमुदारबलविक्रमम् ।
इममप्यंगदं वीरं यौवराज्येऽभिषेचय ॥"

राम सुग्रीवाला म्हणाला, "या अंगदालाहि युवराज कर. " ॥ १२ ॥

वानरांचें राज्य स्वतंत्र राहिलें नाहीं. त्यांचा राजा कोण व्हावा, हें रामानें ठरविलें व सुग्रीवाचे पश्चात् कोण राजा होणार हेंहि मुक्रर केलें. किष्किंधेचें स्वातंत्र्य कायम राहतें तर रामाचा हुकूम मागण्याची व रामानें हुकूम देण्याची जरूरी नव्हती व मग सुग्रीव राजा न होतां अंगद राजा झाला असता. पण नुसत्या मंजुरीवरच किष्किंधेचें पारतंत्र्य सिद्ध झालें असें मी म्हणत नाहीं. किष्किंधा कांडाच्या ४ थ्या सर्गांत रामलक्ष्मणांशीं सुग्रीवाचा मंत्री हनुमान यांचें प्रथमच भाषण होतें. त्यांत लक्ष्मणानें १७

व २४ श्लोकांमध्यें मी व राम सुग्रीवाला शरण आहों, तो नाथ असावा असें राम इच्छितो, असें आठ श्लोकांत सात वेळां विनविलें आहे. पांचव्या सर्गांत हनुमानानें रामलक्ष्मणांची सुग्रीवाबरोबर ओळख करून देतांना

" तस्यास्य वसतोऽरण्ये नियतस्य महात्मनः ।
रावणेन हृता भार्या स त्वां शरणमागतः " ॥ ६ ॥

हा तुला शरण आला आहे असें त्यांचे समक्ष बोलतो. मग त्यांचें सख्य बरोबरीचें नातें जमतें व ते वालीवधापर्यंत एकासनावर बसतात. वालीच्या वध होऊन रामाज्ञेनें सुग्रीव राजा झाल्यावर नात्यांत कसा फरक पडला तें पाहूं.

पाऊसकाळ संपल्यावर वचन दिल्याप्रमाणें सीताशुद्धीचा प्रयत्न सुग्रीव अगत्यानें करीत नाहीं म्हणून त्यास धमकी देण्यासाठीं लक्ष्मणास पाठवितांना ( सर्ग ३० श्लोक ८१ ) राम म्हणतोः—

" न स संकुचितः पंथा येन वाली हतो गतः ।
समये तिष्ठ सुग्रीव मा वालिपथमन्वगाः ॥ "

" वाली वध पावून ज्या मार्गानें गेला तो मार्ग कांहीं अगदीं संकुचित नाहीं. तस्मात् हे सुग्रीवा, आपल्या वचनाविषयीं खबरदार रहा आणि वालीच्या मार्गास जाऊं नकोस. " हा तर निर्वाणीचा निरोप आहे. पुढील श्लोक तर दयाळु, अवतारी रामाचें हृदय व न्यायबुद्धि स्पष्टपणें उघडें करीत आहे:

" एक एव रणे वाली शरेण निहतो मया ।
त्वां तु सत्यादतिक्रांतं हनिष्यामि सबांधवम् " ॥ ८२ ॥

" अरे, संग्रामांत बाणानें मी वालीचा एकट्याचा वध केला; परंतु तूं सत्यापासून भ्रष्ट झाल्यामुळें मी तुझा मात्र बांधवांसह वध करीन. " बिचाऱ्या बांधवांचा काय अपराध ? किष्किंधेचें हें राजकारण केवळ रामाच्या कार्यासाठीं असल्यानें सुग्रीवाला मारून अंगदाला गादीवर बसवून त्याचेकडून कार्य उरकून घ्यावें असाहि बेत त्या दोघां भावांत चालला होता. पहा सर्ग ३१ श्लो. ४. लक्ष्मण रामास म्हणतोः—

"न धारये कोपमुदीर्णवेगं निहन्मि सुग्रीवमसत्यमद्य ।
हरिप्रवीरैः सह वालिपुत्रो नरेंद्रपुत्र्या विचयं करोतु ॥"

"झालेला हा क्रोध आवरून धरण्यास मी समर्थ नाहीं. या सत्यभ्रष्ट सुग्रीवाचा मी आजच वध करणार. वानरश्रेष्ठांसहवर्तमान वालीपुत्र अंगद जानकीचा शोध लावील." पुढें लक्ष्मण किष्किंधेस निरोप सांगण्यास गेला, तेव्हां हनुमान सुग्रीवास सल्ला देतोः—(सर्ग ३२।१७)

"कृतापराधस्य हिते नान्यत्पश्याम्यहं क्षमम् ।
अन्तरेणांजलिं बध्द्वा लक्ष्मणस्य प्रसादनात् ॥"

"तुझ्या हातून अपराध झाला असल्यामुळें हात जोडून लक्ष्मणाची कृपा संपादन केल्याशिवाय तुला गत्यंतर नाहीं असें मला दिसतें." आणखी पुनः म्हणतो,

"तस्य मूर्ध्ना प्रणम्य त्वं सपुत्रः ससुहृज्जनः ।
राजंस्तिष्ठ स्वसमये भर्तुर्भार्येव तद्वशे" ॥ ३२।२१ ॥

"यास्तव हे राजा, तूं त्याला मस्तकानें प्रणाम कर आणि आपल्या संकेताला धरून राहून भार्या ज्याप्रमाणें भर्त्याच्या आधीन होऊन राहते, त्याप्रमाणें पुत्र व सुहृद्गण यांसह तूं त्याच्या आधीन होऊन रहा."

इंग्रजांनीं हिंदुस्थानावर आपली सत्ता हळूहळू पसरविली त्याचा इतिहास हेंच सांगतो! जॉन कंपनीचे वकील आपल्या इंग्रजी चालीरीती बाजूस ठेवून, बूट काढून व टोपी घालून प्रथमतः दरबारास जात व सेवक म्हणून भेट घेत. पेशवे दरबारच्या चित्रांत मालेटसाहेब असेच बसलेले काढले आहेत. दरबारांतील सुग्रीवबिभीषणाचे कोणी अनुयायी त्यांच्याकडे येतील त्यांस हाताशीं धरून, मदत करून, बरोबरीचा, स्नेही, दोस्त असा चंद्रसूर्य असेपर्यंतचा करार करीत. पण याच स्नेही-दोस्तांचे वंशज आज कोणत्या स्थितींत आहेत हें आपण पहातच आहों. त्यांना पोलिटिकल एजंट किंवा रेसिडेंट व फॉरीन सेक्रेटरी यांच्या इशाऱ्याप्रमाणें नाचावें लागत आहे. आजच्या राजाचे दिवाण त्यांना पोलिटिकल एजंट किंवा ए. जी. जी. ची

मर्जी संभाळण्यास शिकवित असतात. किष्किंधेच्या राजकारणाचा इतिहास चांगले प्रकारें अभ्यासण्यासारखा आहे. रामलक्ष्मणांनीं जें बीज पेरलें, त्याचा हा मोठा वृक्ष झाला आहे. त्या इतिहासाची सुधारून वाढविलेली ही पुनरावृत्ति आहे. लक्ष्मण हा अधिराजाचा निरोप सांगणारा पोलिटिकल एजंट किंवा फॉरीन सेक्रेटरी म्हणा, असा आहे. या श्लोकांत दिलेला भार्येचा दृष्टांत मोठा समर्पक आहे.

परकीयांच्या बाहुबलावर भावाला मारवून राज्यावर बसलेले राजे कसे वागत होते हें सर्ग ३३ यांत सांगितलें आहे :

रुमां तु वीरः परिरभ्य गाढं वरासनस्थो वरहेमवर्णः ।
ददर्श सौमित्रमदीनसत्त्वं विशालनेत्रः स विशालनेत्रम् ॥

( तारा लक्ष्मणाला आंत घेऊन आली तरी ) उत्कृष्ट सुवर्णासारखी कांति आणि विशाल नेत्र यांनीं युक्त असलेला तो वीर सुग्रीव रुमेलाच दृढ आलिंगन देऊन सिंहासनावर बसला होता व त्यानें तेथूनच विशालनयन महाशय लक्ष्मणाला अवलोकन केलें.

आर्यावर्तातील सुग्रीव व त्याचे वंशज यांना आजच्या कालींहि हें वर्णन लागू होण्यासारखें नाहीं असें नाहीं. लक्ष्मणाला साहजिकच क्रोध आला; तेव्हां सुग्रीवाची घाबरगुंडी उडून तो सिंहासनावरून गडबडीनें उतरला व हात जोडून त्याचेपुढें उभा राहिला. लक्ष्मणानें त्याला चांगलाच धाक घातला. (सर्ग ३५ श्लोक १८) " वालीच्या भेटीला तुला पाठवूं, " " वाली ज्या वाटेनें गेला ती वाट संकुचित नाहीं " इत्यादि. सुग्रीवानें क्षमा मागितली. ( सर्ग ३६।११ )

" प्रेष्यस्य क्षमितव्यं मे न कश्चिन्नापराध्यति ॥ "

" या दासाचा कांहीं अपराध झाला असल्यास तो क्षमा करावा. "

लक्ष्मणाच्या सूचनेप्रमाणें सुग्रीव रामाकडे जावयास निघाला तेव्हां तो म्हणाला, ( सर्ग ३८।५ )

" एवं भवतु गच्छाम स्थेयं त्वच्छासने मया ॥ "

" ठीक आहे आम्ही चलतों; मला तुझ्या आज्ञेप्रमाणें वागलेंच पाहिजे. "

नंतर दोघे रामाकडे निघाले.

पूर्वी लक्ष्मण व सुग्रीव एका आसनावर बसत नव्हते असें वर दाखविलेंच आहे. लक्ष्मणाला त्याचेकडून आसनहि मिळत नव्हतें. पण आतां

तामुपस्थापितां दृष्ट्वा शिबिकां वानराधिपः ।

लक्ष्मणारुह्यतां शीघ्रं इति सौमित्रिमब्रवीत् ॥ ३८।११ ॥

तेव्हां ती पालखी आणलेली पाहून 'हे लक्ष्मणा, सत्वर आरोहण कर' असें म्हणाला. ते दोघे एकाच यानांतून गेले. (श्लो. १२). रामाजवळ जाऊन हात जोडून उभा राहिला. (३८।१७). इतकेंच नव्हे, तर पूर्वी बरोबरीनें बसणाऱ्या सुग्रीवाला

पादयोः पतितं मूर्ध्ना तमुत्थाप्य हरीश्वरम् ।

प्रेम्णा च बहुमानाच्च राघवः परिषस्वजे ॥३८॥ १९.

नंतर चरणीं मस्तक ठेविलेल्या त्या वानरराजाला उठवून बहुमानपूर्वक त्याला सप्रेम आलिंगन दिलें. ॥१९॥

परिष्वज्य च धर्मात्मा निषीदेति ततोऽब्रवीत् ।

निषण्णं च ततो दृष्ट्वा क्षितौ रामोऽब्रवीत्तथा ॥

व आलिंगन दिल्यावर 'बैस' असें तो धर्मात्मा त्याला म्हणाला आणि तो जमिनीवर बसला. सुग्रीवाची केवढी अधोगति झाली ती पहा. एका आसनावर बसणें गेलेंच. पण आसन न मिळतां धुळींत बसावें लागलें. मांडलिक राजाकडून खंडणी किंवा मुलूखच घेतला पाहिजे असें नाहीं. आजच्या ७०० हिंदी संस्थानिकांतील फारच थोड्यांकडून खंडणी मिळते व त्यांचीहि थोडेच दिवसांत माफ होईल. पण त्यामुळें साम्राज्यसत्तेचा जाच कमी होणार नाहीं.

तात्पर्यः—सुग्रीवाला राज्याची हाव होती. वालीला मारल्याशिवाय राज्य मिळणार नाहीं हें पाहून, रामाशीं सख्य करून त्याचेकडून त्यानें वालीस मारविलें. सुग्रीवाचा स्नेह करून रामालाहि आपलें कार्य साधावयाचें होतें. या दोन स्वार्थांत वाली बळी पडला व सुग्रीवास राज्य मिळालें. सुग्रीवाच्या अभिषेकास रामाची परवानगी लागूं लागली;

रामाच्या पायावर मस्तक ठेवावें लागून आसनाशिवाय जमिनीवर बसावें लागलें. इतका तो परतंत्र झाला. बरोबरीचें नातें गेलें.

रामानें किष्किंधेच्या राजाकडून खंडणी घेतली नाहीं किंवा मुलूखहि तोडून घेतला नाहीं. तरी त्याचें स्वातंत्र्य नष्ट होऊन त्याचा रामाशीं बरोबरीचा दर्जाहि गेला. रामाच्या लंकेवरील स्वारींत आपल्या लक्षावधि वानरसेनेस व अमित युद्धसामुग्रीला रामाच्या पायीं अर्पावें लागलें. ही भारी किंमत रामाकडून भावाचा खून करवून आपणास राज्य मिळवून दिल्याच्या उपकारासाठीं द्यावी लागली.

सुग्रीवाच्या या बंधुद्रोहांत व राज्यद्रोहांत त्याचा मुख्य सल्लागार, साह्यकारी हनुमानच होता. त्याचेवरहि सुग्रीवाइतकीच जबाबदारी येते.

सुग्रीवाच्या अधःपाताचें चित्र वाल्मीकींनीं मोठ्या कुशलतेनें काढलें आहे व त्यांचा उद्देश बंधुद्रोह्याला पुढें किती जबर किंमत द्यावी लागते व तो केवळ आपलाच अधःपात करीत नाहीं तर सर्व राज्याचेंहि नुकसान करतो हें दाखविण्याचा असावा. हें काम त्यांनीं उत्तम रीतीनें केलें आहे.

— ज्ञानमंदिर, एप्रिल १९३५

# रामभक्त हनुमंत व धर्मात्मा बिभीषण

हा धडा आमच्या राजेरजवाड्यांनीं घेतला असता तर सुग्रीवाचें वर्तन निंद्य ठरून बंधुद्रोहास आळा पडला असता. पण रामास विष्णूचा अवतार मानल्यावर, सुग्रीव, हनुमान, बिभीषण, वगैरे त्यास साह्य करणारे व मित्र झालेले, यांची गणना परम भागवतांत होऊं लागली. त्यांनीं केलेलें आचरण खरोखर पाहतां निंद्यच. पण तें इतर देवांच्या या अवतारांनीं राम या ईश्वरी अवताराच्या भूभार–हरण करण्याच्या कामीं साह्य म्हणून केलें असल्यानें तें चांगलेंच असलें पाहिजे, अशी भाविक लोकांची समजूत होणें स्वाभाविक आहे. अशी समजूत झाल्यानें हें वर्तन इतरांस आदर्श आहे असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें व तेंच वर्तन इतरांस अनुकरणीय ठरलें. याचा दोष वाल्मीकीकडे नाहीं. आमच्या खुळ्या श्रद्धेकडे आहे.

श्रीयुत सरवटे यांचें हनुमद्भक्तीवरील प्रवचन अपूर्व आहे. हनुमद्भक्त स्वार्थाला पारखा असतो व इतर देवांचा भक्त स्वार्थी असतो, असा त्यांच्या प्रतिपादनांतून आशय निघतो. यासंबंधानें रा. सरवटे म्हणतातः– “ हनुमंताच्या रामचंद्राशीं जडलेल्या संबंधाला गुणांवरील अनुरक्ति हें कारण असून, त्यापासून हिंदुस्थानांतील लोकांनीं घेतलेला धडा भगवद्भक्तीचा आहे. त्या संबंधाला देशद्रोहाचा रंग श्री. जाधवांच्या दृष्टीनें दिला आहे. हनुमंताचे शिष्य होण्यानें महाराष्ट्राची स्वधर्मावरील भक्ति दुणावली; स्फूर्ति प्रदीप्त झाली; शक्ति संघटित झाली आणि ऐक्यभावना उदित होऊन दृढीभूत झाली. त्याचीच फलश्रुति स्वराज्यप्राप्तींत झाली. मोंगलांना मिळालेले, इंग्रजांना फितूर झालेले, किंवा त्यांच्या सैन्यांत सामील झालेले लोक, या हनुमद्भक्तीला पारखे असल्यामुळेंच तिकडे गेले होते. या भक्तांचें त्यांच्याठायीं असलेलें धर्माविषयींचें औदासिन्य हें त्यांचें शत्रूला मिळण्याचें कारण होतें. स्वार्थ किंवा लोभ त्यांना शत्रूला मिळण्यास

लावीत होता. तो स्वार्थ व लोभ हनुमद्भक्तीनें इतरांमधून नाहींसा केला होता;" इत्यादि.

समर्थ रामदासांनीं हनुमद्भक्तीचा प्रसार केला व शिवाजीमहाराजांच्या हस्तें स्वराज्याची स्थापना केली अशी श्री. सरवटे यांची समजूत दिसते. त्यांचे मतें शहाजीराजापासून पूर्वींचे देवगिरीच्या यादवांपर्यंतचे सर्व लोक हनुमद्भक्तीस पारखे होते. पण शिवाजीनंतरचे मराठे हनुमद्भक्त झाल्यानें त्यांच्या ठिकाणीं स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान संचरून स्वराज्याची स्थापना झाली. याला पुरावा म्हणून प्रत्येक गांवीं मारुतीची स्थापना श्रीरामदासांनीं केली असा जो समज पसरवून देण्यांत येत आहे, त्याचा आधार देण्यांत येईल असें वाटतें.

हनुमंत हा पूर्वींपासून द्राविडांचा एक प्रख्यात देव आहे, व त्याचीं देवळें पूर्वींपासूनचीं होतीं. श्रीरामदासांच्या पूर्वींचीं होतीं. श्रीरामदासांच्या शिष्यवर्गापैकीं कोणीतरी आपल्या परमगुरूचें महत्त्व वाढविण्यासाठीं रामदासांनीं हीं देवळें स्थापिलीं असा समज पसरवून दिला आहे. इ. स. १६७२ पर्यंत श्रीशिवाजी व श्रीरामदास यांची भेटच झाली नव्हती, हें आतां सिद्ध झालेलें आहे. त्यावरून स्वराज्य स्थापण्याच्या कामीं श्रीरामदास व हनुमद्भक्ति यांचा संबंध नव्हता व त्या स्थापनेचें श्रेय हनुमद्भक्तीकडे देणें केवळ अंधश्रद्धेचें होईल. भोसल्यांचें घराणें रामभक्त झालें नाहीं. शिवभक्तच राहिलें. शिखरशिंगणापूरचा महादेव हा त्यांचा कुलदेव आहे. व त्या देवाचें भगवें निशाण श्रीशहाजीनें आपला झेंडा केला व श्रीशिवाजीनें तोच चालू ठेवला. म्हणूनच तंजावरच्या राजवाड्यावर तो आजहि फडकत आहे. श्रीरामदासांस शिवाजीनें राज्य अर्पण केलें व राज्य दिल्याची चिठी झोळींत टाकली व आपली छाटी म्हणून निशाण भगवें करण्यास समर्थांनीं आज्ञा दिली, असा समज रामदासी पंथानें पसरविला आहे. पण हें राज्यदान कल्पित आहे. भगवें निशाण करण्यास रामदासानें सांगितलें ही गोष्ट बनावट आहे. श्रीरामदास हे ब्रह्मचारी असल्यानें त्यांची कफनी व छाटी हुरमुजी रंगाची असे; भगव्या रंगाची नसे. मराठ्यांचें निशाण भगव्या रंगाचें आहे; हुरमुजी नाहीं.

यावरून त्या निशाणाचा संबंध श्रीरामदासांशीं लावणें म्हणजे वडाची साल पिंपळास लावण्यासारखेंच आहे.

श्रीयुत सरवटे यांचें हें प्रवचन उत्कृष्ट गद्याचा मासला म्हणतां येईल. पण त्यांतील विचार फोल आहेत. त्या विचारांचा आधार डळमळीत आहे. मराठ्यांच्या उत्कर्षाचें सर्व श्रेय हनुमद्भक्तीला देणें म्हणजे निव्वळ अंधश्रद्धा आहे.

श्रीवाल्मीकि रामायणांतील हनुमान स्वतः स्वार्थी होता. स्वार्थी सुग्रीवाची तो सेवा करीत होता, व बंधुद्रोहाच्या त्याच्या प्रयत्नांत त्यानें फारच साह्य केलें आहे. हा हनुमान चतुर, मुत्सद्दी, धोरणी व दुसऱ्याचें हृद्गत बरोबर जाणणारा आहे. यानेंच वालीच्या खुनाचा घाट जुळवून आणला व सुग्रीवास राज्य मिळवून दिलें. सीताशुद्धीच्या कामीं व लंका-दहनांत आणि पुढें युद्धांत त्यानें अप्रतिम कामगिरी केली आहे व अयोध्येस श्रीराम जाऊन सिंहासनाधिष्ठित झाल्यावर प्रत्येकाची कामगिरी पाहून बक्षिसांची वांटणी झाली तेव्हां हनुमानास पहिल्या प्रतीचें बक्षीस सीतेच्या हस्तें रामानें देवविलें आहे. रामाच्या यशाची व आगमनाची प्रिय वार्ता आपणास कळविली म्हणून भरतानेंहि त्यास मोठी देणगी दिली आहे.

गवां शतसहस्रं च ग्रामाणां च शतं परम् ।
सकुंडलाः शुभाचारा भार्याः कन्यास्तु षोडश ॥
हेमवर्णाः सुनासोरूः शशिसौम्याननाः स्त्रियः ।
सर्वाभरणसंपन्नाः संपन्नाः कुलजातिभिः ॥

(यु. कांड सर्ग १२५ श्लो. ४५।४६ )

एक लक्ष गाई, शंभर उत्कृष्ट गांव आणि कुंडलें व भूषणें यांनीं युक्त असलेल्या, कुलीन, ज़ातिवंत व शुभ आचरण, उत्कृष्ट नासिका व मांड्या, चंद्राप्रमाणें सौम्य मुखें व सुवर्णतुल्य कंठ यांनीं संपन्न असलेल्या सोळा कन्या, भार्या म्हणून मी तुला अर्पण करतों. ही देणगी परत केल्याचा उल्लेख नाहीं; यावरून तिचा स्वीकार केला असेंच दिसतें.

वाल्मीकीनें हनुमानाची योग्यता फार मोठी वर्णिली आहे.

तेजो धृतिर्यशो दाक्ष्यं सामर्थ्यं विनयो नयः ।
पौरुषं विक्रमो बुद्धिः यस्मिन्नेतानि नित्यदा ॥

( यु. कां. सर्ग १२८ श्लोक ८२ )

तेज, धैर्य, यश, दक्षता, सामर्थ्य, विनय, न्याय, पौरुष, पराक्रम, आणि बुद्धि हे गुण सर्वदा त्या वायुपुत्र हनुमानाचे ठिकाणीं वास्तव्य करीत होते.

आज आमचे लोक तो रामाचा एकनिष्ठ सेवक व भक्त या दृष्टीनेंच त्याचेकडे पाहात आहेत. त्याची अक्कल, तीक्ष्ण बुद्धि, विद्वत्व याची जाणीव फारच थोड्यांस आहे.

## धर्मात्मा बिभीषण

आतां बिभीषणाविषयीं विचार करूं. हिंदूंच्या स्मरणांत भागवतां-संबंधाचे दोन श्लोक येतात. एकांत चौदांचीं नांवें आहेत. दुसऱ्यांत निवडक सहाच सांगितले आहेत. यांतील दोघे पूर्वींच्या थोरल्या यादींत नाहींत, तेव्हां ते आदीन् या पदानें घ्यावे लागतील.

प्रल्हादनारदपराशरपुण्डरीकव्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ।
रुक्मांगदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन्पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥

बलिर्बिभीषणो भीष्मः प्रल्हादो नारदो ध्रुवः ।
षडैते वैष्णवास्तेषां स्मरणं पापनाशनम् ॥

या दोनहि यादींत बिभीषणाचें नांव आहे.

उत्तरकांड म्हणून वाल्मीकि रामायणांत अखेरचें कांड आहे. तें सर्वच प्रक्षिप्त आहे, असें पुष्कळ देशी परदेशी विद्वानांचें मत आहे. पण तें कांडहि वाल्मीकीकृत मूळचेंच आहे, असें मानणारेहि पुष्कळ आहेत. त्यांतील कथेंत रावण–कुंभकर्ण–बिभीषणांची उत्पत्ति दिली आहे. या तिघांची माता कैकसी ही आपल्या बापाच्या आज्ञेप्रमाणें विश्रवस पौलस्त्याकडे गेली. माझ्यापासून तुला मुलें पाहिजेत हें मी समजलों, असें तो म्हणाला.

या क्रूर वेळेला तूं आलीस म्हणून, तुला स्वभावानें व रूपानेंहि भयंकर, क्रूर बांधव आवडणारे आणि क्रूर कर्म करणारे राक्षस होतील; असें तिला त्यानें सांगितलें. तेव्हां ती प्रणिपात करून म्हणाली, "भगवन्, आपणासारख्या ब्रह्मवेत्त्यापासून अशा प्रकारचे अत्यंत दुराचारी पुत्र प्राप्त होण्याची माझी इच्छा नाहीं. यास्तव आपण मजवर कृपा करा." तेव्हां तिजवर प्रसन्न होऊन तो म्हणाला, "तुझा जो शेवटला पुत्र होईल तो माझ्या वंशाला अनुरूप व धर्मात्मा होईल." (उत्तरकांड सर्ग ९ श्लो.२७) कैकसीचा शेवटचा पुत्र धर्मात्मा बिभीषण जन्मास आला, तेव्हां "पुष्पवृष्टि झाली; अंतरिक्षांत देवांच्या नौबदी झडूं लागल्या आणि 'उत्तम, उत्तम' अशी आकाशवाणी झाली." (श्लो. ३६, ३७) मोठे झाल्यानंतर कुबेरापेक्षां श्रेष्ठ होण्याच्या इच्छेनें आईच्या सांगण्याप्रमाणें रावण व त्याचे धाकटे भाऊ तप करूं लागले. ब्रह्मदेव त्यांच्यावर संतुष्ट झाले. ब्रह्मदेव बिभीषणाला म्हणालेः—

"बिभीषण त्वया वत्स धर्मसंहितबुद्धिना ।
परितुष्टोऽस्मि धर्मात्मन्वरं वरय सुव्रत ॥"

"वत्सा बिभीषणा, धर्माविषयीं मन तत्पर ठेवलेल्या तुझ्यावर मी संतुष्ट झालों आहे. हे सदाचरणसंपन्न धर्मनिष्ठा, तूं वर माग." त्यानें वर मागितला तो,

"परमापद्गतस्यापि धर्मे मम मतिर्भवेत् ॥ ३० ॥
अशिक्षितं च ब्रह्मास्त्रं भगवन् प्रतिभातु मे ।
या या मे जायते बुद्धिर्येषु येष्वाश्रमेषु च ॥ ३१ ॥
सा सा भवतु धर्मिष्ठा तं तं धर्मं च पालये ।
एष मे परमोदार वरः परमको मतः ॥ ३२ ॥
न हि धर्माभिरक्तानां लोके किंचन दुर्लभम् ।"

**अर्थ**—"पराकाष्ठेच्या विपत्तींत जरी मी सांपडलों तरी धर्माकडेच माझी मति असावी. ३०. भगवन्, उपदेशावांचून ब्रह्मास्त्राची मला स्फूर्ति व्हावी आणि जी जी बुद्धि ज्या ज्या आश्रमामध्यें मला होईल ३१ ती ती

धर्माला अनुसरून असावी व त्या त्या धर्माचें मी परिपालन करावें. हे परम उदारा, हा वर मला अतिशय प्रिय आहे ३२ कारण धर्मनिष्ठांना जगतामध्यें कांहीं दुर्लभ नाहीं."

"पुनः प्रजापतिः प्रीतो बिभीषणमुवाच ह ॥ ३३ ॥
धर्मिष्ठत्वं यथा वत्स तथा चैतद्भविष्यति ।
यस्माद्राक्षसयोनौ ते जातस्यामित्रनाशन ॥ ३४ ॥
नाधर्मे जायते बुद्धिरमरत्वं ददामि ते ॥"

अर्थ–यावर प्रसन्न झालेला ब्रह्मदेव बिभीषणाला म्हणाला, (३३) "हे धर्मिष्ठा, हे वत्सा, तूं जशी इच्छा करीत आहेस तसें हें होईल आणि हे शत्रुनाशका, राक्षसयोनीमध्यें जन्म झाला असूनहि ज्या अर्थी तुझी मति अधर्माकडे जात नाहीं, त्या अर्थी मी तुला अमरत्व देतों."
(उत्तरकांड सर्ग १० श्लोक ३२–३५).

बापाच्या इच्छेनें व आशिर्वादानें आणि ब्रह्मदेवाच्या वरानें सिद्ध असा हा धर्मात्मा बिभीषण जें जें आचरण करील तें तें धर्माला अनुसरून असलेंच पाहिजे असें सकृद्दर्शनी कोणालाहि वाटेलच. परंतु आपल्या भावाला सोडून बिभीषण रामाकडे आला, व लंकेच्या युद्धांत त्यानें रामास मदत केली हें त्याचें वर्तन स्वार्थी होतें कीं निःस्वार्थी होतें, धर्मी होतें कीं अधर्मी होतें, सुष्ट होतें कीं दुष्ट होतें याचा विचार करूं. मुख्य प्रश्नास हात घालण्यापूर्वी श्री. सरवटे यांनीं मला एक सवाल टाकला आहे त्याला जबाब देणें बरें!

मार्चच्या अंकांतील १६२ वे पृष्ठावर 'आपल्या भावास मारविणें हा देशद्रोह आहे!' असें श्री. सरवटे यांनीं विचारणें केलें आहे. साध्या व्यक्तींमध्यें असा प्रकार झाल्यास तो देशद्रोह होत नाहीं, पण त्या गुन्ह्यास खून किंवा मनुष्यवध म्हणतात. भाऊ राजा असतां त्याचें राज्य मिळविण्याच्या लोभानें परक्या राजाची मदत घेऊन, भावास मारून राज्य मिळविणें यास देशद्रोह म्हणणें भाग आहे. कारण दुसऱ्याच्या उपकारामुळें त्याच्याशीं स्वामिसेवकाचें नातें जुळणें टळत नाहीं, व यामुळें देश परतंत्र होतो. धर्मात्मा म्हणविला जाणारा बिभीषण आपल्या भावाच्या शत्रूस मिळून

त्याचेकडून भावाला मारवून त्याचें राज्य बळकावितो. या कारणानें त्याचेवर देशद्रोहाचा आरोप करणें योग्यच आहे. "परदारापहरण रावणकालांत अनीतिकारक व अधर्म्य मानलें जात नसे या विधानाला बिलकूल आधार नाहीं." असें श्री. सरवटे पृ. १६३ वर म्हणतात; व याच्या पुराव्यासाठीं कुंभकर्ण, मंदोदरी, भरत, जटायु वगैरेंच्या भाषणांतून उतारे देतात. हे उद्गार व्यक्तींचे आहेत. जबरदस्तीनें ज्याची बायको नेली तो व त्याचे हितचिंतक हें कृत्य अधर्म्य असेंच म्हणणार. पण या कामीं थोर पुरुषांचे विचारच प्रमाण मानावे लागतील.

परदाराहरण जबरदस्तीनें केल्यास तो धर्मच आहे, अधर्म नाहीं; असें धौम्य ऋषींचें मत महाभारतांत आहे. ( पहा वनपर्व अ. २६४ ). पांडव वनवासांत काम्यक वनांत असतांना ब्राह्मणांच्या भोजनाकरितां शिकार मारून आणण्यास चौघे चार दिशांस पृथक् पृथक् गेले. ॥ ४ ॥ पुरोहित धौम्याच्या ताब्यांत आश्रमांत द्रौपदीला ठेवली होती. सिंधूचा राजा जयद्रथ हा तिकडून जात असतां द्रौपदी त्याच्या नजरेस पडली. ती अतिसुंदर असल्यानें तिलाच घेऊन जावें, असें त्याला वाटलें. कोणाची कोण ही चौकशी त्यानें एक राजपुत्र पाठवून केली. जयद्रथ तिच्याकडे गेला व म्हणाला, ( अध्याय २६७ श्लोक २० )

"भार्या मे भव सुश्रोणि त्यजैनान्सुखमाप्नुहि" ॥

"हे सुंदरी, या पांचांना सोडून माझी भार्या होऊन सुख भोग." यावरून विवाहित स्त्रियांनाहि पहिला नवरा किंवा नवरे सोडून अन्याची भार्या होतां येत असे, असें अनुमान निघतें. तिनें हें नाकबूल केल्यावर जयद्रथ जबरदस्तीवर आला. तेव्हां तिनें त्याची निर्भर्त्सना केली व मला शिवूं नको, असें सांगून भीतीनें पुरोहित धौम्याला हांक मारली. जयद्रथानें तिचा पदर धरला. तिनें त्याला झिडकारून टाकलें. "बलानें धरल्यावर धापा टाकणारी ती राजपुत्री ओढली गेली व धौम्याचे पाय वंदून रथावर चढली." ॥ २६८।२५॥. तेव्हां धौम्य म्हणाले:—

"नेयं शक्या त्वया नेतुं अविजित्य महारथान् ।
धर्मं क्षत्रस्य पौराणमवेक्षस्व जयद्रथ" ॥ २६ ॥

" महारथी ( अशा इच्या पतींना ) जिंकल्यावांचून हिला नेणें तुला शक्य नाहीं. हे जयद्रथा, क्षत्रियांच्या पुराण धर्माकडे तूं लक्ष दे. " पतीला जिंकल्यावर त्याच्या पत्नीला जबरीनें नेणें, हा धर्म; न जिंकतां नेणें हा अधर्म; असा धौम्याच्या सांगण्याचा अर्थ आहे. या बाबतींत रावणाचें एक वचन येथें देणें युक्त आहे. ( अरण्यकांड सर्ग ५५ श्लो. ३४ )

अलं व्रीडेन वैदेहि धर्मलोपकृतेन ते

आर्षोऽयं दिवि निष्पंदो यस्त्वामभिभविष्यति ॥

हे सीते, ( स्वभर्तृत्यागपूर्वक परपुरुष स्वीकाररूप ) धर्मलोपामुळें उत्पन्न झालेली लज्जा आतां पुरे. हे देवि, तुझा माझा जो संबंध झाला आहे व जो होणार आहे, तो वेदमूलकच आहे. ( कारण, बलात्कारानें स्त्री हरण करून आणणें हा राक्षसविधि विवाहविधीमध्यें उक्त आहे. )

रावणाचें वर्णन करतांना शूर्पणखा ही त्याच्या " परदाराभिमर्शनाचा " उल्लेख करते. लेलेशास्त्री याचें भाषांतर परस्त्रीवर लक्ष ठेवणारा असें गुळमुळीत करतात. कोषांत स्पर्श, बलात्कार, हल्ला, वगैरे अर्थ अभिमर्शन या पदाचे दिले आहेत. त्याच्या या वर्तनाचें एक मोठें महत्त्वाचें उदाहरणहि ती देतेः—

पुरीं भोगवतीं गत्वा पराजित्य च वासुकीम् ।

तक्षकस्य प्रियां भार्यां पराजित्य जहार यः ॥

( अरण्यकांड सर्ग ३२ श्लो. १३–१४ )

त्यानें एकदां पाताळांत भोगवती नगरीला जाऊन आणि वासुकीचा पराजय करून तक्षकाची प्रिय भार्या जिंकून आणली होती. सीताशुद्धीसाठीं हनुमान लंकेस गेला. त्यानें रावणाचा वाडा प्रथम शोधला त्यांत त्याला रावणानें आणलेल्या अनेक स्त्रिया दिसल्या.

राजर्षिविप्रदैत्यानां गंधर्वाणां च योषिताः ।

रक्षसां चाभवत् कन्याः तस्य कामवशंगताः ।

युद्धकामेन ताः सर्वाः रावणेन हृताः स्त्रियः ॥

( सुंदरकांड सर्ग ९ श्लोक ६८,६९ )

असें रावणाचें वर्तन परस्त्रियांबाबत पूर्वीपासूनच जबरदस्तीचें होतें. बिभीषणासारख्या धर्मात्म्यास याबद्दल कांहीं गैर वाटलें नाहीं. तसें वाटलें असतें, तर अशा दुष्ट भावास सोडून तो पूर्वीच दुसरीकडे गेला असता. पण तसा न जातां तो लंकेंतच राहिला; यावरून रावणानें नवऱ्यांना जिंकून त्यांच्या बायका आणणें, हें कृत्य धर्मास अनुसरून होतें, असाच धर्मात्म्या बिभीषणाचा समज असावा.

बापानें आपल्या थोरल्या मुलास (कुबेरास) लंकानगरी दिली असतां, रावणानें ती त्याचेकडे मागितली. भावाशीं तंटा नको म्हणून बापाच्या संमतीनें कुबेरानें ती सोडून देऊन कैलास पर्वतावर दुसरें नगर वसवलें; तेथेंहि जाऊन त्याच्याशीं लढाई करून त्याचें पुष्पक विमान रावणानें जिंकून आणलें. हें रावणाचें कृत्य धर्मात्मा बिभीषण यास न्यायाचेंच वाटलें असावें. कारण यानंतरहि कैक वर्षें तो रावणाच्या दरबारांत मोठ्या मानानें व इतमामानें राहिला होता. याशिवाय रावणानें तिन्ही लोक जिंकण्यासाठीं म्हणून ज्या स्वाऱ्या केल्याचें उत्तरकांडांत वर्णन आहे त्यांत त्यानें सर्वांवरच जुलूमजबरदस्ती करून अनेक पापें केलीं. पण धर्मात्मा जो बिभीषण त्याला या क्रूर वर्तनाचा वीट आला नाहीं. तो लंकेंतच राहिला.

उंट सहज गिळतां येतो, पण लहानसा डांस गिळतांना आयास पडतात, अशी इंग्रजी म्हण आहे. त्याचप्रमाणें धर्मात्म्या बिभीषणास दुसऱ्याची बायको जबरदस्तीनें आणण्याच्या दुष्कृत्यांसुद्धां रावणाचा निर्दयपणा, कामांधपणा, उद्दामपणा, वगैरे सर्व दोष खपले. त्या वेळीं त्याला सोडून दुसरीकडे जाण्याची इच्छा होत नाहीं. पण सीतेला जबरदस्तीनें आणल्यावर मात्र त्याची धर्मबुद्धि जागी होते, हें आश्चर्य करण्यासारखें आहे.

सीतेला रावणानें जबरीनें आणून अशोक वनांत ठेवली तेव्हां तिला सांगितलें कीं, तुला बारा महिन्यांची मुदत देण्यांत येत आहे. त्या मुदतींत तूं मजकडे राहण्यास कबूल झालीस तर बरेंच झालें; तशी कबूल झाली नाहींस तर तुला मारून तुझें मांस न्याहारीसाठीं घेण्यांत येईल. हनुमान लंकेस गेला त्या दिवशींच रावण सीतेकडे गेला होता व मुदतीपैकीं १० महिने होऊन गेले, आतां फक्त दोनच राहिले आहेत, असें त्यानें तिला

वजाविलें. हीच गोष्ट सीतेनेंहि हनुमानाला सांगितली आहे. सीता आणखी त्याला सांगतेः—

" बिभीषणेन च भ्रात्रा मम निर्यातनं प्रति ।
अनुनीतः प्रयत्नेन न च तत्कुरुते मतिम् " ॥ ९ ॥
(सुंदरकांड स. ३७)

" भ्रात्या बिभीषणानें मला परत पाठवण्याविषयीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याप्रमाणें वागण्याची बुद्धि त्यास होत नाहीं." " हें तुला कसें कळलें ?" असा हनुमानानें प्रश्न केला असेल म्हणून किंवा त्याला येणारी शंका घालवण्यासाठीं सीता सांगते,

" ज्येष्ठा कन्या कला नाम बिभीषणसुता कपे ।
तया ममैतदाख्यातं मात्रा प्रहितया स्वयम् " ॥ ११ ॥

" हे वानरा, बिभीषणाची कला म्हणून ज्येष्ठ कन्या आहे. त्या कन्येला स्वतः तिच्या मातेनें पाठविलें असतां तिनें मला सांगितलें," " परस्त्री आणलेली परत दे, " असा उपदेश बिभीषणानें रावणास केला, हें योग्यच होतें. परंतु " आपण असा सल्ला दिला असतां रावण ऐकत नाहीं " ही बातमी सीतेला देण्याची कांहीं जरूरी नव्हती. तशी नसतांहि आपण तर बाजूला राहून, बायकोकडून वडील मुलीला सीतेकडे पाठवून, सीतेला बिभीषणाचा चांगुलपणा पटवून देण्याचें जें काम करविण्यांत आलें आहे, त्यांत त्याचा कावा उघडउघड दिसत आहे. बिभीषणाचा हा उपक्रम नुकताच हनुमानाच्या भेटीपूर्वी थोडे दिवसांचा दिसतो. यावरून सीतेला आणून ९।१० महिने झाल्यावर या धर्मात्म्याला या पापाची टोचणी सुरू झाली असावी. वाली रावणापेक्षांहि बलवान होता व त्याचें व रावणाचें फार दाट सख्य होतें. रामाच्या हातून वाली मारला गेल्याची बातमी लंकेंत गेली असणारच. राजे व राजपुरुष यांनीं अशी बातमी ठेवणें आवश्यकच आहे. ती बातमी ऐकल्यावरच धर्मात्म्या बिभीषणाचा सीता रामास परत दे, असा सल्ला देण्याचें काम सुरू झालें असावें आणि लगेच त्याची खबर सीतेपर्यंत पोंचवण्याची खबरदारी घेतली असावी.

सीतेचा निरोप घेतल्यावर आपलें काम झालें असतांहि हनुमानानें अशोकवनाचा विध्वंस करून कलागत उत्पन्न केली. पुष्कळसे राक्षस मारले व अखेर इंद्रजितानें त्याला पकडून रावणापुढें उभें केल्यावर "मी रामाचा दूत आहें, असें समजून माझें हें हितकर भाषण श्रवण कर" असें सांगितलें. सीताशुद्धि हें त्याला नेमून दिलेलें काम ! त्यापुढील सर्व कृत्यें हनुमानानें आपल्या जबाबदारीवरच केलीं आहेत. त्याचें खरें काम हेराचें आहे. वकिलाचें नव्हे. असें असतांहि मी वकील आहें असें तो खोटेंच सांगत आहे. युद्धाच्या वेळीं हे सर्व प्रकार क्षम्यच असल्यानें यांत हनुमानाकडे मुळींच दोष येऊं शकत नाहीं.

पण त्याचें वास्तविक स्वरूप काय आहे हें ओळखण्याची व त्याप्रमाणें त्याला वागविण्याची जबाबदारी रावण व त्याचे मंत्री यांवर पडते. सुग्रीवानें पाठवलेला दूत म्हणून हनुमान रावणापुढें उभा राहून, तुझ्या सुग्रीव नामक बंधूनें कुशल प्रश्न केला आहे, असें सांगून अखेर तो त्याला राम-सुग्रीवाच्या सख्याची व वालीच्या वधाची हकीगत सांगतो. नंतर सीतेचा शोध करण्यास आपण आलों व रावणाच्या घरीं सीता दिसली आहे, असें सांगून पुढें रामाचें गुणवर्णन करून, धर्माचरण कर असा उपदेश करून, तो रावणाला भीति पडेल असें भाषण करतो.

स तस्य वचनं श्रुत्वा वानरस्य महात्मनः ।
आज्ञापयद् वधं तस्य रावणः क्रोधमूर्च्छितः ॥
(सुंदरकांड सर्ग ५२ श्लोक १–२५)

महात्म्या वानराचें भाषण श्रवण केल्यानंतर क्रोधानें व्याप्त झालेल्या रावणानें त्याच्या वधाची आज्ञा केली. पण ही गोष्ट बिभीषणाला आवडली नाहीं. तो म्हणाला,

"क्षमस्व रोषं त्यज राक्षसेंद्र प्रसीद मे वाक्यमिदं श्रृणुष्व ।
वधं न कुर्वंति परावरज्ञा दूतस्य संतो वसुधाधिपेंद्राः ॥ ५ ॥

"हे राक्षसाधिपते, क्षमा असावी; आपला क्रोध सोडून द्या आणि कृपा करून माझें हें भाषण श्रवण करा. सन्मार्गानें वागणारे सदसद्विचारी राजाधिराज दूतांचा वध करीत नाहींत." ॥ ५ ॥ याच मुद्यावर आणखीहि

त्यानें सांगितलें. रावण अतिशयच क्रुद्ध झाला व म्हणाला, "हे शत्रु-नाशक, पाप्याचा वध करण्यांत पातक नाहीं. यास्तव मी या पापी वानराचा वध करीत आहें." तरीहि बिभीषणानें आपला आग्रह सोडला नाहीं, व मोठें मुत्सद्दीगिरीचें भाषण करून हनुमानाचा वध न करितां, त्याला कांहींतरी विरूप करण्याची शिक्षा व्हावी, असा हुकूम मिळवला; व तो रावणानें केवळ भावाचें मन मोडूं नये म्हणून दिला असावा. उत्तरकांडांत १३ वे सर्गांत कुबेरानें रावणाकडे पाठवलेल्या दूताची हकीकत आहे. पहा उ. कां. सर्ग १३ श्लोक ११–४१. (विस्तार-भयास्तव श्लोक न देतां फक्त भाषांतरच देत आहें.) "रावणाचें इत्थंभूत वर्तमान धनाधिपति कुबेराला समजून आल्यावरहि, आपल्या कुलाला अनुरूप असें आपलें योग्य वर्तन कोणतें याचा त्या धर्मवेत्त्या कुबेरानें विचार केला. आणि खरें खरें भ्रातृप्रेम दर्शविण्याकरितां रावणाला हिताची गोष्ट कळवावी या उद्देशानें त्या कुबेरानें लंकेमध्यें एक दूत पाठवला. लंका नगरीमध्यें गेल्यानंतर तो दूत बिभीषणाकडे गेला असतां, त्यानें त्याचें यथाविधि आदरातिथ्य करून आगमनाचें कारण विचारलें आणि वैश्रवण राजासंबंधानें व आपल्या नातेवाईकासंबंधानें कुशल प्रश्न केल्या-नंतर सभेमध्यें बसलेला रावण बिभीषणानें त्या दूताला दर्शविला. आपल्या तेजानें झळकत असलेल्या राजाला तेथें अवलोकन करून आणि तुझा 'जयजयकार असो' या शब्दाचा मान देऊन (क्षणभर) स्वस्थ उभा राहिला" आणि त्यानें निरोप सांगितला, त्यांतील महत्त्वाचा भाग ३१–३२ श्लोकांत आहे; तो असा:– "मी परत आलों असतां तुझा दुष्ट हेतु मीं ऐकला. तस्मात्, कुलाला ज्याच्या योगानें बट्टा लागणार आहे अशा अत्यंत पापकर्मापासून तूं निवृत्त हो! ऋषिगणासह देव तुझ्या वधाच्या उपाया-विषयीं विचार करीत आहेत." रावणाला क्रोध आला, त्यामुळें दूताचा वध केला आणि दुरात्म्या राक्षसांना तो दूत त्यानें खावयास दिला." या वेळीं दूत अवध्य आहे, त्यास मारूं नये, असें बिभीषण बोलल्याचा उल्लेख नाहीं. खरा दूत असल्यास तो राजाला कसा भेटत असे, हा आचार येथें दिसून येत आहे. कोणातरी दरबारी माणसास भेटून त्याचेमार्फत राजास भेटावयाचें असतें व मग राजास निरोप नम्रपणें कळवावयाचा असतो.

मारुतीचा दूतपणा अगदीं निराळ्या स्वरूपाचा. गुप्त रीतीनें तो सर्व लंकेची पाहणी करतो, सर्व माहिती मिळवितो, सीतेला भेटून निरोप पोंचवितो, उलट निरोप घेतो आणि गुपचुप आल्याप्रमाणें निघून न जातां मुद्दाम भांडण काढून राजाच्या सेवकांस मारतो. पकडून आणल्यावर सुग्रीवानें आपणास निरोप सांगितला आहे, तो सांगून आपण दूत आहे असें म्हणतो. बिभीषणासारख्या धर्मात्म्यास व शहाण्या माणसास हनुमानाचें वर्तन खऱ्या दूतास शोभण्यासारखें नाहीं हें समजलें नाहीं, भोळेपणानें त्याला हनुमान दूत आहे असें वाटलें, असें दिसत नाहीं. त्याच्या एकंदर वर्तनावरूनच तो दूत नसून हेर होता हें प्रत्येकास कळण्यासारखें आहे. असा हेर वध्यच असतो. हनुमानाचा वध झाला असता तर पुढील ग्रंथच आटोपला असता. सीतेची बातमी न लागल्यानें लंकेवर स्वारी झाली नसती. पण बिभीषणाच्या पुढील वर्तनावरून त्याला ही स्वारी होणें इष्ट होतें, व म्हणून त्यानें हनुमानास वांचविण्यासाठीं पराकाष्ठा केली. भावाची भीड रावणानें ऐकिली व स्वल्प शिक्षेवर हनुमानास सोडलें. पुढें त्यानें लंका जाळली तेव्हां बिभीषणाचे उपकार स्मरून त्याचें तेवढें घर पेटविलें नाहीं; वांचविलें.

वर्जयित्वा महातेजा बिभीषणगृहं प्रति ।
क्रममाणः क्रमेणैव ददाह हरिपुंगवः ॥

(सर्ग ५४ श्लोक १६)

यावेळीं धर्मात्म्या बिभीषणानें भावाच्या हिताविरुद्ध त्याच्या शत्रूला साह्य होईल असा सल्ला दिला आहे.

लंकादहन करून हनुमान गेल्यावर रावणानें पुढें काय करावें, याचा विचार करण्याकरितां मंत्रिमंडळ भरविलें. मंत्र्यांनीं त्याच्या सामर्थ्याची स्तुतीच केली व युद्ध करावें असा सल्ला दिला. प्रहस्त सेनापति लढाईवर जाण्यास सिद्ध झाला. दुर्मुख, वज्रदंष्ट्र यांनींहि तसेंच सांगितलें. वज्रदंष्ट्रानें तर शत्रूला आपल्या मुलुखावर चालून येऊं देऊं नये, त्याचेवरच आपण जाऊन पडावें व त्याच्या सैन्यांत भेद करावा असा सल्ला दिला. याप्रमाणें अनेकांचीं भाषणें झाल्यावर सर्वांना थोपवून धरून खालीं बसवून

बिभीषण हात जोडून भाषण करूं लागला. " साम, दाम आणि भेद यांनीं जी गोष्ट असाध्य आहे ती प्राप्त करून घेण्यास पराक्रमाचा उपयोग योग्य." रामाच्या पराक्रमाचें भडक वर्णन करून " सीता आणण्याचें कृत्य रावणानें गैर केलें आहे, खराला त्यानें मारलें यांत त्याचा अपराध नाहीं. त्याला सीता देऊन टाक; तुला आपण होऊन जर सीता द्यावयाची नसेल तर मी तुझी प्रार्थना करीत आहें आणि बंधुत्वामुळें तूं माझें म्हणणें ऐक!" इत्यादि प्रकारें त्यानें विनविलें... " तात्पर्य, तूं प्रसन्न होऊन दशरथपुत्र रामास मैथिली अर्पण कर; म्हणजे पुत्र व बांधव यांसहवर्तमान आपण जिवंत राहूं." असें म्हणून त्यानें भाषण संपविलें. रामाची स्तुति व त्याच्यापासून राक्षसकुलाचा होणारा नाश, यांवर बिभीषणानें जोर दिला होता. व त्यामुळें रावणासारख्या पराक्रमी, जगज्जेत्या अभिमानी पुरुषाला क्रोध येणें साहजिक होतें. तथापि क्रोध न करतां " सर्वांना जाण्याची अनुज्ञा देऊन रावण स्वगृहाध्यें प्रविष्ट झाला." (सर्ग ९)

तदनंतर प्रातःकाल झाल्यावर बिभीषण रावणाच्या घरीं गेला. यावेळीं रावणानें त्यास बोलाविलें नव्हतें; आपण होऊनच तो जात आहे. बंधुप्रीतीमुळें पुनः उपदेश करण्यास गेला असें म्हणतां येईल. ( सर्ग १० ).

" बिभीषणानें रावणाला वंदन केलें व रावणानें नजरेच्या खुणेनें दाखवलेल्या आसनावर तो बसला." त्यानें " सीता आणल्यापासून आम्हांला सर्व प्रकारचीं दुश्चिन्हें होत आहेत, यासाठीं रामाला सीता देऊन टाकावी; हीच निष्कृति मला योग्य दिसते... माझ्या सांगण्याचा योग्य रीतीनें विचार करून त्याप्रमाणें तूं वाग" असें सांगितलें. तें ऐकून रावणाला संताप आला व तो म्हणाला, " मला कसलेंहि भय वाटत नाहीं आणि रामाला सीता कधींहि प्राप्त होणार नाहीं. कारण, इंद्रासहवर्तमान देवांचें साहाय्य असलें तरीसुद्धां संग्रामामध्यें राम माझ्यासमोर उभा राहील कसा?" नंतर त्यानें बिभीषणास जाण्याची परवानगी दिली.

( सर्ग १० श्लोक २८ )

आणखी थोड्याच दिवसांत रावणानें फौज जमा करण्यास हुकूम देऊन मोठी सभा केली. तेथें बिभीषणासह सर्व मंत्री आले. सर्व आपआपल्या आसनांवर बसले. सर्ग ११. या सभेंत कुंभकर्णहि होता. त्यानें सीता

आणल्याबद्दल भावास दोष दिला; पण भावासाठीं लढण्याचीहि प्रतिज्ञा केली. इतरांनींहि युद्धांत लढण्याचें आश्वासन दिलें. नंतर बिभीषण बोलूं लागला. त्याच्या भाषणांत शत्रूची स्तुति व 'सीता देऊन टाक' हा उपदेश! याशिवाय अन्य मुद्दाच नाहीं. कुंभकर्ण, इंद्रजित हे रामापुढें टिकाव धरूं शकणार नाहींत व तूं इंद्राच्या किंवा मृत्यूच्या अंकावर बसलास तरी रामाच्या हातून जिवंत सुटणार नाहींस असें म्हणण्यास त्यानें माघार घेतली नाहीं. वास्तविक अशा प्रकारें कुंभकर्ण, इंद्रजित किंवा खुद्द रावण यांचा इतका अपमान करणें योग्य नव्हतें. रावणास क्रोध येऊन त्यानें अत्याचार करावा, व आपणास लंका सोडून जाण्यास कांहींतरी सबब मिळावी असाच त्याचा कावा दिसत आहे. पण रावण शांत राहिला. पुढें प्रहस्त म्हणाला, "देवापासून किंवा दानवापासून आम्हास भय असल्याचें मुळींच माहीत नाहीं. तेव्हां रामापासून आम्हांला भय कुठलें?" बिभीषणाची भाषणाची पाळी संपली असतांहि त्यानें पुन्हां भाषण केलें. त्यांत रामाचा पराक्रम पुन्हां वर्णिला असून त्याच्यापुढें प्रहस्त, कुंभकर्ण, इंद्रजित, रावण वगैरे कोणाचाहि टिकाव लागणार नाहीं; यासाठीं रामाला सीता देऊन टाकावी; हेंच मी आपणा सर्वांच्या हिताचें बोलत आहे असें तो म्हणाला. यांतहि कोणीकडून तरी चिडून आपणास जाण्याची संधि मिळावी हाच उद्देश दिसतो. कारण त्याच्या सल्ल्याप्रमाणें रावणानें सीता परत दिली असती, तर रामाचा पराक्रम मोठा म्हणून त्याला भिऊन आपला जीव व राज्य वांचावें या उद्देशानें परत दिली असें सिद्ध झालें असतें.

आपण भ्यालों, आपण पराभव पावलों, ही गोष्ट मानधन रावण केव्हांहि कबूल करणार नाहीं, ही बिभीषणाची खात्री होती. धर्मशास्त्राचीच लटपट करून अमुक करणें योग्य, अमुक अयोग्य, असें समजून दिल्यास रावण आपलें ऐकतो. हनुमान दूत आहे म्हणून अवध्य आहे, ही गोष्ट रावणानें मान्य केली; यावरून बिभीषणास तो अनुभव होताच. म्हणून दुसऱ्याची बायको चोरून आणणें हें पाप आहे वगैरे मुद्यांवर तो जोर देत नाहीं. तर रामाचें सामर्थ्य थोर आहे, तो आम्हांला मारील, आम्हांला दुश्चिन्हें होत आहेत वगैरे चीड वाढण्याच्या गोष्टींवर जास्त जोर देत आहे. हा या

धर्मात्मा म्हणविला जाणाऱ्या बिभीषणाचा कावा आहे. त्याला हें युद्ध पाहिजे. पण आपण शांतताप्रिय हा लौकिकहि पाहिजे. शिवाय भावाला सोडून जाण्यासाठीं सबबहि पाहिजे. अशा धोरणानें तो बोलत आहे असें दिसतें.

इंद्रजिताला या भाषणाची सहजच चीड आली व त्यानें बिभीषणाची चांगलीच खरड काढली. यावर बिभीषणानें पुन्हां तिसरें भाषण केलें. यांत त्यानें इंद्रजिताला पुष्कळच शिव्या दिल्या आहेत. तो म्हणतोः—

"पुत्र प्रवादेन तु रावणस्य त्वमिंद्रजिन्मित्रमुखोऽसि शत्रुः ।
यस्येदृशं राघवतो विनाशं निशम्य मोहादनुमन्यसे त्वम् ॥१०॥
त्वमेव वध्यश्च सुदुर्मतिश्च स चापि वध्यो य इहानयत्त्वाम् ॥११॥
मूढोऽप्रगल्भोऽविनयोपन्नः तीक्ष्णस्वभावोऽल्पमतिर्दुरात्मा ।
मूर्खस्त्वमत्यंतसुदुर्मतिश्च त्वमिंद्रजिद्बालतया ब्रवीषि ॥१२॥
को ब्रह्मदंडप्रतिमप्रकाशानर्चिष्मतः कालनिकाशरूपान् ।
सहेत बाणान्यमदंडकल्पान् समक्षमुक्तान्युधि राघवेण ॥१३॥
धनानि रत्नानि सुभूषणानि वासांसि दिव्यानि मणींश्च चित्रान् ।
सीतां च रामाय निवेद्य देवीं वसेम राजन्निह वीतशोकाः ॥१४॥

"पुत्र म्हणून प्रसिद्ध असलेला तूं इंद्रजित मित्रासारखा जरी भासत आहेस तरी रावणाचा शत्रू आहेस. कारण रावणाचा अशाप्रकारें रामापासून नाश होईल हें श्रवण करूनहि मोहामुळें पुनरपि त्या रावणाला ( पापबुद्धीपासून परावृत्त न करितां ) अनुमोदनच देत आहेस. अत्यंत दुर्बुद्धि असलेल्या तुझाच वध करणें योग्य असून ज्यानें तुला येथें आणलें तोहि वधास पात्र आहे. हे इंद्रजिता, तूं मूढ, अप्रगल्भ, उद्धट, स्वभावानें क्रूर, अल्पमति, दुरात्मा, मूर्ख व अत्यंत दुर्मति असून बालपणामुळें भाषण करीत आहेस. अरे, ब्रह्मदंडासारखें ज्याचें तेज आहे आणि प्रलयकालाच्या अग्नीप्रमाणें ज्यांचें रूप आहे असे, राघवानें युद्धामध्यें समक्ष सोडलेले यमदंडतुल्य व उज्ज्वल बाण सहन करण्यास कोण बरें समर्थ आहे!

हे राजा, संपत्ति, रत्नें, उत्कृष्ट भूषणें, दिव्य वस्त्रें, अद्भुत मणि आणि सीतादेवी रामाला अर्पण करून आपण येथें निर्भय राहूं."

एखादा लिलावांतला जिन्नस घेण्याची जरुरी असली म्हणजे गरजू माणूस किंमत चढवीतच जातो; त्याप्रमाणें या तीन वेळच्या भाषणांचा प्रकार आढळेल. पहिल्या भाषणांत रामाची स्तुति केलेली होती. ती निष्फळ झाल्यावर दुसऱ्या भाषणांत रामाची स्तुति तर केलीच आहे, पण वर प्रहस्त, कुंभकर्ण, इंद्रजित, रावण यांचा टिकाव लागणार नाहीं, असें म्हणून त्या सर्वांचा तेजोभंग केला आहे. येवढ्यानेंहि त्याचा कार्यभाग झाला नाहीं. रावणानें त्याला हांकून दिलें नाहीं. म्हणून इंद्रजिताचें भाषण झाल्याबरोबर दरबारांत अगदीं मर्यादा सोडून व सभ्यतेस फांटा देऊन भाषण केलें आहे. इंद्रजित हा रावणाचा थोरला मुलगा, मोठा पराक्रमी, इंद्राला त्यानें जिंकलें; अशा पुत्रास भर दरबारांत शिव्या देऊन तुझा वध करणें योग्य आहे, असें म्हणणें व तुला येथें आणलें त्याचाहि वध करणें योग्य आहे, म्हणजे पर्यायानें रावणाच्या सहनशीलतेचा अंत पहाणें आहे. पण इतक्यानेंहि आपला कार्यभाग साधणार नाहीं, अशी भीति पडूनच कीं काय, बिभीषणानें आपला अखेरचा डाव टाकला आहे. आतांपर्यंत सीतेला परत दे, इतकेंच त्याचें सांगणें असे. त्यांत कांहीं विशेष नव्हतें. दुसऱ्याची लाटलेली बायको परत देण्यांत फारसा कमीपणा नाहीं. बृहस्पतीची भार्या तारा ही चंद्राचे घरीं बरेच दिवस हौसेनें राहिली होती, ती ब्रह्मदेवाच्या मध्यस्थीनें चंद्रानें परत दिली. तशी सीता परत दिली असती, तरी त्यांत रावणाचा मोठासा अपमान नव्हता. पण तिच्याबरोबर रत्नें, उत्कृष्ट भूषणें, दिव्य वस्त्रें, अद्भुत मणि वगैरे संपत्तीचा नजराणाहि दे, असें सांगणें म्हणजे रावणासारख्या मानधन राक्षसाचा मोठाच अपमान आहे. असा नजराणा पाठविणें म्हणजे मी तुला शरण आलों आहे. तूं मला जिंकशील अशी मला खात्री वाटत आहे, वगैरे कबुली देणें आहे. अशा प्रकारें रावणाला चिडविण्याचा बिभीषणाचा हा अखेरचा डाव आहे.

–ज्ञानमंदिर १-५-३५

# धर्मात्मा बिभीषण

बिभीषणाचें भाषण ऐकल्यानंतर त्याच्या (बिभीषणाच्या) अपेक्षेप्रमाणें रावणाला राग आलाच. शूर व पराक्रमी मुलाचा अपमान व स्वतःचाहि अपमान कोण सहन करील? म्हणून त्यानें क्रोधानें बिभीषणाची निंदा केली यांत आश्चर्य नाहीं. पण रावण थोर मनाचा होता व भावावर त्याचें खरें प्रेम होतें. त्यानें त्याला दुष्ट इतकेंच विशेषण लावलें व धिक्कार केला. पण शारीरिक क्लेश देण्याची किंवा जीव घेण्याची भीति घातली नाहीं.

रावण म्हणाला,

"योऽन्यस्त्वेवंविधं ब्रूयाद्वाक्यमेतन्निशाचर ।
अस्मिन्मुहूर्ते न भवेत् त्वां तु धिक्कुलपांसन ॥"

(यु. कां. स. १६ श्लोक १६.)

अर्थः—"हे निशाचरा, दुसऱ्यानें जर कोणी अशाप्रकारचें भाषण केलें असतें तर या क्षणामध्येंच तो कायम राहिला नसता. परंतु हे कुलपांसना बिभीषणा, तुला धिक्कार असो." याचा अर्थ स्पष्टच आहे. "तूं जें भाषण केलेंस तसें करणाराला वधाचीच शिक्षा योग्य; पण तूं माझा भाऊ आहेस यासाठीं तुला मी ती शिक्षा देत नाहीं. फक्त तूं कुळाला बट्टा लावणारा आहेस. तुला धिक्कार असो, असें मी म्हणतों."

याप्रमाणें रावणानें बिभीषणाची फक्त निर्भर्त्सना केली. त्यास देहांतशासनाची भीति घातली नाहीं. किंवा दुसराहि कसला प्रतिबंध केला नाहीं. रावणाचें हें भाषण त्याला सोडून जाण्यास बिभीषणास पुरेसें कारण वाटलें. (युद्धकांड सर्ग १६ श्लोक १७)

इत्युक्तः परुषं वाक्यं न्यायवादी बिभीषणः ।
उत्पपात गदापाणिश्चतुर्भिः सह राक्षसैः ॥

याप्रमाणें रावणानें कठोर भाषण केलें असतां न्यायाला अनुसरून भाषण

करणारा तो गदापाणि बिभीषण चार राक्षसांसहवर्तमान तेथून अंतरिक्षांत उडाला. तेथून तो आपल्या भावाला बोलला :

"स त्वं भ्रांतोसि मे राजन् ब्रूहि मां यद्यदिच्छसि ।
ज्येष्ठो मान्यः पितृसमो न च धर्मपथे स्थितः ॥
इदं हि परुषं वाक्यं न क्षमाम्यग्रजस्य ते" ॥ १९ ॥

"हे राजा, तूं भ्रांतिग्रस्त झाला आहेस. ज्याची ज्याची तुला इच्छा असेल तें तूं मला सांग. ( हें भाषांतर बरोबर नाहीं. तुझ्या मनाला येईल तें तूं मला म्हण असें पाहिजे. ) तूं ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें पित्याप्रमाणें मला पूज्य आहेस. परंतु धर्ममार्गानें वागणारा नाहींस. यास्तव तूं ज्येष्ठ भ्राता असलास तरी या तुझ्या कठोर भाषणाची मी तुला क्षमा करणार नाहीं." तो आणखी म्हणतो :

"दीप्तपावकसंकाशैः शितैः कांचनभूषणैः ।
न त्वामिच्छाम्यहं द्रष्टुं रामेण निहतं शरैः" ॥ २३ ॥

"सुवर्ण भूषणांनीं युक्त, तीक्ष्ण व प्रदीप्त अग्नीसारखे देदीप्यमान अशा रामानें सोडलेल्या बाणांनीं तुझा वध झाला आहे असें पाहण्याची माझी इच्छा नाहीं."

"तन्मर्षयतु यच्चोक्तं गुरुत्वाद्धितमिच्छता ।
आत्मानं सर्वथा रक्ष पुरीं चेमां सराक्षसाम् ॥ २५ ॥
स्वस्ति तेऽस्तु गमिष्यामि सुखी भव मया विना" ॥२६॥

"तूं ज्येष्ठ भ्राता असल्यामुळें तुझें हित व्हावें या इच्छेनें जें कांहीं मीं भाषण केलें त्याची तूं क्षमा कर. आणि आपलें व राक्षसांसहवर्तमान या लंकानगरीचें सर्व प्रकारें रक्षण कर. ॥ २५ ॥ तुझें कल्याण असो; मी जातों. माझ्यावांचून तूं सुखानें रहा." ॥ २६ ॥

सीतेला रामाकडे परत पाठवून संधि करण्याबद्दल बिभीषणानें रावणास सल्ला दिला. तो त्यास पटला नाहीं. व त्यानें उलट बिभीषणाची निर्भर्त्सना केली. तेव्हां तूं भ्रांत झाला आहेस व धर्माचा मार्ग सोडून दिला आहेस, तेव्हां तुजजवळ रहाणें युक्त दिसत नाहीं. यासाठीं मी आतां जातों, असे

उघडपणें सांगून आपल्या चार अमात्यांसह बिभीषण रामास येऊन मिळाला, असें श्री. सरवटे म्हणतात. रावणाला चीड येण्यासारखें व त्यानें अमान्य करणेंच भाग असा सल्ला दिला असतां रावणानें निर्भर्त्सना करणें क्रमप्राप्तच होतें हें वर दाखविलेंच आहे. बिभीषण जातो म्हणून उघडपणें सांगून गेला आहे हें खरें, पण आपण रामाच्या आश्रयास जातों असें त्यानें सांगितलें नाहीं. इतकेंच नव्हे, तर रामाच्या बाणानें तुझा वध झालेला मला पाहवणार नाहीं म्हणून मी जातों असें बोलून आपल्या कोमल अंतःकरणाचें प्रदर्शन केल्यावर तो रामाकडे तरी जाणार नाहीं अशी रावणाची व इतरांची समजूत त्यानें मुद्दाम करून दिली. त्या कारणानेंच त्याचा कोणी पाठलाग केला नाहीं. याप्रमाणें रावणाला फसवून तो लंकेंतून निसटला आहे.

रावण अधर्मी म्हणून या धर्मात्म्या बिभीषणाला त्याचेकडे राहावयाचें नव्हतें. तर त्याला रामाशिवाय कोठेंच थारा नव्हता असेंहि नाहीं. पाताळांत त्याचें आजोळ होतें. तिकडे किंवा कैलासावर कुबेर हा थोरला भाऊ होता, त्याच्या आश्रयास जाण्यास त्याला सवड होती. तसें केलें असतें तर रामाच्या बाणानें थोरल्या भावाचा वध झालेला आपणास पाहवणार नाहीं, हें म्हणणें खरें मनापासूनचें होतें असें सिद्ध झालें असतें. आश्रयाच्या अशा जागा असतांना तिकडे न जातां शक्य तितकी जलदी करून बिभीषण रामाकडे येतो व रावणाचा आणि त्याच्या सर्व कुळाचा नाश आपल्या डोळ्यांनीं पाहाण्याची हौस फेडून घेतो. यापेक्षां अन्य पुरावा त्याचा नीचपणा शाबीत करण्यास नको. "रावणाची म्हणजे दायादाची खोड मोडण्याकरतां" कसलें तरी भांडण उकरून काढून आपला साळसूदपणा राखून व सर्वांस फसवून तो रामाकडे आला आहे.

"बिभीषणाच्या वर्तनांत—श्री. जाधव आरोप करतात त्याप्रमाणें—स्वार्थ नाहीं. राज्याचा अभिलाष किंवा सूड उगविण्याची बुद्धि, हा त्याच्या वर्तनाचा हेतु किंवा प्रवर्तक कारण नाहीं" असें श्री. सरवटे म्हणतात. ह्याचा विचार आतां करूं.

चार अमात्यांसह बिभीषण आकाशमार्गे आलेला पाहून सुग्रीव म्हणाला, "हे पांच आमचा वध करण्यास येत आहेत." इतर वानरहि

त्यांच्यावर तुटून पडण्यासाठीं हुकमाची अपेक्षा करीत राहिले. तेव्हां बिभीषण खालीं न उतरतां आकाशांतूनच ओरडून म्हणाला, "राक्षसांचा वाईट चालींचा राजा रावण याचा मी धाकटा भाऊ आहें. त्यानें जटायूला मारून जनस्थानांतून सीता जबरीनें आणून अटकेंत ठेवली आहे. सीता परत दे, असें मीं वारंवार सांगितलें असतां त्यानें तें मान्य केलें नाहीं."

"सोऽहं परुषितस्तेन दासवच्चावमानितः ।
त्यक्त्वा पुत्रांश्च दारांश्च राघवं शरणं गतः" ॥१७।१६॥

"त्यानें माझ्याशीं कठोर भाषणें केलीं. दासाप्रमाणें माझा अवमानहि केलेला आहे. आणि म्हणूनच पुत्र व भार्या यांचा त्याग करून मी शरण आलों आहें, हें रामाला कळवा."

सुग्रीव रामाकडे गेला व त्यानें "हा शत्रूकडून आलेला आहे, कदाचित् फितुरी पसरवील, विश्वास दाखवून घात करील, तेव्हां याला कैद करावा" असा अभिप्राय कळविला. रामानें जवळच्या लोकांचा सल्ला घेतला. अंगद म्हणाला, "आपणाला या बिभीषणाविषयीं तर्कच करतां येत नाहीं. एकाएकीं त्यावर विश्वास ठेवूं नये, पण त्याच्या गुणदोषांचा विचार करून गुणाधिक्य असल्यास स्वीकार करावा. त्यानंतर शरभ, जांबवान, मैंद यांनीं आपापला अभिप्राय गुळमुळीतच दिला. या सर्वांत हनुमान दूरदर्शी, धोरणी व बुद्धिमान. त्याचें सर्वच भाषण महत्त्वाचें व मननीय आहे. अखेर त्यानें काढलेला सारांश बिनचूक असाच आहे. तो म्हणतो :

"उद्योगं तव संप्रेक्ष्य मिथ्यावृत्तं च रावणम् ।
वालिनं च हतं श्रुत्वा सुग्रीवं चाभिषेचितम् ॥ ६६ ॥
राज्यं प्रार्थयमानस्तु बुद्धिपूर्वमिहागतः ।
एतावत्तु पुरस्कृत्य विद्यते तस्य संग्रहः" ॥ ६७ ॥

"आपला उद्योग पाहून, रावण दुर्वृत्त आहे असें अवलोकन करून आणि आपल्या हातून वालीचा वध होऊन सुग्रीवाला अभिषेक झाल्याचें श्रवण करून राज्याच्या आशेनें हा समजून उमजून येथें आलेला आहे,

आणि म्हणूनच त्याचा संग्रह करणें मला योग्य दिसत आहे." यावर राम म्हणाला– "त्याचे (बिभीषणाचे) ठिकाणीं कांहीं दोष असला तरी तो जर मित्रभावानें प्राप्त झाला असेल तर मी त्याचा त्याग करणार नाहीं." तेव्हां सुग्रीव म्हणाला, "तो हा राक्षस दुष्ट असो किंवा नसो, त्याचा स्वीकार कां करतां येणार आहे? अहो! अशा प्रकारच्या संकटांत सांपडलेल्या भ्रात्याचा जो त्याग करीत आहे तो कोणाचा बरें त्याग करणार नाहीं?" संकटकालीं भावाला सोडून जाणें गैरच. त्यांतून भावाच्या शत्रूकडे जाणें अत्यंत निंद्य असें या बंधुहत्यारी सुग्रीवाचें देखील मत आहे. याप्रमाणें सर्वांचें मत ऐकल्यावर श्रीरामचंद्रानें अखेरचा निर्णय दिला आहे. त्यांतील एक दोन महत्त्वाचे श्लोक देणें युक्त आहे.

(यु. कां. सर्ग १८.)

अमित्रास्तत् कुलीनाश्च प्रातिदेश्याश्च कीर्तिताः ।
व्यसनेषु प्रहर्तारस्तस्मादयमिहागतः ॥ १० ॥
न वयं तत्कुलीनाश्च राज्यकांक्षी च राक्षसः ।
पंडिता हि भविष्यंति तस्माद्ग्राह्यो बिभीषणः ॥ १३ ॥
न सर्वे भ्रातरस्तात भवंति भरतोपमाः ॥

"राजांना दोन प्रकारचे शत्रू असतात, एक आपल्या कुलांतील व दुसरे शेजारच्या देशांतील, हे दोघेहि संकट पाहून प्रहार करणारे असल्यामुळें हा येथें आला आहे. १०. आम्ही त्याच्या (बिभीषणाच्या) कुलांतील नव्हे, या राक्षसाला राज्यप्राप्तीची इच्छा आहे व स्वार्थ साधण्यासाठीं निपुण असलेले पुरुष सर्वत्र असावयाचेच. तस्मात् बिभीषणाचा स्वीकार केला पाहिजे. "बाबारे, सर्वच भ्राते भरतासारखे नाहींत." हनुमान व राम या उभयतांचीहि खात्री बिभीषण हा राज्यलोभानें आला आहे अशी आहे. तरीहि बिभीषणाला आपल्या गोटांत घेऊं नये असा आपला हट्ट सुग्रीव सोडीना. तेव्हां रामानें त्याची समजूत घालण्यासाठीं तो शरण आलेला आहे. त्याला अभय न दिल्यास आपलें यश मलीन होईल.

" सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ।
अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम ॥ ३३ ॥
आनयैनं हरिश्रेष्ठ दत्तमस्याभयं मया ।
बिभीषणो वा सुग्रीव यदि वा रावणः स्वयम् " ॥ ३४ ॥

" जो एकदां शरण येऊन मी तुझा आहे म्हणून याचना करूं लागला, त्याचें सर्वांपासून रक्षण करणें हें माझें व्रत आहे. ॥३३॥ तस्मात्, हे वानरश्रेष्ठा सुग्रीवा, हा बिभीषण असो अथवा प्रत्यक्ष रावणच त्याचें रूप घेऊन आलेला असो, मी याला अभय दिलें आहे. " ॥३४॥ थोर मनाच्या रामाचा अखेरचा हुकूम झाल्याबरोबर त्या सम्राटाच्या दरबारांतला एक सरदार असा झालेला सुग्रीव, आपलें स्वतःचें मत ताबडतोब बदलून एकदम स्तुतिपाठक बनून ' होस हो ' कसें ठोकून देतो पहा. तो म्हणतोः—

" किमत्र चित्रं धर्मज्ञ लोकनाथ शिखामणे ।
यत्त्वमार्यं प्रभाषेथाः सत्त्ववान्सत्पथे स्थितः " ॥ ३६ ॥

" हे धर्मवेत्त्या, नृपश्रेष्ठा, सत्त्वगुणाचेंच अवलंबन करून जर तूं सन्मार्गानेंच वागणारा आहेस, तर सज्जनांना अनुरूप असें भाषण तूं केलेस यांत कांहीं आश्चर्य नाहीं. "

राजेमहाराजांपुढें लाळघोटे त्यांची जशी स्तुति करतात, तशीच ही आहे. तो पुढें म्हणतो,

" मम चाप्यन्तरात्माऽयं शुद्धं वेत्ति बिभीषणम् ।
अनुमानाच्च भावाच्च सर्वतः सुपरीक्षितः " ॥ ३७ ॥

" शिवाय, माझा हा अंतरात्माहि बिभीषणाला शुद्ध समजत आहे. तेव्हां याची हालचाल आणि माझें अनुमान या दोहोंच्या योगानें सर्वप्रकारें याचें चांगलें परीक्षण झालें आहे. " ( युद्धकांड स. १८।३७ )

बिभीषण येऊन रामाच्या पायावर लोटांगण घेऊन म्हणतो–( सर्ग १९ )

" अनुजो रावणस्याहं तेन चास्म्यवमानितः ॥ ४ ॥
भवन्तं सर्वभूतानां शरण्यं शरणं गतः ।
परित्यक्ता मया लंका, मित्राणि च धनानि च ॥ ५ ॥

भवद्गतं हि मे राज्यं जीवितं च सुखानि च ॥ ६ ॥

"मी रावणाचा धाकटा भाऊ त्यानें अपमान केल्यानें आपणाला शरण आलों आहे. लंका, मित्र व धन सोडून दिलें. माझें राज्य, जीवित व सुखें हीं आपल्या हातीं आहेत." राज्य मिळण्याच्या आशेनें मी आलों आहे असें हा पहिल्याच भेटींत स्पष्ट सांगत आहे. या बिभीषणाला भावाचा द्वेष करण्याला सुग्रीवाइतकेंहि कारण नव्हतें. तरी श्री. सरवटे म्हणतात, "राज्याचा अभिलाष त्याला नव्हता." राज्यलोभानें तो आला आहे असें मारुतीला दिसतें. रामालाहि दिसतें. तोहि स्वतः आपल्या तोंडानें कबुली देतो, तरी त्याच्या भक्तांस या गोष्टी वाल्मीकींनीं उघड उघड मांडलेल्या असतांहि दिसत नाहींत, हेंच आश्चर्य! श्री. सरवटे पुढें म्हणतात, "रावणाच्या धर्मबाह्य व नाशकारक वर्तनानें मन विटून गेल्यामुळें व रामाच्याच पक्षाला सत्य, नीति व धर्म आहे अशी खात्री झाल्यामुळें तो रामाला जाऊन मिळाला." या विधानास आधार वाल्मीकि रामायणांत मिळेल असें मला वाटत नाहीं, पण तो मला दाखविल्यास फार आभारी होईन.

रावणाचें धर्मबाह्य वर्तन पूर्वीपासून होतें. पुष्कळांच्या बायका जबरदस्तीनें त्यानें आणल्याचे पुरावे वर दिलेच आहेत. त्यावेळीं या नीतीबाज आणि धर्मनिष्ठ बिभीषणाचें मन विटलें नाहीं. पण हनुमान येऊन आपलें सामर्थ्य दाखवून व वालीचा वध व सुग्रीवाला रामाच्या कृपेनें राज्यप्राप्ति झाली या गोष्टींची घोषणा करून गेला ती ऐकून रावणाला सोडण्याचा त्याचा निश्चय पक्का झाला असें स्पष्ट मलाच दिसत नाहीं तर हनुमान व राम यांसहि दिसून आलें. "बंधु आणि धर्म यांचा विरोध आला असतां कोणाचें पालन करावें?" असा प्रश्न श्री. सरवटे करतात. या ठिकाणीं तसा पेंच बिभीषणास पडलेला नाहीं. भाऊ अधर्मी म्हणून त्याच्याजवळ राहवत नसल्यास रामाच्या आश्रयास जाऊन मला राज्य मिळवून द्या, अशी याचना करण्यास नको होती. दुसरीकडे म्हणजे पाताळांत किंवा कुबेराकडे राहिला असता तरी त्याला आश्रय मिळण्यासारखा होता. पुढें ते म्हणतात, अलेक्झांडरच्या छावणींतील राजपुत्र व मोंगल बादशहास मदत करणारे

रजपूत " या लोकांचा देशद्रोह स्वार्थमूलक होता, बिभीषणाचा बंधुविरोध सत्यभक्तिप्रेरित होता." पण हें विधान चुकीचें आहे. बिभीषणाचा बंधुविरोध निखालस स्वार्थप्रेरित होता व सत्यभक्तीचें निवळ सोंग करून लंका सोडून जाण्यास कसली तरी पुचाट सबब त्यानें काढली होती.

रामानें त्याचेकडून राक्षसांचें बलाबल काढून घेतलें व

" अहं हत्वा दशग्रीवं सप्रहस्तं सहात्मजम् ।
राजानं त्वां करिष्यामि " ॥

असें आश्वासन दिलें. या आश्वासनांत बिभीषणाला ज्याचें ज्याचें म्हणून भय होतें त्यांचा त्यांचा वध करण्याची प्रतिज्ञा रामानें केली आहे. ( यु. कां. सर्ग १९।१९ )

पुढें बिभीषणाची आणखी खात्री करण्याकरितां राम प्रतिज्ञा करितो, ( सर्ग १९ श्लो. २१ ).

" अहत्वा रावणं संख्ये सपुत्रजनबांधवम् ।
अयोध्यां न प्रवेश्यामि त्रिभिस्तैर्भ्रातृभिः शपे " ॥

" पुत्र, स्वजन आणि बांधव यांसहवर्तमान संग्रामामध्यें रावणाचा वध केल्यावांचून मी अयोध्या नगरींत प्रवेश करणार नाहीं. हें त्या तीन भ्रात्यांची शपथ वाहून मी तुला सांगतों." वास्तविक पहातां रामाचें वैर केवळ एकट्या रावणाशीं होतें. बाकीच्यांनीं त्याचा कसलाहि अपराध केलेला नव्हता. रावणाबरोबर होणाऱ्या युद्धांत रावणातर्फे ते लढाईस आल्यास त्यांचें मरण प्रसंगानुरोधानें ओढवणार. मग रामानें रावणाचे पुत्र, त्याचे स्वकीयजन व त्याचे बांधव यांना मारल्याशिवाय अयोध्येस जाणार नाहीं, अशी घोर प्रतिज्ञा कां करावी ? अशी प्रतिज्ञा करण्याचें एकच कारण दिसतें. सुग्रीवाचें साह्य मिळविण्यास वालीचा खून अन्यायानें देखील करण्याचें काम रामानें पत्करलें, तसेंच बिभीषणाचें साह्य मिळविण्यासाठीं त्याच्या राज्य मिळविण्याच्या मार्गांतील कांटे, म्हणजे रावणाचे पुत्र, स्वजन, बंधु, प्रहस्तादि सेनापती वगैरे सर्वांस मारण्याची प्रतिज्ञा रामानें केली व खात्री पटविण्यासाठीं तिघांहि भावांची शपथ घेतली.

तेव्हां हा फितुरी म्हणतो,

"राक्षसानां वधे साह्यं लंकायाश्च प्रधर्षणो ।
करिष्यामि यथाप्राणं प्रवेक्ष्यामि च वाहिनीम्" ॥२३॥

"राक्षसवधाच्या कामीं व लंकेवर हल्ला करतांना जीव तोडून सहाय्य करीन व रावणाच्या सैन्यांतहि मी शिरेन." एकंदरींत राज्यलोभानें स्वजनांचा घात करण्यासहि हा देशद्रोही व बंधुद्रोही मागें हटणारा नाहीं. त्याच बैठकींत बिभीषणाला समुद्रजलानें लंकेचा राजा म्हणून अभिषेक केला गेला.

राज्यलोभानें कांहीं तरी भांडण मुद्दाम काढून भावाला सोडून रामाकडे येऊन तेथील भेद बिभीषणानें दिला. इंद्रजिताचा वध व दुसरे अनेक प्रकार या योगानेंच रामलक्ष्मणाला सोपे झाले. लंकेंतील रावणाच्या व त्याच्या सैनिकांच्या हालचालींची बातमी काढण्याचें काम बिभीषणाचे सेवक करीत. हें सर्व बिभीषणाचें वर्तन निंद्यच आहे. त्याचा नीचपणा कोणत्या कोटीचा होता याची कल्पना सर्ग ९१, श्लो. ६ वरून होईल.

रावणेस्तु शिरश्छिन्नं लक्ष्मणेन महात्मना ।
न्यवेदयत् रामाय तदा हृष्टो बिभीषणः ॥

महात्म्या लक्ष्मणानें इंद्रजिताचें शिर तोडलें असें रामाला सांगतांना बिभीषणास हर्ष झाला! याच्या पूर्वीच्याच श्लोकांत हा हर्ष त्याच्या मुद्रेवरूनच दिसत होता, असें सांगितलें आहे. ज्यानें आपलें केव्हांहि वाईट केलें नाहीं, व जो इंद्रालाहि जिंकणारा असा पराक्रमी, अशा सख्या पुतण्याच्या मृत्यूनें हर्ष पावणाऱ्या बिभीषणाला कशाची उपमा द्यावी हेंच कळत नाहीं. आपल्या राज्यप्राप्तीच्या मार्गातला एक कांटा गेला याचाच त्याला आनंद झाला असला पाहिजे.

रावणानें बिभीषणाला चांगल्या प्रकारें वागविलें होतें, त्याचा इतमाम मोठा होता. सल्लागार मंत्रीमंडळांत तो होता. रावण त्याच्या भिडेखातर बऱ्याच गोष्टी करीतहि असे. असें असतांहि त्याचा पुत्रपौत्रासह नाश करून राज्य उपटण्याची हाव बिभीषणास झाली.

कपटी व मायावी भाषण करून भुरळ पाडण्याची कला त्याला अवगत होती. म्हणूनच रामाच्या बाणानें तुझा वध झाला हें मला पाहवणार नाहीं म्हणून मी जातों, तुझें कल्याण असो, असें सांगून लंका सोडून बिभीषण निर्वेधपणें निघून गेला.

रामाकडे जाऊन भावाविरुद्ध सर्व प्रकारची मदत करून त्याचे सर्व पुत्र मारवून अखेर जगत्जेता, थोर, पराक्रमी भाऊ रामाच्या हस्तें लढाईत पडला तेव्हां मोठ्या हर्षानें सुग्रीव अंगदांबरोबर रामाची पूजा करिता झाला, असें वर्णन १०८ सर्गाच्या अखेरीस आहे. १०९ वे सर्गांत बिभीषणाचा कृत्रिम विलाप दिला आहे. पण या विलापांतहि रावणाच्या गुणाचें वर्णन लक्षांत ठेवण्यासारखें आहे:—

गतः सेतुः सुनीतानां गतो धर्मस्य विग्रहः ॥ ६ ॥

धर्मनिष्ठांची मर्यादा नाहींशी झालेली आहे. धर्माचें स्वरूप ( धर्माची मूर्ति ) नष्ट झालें आहे असें तो म्हणतो. "चित्रभानुः प्रशांतार्चिर्व्यवसायो निरुद्यमः" अग्नि ज्वालारहित झाला आहे आणि प्रवृत्तिरूप धर्मालाहि प्रतिबंध झाला आहे.

रावण मोठा धर्मनिष्ठ होता, ही केवळ त्याची स्तुति नव्हती, तो तसाच होता. मारुती लंकेंत सीताशुद्धीसाठीं गेला तेव्हां तोहि त्याचें तसेंच वर्णन करतो. लंकेंत त्याला सर्वत्र वेदमन्त्रांचा घोष ऐकूं आला व वेदाध्ययनाविषयीं रत असलेले राक्षस दिसले. यथा राजा तथा प्रजा. रावण स्वतः मोठा वेदवेत्ता होता हें प्रसिद्ध आहे. अशा धर्मनिष्ठानें दुसऱ्यांच्या बायका जबरदस्तीनें कां आणाव्या याचें उत्तर उघड आहे. हा राक्षसांचा आचारच होता. त्याची साक्ष 'राक्षसविवाह' हा शब्दच देतो. 'विवाह' हा शब्दच जबरदस्तीचा वाचक आहे. व वधू शब्दाचा मूळचा अर्थ ओढून किंवा उचलून आणलेली अशा आहे. म्हणूनच वधू शब्दाचा प्रयोग (१) नवरी (२) पत्नी (३) सून (४) स्त्री अशा भिन्न भिन्न अर्थी केला जातो.

रावणाचें वर्तन राक्षसांच्या आचाराप्रमाणें धर्मबाह्य नसल्यानें तो मरण पावल्यावर त्याच्या धर्मनिष्ठतेविषयींचे उद्गार बिभीषणाच्या मुखांतून बाहेर पडले आहेत.

या बाबतींत सुग्रीव हा बिभीषणापेक्षां पुष्कळ बरा. त्याचे वालीवधानंतरचे उद्गार अंतःकरणापासून पश्चात्तापाचे आहेत.

बिभीषणाचा शोक सारा १३ श्लोक आहे. नंतर रामानें ६ श्लोकांनीं त्याचें समाधान केलें. त्यांत हा रावण मृत्यूची पर्वा न करितां दैवानें वध होऊन पडला. अभ्युदयाची इच्छा धरणारे जे पुरुष रणांत पडतात, ते क्षात्रधर्मांत तत्पर असल्यानें त्यांचे आप्तजन शोक करीत बसत नाहींत. ज्या बुद्धिवान पुरुषानें इंद्रासहवर्तमान तिन्ही लोक युद्धांत त्रस्त करून सोडले तो हा पुरुष मृत झाला असतां शोच्य नाहीं. सारांश, संग्रामामध्यें वध पावलेल्या क्षत्रियाबद्दल शोक करणें योग्य नाहीं हें निश्चित आहे. म्हणून अंतःकरणामध्यें निश्चय करून तूं स्वस्थ हो, आणि पुढें काय करणें योग्य आहे याचा विचार कर. उदार रामाचें हें भाषण त्या वीराला शोभण्यासारखेंच आहे. तेव्हां बिभीषणानें आणखी शोक केला. तो पुन्हां रावणाचे गुण वर्णितो. " यानें याचकांना दानें दिलीं आहेत. भोग भोगले आहेत. दासांचें पोषण केलें आहे. मित्रांना द्रव्यें अर्पण केलीं आहेत. आणि शत्रूंशीं यानें वैरेंहि बांधलीं आहेत. हा अग्निहोत्री आहे. हा महातपस्वी आहे. यानें उपनिषदांचें अध्ययन केलेलें आहे. आणि अग्निहोत्रादि कर्मांचें अनुष्ठान करणाऱ्यांमध्यें हा मुख्य आहे. यास्तव परलोकीं गेलेल्या याचें जें और्ध्वदेहिक कर्म तें आपल्या प्रसादानें करण्याची माझी इच्छा आहे." युद्धकाण्ड सर्ग १०९ श्लोक २३–२४. त्या उदारबुद्धि राजपुत्र रामानें त्या रावणाचें और्ध्वदेहिक कर्म करण्याविषयीं त्याला आज्ञा दिली. आणि तो म्हणाला,

" मरणांतानि वैराणि निवृत्तं नः प्रयोजनम् ।
क्रियतां अस्य संस्कारो ममाप्येष यथा तव " ॥२६॥

" 'वैरें मरणापर्यंतच कायम रहात असतात आणि सांप्रत आपला (उभयतांचाहि) कार्यभागहि उरकला आहे. यास्तव, याचा आतां तूं संस्कार कर. सांप्रत हा जसा तुझा आहे, तसाच माझाहि आहे." ॥२६॥ नंतर ११० सर्गांत रावणपत्नींचा शोक आहे. १११ चे सुरवातीस मंदोदरीचा शोक हा ९१ श्लोकपर्यंत आहे. इतक्यामध्यें राम बिभीषणाला म्हणाला, " भ्रात्याचा और्ध्वदेहिक संस्कार कर आणि स्त्रीसमुदायाचें सांत्वन कर." यावर–

तमुवाच ततो धीमान् बिभीषण इदं वचः ।
विमृश्य प्रश्रितं बुद्धया धर्मार्थसहितं हितम् ॥९२॥
त्यक्तधर्मव्रतं क्रूरं नृशंसमनृतं तथा ॥९३॥
नाहमर्हामि संस्कर्तुं परदाराभिमर्शनम् ।
भ्रातृरूपो हि मे शत्रुरेष सर्वाहिते रतः ॥९४॥
रावणो नार्हते पूजां पूज्योऽपि गुरुगौरवात् ।
नृशंस इति मां राम वक्ष्यंति मनुजा भुवि ॥९५॥
श्रुत्वा तस्यागुणान्सर्वे वक्ष्यंति सुकृतं पुनः ॥

अर्थः—ह्यावर विचारी बिभीषण बुद्धिपूर्वक विचार करून धर्मार्थसहित, हितावह व विनययुक्त असें भाषण त्या रामाशीं करूं लागला. ( तो म्हणाला ) " धर्माचा व व्रताचा ज्यानें त्याग केला असा जो क्रूर, दुष्ट, खोटा, ( ९२, ९३ ) आणि परस्त्रीवर हात टाकणारा त्याचा और्ध्वदेहिक संस्कार करणें मला योग्य नाहीं. सर्वांच्या अकल्याणाविषयीं तत्पर असलेला हा रावण माझा भ्रातृरूप शत्रूच होय. ९४. ' ज्येष्ठ भ्राता ' ही महत्वाची गोष्ट लक्षांत घेतली असतां रावण जरी पूज्य आहे तरी माझ्या हातून पूजा होण्यास तो पात्र नाहीं. हे रामा, ( संस्कार न केला तर ) भूतलावरील मला प्रथमतः दुष्ट म्हणतील ९५, परंतु त्याचे दोष श्रवण केल्यानंतर सर्वहि पुनरपि चांगलें केलें असेच उद्गार माझ्यासंबंधानें काढूं लागतील. "

थोड्याच वेळापूर्वी आपण लटकाच कां होईना शोक केला, रामाकडे और्ध्वदेहिकाची परवानगी मागितली, त्यानें रावणाचें शौर्य, धैर्य इत्यादि गुणांचें वर्णन करून मरणापर्यंतच वैर असतें असें म्हणून परवानगी दिली; याचें विस्मरण पडून रावणाविषयींचा दीर्घ द्वेष बिभीषणाचे मनांत कसा उसळी मारून उठला हें यावरून स्पष्ट होत आहे. बिभीषणाचें धर्मात्मापण आपमतलबाचें अतएव खोटें आहे. राज्याची हाव त्याला मोठी. तिच्या तृप्तीसाठीं त्याचे सारे प्रयत्न, तो अगदीं हलक्या मनाचा व दुष्ट, दिलदार-पणा त्याचे ठिकाणीं नाहीं, इत्यादि दाखविण्यासाठीं महाकवि वाल्मीकींनीं व्याजस्तुतिरूपानें त्याला अनेक ठिकाणीं धर्मात्मा वगैरे वरून स्तुतिवाचक

विशेषणें दिलेलीं आहेत. व तो अर्थ वाचकांच्या लक्षांत येण्यासाठीं त्याचें काळेंकुट्ट हृदय उघडें पडणारे उद्गार दिले आहेत. भरताची बंधुभक्ति उज्ज्वल. ती खुलून दिसावी यासाठीं बंधुघाती सुग्रीव व त्यापेक्षांहि दुष्ट बिभीषण ही लोभी जोडी पुढें ठेवली आहे. व यासाठींच बिभीषण प्रथम रामाकडे आला, तेव्हां "भरतासारखे सर्वच भ्राते नाहींत" असे उद्गार रामाच्या तोंडीं घातले आहेत. आद्य महाकवीच्या काव्यांत व्यंग्यार्थ पुष्कळच ठिकाणीं आहे.

पापी रावणाचा संपर्क नको अशी धर्मात्मा बिभीषणाची उक्ति रामाला पसंत पडणें शक्यच नव्हतें. त्यानें मागीलच मुद्दे 'मरणाबरोबर वैरांचा शेवट होतो व आपला कार्यभाग झालेला आहे' वगैरे सांगून रावणाचा संस्कार करण्यास आज्ञा केली.

## फोडिलें भांडार वाल्मिकीचा माल । मी तंव हमाल भार वाही ॥

रामानें रावणास मारल्यामुळें रिकाम्या झालेल्या लंकेच्या सिंहासनावर रामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें बिभीषणास अभिषेक केला.

" बिभीषणमिमं सौम्य लंकायामभिषेचय ।
अनुरक्तं च भक्तं च तथा पूर्वोपकारिणम् ॥ "

( युद्धकांड सर्ग ११२ श्लो. १० )

"हे सौम्या, या बिभीषणाला लंकेमध्यें अभिषेक कर. हा आपणावर प्रेम करणारा असून आपला भक्त आहे व प्रथमतः यानें आपणावर उपकार केला आहे." नंतर लक्ष्मणानें वानरांकडून समुद्राचें जल आणविलें.

ततस्त्वेकं घटं गृह्य संस्थाप्य परमासने
घटेन तेन सौमित्रिरभ्यषिंचद्विभीषणम् ॥१५॥
लंकायां रक्षसां मध्ये राजानं रामशासनात्
विधिना मंत्रदृष्टेन सुहृद्गणसमावृतः ॥१६॥
अभ्यषिंचत्तदा सर्वे राक्षसा वानरास्तथा
प्रहर्षमतुलं गत्वा तुष्टुवू राममेव च ॥१७॥

अर्थ:—तदनंतर त्यांपैकीं एक घट घेऊन आणि बिभीषणाला सिंहासनावर बसवून सुहृद्गणांनीं परिवेष्टित असलेल्या सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रामाच्या आज्ञेप्रमाणें राक्षसांमध्यें त्यांचा राजा म्हणून समंत्रक विधीनें त्याला लंकेंत अभिषेक केला. ( १५ । १६ ) तेव्हां सर्व राक्षसांनीं व वानरांनीं त्याला अभिषेक केला व अतिशय हर्षयुक्त होऊन ते रामाची स्तुति करूं लागले. ( १७ ) पुढें प्रजाजनांचें सांत्वन करून तो रामासमीप आला तेव्हां—

दध्यक्षतान्मोदकांश्च लाजाः सुमनस्तथा
आजह्रुरथ संहृष्टाः पौरास्तस्मै निशाचराः ॥ २० ॥
स तान्गृहीत्वा दुर्धर्षो राघवाय न्यवेदयत्
मांगल्यं मंगलं सर्वं लक्ष्मणाय च वीरवान् ॥ २१ ॥

दहीं, अक्षता, मोदक, लाह्या व पुष्पें घेऊन आनंदित झालेले लंकानगरवासी राक्षस त्या बिभीषणाकडे आले असतां त्या दधिप्रभृति पदार्थांचा स्वीकार करून त्या अजिंक्य व वीर्यवान् बिभीषणानें ते सर्व मंगलदायक व मंगलरूप शुभ पदार्थ रामाला व लक्ष्मणाला निवेदन केले.

सन १७३९ सालीं नादिरशहानें दिल्लीवर स्वारी करून मोठी कत्तल करून व मोठी लूट मिळवून महंमदशहाला पुन्हां गादीवर बसविलें आणि तो आपले मुलखास परत गेला. त्यावेळीं याच इतिहासाची पुनरावृत्ति झाली. दोन बादशहा ( एक जेता व दुसरें बाहुलें ) एकत्र असतां नजराणा घेऊन आंत येण्याचा प्रसंग वजिरावर आला. महंमदशहापुढें तो नजराणा ठेवावा तर नादिरशहाचा अपमान होऊन तो कदाचित् डोकें उडवील ही भीति, बरें एकदमच नादिरशहापुढें ठेवल्यास आपल्या धन्याचा अपमान आपल्या हातानें होतो अशी अडचण आली. तेव्हां त्यानें धूर्तपणानें महंमदशहापुढें तो ठेवून ' या बड्या पाहुण्याचा आपणच सत्कार करावा, माझी ती योग्यता नाहीं ' असें विनविलें. वजिराचा हा धूर्तपणा नादिरशहानें ओळखला व तो संतुष्ट झाला. तशीच ही कथा आहे. राम हा जेता आहे; बिभीषण हा केवळ निष्प्रभ, त्याच्या हातांतील बाहुलें आहे.

नंतर रामानें हनुमानास सीतेला आणण्यास पाठविलें; तेव्हां बिभीषणाची आज्ञा घेऊन जा, असें सांगितलें. पण यावरून बिभीषणाचा

दर्जा वाढला असें होत नाहीं. रामानें गादीवर बसविलेल्या बाहुल्याचा बोज रामानें व त्याच्या नोकरांनीं राखला नाहीं तर इतर राक्षसहि राखणार नाहींत म्हणून तसा हुकूम दिला आहे. आजहि कोणत्याहि संस्थानच्या हद्दींत इंग्रज सरकारचा हुकूम प्रत्यक्ष अमलांत येत नाहीं. सर्व गोष्टी राजे, महाराजे, नबाब, सुलतान यांच्याच हुकमानें घडून येतात.

सीतेला पालखींतून आणली त्यावेळीं वानर ऋक्षांची व राक्षसांची दाटी झाली. ती मागें सारतांना कांहीं दंडादंडी बिभीषणाच्या आज्ञेनें झाली. ती पाहून रामाला क्रोध आला व बिभीषणाला तो रागें भरला.

संरंभाच्चाब्रवीद्रामश्चक्षुषा प्रदहन्निव ।
बिभीषणं महाप्राज्ञं सोपालंभमिदं वचः ॥२५॥
" किमर्थं मामनादृत्य क्लिश्यत्येऽयं त्वया जनः ।
निवर्त्तयैनमुद्वेगं जनोऽयं स्वजनो मम " ॥२६॥

**अर्थ** :— आणि क्रोध आल्यामुळें दृष्टीनें दग्ध करीत करीतच कीं काय, तो राम त्या महाबुद्धिमान बिभीषणाला रागें भरून म्हणाला, ॥ २५ ॥ " माझी पर्वा न करतां तूं या लोकांना कशाकरतां त्रास देत आहेस ? ही दाणादाण बंद कर; हे लोक माझे आहेत. " ॥२६॥

वानर व ऋक्ष हे सुग्रीवाच्या सैन्यांतील. ते आपले आहेत असें रामाचें म्हणणें योग्य आहे. पण या गर्दींत राक्षसहि आहेत. त्यांनाहि राम आपले म्हणत आहे. यावरून लंकेचें राज्य आपल्या शासनाखालीं आलें व सर्व राक्षस आपली प्रजा झाले, असें रामाच्या म्हणण्यावरून ठरतें. नुकत्याच श्रीमच्छत्रपति महाराज कोल्हापूर यांनीं आजरा प्रकरणीं दिलेल्या ठरावांत इचलकरंजी जहागिरींतील प्रजेस आपली प्रजा म्हटलें आहे. तेथेंहि हाच प्रकार आहे. संस्थानिकांची प्रजाहि साम्राज्य सरकारचीच आहे.

यावरून त्यांचें नातें बरोबरीचें राहिलें नाहीं. रामाच्या आज्ञेंत बिभीषणाला राहणें भाग होतें. राम अधिराजा होता.

याच वेळीं रामाच्या मतानें स्त्रियांनीं पाळावयाच्या पडद्याची मर्यादा कशी होती हें त्यानेंच सांगितलें आहे.

न गृहाणि न वस्त्राणि न प्राकारस्तिरस्क्रिया ।
नेदृशा राजसत्कारा वृत्तमावरणं स्त्रियः ॥ २७ ॥
व्यसनेषु न कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे ।
न क्रतौ न विवाहे वा दर्शनं दूश्यते स्त्रियः ॥ २८ ॥
सैषा विपद्गता चैव कृच्छ्रेण च समन्विता ।
दर्शने नास्ति दोषोऽस्या मत्समीपे विशेषतः ॥ २९ ॥
विसृज्य शिबिकां तस्मात्पद्भ्यामेवापसर्पतु ।
समीपे मम वैदेहीं पश्यन्त्वेते वनौकसः ॥ ३० ॥

गृहें, वस्त्रें व कोट हीं स्त्रीचीं आवरणें नसून ( लोकांना मार्गे हटविणें, धकाबुक्की करून त्यांना मार्गे सारणें ) अशा प्रकारचे राजसत्कारहि स्त्रीचें वास्तविक आवरण नव्हे. सदाचरण हेंच स्त्रीचें वास्तविक आचरण होय । २७ । संकट, विपत्ति, युद्ध, स्वयंवर, यज्ञ आणि विवाह याप्रसंगीं स्त्रिया इतरांच्या दृष्टि पडणें दोषावह होत नाहीं । २८ । ज्याअर्थी सीता विपत्तीमध्यें व संकटामध्यें सांपडलेली आहे त्याअर्थी इतरांच्याहि दृष्टि पडणें दोषावह होत नाहीं. आणि विशेषतः मी जवळ असतांना दोषावह नाहींच नाहीं. । २९ । यास्तव पालखींतून उतरून पायानींच तिला इकडे येऊं दे आणि माझ्यासमीप या वानरांच्या ती खुशाल दृष्टीं पडूं दे.

राम पुष्पक विमानांत बसून सीतेसह निघाला तेव्हां,

"स्वराज्ये वस लंकायां मया दत्ते बिभीषण ।
न त्वां धर्षयितुं शक्ताः सेंद्रा अपि दिवौकसः" ॥

(यु. कां. सर्ग १२२ श्लो. १६)

"हे बिभीषणा, तूंहि आपल्या लंकेंत वास्तव्य कर. इंद्रासहवर्तमानहि देव तुझा पराभव करण्यास समर्थ नाहींत." या भाषांतरांत शास्त्रीबुवांनीं "मया दत्ते" या पदाचा अर्थ कां सोडला समजत नाहीं !! "मी दिलेल्या" आपल्या राज्यांत रहा, माझ्या भीतीनें तुझ्या वाटेस कोणी

जाणार नाहीं, असा रामाचा आशय आहे. पुढें राम अयोध्येस गेला तेव्हां रामाची मिरवणूक निघाली, तींत राम रथावर आरूढ झाला होता.

जग्राह भरतो रश्मीञ्शत्रुघ्नश्छत्रमाददे ।
लक्ष्मणो व्यजनं तस्य मूर्ध्नि संवीजयंस्तदा ॥२८॥
श्वेतं च बालव्यजनं जगृहे परितः स्थितः ।
अपरं चंद्रसंकाशं राक्षसेंद्रो बिभीषणः ॥२९॥

त्यावेळीं भरतानें रश्मि धरल्या होत्या, शत्रुघ्नानें छत्र धरिलें, लक्ष्मण त्याच्या मस्तकावर विंझोणा वारीत होता. ॥२८॥ आणि राक्षसाधिपति बिभीषण दुसरी श्वेतवर्ण व चंद्रतुल्य चवरी घेऊन त्याच्यासमीप उभा होता. ॥२९॥ (शास्त्रीबुवांनीं भाषांतरांत परितः शब्द सोडला ) तो चवरी वारूं लागला असें पाहिजे.

रामाच्या दरबारांत सुग्रीव हा बिभीषणापेक्षां लाडका होता. त्याचे सर्व वानर रामानें पुष्कळ विमानांतून आणले; बिभीषणाचे फक्त चारच अमात्य आणले. सुग्रीवाच्या व थोर वानरांच्या बायकाहि सीतेनें बरोबर घेवविल्या. पण बिभीषण तुझ्याविषयीं रदबदली करितो हा निरोप त्याची ज्येष्ठ कन्या इच्या तोंडीं बिभीषणाच्या सरमा नामक पत्नीनें पोचविला. त्या कन्येला किंवा तिच्या आईला अयोध्येस आणलें नाहीं. दोघामध्यें केलेला हा फरक लक्ष्यांत घेण्यासारखा आहे.

या मिरवणुकींत शत्रुंजय या नांवाच्या थोरल्या हत्तीवर सुग्रीवाला बसविलें होतें. (३१) रामानें मंत्र्यांना

सख्यं च रामः सुग्रीवे प्रभावं चानिलात्मजे ।
वानराणां च तत्कर्म ह्याचचक्षेऽथ मंत्रिणाम् ॥३९॥

" नंतर सुग्रीवाशीं झालेलें आपलें सख्य, वायुपुत्र हनुमानाचे ठिकाणीं असलेलें सामर्थ्य आणि वानरांचें तें कर्म रामानें मंत्र्यांना कथन केलें." यांत बिभीषणाविषयीं किंवा त्याच्या पराक्रमाविषयीं कांहीं सांगितलेलें नाहीं. ४१ वे श्लोकांत राम वानरांसह नगरांत शिरल्याचा उल्लेख आहे. ४४ वे श्लोकांत वानरांना तूं आंत ने व कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांस

त्यांच्याकडून नमस्कार करव, असें राम भरतास सांगतो. पुढल्याच श्लोकांत सुग्रीवाच्या राहाण्याची व्यवस्था "मोत्यें व वैडूर्यमणि यांनीं गजबजून गेलेलें तें माझें प्रचंड श्रेष्ठ गृह अशोकवनासहवर्तमान तूं सुग्रीवाला निवेदन कर." (४५) तें त्याचें भाषण श्रवण केल्यानंतर सत्यपराक्रमी भरत सुग्रीवाला हातीं धरून, त्या गृहांत प्रविष्ट झाला. ।४६। बिभीषणाला उतरण्यास जागा दिली असलीच पाहिजे, पण त्याचा उल्लेख करण्याची आवश्यकता वाल्मीकीस भासली नाहीं. यावरून त्याचें महत्त्व विशेष मानलें गेलें नव्हतें असें दिसतें. सुग्रीव व बिभीषण यांमध्यें राम सुग्रीवालाच विशेष मान देत आहे. बिभीषण हा खिजगणतींतहि नाहीं. शेवटच्या पाठवणींतहि "प्रजाधिपति रामानें सुग्रीवाला एक दिव्य माला दिली; तिची कांति सूर्यकिरणाप्रमाणें होती व ती रत्नमाला सुवर्णानें गुंफिलेली होती." अंगदाला व हनुमानाला काय काय दिलें याचीहि नोंद आहे. पण तसा स्वतंत्र उल्लेख बिभीषणाला दिलेल्या आहेरासंबंधानें नाहीं. ८५।८६ श्लोकांत—

बिभीषणोऽथ सुग्रीवो हनुमाञ्जांबवांस्तथा ।
सर्वे वानरमुख्याश्च रमेणाक्लिष्टकर्मणा ॥८५॥
यथार्हं पूजिताः सर्वे कामै रत्नैश्च पुष्कलैः ।
प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥८६॥

सर्वांबरोबर योग्यतेनुरूप पूजन केलें व रत्नें वगैरे दिलीं. रामानें मुद्दाम दरबार भरवून सुग्रीव, अंगद, हनुमान वगैरे वीरांस त्यांच्या कामगिरीबद्दल विशेष बक्षिसें त्यांच्या पराक्रमाचें वर्णन करून दिलीं. त्यावेळीं बिभीषणास कांहीं मिळालें नाहीं. सर्वांची पाठवणी करण्याच्या दरबारांत ८५।८६ श्लोकांत सांगितल्याप्रमाणें सर्वांचाच सन्मान करून त्यांना आहेर दिले आहेत. यावेळीं थोर पाहुण्यांना तर आहेर मिळतातच, पण त्यांच्या हुजऱ्यापर्यंतच्या नोकरांनाहि देण्यांत येतात. रामाच्या दरबारींहि तसेंच झालें.

सुग्रीव व बिभीषण या दोघांबरोबरची रामाची वागणूक भिन्न आहे. राम बिभीषणापेक्षां सुग्रीवासच जास्त मानतो, प्यार करतो. त्याचें कारण काय? या प्रश्नाचें उत्तर या दोघांच्या मनःस्थितींत आहे.

सुग्रीवाचें व त्याच्या भावाचें वैर पडलेलें होतें व तें वैर उघड होतें. त्यासाठीं सुग्रीवानें वालीचा वध करविला हें गैर खरें, पण बिभीषणाच्या वर्तणुकीच्या मानानें क्षम्य आहे. बिभीषणाशीं रावणानें वैर केलें नाहीं. त्यानें दिलेला भलताच सल्ला ऐकला नाहीं म्हणून तो खोटेंच रागावून लंका सोडून गेला. राम, हनुमान वगैरे सर्वांनीं त्याचा कावा ओळखला. त्याच्या नीचपणाचा त्यांना तिटकारा आला. सुग्रीवानें तर तो बोलूनहि दाखविला. रामास त्याच्या फितुरीची जरूर होती म्हणून त्याला ठेवून घेतला, व लंकेचें राज्य त्याला दिलें. पण तो स्वार्थी, बंधुघातकी अशीच सर्वांची खात्री होती. म्हणून रामाचे दरबारीं त्याची मोठीशी मान्यता झाली नसावी. सुग्रीवाबरोबर रामानें अग्निसाक्षिक सख्य केलें व त्यामुळें तो त्याचा परम मित्र व बंधु झाला. म्हणूनच त्याला आयांकडे पाठवून त्यांचें दर्शन करविलें आहे. बिभीषण हा रामाच्या आश्रयास स्वार्थ साधण्याच्या हेतूनें आला. त्याच्याबरोबर तसें सख्य झालें नव्हतें. तो केवळ आश्रित होता.

नगरप्रवेशांत सुग्रीवाला मोठ्या इतमामानें थोरल्या हत्तीवर बसविलें व राहाण्यास थोरला राजवाडा दिला. याप्रमाणें त्याचा दर्जा वाढून आपण बरोबरीचे अशी भावना होऊन त्याचें डोकें फिरेल अशी भीति रामाचे दरबारी लोकांस पडली असावी. म्हणूनच राज्याभिषेक झाल्यावर

किरीटेन ततः पश्चाद्वसिष्ठेन महात्मना ।
ऋत्विग्भिर्भूषणैश्चैव समयोक्षत राघवः ॥ ६७ ॥
छत्रं तस्य च जग्राह शत्रुघ्नः पांडुरं शुभम् ।
श्वेतं च वालव्यजनं सुग्रीवो वानरेश्वरः ॥ ६८ ॥
अपरं चंद्रसंकाशं राक्षसेंद्रो बिभीषणः ॥ ६९ ॥

नंतर महात्म्या वसिष्ठ मुनीनीं राघवाचे मस्तकीं किरीट चढविला व ऋत्विजांनीं त्याला अलंकार घातले (६७), शत्रुघ्नानें त्या रामावर शुभ्रवर्ण व शुभ छत्र धरिलें; वानराधिपति सुग्रीव श्वेतवर्ण चवरी वारूं लागला (६८). आणि राक्षसराज बिभीषण चंद्रासारखें दुसरें चामर वारीत राहिला (६९). चवरी, मोरचेल, छत्र वगैरे राजचिन्हें अभिषिक्त राजावर धरण्याचा मान

मोठमोठ्या सरदारांचा असतो. पण त्यायोगें ते सेवक आहेत असें स्पष्ट ठरतें. कोल्हापुरासहि श्रीमन्महाराज छत्रपति हत्तीवर बसून जातात त्यावेळीं त्यांचे मागें खवासखान्यांत बसण्याचा मान श्रीमंत पंतप्रतिनिधि विशाळगडकर व श्रीमंत पंतअमात्य बावडेकर यांचा आहे, व त्यावेळीं त्यांना मोरचेल हातीं धरावें लागतें. हे दोन दरबारचे मुख्य सरदार आहेत. तसेंच रामाच्या दरबारचे सुग्रीव-बिभीषण हे झाले, असें श्रीवाल्मीकींनीं शब्दानें न सांगतां त्यांच्या हातांत चवऱ्या देऊन दाखविलें आहे.

किष्किंधा व लंका यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें यांत संशय नाहीं. लंकेवर तर प्रोटेक्टरेटच स्थापन झालें असें रामाच्या बोलण्यांतच स्पष्ट आहे. मीं तुला राज्य दिलें आहे, तुला इंद्र किंवा देव यांपासून भय नाहीं. म्हणजेच मी तुझें रक्षण करीन असें वचन दिलें आहे. हिंदुस्थानांतहि इंग्रजांनीं हीच नीति अवलंबिली. इतर शत्रूंपासून रक्षण हीच इंग्रजी राज्यनीतीची गुरुकिल्ली.

श्री. सरवटे यांच्या एका आक्षेपास उत्तर देण्याचें राहून गेलें, त्याबद्दल थोडेसें लिहिणें जरूर आहे. ते म्हणतातः-" बिभीषणानें मंदोदरीला आपल्या जनानखान्यांत दाखल केल्याचें हें दुसरें उदाहरण श्री. जाधवांनीं कोठून मिळविलें न कळे. श्रीवाल्मीकि रामायणांत असा उल्लेख नाहीं. प्रचलित कथांतूनहि तसें सांगण्यांत येत नाहीं."

हें उदाहरण माझ्या नजरेस प्रथमतः Prof. S. C. Sarkar's Some Aspects of the Earliest Social History of India ( Pre-Budhistic Ages ) या पुस्तकावरून आलें. त्यांत पृष्ठ १८६-१८९ या दोन ठिकाणीं हा उल्लेख आहे. तारेच्या संबंधानें वाल्मिकि रामायणांत जसा स्पष्ट उल्लेख आहे तसा मंदोदरीसंबंधानें नाहीं हें खरें. पण याचें कारण निराळें आहे. तारा विधवा होऊन सुग्रीवाच्या ताब्यांत गेल्यावर रामलक्ष्मणांचा मुक्काम बरेच दिवस किष्किंधेच्या समीप होता. रावणवध झाल्यावर एक दोन दिवसांतच रामाचा मुक्काम लंकेतून हालला. यामुळें मंदोदरीसंबंधानें उल्लेख करण्यास अवकाशच मिळाला नाहीं. पण शास्त्रविहित जो आचार त्या कालीं होता त्याप्रमाणें घडून आलें असलें पाहिजे असें अनुमान होतें. भावाचा संबंध जनानाच त्याच्या पश्चात् त्याच्या धाकट्या भावास मिळावा असा

आचारच होता. रावणवधानंतरच्या स्त्रियांचा शोक पहा. बिभीषणानें रामाकडे जाऊन त्याला आणून युद्ध करून रावणाला व त्याच्या सर्व पुत्रांस मारविलें. याप्रसंगीं स्त्रीस्वभावाप्रमाणें या शोकांत बिभीषणावर शिव्यांचा व शापांचा भडिमार पाहिजे. रामावरहि त्यांचा राग झाला पाहिजे. लक्ष्मण, सुग्रीव यांचीहि हजेरी घेतली जावयाची. पण या शोकांत बिभीषणाचें ऐकलें नाहींस, सीतेला आणलीस, म्हणून तुला मरण आलें; असाच आशय ११० सर्गांत रावणपत्न्यांच्या शोकाचा आहे. पुढील सर्गांत मंदोदरीचा शोक त्याच प्रकारचा आहे. त्यांत उलट बिभीषणाची वाखाणणीच आहे. त्याच्या फितुरीबद्दल शब्दहि नाहीं. सर्व दोष रावणावरच टाकला आहे.

असल्या शोकाची उपपत्ति लावणें कठीण नाहीं. या सर्व स्त्रियांना बिभीषणाच्या आश्रयानें त्याच्या बायका होऊन जन्मभर राहावयाचें असल्यानें त्याला क्रोध येईल किंवा वाईट वाटेल असे शब्द न उच्चारण्याची खबरदारी त्यांनीं घेणें स्वाभाविक आहे.

रावणाच्या मृत शरीराचें दहन यथाविधि झालेलें आहे. त्याचें अग्निहोत्र होतें तो अग्नि नेऊन सर्व क्रियाकर्म स्मशानांत झालें. त्याचा सर्व जनानखाना स्मशानांत गेला होता. ( १११ श्लोक १११ सर्ग )

ताः स्त्रियोऽनुनयामास सान्त्वयित्वा पुनःपुनः ।
गम्यतामिति ताः सर्वा विविशुर्नगरं ततः ॥ १२२ ॥

बिभीषणानें गोड शब्दांनीं त्यांचें वारंवार सांत्वन केलें आणि त्यानें जा असें सांगितल्यावर त्या नगरांत प्रविष्ट झाल्या.

यासंबंधानें वैदिक काळचा आचारहि लक्ष्यांत घेण्यासारखा आहे. त्यासाठीं श्री. पांडुरंग वामन काणे यांच्या धर्मशास्त्रविचार या ग्रंथांतून एक लहानसा उतारा येथें देतों. (पृ. १००) त्यावेळीं (ऋग्वेदकाळीं) स्त्रियाहि मृताबरोबर स्मशानांत जात. मृताला चितेवर ठेवल्यावर त्याच्या स्त्रीला उत्तर बाजूस बसवीत.

उत्तरतः पत्नीं संवेशयंति । धनुश्च क्षत्रियस्य ॥ तामुत्थापयेद् देवरः पतिस्थानीयोऽन्तेवासी जरद्दासो वा उदीर्ष्वनार्यभि जीवलोकं

गतासुमेतमुप शेषा एहि । हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभिसंबभूथ । (ऋ. १८, ८)

नंतर पतीचें स्थान घेणारा तिचा दीर किंवा दुसरा कोणी "हे स्त्रिये, या मृताजवळ तूं शयन केलें आहेस, तरी ऊठ आणि या जीवलोकाकडे (घराकडे) चाल. तुझा हात धरूं इच्छिणाऱ्या दुसऱ्या पतीला पुन्हां संतति होऊं दे." भावजयीला स्मशानांतून दिरानें हात धरून उठवून आणावयाची व पुढें त्यांनीं नवराबायकोप्रमाणें राहावयाचें, हा पूर्वींचा आचार आहे. आश्वलायन गृह्यसूत्रांत हा विधि वर्णिला आहे. त्याप्रमाणें पुढें मंदोदरी बिभीषणाजवळ आपल्या इतर सवतींसह राहिली असणार यांत संशय घेण्याचें कारण नाहीं.

आमच्या महाराष्ट्रांत ही चाल नाहींशी झाली आहे हें खरें; पण या आर्यावर्तांतून ही चाल अजीबात नष्ट झाली असेंहि नाहीं. पंजाब व आग्रा यांत जाट म्हणून एक कोट लोकसंख्येची जात आहे. तशीच गुजर या नांवाचीहि जात मोठी आहे. या दोहींतहि नवरा मेल्यावर त्याच्या विधवेनें त्याच्या धाकट्या भावाबरोबर नेवता लावावयाचा अशी सरास रूढी आहे. यांत विधवेच्या किंवा तिच्या दिराच्या वयाचा किंवा पूर्वींच्या बायका असण्याच्या अडचणीचा प्रश्न बिलकुल नाहीं. हीच चाल नाशिक व खानदेश जिल्ह्यांतील बंजारी लोकांच्या तांड्यांतहि सरास आढळते.

श्री. केळकरांच्या एका विधानासंबंधानें थोडें लिहिणें भाग आहे. कारण तसें न केल्यास गैरसमज वाढण्याची भीति आहे. ते म्हणतात, (पृ. १६८) "अशी मित्राची मदत घेण्याची चाल हल्लींहि प्रचलित आहे. १८५७ सालीं इंग्रजांनीं अशी मदत नेपाळची घेतली. पण त्यांस कोणीहि इंग्रजानें देशद्रोही ठरविलें नाहीं." प्रजेंत बंड झाल्यावेळीं नेपाळची मदत इंग्रजांस इष्टच होती. म्हणून कोणीहि इंग्रजानें नेपाळला द्रोही ठरविणें शक्य नाहीं. पण नानासाहेब पेशवे, झांशीची राणी, तात्या टोपे वगैरेंच्या दृष्टीनें पाहाणारांस नेपाळचें कृत्य स्वार्थी, देशद्रोही, धर्मद्रोही वाटलें पाहिजे.

रामायण ही कथा ऐतिहासिक आहे का कल्पित आहे, राम या देशांतील किंवा इजिप्तचा, वगैरे वादांत शिरण्याचें कारण नाहीं. रामायण हें उत्कृष्ट व फार मोठ्या दर्जाचें काव्य आहे. यांत राजनीति उत्तमरीतीनें वर्णन केलेली आहे. परंतु रामायणांत प्रक्षिप्त भाग पुष्कळसा घुसडला गेला आहे. अगदीं सुरवातीला वाल्मीकीला रामाचें नांव देखील माहीत नव्हतें, असें स्पष्ट असतां उत्तर कांडांत ते जवळजवळच्या प्रांतांत राहणारे समकालीन वर्णिले आहेत. उत्तर कांड जसें प्रक्षिप्त तसाच रामाला विष्णूचा अवतार व सुग्रीव, हनुमान बिभीषणादींस देवांचे अवतार ठरविणाऱ्या कथा प्रक्षिप्तच आहेत. कबीरादि संतांची कविता पाहतां माझा राम दशरथाच्या पोटीं जन्मास आला नाहीं, कौसल्येचें स्तनपान त्यानें केलें नाहीं असेंच ते कंठरवानें सांगत आहेत. लघुयोग वासिष्ठाच्या प्रस्तावनेंत आपला राम कसा आहे हें

रमंते योगिनोऽनंते नित्यानंदे चिदात्मनि ।
इति राम पदेनासौ परं ब्रह्माभिधीयते ।।

या श्रुतीनें रंगनाथ वर्णन करतात, आणि मग योगवासिष्ठाच्या अनुरोधानें पुढील ग्रंथ लिहितात. राम हा विष्णूचा अवतार असें ठरविल्यामुळें रामायण या महाकाव्याची दैना उडाली आहे.

पठन्द्विजो वाग्वृषभत्वमीयात्स्यात्क्षत्रियो भूमिपति त्वमीयात् ।
वणिग्जनः पण्यफलत्वमीयात् जनश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् ।।
( बालकांड स. ११ श्लो. १०० )

अशी खरोखर या ग्रंथाची योग्यता आहे. पण ती भाविकपणें केलेल्या ग्रंथश्रवणापासून नाहीं. राम अवतार मानला गेल्यामुळें या भाविकपणास ऊत आला व विचारशक्ति कुंठित झाली. विचारपूर्वक या ग्रंथाचें अध्ययन केल्यास बुद्धीचें क्षेत्र वाढेल. पण विचारशक्ति कुंठित झाल्यानें राम व त्याचे साह्यकारी सेवक यांची प्रत्येक कृति वंदनीय ठरली, व त्यामुळें बुद्धीला शिक्षण घेण्यास वावच उरला नाहीं. राम हा इतर माणसांसारखाच एक माणूस होता. तो शूर, वीर, शहाणा, सत्यनिष्ठ असा होता. पण तो स्वार्थीहि होता. सीतेला त्यानें योग्य प्रकारें वागविलें नाहीं, वालिवध

अन्यायानें केला, वगैरे गोष्टींकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं.

रामायणास, इतिहआस, या अर्थानें इतिहास म्हणतात. या शब्दाचा अर्थ–गोष्टी, उपदेश इत्यादिकांनीं युक्त जुना वृत्तांत असा ओकांनीं केला आहे. यांतील उपदेश करतांना सांगितलेल्या पुष्कळशा गोष्टी कल्पित असावयाच्याच. वृत्तांतांतहि पुष्कळसा भाग कल्पित असतो. रामायणाचीच गोष्ट घेऊं. रावणानें हरण केलेली सीता रावणास मारून परत आणणें हा या रामायण कथेचा मुख्य भाग. या कामीं किष्किंधेच्या वानरराजाचें व वानरसैन्याचें साह्य फारच मोठ्या महत्त्वाचें. हे वानर फार सामर्थ्यवान व मोठे पराक्रमी असें वर्णन केलें आहे. इतकेंच नव्हे तर ते व लंकेंतील सर्व राक्षस हे कामरूपी होते म्हणजे त्यांस इच्छेस येईल तें रूप घेतां येत असे, असें त्यांचें वर्णन केलेलें आहे. एखादी व्यक्ति योगाभ्यासानें अणिमादिक सिद्धि संपादन करूं शकेल असें कबूल करूं. पण तीहि व्यक्ति विरक्त असावी लागते. सबंध राष्ट्रच्या राष्ट्र व तेंहि शेपटीवाल्या कपींचें. हे कपी जन्मापासून कामरूपी. तसेंच अनेक प्रकारचीं निर्दय कृत्यें करणाऱ्या व नरमांस भक्षिणाऱ्या राक्षसांचें सबंध राष्ट्र कामरूपी, हेंहि विश्वास ठेवण्यासारखें नाहीं. बरें कपी कामरूपी नव्हते, साधीं माणसें होतीं असें म्हटल्यास मग त्यांचें पृथ्वीपर्यटण, लंकेचा शोध व अखेरची लढाई यांत बरेच टक्के बाद करावे लागतील. यावरून या काव्यांतील पुष्कळच गोष्टी घडलेल्या नसून काल्पनिक आहेत असें म्हणणें भाग पडतें.

तसेंच युद्धाच्या शेवटीं महादेव व इतर देव येणें, दशरथाची भेट व सर्व मेलेले वानर जिवंत करणें, वगैरे कथा अगदींच काल्पनिक आहेत. त्यावर विश्वास ठेवणें मला तरी शक्य वाटत नाहीं.

हा उत्तराचा भाग मूळच्या अपेक्षेपेक्षां फारच वाढला आहे. तेव्हां आतां लेखणी आटपती घेणें बरें. माझा मूळचा लेख जेमतेम दोन पानें होता. त्यावर एकट्या श्री. सरवटे यांची टीका साडेचार पानांची आहे. दुसऱ्या दोन टीका सवापांच पानें आहेत. याला उत्तरहि तसेंच विस्तृत द्यावें लागलें. सर्व उत्तर एकदमच प्रसिद्ध न करतां आल्यानें अभ्यास करून जास्त पुरावे देण्यास सवड मिळाल्यानें उत्तर जास्तच वाढलें आहे. मजवर केलेले आरोप भयंकरच होते.

" फोडिलें भांडार धन्याचा हा माल। मी तंव हमाल भार वाही॥ " असें श्री तुकाराम म्हणतात. याहून मी तरी जास्त काय सांगणार? श्री वाल्मीकीचा माल रामायणरूप भांडारांत सांठविला आहे. तें भांडार फोडून मी हमाल होऊन तो बोजा वाहून ज्ञानमंदिराच्या वाचकांपुढें मांडला आहे. यांत जें कांहीं आहे तें आद्यकवि वाल्मीकीचें आहे. मांडण्यांत जे दोष झाले असतील त्याची जबाबदारी माझे शिरावर आहे. मी तरी 'अपूर्व' शोध लावले नाहींत; वाल्मीकीनें सांगितलेलेंच पुढें केलें आहे. माझ्या विधानास मी रामायणांतून भरपूर 'आधार' दिले आहेत. यामुळें माझीं अनुमानें 'सदोष' नाहींत असें मी नम्रपणें म्हणतों. उत्तरांत दिलेल्या दृष्टांतासारखे दाखले श्री. सरवटे यांस 'भ्रामक' वाटल्यास मुख्य विषयाचे मानानें ते दाखले अगदींच गौण असल्यानें ते बाजूस ठेवल्यास माझी कांहीं हरकत नाहीं. 'ठोकून देतो ऐसाजे' रीतीनें लिहितात, " सुग्रीवाचें वर्तन निंद्य दिसण्यासाठीं त्याच्या पदरीं राज्याचा लोभ बांधणें व उलटपक्षीं वालीचें वर्तन निर्दोष, निदान क्षम्य दिसावें म्हणून त्या कालांत, 'भावाच्या बायकोवर एक प्रकारें हक्कच चालत होता' हें अवास्तव विधान करणें, अवश्य होतें म्हणूनच तें मुळांत आधार नसतां केलें आहे' असा श्री. सरवटे यांचा मजवर आरोप आहे. मी सत्यशोधक आहे. रामायणांतील कोणतीहि लहानमोठी व्यक्ति माझा शत्रु किंवा मित्र नाहीं. मला जें दिसलें तें मीं पुढें ठेविलें आहे. सुग्रीवाला राज्यलोभ होता हें पुराव्यानेंच सिद्ध आहे. भावाच्या बायकोवर हक्क चालत होता, याला महाभारताचा आधार देऊन शाबीद केलें आहे. मुळांत म्हणजे रामायणांतलाच आधार पाहिजे असा आग्रह असल्यास तसाहि देतां येईल. इतकेंच विस्तारभयास्तव आज पुरे.

श्री. सरवटे यांनीं पांडवांचा पक्ष घेऊन मजवर झोड उडविली आहे. त्याला मी उत्तर देत नाहीं कारण त्यामुळें महाभारताचें मंथन करावें लागेल. माझा मुख्य मुद्दा सुग्रीव–बिभीषण या उभयतांनींहि राज्यलोभानें बंधुद्रोह व देशद्रोह केला, परक्याकडून आपल्या भावांस मारण्याच्या कामीं साह्य घेतलें व स्वतः त्याच्या उपकारांत व आज्ञेंत राहिले. आपल्या स्वतःच्या राज्याभिलाषाच्या पूर्ततेसाठीं आपल्या प्रजेचा फार मोठा संहार

होऊं दिला, हा आहे. तो रामायणांतील पुराव्यानें सिद्ध झाला आहे असा मला भरंवसा आहे. पांडवांनीं तसें केलें कीं नाहीं हा स्वतंत्र विषय आहे. त्याची चर्चा येथें नको.

" देशद्रोहाची निंदा करण्यासाठीं रामायणांतून नसतीं उदाहरणें धुंडून काढण्याच्या व त्याबरोबर **निराधार** दोषारोपांचीं विधानें करण्याच्या खटाटोपांत पडण्याचें त्यांना कारण नव्हतें." असें श्री. सरवटे लिहितात. मीं **असलीं** उदाहरणें दिलीं आहेत व **साधार** दोषारोप केला आहे.

रा. केळकर यांच्या टीकेस उत्तरें वर येऊन गेलींच आहेत. बिभीषण हा आर्य व अनार्य यांची मिश्रसंतति होती असें ते म्हणतात. राक्षस हे अनार्य होते असें उ. कांड सर्ग २–४ वरून दिसत नाहीं. यक्ष व राक्षस हे प्रथम भाऊ भाऊ होते. रावणाचा थोरला भाऊ कुबेर हा यक्षांचा राजा होता. शिवाय–

विद्याधराप्सरोयक्षरक्षोगंधर्वकिन्नराः ।
पिशाचो गुह्यकः सिद्धो भूतोऽमी देवयोनयः ॥

या आधारें राक्षस हे देवयोनी असल्यानें त्यांना अनार्य म्हणतां येणार नाहीं. तेव्हां आर्यांचे गुण व अनार्यांचे गुण वगैरे चिकित्सा उपयोगी नाहीं. बिभीषणांत आर्यांचे सात्विक गुण उतरले होते असें ते म्हणतात. बिभीषण हा मोठा कावेबाज, निष्ठुर, लबाड, लोभी वगैरे गुणांनीं पूर्ण होता. यांनाच आर्यांचे सात्विक गुण म्हणावयाचे असल्यास तसें म्हणावें.

विद्वद्वर्य नानासाहेब वैद्य यांचा भारतीय वीरकथा हा ग्रंथ अलीकडेच माझे पहाण्यांत आला. भारतीय वीर भीष्म यांच्यावरच्या आक्षेपाचा विचार करतांना त्यांनीं तुलनेसाठीं बिभीषणाच्याहि वर्तनाचा विचार केला आहे. ( पहा भारतीय वीरकथा पृष्ठ १९१ ) " भीष्म नोकर किंवा मंत्री खरे आणि ते हस्तिनापुरीं राहिले हेंहि योग्य, पण उत्पन्न झालेल्या परिस्थितींत सन्मंत्र्याचें कर्तव्य काय, हा प्रश्न येथें उद्भवतो, आणि तो प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे. कारण त्यांतच राष्ट्रभक्तीचें एक अत्युदात्त तत्त्व भरलें आहे. अन्याय मार्गानें चालणाऱ्या राजास पदच्युत करावें किंवा

ठार मारावें, हा श्रीकृष्णानें एक नवा मार्ग राजनीतींत सुचविला आहे; किंबहुना प्रत्यक्ष कंसवध करून आचरिला आहे. तसें करावें किंवा 'राजा परं दैवतमित्युवाच' या व्यासोक्तीप्रमाणें, राजास परम दैवत मानून, तो जी ठरवील ती पूर्वदिशा धरून, राजनिष्ठपणें भीष्म वागले तसें वागावें हा प्रश्न येथें आहे. तिसरा मार्ग म्हणजे शत्रूस जाऊन मिळावें. हा भीष्म व कृष्ण या दोहोंच्याहि मतानें त्याज्य व दुष्ट ठरतो. अर्थात् बिभीषणानें जें आचरण केलें, तें त्यांस कितीहि भगवद्भक्त म्हटलें तरी, राजनीतिदृष्ट्या सर्वथैव निंद्य होय, यांत शंकाच नाहीं. असे बिभीषण हिंदुस्थानच्या पुढील इतिहासांत अनेक निघून, त्यांनीं या भरतखंडाचें अत्यंत नुकसान केलें आहे, हें सांगावयास नको. अन्यायी राजाशींहि राजनिष्ठ राहून मानानें सेवा करणें हेंच जास्त कठीण व श्रेयस्कर, असें म्हटलें पाहिजे." (पृष्ठ २४४). "आपला राजा जर अन्यायानें परराष्ट्राशीं युद्ध करील तर सरदार, मंत्री, नोकर, या नात्यानें आपलें कर्तव्य आपल्याच राजाच्या वतीनें लढण्याचें आहे, यांतच खरी स्वामिभक्ति आहे. किंबहुना राजनिष्ठाहि यांतच आहे आणि निमकहलालीहि यांतच आहे. 'अर्थस्य पुरुषो दासः' ही क्षुद्रबुद्धि नव्हे. ज्याचें आपण अन्न खाल्लें आणि ज्यापासून आपण संपत्ति मिळविली त्याची सेवा आपण योग्य प्रसंगीं केली नाहीं आणि ऋण फेडलें नाहीं, तर हा कृतघ्नपणा होईल. ही निमकहरामी होईल. शिवाय अशी कुचराई प्रसंगीं केल्यानें आणि अंग बाजूस काढल्यानें हल्लींच्या दृष्टीनें बोलतां आपल्या राष्ट्राचेंहि नुकसान होईल, ही गोष्टच विस्तारानें सांगणें जरूर नाहीं." श्रीयुत नानासाहेबांनीं हें आपलें मत दहा वर्षांमागें प्रसिद्ध केलें आहे. नानासाहेब वैद्य हे सर्वमान्य भारताचार्य. त्यांच्यावर टीका करण्याची हिंमत कोणास झाल्याचें ऐकिलें नाहीं. माझ्यासारख्या गरीबावर अकरांजणांनी लेखणी चालविली. हा माझा त्यांनीं गौरव केला आहे म्हणून मी त्यांचे उपकार मानतों.

श्री. धारवाडकर यांच्या टीकेंतील मुद्यांच्या गोष्टींसंबंधानें उत्तरें वर येऊन गेलींच आहेत. त्यांच्या बाकीच्या टीकेस व विधानांस आणि शिव्यांस उत्तरें देण्याची योग्यता माझे अंगीं नाहीं. "जाधवप्रिय

कुंभकर्ण " भावाच्या दुष्कृत्याला दुष्कृत्य ठरवून पण बंधुप्रेमानें लढून रणांत मृत्यु पावला व त्यानें आपलें कर्तव्य बजावलें. मरणांतानि वैराणि हा रामाचा उपदेश श्री. धारवाडकरांस पटलेला दिसत नाहीं. 'कुंभकर्णप्रिय जाधव' हा सत्यशोधक आहे. कोणाची भीडमुर्वत न ठेवतां व "सत्य-असत्यासी मन केलें ग्वाही, मानीयलें नाहीं बहुमतां" या श्री तुकोबारायांच्या तत्त्वांप्रमाणें वागून सत्याचा शोध करीत अखेरपर्यंत तो झटेल. या कामीं श्री वाल्मीकि त्याचा पाठीराखा आहे.

या तीनहि टीकाकारांचा मी फारफार ऋणी आहें. रामायणाचें माझें वाचन प्रथम फारसें खोल नव्हतें; अगदींच उथळ होतें. टीकाकारांस उत्तरें देण्याकरितां रामायणाचा बराच अभ्यास करावा लागला. त्यांतलीं कांहीं रत्नें, मोतीं या उत्तरांत दिलीं आहेत. आणखीहि मौल्यवान रत्नें मिळालीं आहेत. यथावकाश तींहि प्रसिद्धीला येतील. पण या सर्वांचें श्रेय टीकाकारांसच दिलें पाहिजे. त्यांनीं आपला सात्त्विक संताप टीकारूपानें व्यक्त केला नसता तर वाल्मीकीच्या काव्याची खरी योग्यता व रामायणाचा खरा आस्वाद मला मिळाला नसता. म्हणून मी त्यांस धन्यवाद देतों.

—ज्ञानमंदिर १५-५-३५
१-६-३५

# रामायणाचा वाद

ज्ञानमंदिरच्या जुलैच्या अंकांत रा. रा. रा. ना. पुसाळकर, कोल्हापूर, यांचा "रामायण असें वाचावें काय ?" या मथळ्याचा लेख प्रसिद्ध झाला आहे. जानेवारीच्या अंकांत "रामायणापासून हिंदुस्थाननें गिरविलेला धडा" या मथळ्याचा माझा लेख प्रसिद्ध झाला होता. त्यावर तीन टीका प्रसिद्ध झाल्या व त्यावर माझें उत्तर जूनच्या अंकांत पूर्ण झालें. यांस उद्देशूनच रा. रा. पुसाळकर यांचा लेख असल्यानें माझे विचार मी थोडक्यांत देत आहें.

रा. रा. पुसाळकर यांच्या मतें "रामायण महाभारतासारख्या काव्यांचा उपयोग इतिहास म्हणून जर करणें असेल तर तो उपयोग फारच मर्यादितपणें करणें युक्त ठरेल." हें मलाहि मान्य आहे. "रामायणकालीं भावाची बायको दुसऱ्या भावानें घेणें, ही गोष्ट विद्यमान कालमानपरिस्थितीशीं सर्वस्वीं विरुद्ध आहे. अशा बाबतींत हा मुद्दा शाबीत करण्याचा अट्टाहास कां ?" असा त्यांनीं प्रश्न केला आहे. सुग्रीवाची बायको वालीनें बळकावून त्याला हाकून दिल्यानें तो वध्य झाला, म्हणून वालीवधाचें रामाचें कृत्य न्याय्य होतें, असा टीकाकारांचा आशय होता. त्याला उत्तर देतांना त्या काळचा आचार काय होता हें दाखवून वालीचें वर्तन वध करण्यासारखें नव्हतें, असें दाखविण्यासाठीं पुसाळकरांनीं आक्षेप घेतलेला मुद्दा शाबीत करणें जरूर पडलें.

जुन्या ग्रंथाचा अभ्यास समाजसुधारणेच्या दृष्टीनेंहि इष्ट असतो. आज विवाहाचे कामीं सगोत्राची अडचण बरेच ठिकाणीं येते. ती दूर करण्याकरितां शास्त्राला संमत नसलेली मुलगी परगोत्रांत दत्तक देण्याचा विधि करून समारंभ उरकला जातो. सगोत्र विवाह निषेध हा अलिकडचे अंमलांत आहे. पूर्वीं असे विवाह बहिणभावापर्यंत होत असत. ही गोष्ट पटली म्हणजे सगोत्राचा प्रतिबंध झुगारून देण्यास हिंमत येईल. हा एक उद्देश कौसल्या ही दशरथाची बहीण होती या प्रतिपादनांत आहे.

श्रीजोतिबाच्या डोंगरावर चैत्र शु॥१५ स श्रीजोतिबा व त्याची बहिण यमाई यांचा विवाह दरसाल लागतो, ही गोष्ट रा० पुसाळकर यांस माहीत असेलच. तो पूर्वींचा आचार आहे. हें प्रसिद्ध होणें नुकसानीचें नाहीं.

" येशू ख्रिस्ताचें अमकें चुकलें अथवा मोझेस अधिक शहाणा असता तर फार बरें झालें असतें, अशी चर्चा केव्हांच होत नाहीं " असें श्री. पुसाळकर प्रतिपादितात. माझेंहि मत तसेंच आहे, व रामायणाच्या चर्चेंत मीं असेंच वर्तन ठेविलें आहे.

रामायण, महाभारत हे ग्रंथ जुने असले तरी त्यांत घुसडाघुसड पुष्कळच झाली आहे; आणि अनेक मतवाद्यांनीं आपआपल्या मतांच्या पुष्टीसाठीं त्यांत आपल्यास अनुकूल अशा गोष्टी दडपून दिल्या आहेत. रामास देवपण देऊन त्याला ब्राह्मणांचा आज्ञाधारक बनवून समाजांत ब्राह्मणांचें महत्त्व वाजवीपेक्षां फाजील वाढविलें आहे. त्याची चर्चा न केल्यास समाजांत धर्मभोळेपणा जो बोकाळला आहे त्याला चिरस्थायी करावयाचें कीं काय ! तो जर कमी करावयाचा असेल तर प्रचलित समजुतीस धक्का देणें क्रमप्राप्तच आहे. पुरातन थोर पुरुषांस कोणाचा तरी अवतार बनवल्याशिवाय आमच्या पुराणकारांस व इतिहास-कारांस आपले ग्रंथच लिहितां आले नाहींत. तेव्हां त्या त्या पुरुषांची खरी योग्यता चिकित्सकांनीं समाजापुढें मांडणें इष्टच आहे. या योगानें त्या त्या पुरुषावर आरोपिलेलें अवतारत्व गेलें तर तें फायद्याचेंच होईल. श्रीशिवाजी महाराज छत्रपति यांस शिवाचा अवतार कल्पून लिहिलेली पोथी आम्हीं पाहिली आहे. या अवतारकल्पनेनें श्रीशिवाजी महाराजांची योग्यता न वाढतां उलट कमीच होते. यासाठीं या अवतारकल्पनेवर हल्ला चढविणें योग्यच होईल.

श्रीशिवाजीमहाराजांच्या भगव्या निशाणाच्या वादांत रा. रा. पुसाळकर कां शिरलें कळत नाहीं. श्री रामदासाच्या शिकवणीनें त्यांनीं भगवें निशाण घेतलें असें वारंवार प्रतिपादण्यांत येतें, त्याच्या खंडनासाठीं या निशाणाच्या रंगाच्या वादांत पडावें लागतें. रा. रा. पुसाळकर पाहतात त्या दृष्टीनें सर्वच पाहतील तर बरें.

" रामानें वालीला मारण्यांत काय हेतु असावा, सुग्रीवानें भावाशीं कपट केलें, रावणानें केलें तें चूक नव्हतें, पण बिभीषणाचें वर्तन गर्हणीय झालें, इत्यादि सिद्धांत आज प्रतिपादन करून आपण काय मिळवूं ? " असा रा. पुसाळकर सवाल टाकतात. आम्हांस धर्माचें ज्ञान पाहिजे, म्हणून आमच्या राष्ट्रीय संपत्तीचा अभ्यास केला पाहिजे, असें प्रतिपादन करणारानें तो अभ्यास चिकित्सक बुद्धीचा असूं नये, हें म्हणणें थोडें विसंगत होईल. ग्रंथ वाचावयाचा तर त्यांत चिकित्सक बुद्धि असणेंच इष्ट. नाहींतर सात दिवसांत भागवताचें पारायण ऐकणारास जसा काल्पनिक फायदा, तसाच प्रकार येथें होणार.

" रामायण महाभारतासारख्या ग्रंथावर सध्याच्या लेखाप्रमाणें पूर्वपक्ष, उत्तरपक्ष करीत बसून विचारांचा प्रसार केल्यास, कालवशात् या अशा वादानें समाजाची मानसिक बैठकच उखडून टाकली जाईल. अशा प्रसंगीं समाजापुढें अधिक चांगला आदर्श ठेवण्यासारखा आपल्याजवळ असावयास हवा, याचा विचार व्हावयास नको काय ? आपल्या समाजांतील यच्चयावत् व्यक्तींत बीजरूपानें कां होईना— या ग्रंथांतील शिकवणूक रुजली आहे. त्या ज्ञानाचा नायनाट झाल्यास प्रसंग बिकट येणार खास. " हे विचार रा. रा. पुसाळकरांनीं मांडले आहेत व ते पुष्कळांस पसंत पडतील यांत शंका नाहीं.

आजच्या बहुजनसमाजाच्या समजुतीमुळें ज्यांचा फायदा आहे, त्यांना ही स्थिति पालटूं नये असें वाटणें साहजिक आहे. पण खालीं दडपले गेलेल्या वर्गाच्या दृष्टीनें ही समजूत पालटणें अगदीं अवश्य आहे. भगवान् बुद्धाच्या पूर्वी यज्ञयागाचें फार मोठें प्रस्थ होतें; वेदावर लोकांची फारच श्रद्धा होती; पण त्यामुळें बहुजनसमाज अज्ञानांत, व थोडे वेद जाणणारे व यज्ञ करणारे सुखांत अशी स्थिति होती. भगवान बुद्धांनीं यज्ञकांडावर व वेदावर हल्ला चढविला. त्यावेळच्या पुसाळकरांनीं समाजावर, ' बिकट प्रसंग येणार ' अशी ओरड केली असणारच. नवीन विचारांनीं समाज अधोगतीला जाईल ही भीति व्यर्थ आहे. समाज स्थिर राहणार. पुढील साधुसंत, समाजसुधारक यांनींहि धर्मभोळेपणावर झोड उडविलीच आहे.

रा. रा. पुसाळकर यांचा सर्वच लेख शांतपणें लिहिलेला व पक्षाभिमानापासून मुक्त आहे. त्यांत तत्त्वशोधनाची तीव्र इच्छा आहे. रा. पुसाळकर शांतताप्रिय व समतोल मनानें लिहिणारे आहेत. अशांनीं केलेल्या वादापासून तत्त्वबोध होईल. त्यांचे विचार माझ्या विचारांशीं पुष्कळ जुळतात, पण विचारांची खळबळ समाजसुधारणेस अवश्य आहे, असें मला वाटतें.

— ज्ञानमंदिर १ ऑगष्ट १९३५

# इतिहासदृष्टीनें रामायण काव्याची योग्यता

## इतिहास कोणता ?

संस्कृत वाङ्मयांत रामायण व महाभारत हे मोठे काव्यग्रंथ आहेत; त्यांस इतिहास असेंहि म्हणतात. संस्कृत भाषेंत इतिहास या शब्दाची इति + ह + आस अशीं पदें पडतात. त्यावरून कोणत्याहि खऱ्या, खोट्या, काल्पनिक गोष्टीस इतिहास म्हटलें जातें. आजच्या मराठी भाषेंतील इतिहास शब्दाची व्याख्या निराळी आहे. हकीकत जशी घडली तशी ज्या ग्रंथांत लिहिली असेल त्यासच सांप्रत इतिहास ग्रंथ म्हणतात. पूर्वींच्या म्हणजे उपनिषत्कालीं इतिहास शब्दाचा प्रयोग छांदोग्य व बृहदारण्य या दोन उपनिषदांत आढळतो. बृहदारण्यांत महाभूताच्या निश्वसितापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानाच्या यादींत इतिहास सांगितला आहे. पण तो ब्राह्मणांतर्गतच घेतला पाहिजे असें शांकरभाष्यांत सांगितलें आहे; कारण त्यास निश्वसित म्हटलें आहे. येथें महाभारत व रामायण हे इतिहास या सदराखालीं येत नाहींत. छांदोग्याच्या सातव्या अध्यायांत नारद-सनत्कुमार संवादांत हा शब्द तीन वेळ एकाच अर्थी आला आहे. आपण काय शिकलों याची यादी देतांना "इतिहासपुराणं पंचमं", "इतिहासपुराणः पंचमः" असे प्रयोग आढळतात. भाष्यकारांनीं "वेदानां भारतपंचमानाम्" असें भाष्य केलें आहे. त्यावरून भारतग्रंथाला इतिहास म्हणणें श्रीशंकराचार्यांस कबूल असावें. पण ते रामायणास इतिहास म्हणत नाहींत. तसेंच रामायण पढण्याचें महत्त्व नारदाच्या दृष्टीनेंहि नव्हतें, असें दिसून येतें.

छांदोग्याच्या कालीं व पुढेंहि श्रीशंकराचार्यांच्या वेळीं भारत हा इतिहास आहे असें मान्य होतें. महाभारतास तो शब्द लावीत नसत. कसेंहि असलें तरी रामायणास इतिहास म्हणण्याचा संप्रदाय पूर्वी नव्हता. अलिकडेच म्हणूं लागले असावे.

## कथा कोणीं चोरली ?

'महाराष्ट्र-शारदे'च्या फेब्रुवारी, मार्च व मे महिन्यांच्या अंकांत मल्लादि वेंकटरत्नम् या विद्वानाच्या ग्रंथाराधारानें वाल्मीकीचें वाङ्मयचौर्य व रामायणाचें मूळ इजिप्तमध्यें या मथळ्याचे लेख प्रसिद्ध झाले. त्यावरून जिज्ञासा उत्पन्न होऊन वेंकटरत्नम् यांच्या ग्रंथाचे दोन्ही भाग वाचून पाहिले. त्यांतील सर्वच सिद्धांत सर्वमान्य होण्यासारखे नाहींत. तथापि रामायणकथेचा विचार करणें जरूर आहे इतकें तरी कोणासहि पटण्यासारखें आहे.

मल्लादि वेंकटरत्नम् यांचें म्हणणें इजिप्तच्या राजवंशापैकीं एका वंशाचा रामेसु ( रामेसिस ) हा मोठा पराक्रमी राजा होता. त्याची कथा ऐकून कोणी कवीनें त्या कथेवर आपल्या कल्पनेच्या जोरानें रामायण हें काव्य लिहिलें.

परभाषेंतील पुस्तकाचें भाषांतर करण्याची प्रथा पूर्वींपासून आहे. पैशाची भाषेंतील बृहत्कथेचें संस्कृतीकरण केल्याचें प्रसिद्धच आहे. परकीकथा व वंशावळी भाषांतरित करून आपल्या ग्रंथांत दडपून देण्याचा संप्रदाय भविष्यपुराणांत ढळढळीत दिसतो. जुन्या करारांतील राजांच्या वंशावळी जशाच्या तशा त्या पुराणांत उतरून घेतलेल्या आढळतात. कोणी कोणापासून चोरल्या हा संशयहि उरत नाहीं. कारण त्या वंशावळींतील नांवें इकडे अपरिचित आहेत. कशाचें भाषांतर केलें हें स्पष्ट सांगण्याचा प्रामाणिकपणा व थोरपणा फारसे कोणी दाखवीत नाहींत. जो तो सर्व श्रेय आपणाकडेच घ्यायचा प्रयत्न करतो. रामायणांतील कथेचें मिसरी मूळ झांकून व तिकडील कांहीं नांवांस संस्कृतरूप देऊन व कांहींचीं पूर्णपणें बदलून हा ग्रंथ तयार झाला असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे.

आजच्या कालींहि परदेशी किंवा परप्रांतींच्या गोष्टींना मराठी पेहराव देऊन आपल्या स्वतंत्र कल्पनेच्या म्हणून दडपून देण्याचीं उदाहरणें पुष्कळच आहेत. हा संप्रदाय अलीकडच्या या कलियुगांतच सुरू झाला किंवा त्रेतायुगांत रामकालींहि तो जारी होता हा मुद्दा मल्लादि वेंकटरत्नम् यांनीं सर्वांपुढें मांडला आहे. इजिप्तची कथा आमच्या वाल्मीकीनें

संस्कृतांत भाषांतरिली कां आमची संस्कृतांतील कथा इजिप्तांत दगडावर खोदली गेली हाहि विचार करण्यासारखाच प्रश्न आहे. याचा विचार समतोल बुद्धीनें केला पाहिजे. यांत पक्षाभिमान किंवा देशाभिमान किंवा धर्माभिमान यांस वाव न देतां केवळ सत्य काय आहे याचा शोध करणें योग्य होईल.

मल्लादि वेंकटरत्नम् यांच्या म्हणण्याप्रमाणें राम तर आमचा नव्हेच; तसेंच रामायणांतील इतर पात्रें रावण व त्याचें घराणें, वाली व सुग्रीव हींहि परदेशीय; इतकेंच नव्हे तर वाल्मीकीहि तिकडचाच. अगस्त्य हा रोमन बादशहा आगस्टस, लोपामुद्रा ही त्याची पत्नी लिविया अशाप्रकारें त्यांच्या शोधांत पुष्कळच अतिशयोक्ति झालेली आहे. यासाठीं त्याची छाननी करणें अवश्य आहे.

## आद्य काव्याची छाननी

रामायणाची अशी छाननी करण्यानें त्या ग्रंथाविषयीं व त्यांत वर्णिलेल्या व्यक्तींविषयीं अश्रद्धा उत्पन्न होण्याचा संभव असल्यानें हें काम करूंच नये, असें म्हणणारे कोणी "न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।" हें गीतावचन आमच्या अंगावर टाकतील. कोणी, "रामायण असें वाचावें काय!" असा बुद्धिवाद करून चिकित्सक प्रयत्न करूंच नये असें प्रतिपादितील. आमच्या दृष्टीनें आमचा मार्ग स्पष्ट आहे. जें सत्य असें दिसेल तें लोकांपुढें मांडावयाचें. घेणारे घेतील. असत्याला चिकटून राहणारांनीं खुशाल डोळे मिटून व कानांत दडे घालून आपला मार्ग क्रमावा. विचाराचें प्राबल्य केव्हां तरी होणारच.

रामायण हें आद्य काव्य व वाल्मीकि हा आदिकवि असें मानलें जातें. या काव्याचा आरंभ अगदीं साधेपणानें झाला आहे. याला मंगलाचरण नाहीं. वाल्मीकीला काव्य करण्याची कल्पना कशी सुचली हेंच प्रथम सांगितलें आहे. त्यांतील पहिलाच श्लोक पहाः—

तपःस्वाध्यायनिरतं तपस्वी वाग्विदांवरम् ।
नारदं परिपप्रच्छ वाल्मीकिर्मुनिपुंगवम् ॥

बालकांड सर्ग, श्लोक १

अर्थः–वेदाध्ययनरूप तपश्चर्येचे ठिकाणीं तत्पर अशा वाल्मीकि मुनींनीं शब्दब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ, आणि मुनींमध्यें वरिष्ठ अशा नारदांना प्रश्न केला.

सदरचा प्रश्न २ ते ५ श्लोकांपर्यंत आहे. वाल्मीकि विचारतातः–

" वर्तमानकाळीं या भूलोकावर बहुगुणसंपन्न असा कोण आहे ? अर्थात् वीर्यवान, धर्मरहस्यवेत्ता, कृतज्ञ, सत्यवचनी, धर्माकरितां स्वीकारलेल्या व्रताचा आपत्कालींहि त्याग न करणारा, सदाचारसंपन्न, प्राणिमात्रांच्या हिताविषयीं तत्पर, समर्थ, दर्शन झालें असतां लोकांना अत्यंत आनंद देणारा, मनोनिग्रही, क्रोधादिकांचें संयमन करणारा, तेजस्वी, परोत्कर्षाविषयीं मत्सर न धरणारा आणि युद्धकालीं क्रुद्ध झाला असतां देवांनाहि भीति उत्पन्न करणारा असा कोण आहे हें श्रवण करण्याची माझी इच्छा आहे; इतकेंच नव्हे परंतु, तें श्रवण करण्याविषयीं मला पराकाष्ठेची उत्सुकता आहे. आणि हे महर्षे, आपणहि अशा प्रकारचा पुरुष कोण आहे हें जाणण्यास समर्थ आहांत." हा प्रश्न ऐकून तीन्ही लोकांतील वृत्तान्त जाणणारे नारदमुनि आनंदित झाले व ऐकावें असें वाल्मीकीस म्हणाले. " आपण विचारलेले गुण बहुत असून दुर्लभच आहेत; तथापि हे मुने, त्या गुणांनीं संपन्न कोण आहे याचें स्मरण करून मी आपणांला कथन करतों, आपण त्या त्या गुणांनीं युक्त पुरुष कोण तो श्रवण करा." असें ७ व्या श्लोकांत सांगून ८ ते १९ अशा १२ श्लोकांनीं नारदांनीं रामाचें वर्णन केलें. पुढें २०–८९ श्लोकपर्यंत ७० श्लोकांनीं रामाचें चरित्र वर्णिलें आहे. येथपर्यंतचीं क्रियापदें भूतकालीं आहेत. पुढील ९०–९७ पर्यंत आठ श्लोक रामराज्याच्या वर्णनपर असून त्यांतील क्रियापदें भविष्यकाळीं आहेत. पुढील तीन श्लोक रामायणपठणाच्या फलश्रुतीचे आहेत. पहिल्या सर्गांत इतका विषय आला आहे.

यावरून पुढील अनुमानें निघतातः–

१ राम, वाल्मीकि व नारद हे समकालीन होते.

२ नारदाला रामचरित्राची चांगलीच माहिती होती.

३ वाल्मीकीला रामाची कांहींच माहिती नव्हती. राम आर्यावर्तांतील राजा असता तर त्याची माहिती त्यास असावयास पाहिजे होती.

४ नारद तीन्ही लोकांत फिरणारा म्हणून त्यास माहिती झाली.

परदेशांत प्रवास करून आलेल्या बहुश्रुताजवळ वाल्मीकीनें चौकशी केली; अशी चौकशी करणें साहजिक आहे.

यावरून राम वाल्मीकि समकालीन असले तरी ते भिन्न देशांतील होते. रामायण काव्याचा कर्ता एतद्देशीय होता यांत संशय नाहीं. त्यावरून राम हा दूरवरच्या देशांतील पुरुष असला पाहिजे असें अनुमान होतें.

आतां नारदानें सांगितलेल्या रामचरित्राचा विचार करूं.

## रामचंद्राला चिकटाविलेले गुण

वाल्मीकीला रामाची कांहीं माहिती नव्हती ती त्यास नारदानें दिली. यावरून राम हा परदेशांतील असावा व नारद हा तिकडून आला होता म्हणून ती त्याला सांगतां आली असें अनुमान काढलें आहे. आतां नारदानें रामाविषयीं काय सांगितलें तें पाहूं. कारण या माहितीचाच विस्तार पुढील ग्रंथांत केलेला आहे.

८ वे श्लोकापासून १८ ।। श्लोकांपर्यंत फक्त रामाच्या गुणाचें, शरीराचें वगैरे वर्णन आहे. यांत त्याला नियतात्मा म्हटलें आहे. म्हणजे तो मनोनिग्रही होता. पण रामाच्या एकपत्नीत्वाचा उल्लेख यांत मुळींच नाहीं. दशरथाला साडेतीनशें बायका होत्या; त्यांत तीन प्रमुख होत्या. भरत लक्ष्मणालाहि अनेक भार्या होत्या. अशा या काळीं रामास बहुपत्नी असणें स्वाभाविक होतें. तसें नसून त्यास एकच पत्नी असती तर ती गोष्ट अजब म्हणून नारदानें स्पष्टपणें सांगणें योग्य झालें असतें.

कैकेयीला पूर्वी वर दिले होते त्याप्रमाणें रामाचा वनवास व भरताला राज्य हें तिनें मागितलें. सत्यवचनी दशरथानें आपल्या प्रियपुत्र रामाला वनामध्यें पाठविलें, कैकेयीचे मनोरथ पूर्ण करण्यासाठीं राम वनामध्यें गेला, त्याचेबरोबर लक्ष्मण स्नेहामुळें गेला. सीताहि रामाबरोबर गेली. येथें सीतेचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे :

> रामस्य दयिता भार्या नित्यं प्राणसमा हिता ।
> जनकस्य कुले जाता देवमायेव निर्मिता ॥

सर्वलक्षणसंपन्ना नारीणामुत्तमावधूः ।
सीताप्यनुगता रामं शशिनं रोहिणी यथा ॥

वा. रा. बा. कांड १।२५।२६।२७।२८

अर्थ:—जनकाच्या कुलामध्यें उत्पन्न झालेली, देवमायेप्रमाणें निर्माण झालेली, सर्व लक्षणांनीं संपन्न असलेली, स्त्रियांमध्यें उत्कृष्ट असलेली आणि रामाला प्राणासमान प्रिय असून त्याचें हित करण्याविषयीं तत्पर असलेली जी रामाची भार्या तीहि चंद्राच्या मागोमाग जाणाऱ्या रोहिणी नक्षत्राप्रमाणें रामाच्याबरोबर गेली.

सीता ही रामाची एकुलती एक पत्नी होती असें सांगितलें नाहीं. इतकेंच नव्हे तर ती फार आवडती होती असें सांगितल्यानें दुसऱ्याहि बायका होत्या असा ध्वनि निघतो. त्यांत सीता ही सर्वांत लाडकी होती. चंद्ररोहिणीचा दृष्टांत रामसीतेला दिला आहे; त्यावरून रामाच्या बहुपत्नी-कत्वाच्या अनुमानाला बळकटी येते. चंद्राला २७ बायका असून रोहिणी ही त्याची सर्वांत आवडती बायको आहे असें वर्णिलें जातें.

### भौगोलिकदृष्ट्या पाहणी

राम अयोध्येहून निघून रथानें शृंगवेरपुरापर्यंत गेला. तेथून त्यानें रथ परत पाठविला व गुह नामक निषादांच्या पतीच्या साह्यानें गंगा नदी त्यांनीं ओलांडिली. नंतर भरद्वाज मुनीच्या आज्ञेवरून चित्रकूट पर्वतावर पर्णकुटी करून राहिले. इतक्यांत दशरथ राजा पुत्रशोकानें मरण पावला. तेव्हां वसिष्ठ प्रभृति द्विज भरताला राज्याचा स्वीकार करण्याविषयीं सांगूं लागले. भरतानें तें मान्य केलें नाहीं. तो रामास आणण्यास चित्रकूटावर गेला. रामानें परत येण्याचें नाकबूल केलें व भरतास पादुका दिल्या. भरत परत येऊन नंदिग्रामांत राहून राज्य करूं लागला. पुढें राम दंडकारण्यांत जाऊन राहिला. तेथें त्यानें विराध राक्षसाचा वध केला. नंतर शरभंग, सुतीक्ष्ण, दोघे अगस्त्य बंधू यांची भेट घेतली. ऋषींच्या विनंतीवरून राक्षसांचा वध करतों असें वचन रामानें दिलें. पुढें रामानें जनस्थानांत राहणारी शूर्पणखा विरूप केली. तिनें उठविलेले खर, त्रिशिरा व दूषण या राक्षसांचा व आणखी चौदा हजार राक्षसांचा रामानें

वध केला. आपल्या ज्ञातीचा नाश झाल्याचें वृत्त ऐकून रावणाला क्रोध आला. त्यानें मारीच नको नको म्हणत असतां त्याच्या मदतीनें रामलक्ष्मणांस दूर नेववून असहाय्य झालेल्या सीतेला उचलून नेलें. जटायु नामक गृध्राचा वध केला. सीतेविषयीं विलाप करीत फिरत असतां कबंधास रामानें मारून जाळलें. त्यानें धर्मानें वागणाऱ्या आणि धर्मज्ञ अशा शबरी नामक तापसीला भेट असें सांगितलें. तिच्यापासून सत्कार घेतल्यावर हनुमान वानराची भेट पंपा सरोवरावर झाली. हनुमानाच्या मार्फत सुग्रीवाची भेट घेऊन त्याला आपलें दुःख निवेदिलें. सुग्रीवानें अग्निसाक्षिक सख्य रामाबरोबर जोडलें. सुग्रीवानें रामास आपलें दुःख सांगितलें, रामानें वालीवधाची प्रतिज्ञा केली. सुग्रीवानें वालीस आव्हान दिलें. सुग्रीवाचें व वालीचें युद्ध चालू असतां रामानें वालीचा बाणानें वध केला. व सुग्रीवास राज्यावर बसविलें. सुग्रीवानें दशदिशांस वानर पाठवून सीतेचा शोध केला. संपातीच्या सांगण्यावरून शतयोजन विस्तीर्ण अशा समुद्रावरून हनुमान उडी मारून गेला. सीतेचा शोध काढून लंका जाळून रामाला बातमी सांगण्यास हनुमान परत आला. समुद्राच्या सांगण्यावरून रामानें नलाकडून सेतु बांधिला आणि त्या सेतूनें लंकानगरीला जाऊन व त्या ठिकाणीं युद्धामध्यें रावणाचा वध करून रामानें सीता प्राप्त करून घेतली. अग्निदिव्य केल्यावर निष्कलंक अशा सीतेचा रामानें स्वीकार केला. बिभीषणाला लंकाराज्यावर अभिषेक करून पुष्पक विमानांत बसून राम अयोध्येस निघाला. हनुमानास पुढें पाठवून राम नंदिग्रामास जाऊन भरतास भेटला. रामाचा राज्यावर अभिषेक झाला. पुढें रामराज्याचें वर्णन करून रामायणाची फलश्रुतिहि सांगून नारदानें आपलें भाषण संपविलें. या कथेंत सीतेला पुन्हां वनवासास पाठविलेल्याचा उल्लेख नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

### अयोध्येचें वर्णन

नारदानें सांगितलेल्या संक्षिप्त रामायणांत व्यक्तींचीं व स्थळांचीं बरींच नांवें आलीं आहेत. दशरथ, कैकेयी, भरत, गुह, भरद्वाज, वसिष्ठ, विराध, शरभंग, सुतीक्ष्ण, अगस्त्य व त्याचा बंधु, शूर्पणखा, खर, त्रिशिरा, दूषण, रावण, मारिच, जटायु, कबंध, शबरी, हनुमान, सुग्रीव, वाली,

संपाति, नल, बिभीषण इत्यादि नांवें व्यक्तींचीं आहेत. तशींच अयोध्या, शृंगवेरपुर, चित्रकूट, नंदिग्राम, दंडका, जनस्थान, पंपा, किष्किंधा, लंका, वगैरे स्थलांचींहि नांवें आलीं आहेत. रामायणांत दिलेलें अयोध्येचेंच वर्णन पाहूं. रामायण बालकांड सर्ग ५.

कोशलो नाम मुदितः स्फीतो जनपदो महान् ।
निविष्टः सरयूतीरे प्रभूतधनधान्यवान् ॥ ५ ॥
अयोध्या नाम नगरी तत्रासील्लोकविश्रुता ॥
मनुना मानवेंद्रेण या पुरी निर्मिता स्वयम् ॥ ६ ॥
आयता दशच द्वेच योजनानि महापुरी ।
श्रीमती त्रीणि विस्तीर्णा सुविभक्तमहापथा ॥ ७ ॥

सरयू नदीचे तीरीं कोशल म्हणून एक मोठा देश आहे त्यांत धनधान्याची समृद्धि आहे; त्यांतील लोक आनंदित आहेत व उत्तरोत्तर त्या देशाची अभिवृद्धि होत आहे. त्या देशामध्यें मानवाधिपति मनूनें स्वतः निर्माण केलेली अशी एक अयोध्या नांवाची जगद्विख्यात नगरी आहे. त्या मोठ्या नगरीची लांबी अठ्ठेचाळीस कोस असून रुंदी बारा कोस आहे आणि ती नगरी वैभवसंपन्न असून स्पष्ट अशा बाह्य मार्गांनीं युक्त आहे. पुढें आणखी सोळा श्लोकांनीं अयोध्येचें वर्णन केलेलें आहे. ही सर्व नगरी घरांनीं खच्चून भरली होती व हिच्या भोंवतीं कोट व खंदक वगैरे होते. ( –लेलेशास्त्रीकृत भाषांतर )

ही अशी ४८ कोस लांब व बारा कोस रुंद अशी नगरी होती, यांत लोकसंख्या किती होती याचा अंदाज दिलेला नाहीं. तिचा आकार अष्टपैलू होता. तिच्यामध्यें घरांची अगदीं खेचाखेच झाली असून मोकळी जागा कोठेंहि राहिलेली नाहीं असें १६।१७ व्या श्लोकांत सांगितलें आहे. यावरून या अयोध्येची वस्ती मुंबईच्या वस्तीच्या बरोबरीच असली पाहिजे असें अनुमान होतें.

आजची अयोध्या गोग्रा नदीच्या कांठीं दाखविली जाते. पण तेथें किंवा आसपास इतकी मोठी राजधानी पूर्वी होती अशा खाणाखुणा कांहींच मिळत नाहींत. जुन्या मोठ्या शहरांचे अवशेष जमिनींत दडपून गेलेले

बहुतेक ठिकाणीं सांपडत असतात व त्या त्या सांपडलेल्या पदार्थांवरून पूर्वीचा इतिहास कळत असतो व त्याविषयीं खात्री पटते.

### उंटांची व गाढवांची गर्दी

पण या अयोध्येच्या अस्तित्वाची खूण आजमितीस मुळींच सांपडत नाहीं. रामायणांत तिचें वर्णन आहे व त्या आधारें एक गांव रामाची अयोध्या या नांवानें आजहि ओळखलें जातें. यापेक्षां अयोध्येविषयीं कांहीं पुरावा मिळत नाहीं; ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. रामायणांत सरयू नदीवर अयोध्या होती असें सांगितलें आहे. आजचें नदीचें नांव गोग्रा आहे. नांवांत असा बदल कां व कसा झाला हें कळत नाहीं.

अयोध्या ही मोठी नगरी अशी वर्णिली आहे. तिच्या किल्ल्यांचें, रस्त्यांचें, बाजारांचें, परदेशी व्यापारांचें, मोठमोठ्या वाड्यांचें, नायकिणींचें वगैरे वर्णन इतर शहरांप्रमाणेंच आहे. पण अयोध्येचा कांहीं विशेषहि सांगितला आहे व तो विचार करण्यासारखा आहे.

तेराव्या श्लोकाचा उत्तरार्ध

वाजिवारणसंपूर्णां गोभिरुष्ट्रैः खरै स्तथा ॥

असा आहे. (अश्व व गज, बैल, उंट व गर्दभ यांनीं ती भरलेली असून) प्रत्येक राजधानींत हत्ती व घोडे यांची गर्दी असावयाचीच, बैल हेहि असतातच. पण उंट व विशेषतः गाढवें यांनीं अयोध्या भरलेली होती असें वाचलें म्हणजे विचार करणें भाग पडतें. उंटांचा उपयोग वालुकामय प्रदेशांतच होतो व तेथें ते पुष्कळ असतात. आज रजपुतान्यांतील सर्व संस्थानांत त्यांचा मोठा भरणा आहे. पण ह्या वालुकामय प्रदेशांत लोकसंख्याहि कमी असते. अयोध्या माणसांनीं गजबजली होती. गंगा, यमुना नद्यांच्या कांठावरील प्रदेश सुपीक, तेथें उंटांचा उपयोग नाहीं. पण अयोध्येंत तर त्यांची गर्दी. तशीच गर्दभांची. हा प्राणी आर्यांच्या मतानें अशुभ. त्यावर बसल्यास द्विजांचें उपनयन पुन्हां केलें पाहिजे अशी शास्त्राज्ञा. अशा प्राण्यांची अयोध्येंत गर्दी होती. हें सांगणें म्हणजे अयोध्या ही नगरी आर्यावर्ताच्या बाहेर असावी असें सांगण्यासारखेंच आहे !

## श्रृंगवेरपुराविषयीं पंचाईत

आतां श्रृंगवेरपुराविषयीं विचार करूं. राम वनवासाला निघाला तों रथांतून निघाला. त्यावेळीं त्याला निघण्यास बराच उशीर झाला असला पाहिजे; म्हणजे सूर्यास्तास तास दोन तास फार तर असतील. पहिला मुक्काम तमसेवर पडला. मोठ्या पहाटेस राम तमसा उतरून पलीकडे गेला. बराच रस्ता काटल्यावर सूर्य उगवला. प्रातःसंध्या करून राम आपला देश ओलांडून पलीकडे गेला. ( विषयानत्यगाहत रा. अ. कां. स. ४९ श्लोक २ ) यावरून अयोध्येच्या पूर्वेस सुमारें ५०।६० मैलांपेक्षां दशरथाच्या राज्याची सीमा जास्त नसावी. इतकीच किंवा फार तर दुप्पट चारी बाजूला सीमा असेल. इतक्याशा प्रदेशाची राजधानी ४८ कोस लांब व १२ कोस रुंद असणें असंभवनीय आहे. वाल्मीकीनें या बाबतींत अतिशयोक्ति केली हें स्पष्ट आहे. कोसल देशाचा विस्तार मोठा नव्हता म्हणून दशरथाला सम्राट किंवा सार्वभौम ही लावलेली पदवी औपचारिकच समजावी लागेल. अयोध्या नगरीच्या आग्नेयीस गंगा व सरयू–आजची गोग्रा–यांच्या संगमाखालीं श्रृंगवेरपूर हें नगर लागलें. अयोध्येहून निघाल्यानंतर रामलक्ष्मणांनीं तमसेवर पहिली रात्र घालविली. दुसरी रात्र गंगेवर श्रृंगवेरपुरीं घालविली. एक दिवसांत रथ ओढणारे घोडे ४०।५० मैलांपेक्षां जास्त मजल करूं शकणार नाहींत. फार फार तर ६०।७० मैल. अयोध्येहून बरोबर थेट दक्षिणेस राम गेलेला नाहीं. तर पूर्वदक्षिणेस गेलेला आहे. श्रृंगवेरपूर हें गंगेच्या उत्तर तीरावर मिर्झापूरजवळ होतें. गंगा नदीच्या पलीकडच्या तीरावर वत्स देश होता असें सांगितलें आहे. पण हा देश प्रयागच्या पश्चिमेस आहे असें इतरत्र सांगितलें आहे. म्हणजे रामायणाप्रमाणें राम अयोध्येहून सरयूच्या काठानें पूर्वेस गेला. श्रृंगवेरपुराजवळ त्यानें नावेनें गंगा नदी ओलांडली, तेव्हां तो वत्स देशास पोचला होता. तेथून तो पश्चिमेस गेला असला पाहिजे. कारण तो मग गंगा–यमुनांच्या संगमास जाण्यास निघाला असें ( अयोध्याकांड सर्ग ५४ श्लोक यांत ) सांगितलें आहे.

यत्र भागीरथीं गंगा यमुनाभिप्रवर्तते ।
जग्मुस्तं देशमुद्दिश्य विगाह्य सुमहद्वनम् ॥ २ ॥

'आणि फार मोठें वन ओलांडून गेल्यावर जेथें यमुनेचा भागीरथीशीं संगम होत आहे त्या (प्रयाग) देशाला जाण्याकरितां निघाले.' पुढें पांचव्या श्लोकांत, प्रयाग पहा, असें राम सांगत आहे. तेथें तो भरद्वाजाच्या आश्रमास पोचला. तेथून दहा कोसांवर असलेल्या चित्रकूटावर राहा असें भरद्वाजानें रामास सांगितलें. आज चित्रकूट म्हणून दाखविलेली जागा प्रयागच्या पश्चिमेस आहे.

भरत रामास भेटण्यास आला तोहि शृंगवेरपुराजवळ गुहाच्या साह्यानें नदी उतरून आलेला आहे. आजची अयोध्या, गोग्रा नदीचा भागीरथीशीं संगम व गंगा–यमुना संगमाचे प्रयाग, हे तीन बिंदु समभुजत्रिकोण साधतात. म्हणजे अयोध्येपासून शृंगवेरपुराचें जितकें अंतर तितकेंच अयोध्येचें प्रयागपासून अंतर व तितकेंच प्रयाग व शृंगवेरपुराचे मधील अंतर. म्हणजे राम व भरत हे सरळ मार्गानें प्रयागास न जातां दुप्पट अंतर चालून प्रयागास गेले आहेत, हें फार चमत्कारिक आहे.

## कवीचें अगाध ज्ञान

रामायणांत पुढें घुसडाघुसड पुष्कळच झाल्यानें वाल्मीकीच्या काव्याला फार कमीपणा आलेला आहे. वाल्मीकीसारख्या जुन्या कवीला भरताची सेना गंगा नदी कशी तरून गेली याचें विस्तृत वर्णन देण्याची जरूरी वाटणार नाहीं. हें वर्णन कोणीतरी शहरांतच जन्म घालविलेल्या व सेना न पाहिलेल्या कविब्रुवानें घुसडून दिलेलें दिसतें. उदाहरणार्थ– अयोध्याकांड सर्ग ८९ श्लोक १७ व १९.

> नारीणामभिपूर्णास्तु काश्चित्काश्चित्तु वाजिनाम् ।
> काश्चित्तत्र वहंति स्म यानयुग्यं महाधनम् ॥ १७ ॥

या श्लोकांत, "कांहीं नावा घोड्यांनीं खचलेल्या होत्या. व कांहीं बहुमूल्यवान गाड्या ओढणारे बैल वगैरे वाहून नेत होत्या." असें सांगितलें आहे. सैन्यांतील घोडे व बैल नदी उतरतांना स्वता पोहून जातात. त्यांस नावेंत घालावें लागत नाहीं याची जाणीव या कवड्यास नव्हती.

पुढीलच १९ वा श्लोक पहा.

सवैजयन्तास्तु गजा गजारोहैः प्रचोदिताः ।
तरन्तःस्म प्रकाशन्ते सपक्ष इव पर्वताः ॥

" माहुतांनीं प्रेरणा केलेले ध्वजासहवर्तमान गज नावांतून तरून जाऊं लागले असतां पक्षयुक्त पर्वतांप्रमाणें दिसूं लागले." हत्ती हा जबर पोहणारा आहे. पाठीवर बसणारासुद्धां तो कसल्याहि पुरांतून तरून जातो हें प्रसिद्ध आहे. पण या बनावट वाल्मीकीला मात्र ही गोष्ट माहीत नव्हती असें दिसतें !

आतां श्रृंगवेरपुराविषयीं सध्यां काय मत आहे तें पाहूं. गंगेच्या उत्तर तीरावर अलाहाबादच्या वायव्येस अठ्ठावीस मैलांवर श्रृंगरौर या नांवाचें गांव आहे. तेंच पूर्वीचें श्रृंगवेरपूर असें दाखविण्यांत येतें. तेथें श्रृंगी ऋषीचा आश्रम असल्यानें तें नांव पडलें असें म्हणतात. हें गांव पूर्वीचें रामकालचें श्रृंगवेरपूर असल्यास राम जवळच्या रस्त्यानें सरळ तेथें आला असें होईल. पण मग चित्रकूटास जातांना त्याला प्रयाग लागणार नाहीं. प्रयाग लागलें हा उल्लेख रामायणांत स्पष्ट आहे.

या भौगोलिक स्थितीवरून एक तर आज दाखविण्यांत येत असलेलें श्रृंगरौर हें गांव पूर्वीचें श्रृंगवेरपूर नसावें किंवा रामायणांत दिलेलें प्रवासाचें वर्णन तरी काल्पनिक असावें. कारण तो रामाचा प्रवास खरा धरल्यास रामानें पूर्वेस पुष्कळ दूर जाऊन पुन्हां गंगेच्या काठानें सुमारें दोनशें मैल पायीं पायीं पश्चिमेकडे जाण्यास कांहीं योग्य कारण दिसत नाहीं; तसेंच भरतानेंहि जवळच्या रस्त्यानें चित्रकूटास रामाकडे न जातां रामानें जसा वळसा घातला त्याच दूरच्या रस्त्यानें इतक्या मोठ्या अगडबंब फौजेसुद्धां जाण्याचे श्रम घ्यावे ही गोष्ट विचारबुद्धीस पटणें कठीण.

## सर्वज्ञ संस्कृत टीकाकार

आतां श्रृंगवेरपुर या शब्दाचा थोडा विचार करूं. श्रृंगी ऋषीचा आश्रम सिंगरौर येथें दाखविला जातो. त्या ऋषीच्या नांवावरून त्या गांवास सिंगरौर हें नांव पडलें असेल. पण रामायणांतील गुहाच्या राजधानीचें नांव श्रृंगिबेरपुर असें आहे. त्यांतील बेर शब्दाची उपपत्ति लावण्याचा प्रसंग टीकाकारावर आला तेव्हां त्यांनीं, श्रृंगि म्हणजे हरणांतील नर, बेर, वेर म्हणजे

देह व पुर म्हणजे शहर असा या समासांतील तीन पदांचा अर्थ घेतला व ज्या गांवांत हरणाचीं शरीरें (अर्थात् पेंढा भरलेलीं कातडीं) घरोघर आहेत तें गांव असा केला. त्या नगरांत राहणारे लोक निषाद म्हणजे शिकार करणारे होते. म्हणून हरणें भुलून गांवांत यावीं या हेतूनें असे कृत्रिम हरीण उभें करीत, अशी कल्पना टीकाकारानें लढविली. हरणाच्या शिकारीची यत्किंचित् तरी माहिती ज्याला आहे त्याला टीकाकाराच्या या विचित्र कल्पनेचें हंसू आल्याशिवाय राहणार नाहीं. आमच्या पुराणग्रंथांवरील टीकाकार मोठे सर्वज्ञ असत. वाटेल त्या अपरिचित किंवा परकी भाषेंतील शब्दाचा संस्कृत अर्थ आपल्या कल्पनेच्या जोरावर त्यांनीं ठासून दिला नाहीं असें उदाहरण मिळणें कठीण. बेर हें पद कुबेर या देवांच्या धनाध्यक्षाचें नांव आहे त्यांत आढळतें. आमच्या टीकाकारांनीं या शब्दावर आपल्या कुशाग्रबुद्धीचा प्रयोग करून कु (कुत्सितं) बेरं (शरीरं) यस्य स कुबेरः असा विग्रह केला व तो देव किंवा यक्षराज अगदीं कुरूप आहे असें ठरविलें. त्याला तीन पाय, एक डोळा व आठ दांत आहेत, असें सांगण्यांत येतें. एकंदरींत श्रृंगिबेरपुर कोठें होतें याचा पत्ता लागत नाहीं व हें नांवहि हिंदी असण्याचा संभव नाहीं.

### चित्रकूटाचें विचित्र कोडें

आतां चित्रकूटाविषयीं विचार करूं (अयोध्याकांड सर्ग ५४ श्लोक २८)

दशक्रोश इतस्तात गिरिर्यस्मिन्निवत्स्यसि ।
महर्षिसेवितः पुण्यः पर्वतः शुभदर्शनः ॥

अर्थ—बा रामा, येथून (प्रयागापासून) दहा कोसांवर एक पर्वत आहे. त्या ठिकाणीं तूं वास्तव्य कर. त्या पुण्य पर्वताचा महर्षींनीं आश्रय केलेला आहे व त्याचें दर्शनहि शुभकारक आहे.

गोलांगूलानुचरितो वानरर्क्षनिषेवितः ।
चित्रकूट इतिख्यातो गंधमादनसन्निभः ॥ २९ ॥

गोलांगूलसंज्ञक वानर तेथें संचार करीत असतात, व इतर वानर व अस्वलें तेथें वास्तव्य करीत असतात. गंधमादन पर्वताप्रमाणें असलेला पर्वत चित्रकूट म्हणून प्रसिद्ध आहे.

ओकांच्या कोषांत गंधमादन पर्वताविषयीं थोडक्यांत माहिती पुढील-प्रमाणें दिली आहे. गंधमादनः—१ हिमालयाच्या उत्तरेकडील एक पर्वत भद्राक्ष वर्षाजवळ. याच्यावर सुगंधवृक्षयुक्त वनें आहेत. २ हिमालयाचें एक शिखर. कोणताहि अर्थ घेतला तरी गंधमादन हा एक उंच व विस्तृत पर्वत आहे व चित्रकूट त्यासारखाच असल्यानें तोहि उंच व विस्तृत असावा, अशी कल्पना होते. तिसावे श्लोकांत चित्रकूट पर्वताच्या शिखरांच्या दर्शनाचें महत्त्व सांगितलें आहे. तेथें 'शृंगाणि' असा बहुवचनी प्रयोग केला आहे. बहुत शिखरें असलेला पर्वत मोठा असणारच.

पण वस्तुस्थिति काय आहे ? अलाहाबाद प्रयाग याच्या आसपास शंभर कोसांतहि उंच अशी टेकडीदेखील नाहीं, मग बहुत शिखरें असलेला पर्वत कोठून मिळणार ? गंगा, यमुना या नद्या पूर्वीसारख्याच राहून हा चित्रकूट पर्वत मात्र नाहींसा झाला असें म्हणणेंहि विश्वसनीय नाहीं.

एकंदरींत रामायणांत दिलेलें अयोध्येचें वर्णन पाहतां व शृंगबेरपुर हें नांव व रामाच्या प्रवासाचा दिलेला मार्ग लक्षांत घेतां आज दाखविण्यांत येणारी अयोध्यानगरी, शृंगबेरपुर व चित्रकूट हीं स्थळें रामायणकालीन नव्हत असें स्पष्ट होतें. हें सर्व वर्णन काल्पनिकच आहे. यांत विश्वसनीय भाग फार थोडा आहे असें कबूल करावें लागतें.

मल्लादि वेंकटरत्नम् यांच्या मतें हीं तीनहि ठिकाणें मिसर म्हणजे आजचा इजिप्त या देशांतील आहेत असें आहे.

—महाराष्ट्र शारदा—सप्टेंबर १९३५.

# रामायणाची ऐतिहासिक योग्यता

आतां **नंदिग्राम** याचा विचार करूं.

रामाकडे चित्रकूट पर्वतावर भरत आला. रामानें आपल्या पादुका देऊन त्याला परत पाठविलें.

> स ( भरतः ) काममनवाप्यैव रामपादावुपास्पृशन् ।
> नन्दिग्रामे करोद्राज्यं रामागमनकांक्षया ॥

( बालकांड सर्ग १ श्लो. ३८,३९ )

आपला मनोरथ पूर्ण न होतांच तो भरत रामचरणीं प्रणाम करून परत फिरला आणि रामाच्या आगमनाची वाट पहात त्यानें नंदिग्रामामध्यें राहून राज्य केलें. हें नंदिग्राम कोठें होतें याचा तपास करितां अयोध्या कांड सर्ग ११३ श्लोक २४ यांत थोडा उल्लेख आहे. पहा–

> " चतुर्दशहि वर्षाणि जटाचीरधरो ह्यहं ॥
> फलमूलाशनो वीर भवेयं रघुनंदन ।
> तवागमनमाकांक्षन् वसन्वै नगराद् बहिः " ॥ २४ ॥

" हे वीर रघुनंदना, जटावल्कलें धारण करून आणि फलमूलें भक्षण करून तुझ्या आगमनाची वाट पहात मी नगराच्या बाहेर चौदा वर्षेपर्यंत राहीन. " यावरून अयोध्यानगरीच्या बाहेरच नंदिग्राम होतें असें दिसतें. सर्ग ११५ मध्यें भरत अयोध्येस परत आल्यावर नंदिग्रामास गेल्याचा उल्लेख आहे. (पहा श्लोक २ **नंदिग्रामं गमिष्यामि**; श्लोक १२ **नंदिग्रामं ययौ तूर्णम्**) हें गांव अयोध्येपासून एक कोसाच्या अंतरावर होतें असें दिसतें. (युद्धकांड सर्ग १२५ श्लोक २९ **क्रोशमात्रे त्वयोध्यायाः**) राम भरतभेटीस आला तेव्हां त्याच्या स्वागताची मोठी तयारी झाली. त्यावेळीं " **कृत्स्नं तु नगरं तत्तु नंदिग्राममुपागमत्** ",

म्हणजे "तें सर्वहि नगर ( अयोध्या ) नंदिग्रामाकडे लोटलें!" यावरून नंदिग्राम अयोध्येच्या जवळच असलें पाहिजे.

आज रोजीं अयोध्या शहराजवळ या नंदिग्रामाचा पत्ता लागत नाहीं. या नांवाचीं किंवा असल्याच नांवाचीं गांवें दक्षिण हिंदुस्थानांत आहेत. नंदि हें दैवत ज्या गांवांत प्रमुख तो गांव नंदिग्राम होय. या अर्थानें नंदीची मूर्ति असलेलीं गांवें पुष्कळच आहेत. शिवभक्ति जोरांत आल्यावर नंदीला श्रेष्ठ मानणारा एक पंथ निघाला. त्यांच्या मतें नंदीची प्रतिमा मुख्य असली पाहिजे. पण असें नंदीचें देऊळ अयोध्येजवळ असल्याचा किंवा शंकराच्या भक्तीचा उल्लेख रामायणांत आलेला नाहीं. याचें कारण कट्टर वैष्णव कवीनें किंवा कवींनीं यांतील मूळ कथेचा वाल्मीकीच्या नांवाखालीं विस्तार केलेला दिसत आहे. पण खऱ्या अयोध्येजवळ नंदीचें देऊळ होतें ही गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

भरत परत गेल्यावर

> " रामस्तु पुनरालक्ष्य नागरस्य जनस्य च ।
> तत्रागमनमेकाग्रो दण्डकान्प्रविवेश ह ॥ "

" नगरवासी जनांचें आगमन पुनरपि होण्याचा संभव आहे असें समजून राम दंडकारण्यांत मोठ्या सावधपणानें शिरला. "

( बालकाण्ड सर्ग १ श्लोक ४० )

यमुनेपासून गोदावरीपर्यंतच्या मुलखाला दंडकारण्य म्हणत असें सांगितलें आहे. कोठें कोठें नर्मदा व गोदावरी यांच्यामधील प्रदेशासच दंडकारण्य म्हटलेलें आढळतें. पुढें पंपा सरोवरापर्यंतच्या मुलखाचा समावेश या अरण्यांत केलेला आढळतो.

पण इतक्या विस्तृत प्रदेशास दंडकारण्य हें नांव संभवत नाहीं. पुराणांत या अरण्याची उत्पत्ति पुढीलप्रमाणें दिली आहे. दंडक हा इक्ष्वाकुपुत्र लहानपणापासून उन्मत्त व मूढ होता. हा विंध्याद्रि व शैवल ( विंध्याद्रीच्या दक्षिणेस त्याच्या लगत असलेला पर्वत. आजचा सातपुडा ? ) या पर्वतांमधील प्रदेशाचा राजा. यानें एकदां भृगुकुलोत्पन्न गुरुकन्येवर बलात्कार केल्यामुळें गुरूच्या शापानें याचा नाश झाला व तो देश अरण्यप्राय झाला.

कारण त्यावर सात दिवस चिखलाचा पाऊस पडला. म्हणून त्यास दंडकारण्य हें नांव मिळालें. (ओकांचा कोष).

याप्रमाणें दंडकारण्याविषयीं निश्चितपणा नाहीं. राम दंडकारण्यांत गेला इतकी कथा. दक्षिणेंत राम आला हें सिद्ध करण्यासाठीं कोणीहि दंडकारण्याची हद्द वाटेल तितकी ताणावी. राक्षसांचें ठाणें दंडकारण्यांत होतें; व त्यांचा उपद्रव थोडाबहुत चित्रकूटापर्यंत पोंचत असे. म्हणून यमुनेच्या तीरापर्यंत दंडकारण्य होतें असें रामायणावरून कळतें.

रामाच्या वनवासाचीं दहा वर्षें घालविण्याकरितां हा रामाचा दंडकारण्यांतील प्रवास दिसतो. या दहा वर्षांत विराधाला रामलक्ष्मणांनीं मारलें. याशिवाय दुसऱ्या कोणाचा वध केल्याची हकीकत दिलेली नाहीं. पुढील दोन वर्षांत मात्र कथानक फार जोरांत आलें आहे. त्यांत हाणामार खेचून भरली आहे. दहा वर्षें लोटल्यावर राम अगस्त्याश्रमास गेले असें सांगितलें आहे. याचा अर्थ विंध्य पर्वताच्या दक्षिणेस गेले असा आहे. अगस्तीचा आश्रम पंचवटीपासून दोन योजनांवर होता. (पहा अरण्यकाण्ड सर्ग १३ श्लोक १३).

दण्डकारण्याचा उल्लेख रामायणांत येतो; पण तो देश केवढा होता याविषयीं एकमत नाहीं. निरनिराळ्या हद्दी दिल्या जातात; हें आश्चर्यकारक आहे. दंडकाची राजधानी मधुमंत नगर. यावर चिखलाचा वर्षाव सात दिवस झाला व शंभर मैल लांब रुंद इतका प्रदेश चिखलमय झाला असें दिसतें. म्हणजे दण्डकारण्य हें नांव दलदलीच्या प्रदेशाचें असावें. तसा प्रदेश आर्यावर्तांत आढळत नाहीं.

जनस्थान—शूर्पणखा जनस्थानांत राहाणारी होती असें नारदानें सांगितलेल्या रामायणांत आहे. पुढें वाल्मीकीच्या रामायणांत (अरण्यकांड सर्ग १८ श्लोक २५ त) खर जनस्थानांत राहात होता, असा उल्लेख आहे. ओकांच्या कोषांत "जनस्थान—नाशिकजवळचा भाग. येथें शूर्पणखा व खर राक्षस राहात होते. वनवासांत रामाचें येथें कांहीं दिवस वास्तव्य होतें." असा खुलासा आहे. जनस्थान म्हणजे जन राहाण्याची जागा. कोणत्याहि शहरास किंवा गांवास हा शब्द लावतां येईल. यावरून हें गांव कोठें होतें, केवढें होतें, वगैरेचा पत्ता नाहीं. सर्वच बाब मोघम. जनस्थाना-

पासून तीनच कोसांवर रामलक्ष्मणांना कौंचारण्यनामक वन लागलें आहे. यावरून जनस्थान फारसें मोठें नसावें असा तर्क होतो.

पंचवटीहून सीतेला रावणानें जबरीनें नेली. वाटेंत जटायूनें त्याला विरोध केला. जटायूकडून हकीकत समजल्यावर राम प्रथम पश्चिमेकडे व नंतर दक्षिणेकडे असे शोध करीत चालले.

पंचवटी—जनस्थानाजवळ पांच वडांचें ठिकाण, गोदावरीच्या उत्तर किनाऱ्यावर. गोदावरीच्या उगमापासून समुद्राला मिळेपर्यंतच्या प्रदेशांत हें स्थळ असू शकेल. नाशिकजवळ पंचवटी ही रामाची जागा असें सांगण्यांत येतें. तसेंच राजमहेंद्रीजवळ पर्णशाला नांवाचें गांव आहे. तेथें पंचवटी असून रामाची पर्णशाला होती असेंहि सांगून जागा दाखविण्यांत येते.

सीतेचा शोध करण्यास निघाले, तेव्हां रामलक्ष्मण पश्चिमेस गेले व पुढें दक्षिणेस चालले. पश्चिमेस गेले असें सांगितल्यावरून तिकडे बरेंच अंतर चाललें पाहिजे; म्हणून रामाची राहण्याची जागा नाशिक पंचवटी नसावी असें वाटतें. कारण ती असती तर लक्ष्मणास सह्याद्रीचे घाट लगेच लागते व पुढें समुद्र लागता. राजमहेन्द्रीजवळील पर्णकुटी म्हणावी, तर तिच्या पश्चिमेस बऱ्याच अंतरावर पंपा आहे. पण मग दक्षिणेकडे जावें लागत नाहीं. याप्रमाणें रामाची खरी पंचवटी ठरविण्यास अडचण येत आहे. इतर स्थळांप्रमाणेंच पंचवटी ही घोटाळयाची आहे.

पंपा—नामक सरोवर किंवा पुष्करिणी, ऋष्यमूकपर्वताजवळची. दंडकारण्यांतील एका नदीलाहि पंपा असें नांव आहे. अरण्यकाण्डाच्या ७५ व्या सर्गांत १४ व्या श्लोकांत पंपा नदी आहे, असेंहि सांगतल आहे.

स तामासाद्य वै रामो दूरात्पानीयवाहिनीम्
मतंगसरसं नाम ऱ्हदं समवगाहत ॥१४॥

समीपच्च वाहात असलेल्या त्या पंपानामक नदीला गेल्यावर त्या मतंगसरस नामक सरोवरामध्यें त्यानें स्नान केलें. ( ऱ्हद म्हणजे डोह असें पाहिजे. ) होसपेटजवळ हें स्थळ दाखवितात. यावरून पंपाहि अनिश्चितच.

किष्किंधा—ही वालीची राजधानी येथून जवळच दाखविली जाते. तुंगभद्रेच्या कांठीं हंपीजवळ किष्किंधा या नांवाचें खेडें दाखवितात.

रामायणांतील स्थलांविषयीं किंवा त्या त्या स्थलास जाण्याच्या मार्गाविषयीं वाल्मीकि कांहींच माहिती देत नाहीं. वाटेल त्या जागीं जाऊन येथें अमुक झालें म्हणून खुशाल दाखवावें. रामायणांत केलेलें किष्किंधेचें वर्णनहि मामुलीच आहे.

आजची पंपा व किष्किंधा दक्षिणेंत बल्लारी जिल्ह्यांत दाखविलीं जातात. पण मूळची विंध्य पर्वताच्या उत्तरेस असावी व लंका विंध्याच्या दक्षिणेस असावी. कारण किष्किंधा कांडाच्या ४१ व्या सर्गांत अंगदाच्या प्रमुखत्वाखालीं हनुमान वगैरे वानर सीतेचा शोध करण्यास पाठविले आहेत; त्यांना सीतेचा शोध कोठें कोठें करावा तें सुग्रीवानें सांगितलें आहे.

( सर्ग ४१ श्लोक ६ ).

तेषां अग्रेसरं चैव बृहद्बलमथांगदम् ।
विधाय हरिवीराणां आदिशद्दक्षिणां दिशम् ॥ ६ ॥
येकेचन समुद्देशाः तस्यांदिशि सुदुर्गमाः ॥
कपीशः कपिमुख्यानां स तेषां समुदाहरत् ॥ ७ ॥
सहस्रशिरसं विंध्यं नानाद्रुमलतायुतम् ।
नर्मदां च नदीं रम्यां महोरगनिषेविताम् ॥ ८ ॥
ततो गोदावरीं रम्यां कृष्णवेणी महानदीम् ॥
मेखलानुत्कलांश्चैव दशार्णनगराण्यपि ॥
आब्रवन्तीमवन्तींच सर्वमेवानुपश्यत ॥ ९ ॥

महाबलाढ्य अंगदाला त्या वानरवीरांचा अग्रणी करून त्यांना दक्षिण दिशेस जाण्यास सांगितलें. (६) आणि त्या दिशेला जे कांहीं अत्यंत दुर्गम प्रदेश आहेत, ते सर्व त्या वानराधिपतीनें त्या वानरश्रेष्ठांना सांगून दिले. (७) ( तो म्हणाला ) "हजारों शिखरांनीं आणि नानाप्रकारच्या वृक्षांनीं व लतांनीं युक्त असलेला विंध्याद्रि, महोरगांनीं आश्रय केलेली नर्मदा नदी, रम्य गोदावरी महानदी, कृष्णवेणी, मेखल व उत्कल देश, दशार्ण देशांतील शहरें आब्रवंती आणि अवंती हीं सर्व तुम्ही पहा."

पुढेंहि पुष्कळ स्थळें सांगितलीं आहेत, पण विस्तारभयास्तव त्यांना तूर्त बाजूला ठेवूं या. त्याप्रमाणें विंध्य पर्वत सर्व हुडकल्याचें ४८ वें सर्गांत सांगितलें आहे. यावरून किष्किंधा तसेंच पंपा, अगस्त्याश्रम, पंचवटी, जनस्थान, दण्डकारण्य वगैरे स्थळें विंध्य पर्वताच्या उत्तरेसच होतीं असें म्हणावें लागतें. तसें असल्यास पंचवटी ही ज्या नदीच्या तीरावर होती तिचें नांव गोदावरी असल्यास ती उत्तरेची नदी असावी असें अनुमान काढावें लागेल. रामायणांत किती आणि कोणीं कोणीं घुसवाघुसव केली आहे याचें अनुमान थोडा विचार करणारास सहज होईल.

आतां नारदीय रामायणांत उल्लेखिलेल्या लंकानगरीचा विचार करूं.

अंगद–हनुमानादि वानरांना संपाति विंध्यावर भेटला; व कलिंग देशांतल्या महेंद्रपर्वतावरून त्यानें लंकेंत उडी घेतली. (किं. सर्ग ६० श्लो. ४०).

महेंद्र पर्वत हा कलिंग देशांत आहे. कलिंग म्हणजे जगन्नाथ ते कृष्णेपर्यंतचा पूर्वेकडचा प्रदेश. हा विंध्याच्या पूर्वेस आहे. (पहा ओकांचा कोष)

महेंद्र पर्वतापासून १०० योजनांच्या अंतरावर असलेल्या त्रिकूटाचलाच्या लंबसंज्ञक शिखरावर हनुमान उतरला. (सुंदर कांड सर्ग १ श्लो. २०२). तेथून पर्वतशिखरावर असलेली लंका पाहिली. (सर्ग २ श्लो. ८). ती लंका अनेक प्रकारच्या कमलांनीं भरलेल्या खंदकांनीं भूषित झालेली होती. (श्लो. १४). ती लंका उडतच आहे कीं काय असें त्या हनुमान वानरानें अवलोकन केलें. ( श्लोक २० ).

हनुमान परत येऊन सीतेची बातमी रामाला देता झाला. सर्व वानरसैन्य घेऊन राम दक्षिण दिशेस निघाला. मोठ्या बंदोबस्तानें तो चालला. ( पहा युद्धकाण्ड सर्ग ४ श्लोक ४३ ).

जगाम रामो धर्मात्मा ससैन्यो दक्षिणां दिशम् ॥

अखेर राम महेंद्र पर्वतावर गेला.

महेंद्रमथ संप्राप्य रामो राजीवलोचनः ।
आरुरोह महाबाहुः शिखरं द्रुमभूषितम् ॥

( यु. कां. स. ४. श्लो. ९४ ).

वाल्मीकीला हिंदुस्थानच्या भूगोलाची माहिती बेतापुरतीच. पर्वत, नद्या वगैरेंचीं महशूर असलेलीं नांवें कोठेंहि दडपून देण्याची त्याला संवय आहे. विंध्य पर्वताच्या उत्तरेस किष्किंधा असली पाहिजे. तेथून विंध्य पर्वतावरून महेंद्र पर्वतावर जावयाचें. रस्ता पूर्व बाजूस लांब नाहीं असा. परंतु याच सर्गाच्या ७३ व्या श्लोकांत

काननानि विचित्राणि नदी प्रस्रवणानिच ।
पश्यन्नपि ययौ रामः सह्यस्य मलयस्य च ॥

" रामहि सह्याद्रीवरील व मलय पर्वतावरील विचित्र वनें आणि नदीप्रवाह अवलोकन करीत करीत चालला " असें दडपून दिलें आहे. किष्किंधा, हंपी होसेपटजवळ होती व रामेश्वराजवळ राम गेला असें वादाकरितां मानलें तरी सह्य व मलय पर्वतावर रामानें जाणें शक्य नाहीं. ९६ वे श्लोकांत असलेंच कथन पुन्हां केलें आहे.

ते सह्यं समतिक्रम्य मलयं च महागिरिम् ।
आसेदुरानुपूर्व्येण समुद्रं भीमनिस्वनम् ॥९६॥

ते वानर सह्य पर्वत आणि मलयसंज्ञक महापर्वत उल्लंघून गेल्यानंतर भयंकर गर्जना करीत असलेल्या समुद्रासमीप सैन्याच्या पद्धतीनें बसले.

असल्या भलत्याच चुका दिसल्या म्हणजे सर्वच गोष्ट कल्पित आहे काय असा संशय येतो. महेंद्र पर्वताजवळील समुद्रांत शंभर योजनांवर लंका होती. म्हणून आजचें सिंहलद्वीप ही रावणाची लंकाच नसली पाहिजे असेंहि दिसतें.

सीलोन हीच रावणाची लंका हें सिद्ध करण्याकरितां तिनेवेल्ली जिल्ह्यांतील एका साधारणशा डोंगराला महेंद्र पर्वत असें नांव दिलें आहे. ती जागा रामेश्वर म्हणून आतां प्रसिद्ध आहे. पण पुराणप्रसिद्ध महेंद्र पर्वत हा कृष्णा व महानदी यांचेमध्यें आहे.

नारदानें रामचरित्र वाल्मीकीस थोडक्यांत सांगितलें व वाल्मीकीनें त्याचा आपल्या कल्पनेनें विस्तार केला. नारदाच्या रामायणांत स्थलांचीं जीं जीं नांवें आलीं तीं तीं आर्यावर्तांत कोठें दाखविलीं जातात हें स्थलवार

वर दाखविलें आहे. राम त्या त्या स्थलांस गेल्याची जी हकीकत रामायणांत दिली आहे त्यावरून हीं स्थलें हिंदुस्थानांतील असावींत असें मुळींच दिसत नाहीं. अयोध्येहून निघून शृंगबेरपुरास राम रथानें गेला व तेथून चित्रकूटास प्रयागावरून पायानें गेला. त्याला परत आणण्याच्या उद्देशानें भरतहि त्याच मार्गानें गेला. पण तो हत्ती, रथ वाहनानें गेला. अयोध्येहून चित्रकूट फार दूर नसतां लांबच्या वाटेनें राम जातो व भरतहि त्याच दूरच्या वाटेनें येतांना येतो व जातांना जातो हें आश्चर्य आहे. आजच्या स्थितील रामायणांत वर्णिलेल्या चित्रकूटाचा मुळींच पत्ता नाहीं. गंगायमुनांचें खोरें शेकडों मैलपर्यंत अगदीं सपाट आहे.

जनस्थान, पंचवटी, पंपा, किष्किंधा, लंका वगैरे स्थलांसंबंधीं तीच स्थिति. या जागा हिंदुस्थानांतील होत्या असें म्हणणें बिलकूल पटत नाहीं.

विंध्य पर्वताच्या उत्तरेस किष्किंधा होती. मारुती वगैरे वानर दक्षिण दिशेस सीतेचा शोध करतांना प्रथम विंध्यावर आले व तेथून महेंद्रावर जाऊन हनुमान लंकेंत उडी मारून गेला. या हकिकतीवरून पूर्वीचें रामायण केवळ आर्यावर्तापुरतेंच होतें. म्हणजे त्यांत घडलेली हकीकत हिमालय व विंध्याद्रि या पर्वतांमधील प्रदेशांतच घडली, असा पहिला समज होता. पुढें राम हा दक्षिण हिंदुस्थानाचाहि वीर आहे असें दाखविण्याची जरूरी वाटली. त्यावेळीं कांहीं सर्ग नवे बनवून किष्किंधा, महेंद्र वगैरे स्थळें दक्षिणेंतील, असा भास उत्पन्न केला.

यासंबंधानें आणखी एक महत्त्वाची उणीव भासत आहे. कोणत्याहि गोष्टीच्या महत्त्वाच्या खुणा मिळत असतात. कोणाचीं लेणीं असतात. त्या लेण्यांत त्यांचे पुतळे असतात. दगडावर कोरलेले लेख असतात. कोणाच्या नांवचीं नाणीं मिळतात. कोणाचे विजयस्तंभ असतात. अशोकासारखे राजे आपलीं शासनें कोरून ठेवतात. पण रामासंबंधानें मात्र दुसरा पुरावा मुळींच मिळत नाहीं. विष्णूच्या दहा अवतारांपैकीं राम हा सातवा अवतार मानला जातो. पण अवतारांची यादी प्राचीन नाहीं; अलीकडीलच आहे. विष्णुसहस्रनाम या नांवाचें विष्णूचें स्तोत्र आहे. तें महाभारतांत समाविष्ट केलेलें आहे. तें केव्हां तयार झालें हें कळणें कठीण आहे. पण या स्तोत्रांत कृष्णावतारासंबंधानें कमींत कमी

दहा उल्लेख आहेत. देवकीनंदन असें स्पष्ट नांव आहे. पण दाशरथी रामालाच लागेल असें एकहि नांव नाहीं. यावरून रामाची अवतारांत गणना विष्णुसहस्रनामानंतरची आहे हें निर्विवाद आहे.

रामायणासंबंधानें दुसरी एक महत्त्वाची गोष्ट आहे. शंकराची भक्ति फार पुरातन आहे. काशी हें शैवांचें क्षेत्र प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. परंतु सबंध रामायणांत शिवालयाचा उल्लेख नाहीं. राम कोठें चुकूनहि शिवाच्या देवळांत किंवा शिवालयाच्या गांवीं जात नाहीं. ज्या वाल्मीकीनें हें रामायण वाढविलें तो कट्टर वैष्णव असावा. त्यानें शैवासंबंधीं उल्लेख मुद्दाम गाळले असले पाहिजेत.

वाल्मीकीचा प्रश्न व त्याच्या उत्तराच्या निमित्तानें रामाचें वर्णन नारदानें करणें हा प्रकार लक्षांत घेतला असतां राम हा परदेशचा पराक्रमी राजा असावा अशी कल्पना होते. रामायणांत रामाच्या प्रवासांतील सांगितलेलीं स्थळें आर्यावर्तांतीलच असें ठाम ठरविण्यास पुरावा नाहीं. आजचा उपलब्ध पुरावा घोटाळ्याचा व अनिश्चित; व म्हणूनच तो अविश्वसनीय आहे. मल्लादि वेंकटरत्नम् यांच्या मतें राम हा इजिप्तचा पराक्रमी राजा दुसरा रामेसिस हा होय. याच्या दोन लढायांची हकीकत नारदानें वाल्मीकीस सांगितली व त्यानें हें काव्य लिहिलें असावें. यासंबंधाच्या पुराव्याची छाननी करणें जरुर आहे.

रामाची राजधानी अयोध्या ही होती.

इजिप्तच्या रामेसिसची राजधानी मेंफिस शहर होतें. मेंफिस हें मिसरी नांव. याचा अर्थ लक्षांत घेऊन ग्रीक भाषेंत Agadon अजादों या नांवानें मेंफिस ओळखण्यांत आलें. आजच्या कैरो शहराच्या दक्षिणेस १० मैलांवर नील नदीच्या पश्चिम कांठावर तें वसलें होतें. डिओडोरस लिहितो, कीं त्या शहरची लांबी उत्तर दक्षिण १५० स्टाडिया होती (१ स्टाडिया=२०२ यार्ड). यावरून ती लांबी १७ मैल आजच्या मापानें होते. रामायणांतील अयोध्येची लांबी फार, अतिशयोक्तीची आहे. तेथें ती ९६ मैल दिली आहे !

मेंफिस या शब्दाला मूळचा शब्द मिन्–नोफिस असा होता. याचा अर्थ चांगला आसरा असा असावा. अयोध्या या नांवाचाहि जवळ

जवळ तोच अर्थ होता. ग्रीक अजादों व अयोध्या हीं नांवें अगदीं नजीकचीं आहेत.

मेंफिसचें वर्णन यवन इतिहासकार हिरोडोरस व स्ट्राबो यांनीं केलेलें आहे. अब्द्-एल-लतीफ या अरबी बखरकारानेंहि तेरावे शतकाच्या प्रारंभीं याचें वर्णन दिलें आहे. या शहराच्या पूर्व बाजूस नील नदी असून बाकीच्या बाजूनें एक तलाव मेना यानें खोदलेला होता. अयोध्या ही मनूनें बांधली असें रामायण म्हणतें. अयोध्या ही उंटांनीं व गाढवांनीं भरली होती. हें वर्णन आर्यावर्तातील शहराचे बाबतींत कसेंसेंच वाटतें. पण मेंफिसमध्यें उंट, गाढवें यांचा सुकाळ होता यांत आश्चर्य नाहीं.

मुलूख वाळूचा असल्यानें उंटाचा उपयोग सर्व कामास फार होतो. म्हणून त्यांनीं शहर भरलेलें असणेंच योग्य. तीच गोष्ट गाढवांची. इजिप्त, अरेबिया, पालेस्टाईन, वगैरे देशांत थोरामोठ्यांची स्वारी गाढवावरूनच होते. अरेबियन नाइट्सूमधल्या गोष्टींत बहुधा गाढव वाहनाचा उल्लेख आढळतो. येशू ख्रिस्तहि यरुशलेम शहरांत समारंभानें जातांना गाढवावरच बसला होता हें प्रसिद्ध आहे. अशा प्रतिष्ठित वाहनाचा म्हणजे गर्दभांचा भरणा इजिप्तच्या अयोध्येंत मोठा होता हें सांगणें हें तेथील संपत्तीचें वर्णन आहे. पण तीच अयोध्या आर्यावर्तातील घोगरा नदीवरील मानली म्हणजे उंट आणि गाढव यांचा उल्लेख शोभत नाहीं.

अयोध्येचें केलेलें वर्णन मेंफिसला जुळतें. आर्यावर्तातील शहराला जुळत नाहीं. यावरून अयोध्या मिसर देशांतील असावी असें वाटूं लागतें.

—महाराष्ट्र-शारदा आक्टोबर १९३५

# ब्रह्मचारी हनुमान

## चुकीच्या समजुती

आमच्या हिंदूंच्या समजुतीप्रमाणें, राम हा विष्णूचा सातवा अवतार ठरून त्याच्या मूर्तीची स्थापना देवळांत झाली, तेव्हां राम लक्ष्मण सीता यांच्याबरोबर त्यांच्यासमोर हनुमानहि हात जोडून उभा केला गेला. लांबच लांब शेपटी व सर्वांगाला शेंदूर फासलेली ती मूर्ति पाहून साधारण लोकांच्या मनांत तो माकड आहे ही कल्पना येते. रामाचा एकनिष्ठ सेवक, स्त्रीजातीशीं संबंध न ठेवणारा व अति बलवान् अशी त्याच्याविषयीं सामान्यपणें समजूत आहे. मारुती असें त्याचें आणखी नांव आहे. मारुती म्हणजे हनुमान याचीं स्वतंत्र देवळेंहि आहेत. दक्षिणेंत तीं बहुतेक सर्वत्र आहेत. उत्तरेंत क्वचित् आहेत. रामदास स्वामींशीं या देवळांचा लावलेला संबंध काल्पनिक आहे. त्यांत सत्य दिसत नाहीं.

हनुमान हा दक्षिणेकडील देव. रामाचा सेवक तो होता अशी समजूत पसरून दिल्यास रामाची योग्यता फारच वाढेल अशा बुद्धीनें रामायणांत हनुमानाचा उपयोग करून घेतांना त्याच्या अफाट शक्तीच्या गोष्टी वर्णिल्या आहेत.

हनुमानाविषयीं बहुजनसमाजाच्या समजुती मुख्यत्वें चार आहेत :

१. हनुमान हा रामाचा एकनिष्ठ सेवक झाला.

२. तो माकड असल्यानें त्याला फारशी अक्कल नव्हती, म्हणजे इतर माकडांसारखा तो निर्बुद्ध होता.

३. तो चिरंजीव आहे.

४. तो ब्रह्मचारी होता, म्हणजे कट्टा स्त्रीपराङ्मुख होता. श्रवण, कीर्तन, केलि वगैरे अष्टमैथुन त्यानें टाकले होते, व म्हणूनच तो फार बलवान होता.

वाल्मीकि रामायणांत दिलेल्या हकीकतीवरून या समजुतींत सत्यपणा किती आहे हें पाहणें जरूर आहे.

रामायणें बरींच आहेत. पण त्यांत वाल्मीकि रामायण जास्त प्रमाण मानलें जातें. बाकीच्या रामायणांत अतिशयोक्ति फार आहे. वाल्मीकि रामायणहि अतिशयोक्तीपासून मुक्त नाहीं. पण या अतिशयोक्ती मागाहून घुसडल्या असाव्यात.

हनुमान हा रामाचा एकनिष्ठ सेवक झाला अशी समजूत सार्वत्रिक आहे व याचा पुरावा रामाच्या देवळांत हनुमानाची लहानमोठी मूर्ति असावयाचीच हा देण्यांत येतो.

### अवताराची अश्लील कल्पना

राम हा विष्णूचा सातवा अवतार ठरल्यावर या अवतारकल्पनेला जोर येण्यासाठीं रामास मदत करणाऱ्या सर्व वानरसेनेची उत्पत्ति देवता वगैरे-पासून झाली असें बालकांडाच्या १७ व्या सर्गांत सांगितलें आहे :

पुत्रत्वं तु गते विष्णौ राज्ञस्तस्य महात्मनः ।
उवाच देवताः सर्वाः स्वयंभूर्भगवानिदम् ॥ १ ॥
सत्यसंधस्य वीरस्य सर्वेषां नो हितैषिणः ।
विष्णोः सहायान् बलिनः सृजध्वं कामरूपिणः ॥ २ ॥
अप्सरःसु च मुख्यासु गन्धर्वीणां तनूषु च ।
यक्षपन्नगकन्यासु ऋक्षिविद्याधरीषु च ॥
किन्नरीणां च गात्रेषु वानरीणां तनूषु च ।
सृजध्वं हरिरूपेण पुत्रांस्तुल्यपराक्रमान् ॥

याप्रमाणें विष्णूनीं त्या महात्म्या दशरथाचें पुत्रत्व स्वीकारिलें असतां भगवान् ब्रह्मदेव सर्व देवतांना असें म्हणाले ( १ ) "सत्यप्रतिज्ञ आणि वीर असा जो आपणा सर्वांचें हित इच्छिणारा विष्णु त्याला यथेष्टरूप धारण करणारे व बलाढ्य असे साहाय्यकर्ते तुम्ही उत्पन्न करा." ( २ ) त्याप्रमाणें त्यांनीं "मुख्य मुख्य अप्सरा, गंधर्वपत्न्या, यक्ष व नाग यांच्या कन्या, ऋक्ष आणि विद्याधर यांच्या स्त्रिया, किन्नरांच्या

स्त्रिया आणि वानरस्त्रिया यांचे ठिकाणीं हरिरूपानें तुम्ही एक-सारखे पराक्रमी पुत्र उत्पन्न करा." (६)

ब्रह्मदेवाची अशी आज्ञा झाल्यावर

ते तथोक्ता भगवता तत्प्रतिश्रुत्यशासनम् ।
जनयामासुरेवं ते पुत्रान्वानररूपिणः ॥ ८ ॥
ऋषयश्च महात्मानः सिद्धविद्याधरोरगाः ।
चारणाश्च सुतान्वीरान् ससृजुर्वनचारिणः ॥ ९ ॥

अर्थः—याप्रमाणें भगवान् ब्रह्मदेवानीं सांगितल्यावर त्या देवांनीं त्यांची आज्ञा पाळण्याविषयीं वचन दिलें आणि त्याप्रमाणें त्यांनीं वानररूपी पुत्र उत्पन्न केले. (८). महात्मे, ऋषि, सिद्ध, विद्याधर, उरग, आणि चारण यांनीं वनामध्यें संचार करणारे असे वीर (वानर) पुत्र उत्पन्न केले.

## पुराणांतील पावित्र्यविडंबन

या सर्गांतील हकीगत खरी मानावयाची असेल तर देवांच्या नीतिमत्तेच्या अभावाची जाणीव होते. या देवांना वानरपुत्र उत्पन्न करण्याचा हुकूम ब्रह्मदेव देतात. पुत्र उत्पन्न करण्यास स्त्रीजात पाहिजे. तिचीहि तरतूद ब्रह्मदेवांनीं केली आहे. वरच्या ५ व्या व ६ व्या श्लोकांत त्या सांगितल्या आहेत. त्यांतील अप्सरा या वेश्याच आहेत. तेव्हां त्यांच्या ठायीं पुत्रोत्पत्ति करण्यानें विवाहाच्या पावित्र्याची हानि नाहीं. परंतु गंधर्वपत्न्या यांनीं देवांपासून वानर उत्पन्न करावे असा हुकूम देऊन ब्रह्मदेवानें त्यांच्या गंधर्वपतींस या कामीं नालायक ठरविलें. तसेंच यक्ष व नाग यांच्या कन्या, ऋक्ष व विद्याधर यांच्या स्त्रिया, किन्नरांच्या स्त्रिया, वानरस्त्रिया या सर्व वानरोत्पत्तीच्या कामासाठीं देवांच्या हवालीं करून ब्रह्मदेवानें दांपत्यनीतीचें उत्कृष्ट उदाहरण घालून दिलें आहे. विषयी देवांची विषयसुखसेवनाची भरपूर सोय केलेली पाहून त्यांचा कित्ता महात्मे, ऋषि, सिद्ध, विद्याधर, उरग व चारण यांनीं गिरवून वानरप्रजावृद्धीच्या कामीं फार मोठें काम केलें आहे. दिसण्यांत इंद्रासारखा आणि वानरांचा अधिपति असा वाली नांवाचा पुत्र इंद्रानें उत्पन्न केला

आणि तेजस्व्यांमध्यें श्रेष्ठ असलेल्या सूर्यानें सुग्रीव नामक पुत्र उत्पन्न केला (श्लो. १०). याप्रमाणें बृहस्पतीपासून तार, कुबेरापासून गंधमादन, विश्वकर्म्यापासून नल, अग्नीपासून नील, अश्विनीकुमारापासून मैंद व द्विविद, वरुणापासून सुषेण, पर्जन्यापासून शरभ असे जन्मास आले. याप्रमाणें ही सर्व लहानथोर वानरसेना त्यांच्या त्यांच्या आईच्या नवऱ्याच्या बीजाची नव्हती, तर त्यांचें जनकत्व निरनिराळ्या देवांकडे होतें. हनुमानहि अशाच उच्च बीजाचा होता.

मारुतस्यौरसः श्रीमान् हनुमान्नाम वानरः ।
वज्रसंहननोपेतो वैनतेयसमो जवे ॥१६॥
सर्व वानर मुख्येषु बुद्धिमान् बलवानपि ॥१७॥

सर्व मुख्य मुख्य वानरांमध्यें बुद्धिमान आणि बलाढ्य, वेगामध्यें गरुडाची बरोबरी करणारा, कांतिमान् आणि वज्रदेही असा हनुमान म्हणून प्रसिद्ध असलेला वानर वायूचा पुत्र होय. (१६ । १७).

या सर्वांविषयीं २० वे श्लोकांत सांगितलें आहे.

यस्य देवस्य यद्रूपं वेषो यश्च पराक्रमः ।
अजायत समं तेन तस्य तस्य पृथक् पृथक् ॥

अर्थ—ज्या देवाचें जें रुप, जो वेष व जो पराक्रम त्यासहवर्तमान त्या त्या देवापासून पृथक् पृथक् पुत्र उत्पन्न झाला. (२०) हे पुत्र उत्पन्न करण्यासाठीं या देवांना वानरांचें रुप घ्यावें लागलें, का त्यांनीं आपल्या दैवी रूपांतच वानरींशीं संग केला हें सांगितलें नाहीं. एकंदरींत रामाचे हे सर्व साह्यकर्ते व मित्र आपापल्या आईच्या नवऱ्याच्या पोटचे नव्हते, व ते कोणाच्या बीजाचे हें त्यावेळीं उघड व प्रसिद्ध होतें. कौसल्या, कैकयी व सुमित्रा यांच्याशीं कोणी देवानें अत्याचार केल्याचें सांगितलें नाहीं हें त्यांचें सुदैव !

ही अवतार कल्पना बोकाळली म्हणजे विचारशक्ति नाहींशी होते याचें हा सर्ग हें चांगलें उदाहरण आहे.

वाली, सुग्रीव, हनुमान यांच्या उत्पत्तीची कथा उत्तरकांडांत ३५।३६

सर्गांत आहे. तेथें त्यांच्या आयांचीं व त्यांच्या विवाहित पतींचीं नांवें दिलीं आहेत:

> सूर्यदत्तवर: स्वर्ण: सुमेरुर्नाम पर्वत: ।
> यत्र राज्यं प्रशास्त्यस्य केसरी नाम वै पिता ॥१९॥
> तस्य भार्या बभूवेष्टा ह्यंजनेति परिश्रुता ।
> जनयामास तस्यां वै वायुरात्मजमुत्तमम ॥२०॥

कल्पनेचे घोटाळे

तात्पर्य:—सुमेरु पर्वतावर केसरी नांवाचा वानर राज्य करीत होता. अंजना त्याची राणी. तिच्या पोटीं वायूपासून पुत्र हनुमान जन्मास आला. पुढील सर्गाच्या ३६।३७।३८ या श्लोकांत वाली व सुग्रीव यांच्या बापाचें नांव ऋक्षरजस हें दिलें आहे. तो सर्व वानरांचा राजा होता. तो मरण पावल्यावर त्याचें राज्य वालीस मिळालें, असें सांगितलें आहे. रामायणकथेंतील वाली, सुग्रीव, हनुमान यांचा जन्म राजकुलांत झाला असून ते मोठे पराक्रमी होते. त्यांचे बाप त्यांच्याच जातीचे होते. पण रामाला अवतारांत घेतलें तेव्हां त्याच्या या मित्रांसहि अवतारी बनवावें लागलें. हें करण्यास त्यांचें जनकत्व त्यांच्या मातेच्या विवाहित पतीकडून काढून निरनिराळ्या देवांकडे देणें जरूर दिसलें. **ही अवतारकल्पना घोटाळ्याची, अनैसर्गिक व अविश्वास्य आहे.** तिच्या भ्रमाचा भोपळा फोडणारावर 'पावित्र्यविडंबना'चा दोष लादण्यांत येईल, हें निश्चित आहे. पण आपण ज्यांना अवतारी पुरुष म्हणतों त्यांची उत्पत्ति त्यांच्या आईच्या लग्नाच्या नवऱ्यापासून झालेली नसून परपुरुषांपासून झाली आहे, असें प्रतिपादितांना आपणहि 'पावित्र्यविडंबन' करितों याचें भान त्यांस रहात नाहीं.

हनुमानाच्या आईचें नांव अंजना व तिच्या पतीचें नांव केसरी होतें व तो मेरुपर्वतावर राज्य करीत होता. हें राज्य सोडून सुग्रीवाचा अमात्य होण्यास व त्याच्याबरोबर वालीच्या भीतीनें भटकण्यास हनुमान केव्हां व काय कारणानें आला हें दिल्याचें आढळत नाहीं. ऋक्षरजसाच्या ताब्यांतील लहानशा प्रदेशाचा संस्थानिक केसरी असावा व त्याचा मुलगा

हा वाली, सुग्रीव या राजपुत्रांबरोबर शिक्षणासाठीं म्हणून आलेला सुग्रीवाचा मित्र व विश्वासू सेवक झाला असावा असें अनुमान होतें.

### अशक्य गोष्टींचें भारुड

हनुमान हा वायूचा पुत्र असें सांगितल्यावर या कल्पनेच्या पुराव्यासाठीं बऱ्याचशा अद्‌भुत गोष्टी बनवाव्या लागल्या. त्यांतील पहिली म्हणजे सूर्यबिंब धरण्यास जाण्याची. उत्तरकांड सर्ग ३५ श्लोक २१ ते सर्ग ३६ श्लोक २५ पर्यंत ही अद्‌भुत कथा आहे. तिचा सारांश देणें बरें. अंजनेनें याला जन्म दिला. फळें आणण्याच्या हेतूनें ती अरण्यांत गेली (श्लोक.२१). मातेच्या वियोगानें व भुकेनें पिडल्यामुळें हें बाळ रडूं लागलें. यावेळीं सूर्योदय होत होता. त्याचें तांबुस रंगाचें बिंब पाहून तें एक फळ आहे, म्हणून तो त्याच्या लोभानें वर उडाला. ( श्लो. २२।२३। )

फललोभानें सूर्यबिंबावर झडप घालण्याचें कृत्य हनुमान जन्मास आल्यावर झालें, कां पुढें कांहीं दिवसांनीं झालें हें येथें सांगितलेलें नाहीं. उपजल्याबरोबर असें कृत्य घडणें अशक्य असें कै. भाऊशास्त्री लेले या कट्टर सनातनीसहि पटलें व त्यांनीं २१ व्या श्लोकाच्या भाषांतरांत 'एके प्रसंगीं,' असे शब्द "ही श्रेष्ठ अंजना फळें आणण्याकरितां वनामध्यें गेली होती" याच्यापूर्वी, मुळांत तदा हा शब्द आहे त्याचें जागीं घातले. पण सर्वसाधारण भाविकांचा समज उपजल्याबरोबरच तो सूर्यबिंबावर धांवला असा आहे. चैत्र शुद्ध पौर्णिमेस सूर्योदयापूर्वीच हरदास कीर्तनास उभा राहतो व भाविक स्त्री-पुरुष आपल्या मुलांसह त्यावेळीं श्रवणास हजर असतात. सूर्याचें बिंब दिसण्याच्या वेळीं मोठ्या रसाळवाणीनें ही कथा सांगण्यांत येते, व जन्मल्याबरोबर मारुती उडाला असेंच प्रतिपादिलें जातें. तेव्हां मारुतीच्या दैवी अचाट सामर्थ्याची बालमनाला ओळख पटून त्यांस फार गंमत वाटते. पण या मुलांच्या करमणुकीच्या गोष्टीचा परिणाम त्यांच्या आईबापांवर भलताच होतो. त्यांची विचारशक्ति कुंठित होते. रामायणासारख्या ग्रंथांत सांगितलेल्या कथेवर अविश्वास दाखविणें पाप आहे, असें मारुतीजन्माच्या व असल्याच दुसऱ्या प्रसंगानें आमच्या लोकांच्या मनावर ठसविलें जात असल्यानें आमच्यांतील चिकित्सक बुद्धि दडपून गेली आहे. कोणी

कसलीहि थाप मारावी, आमचे भोळे लोक 'ईश्वरी लीला अगाध आहे,' असें म्हणून विश्वास ठेवण्यास तयारच ! आमच्या देशांत बोकाळलेल्या बुवाबाजीचें मूळ या भोळेपणांतच आहे. हें मूळ उपटून काढल्याशिवाय आमच्यावर झालेले खुळे संस्कार जाणार नाहींत.

## विचारांवर भलतें दडपण

केसरी हा लहानसा का होईना राजा होता. त्याचे घरीं थोडे तरी दासदासी असणारच. या स्थितींत तान्ह्या मुलास टाकून फळें आणण्यासाठीं वनांत जाण्याची पाळी अंजनेवर यावी हेंच अविश्वसनीय. प्रसूत झाल्याबरोबर ती गेली असें म्हणावें तर या प्रसंगीं या राणीच्या सेवेसहि कोणीच नव्हतें यावर तरी विश्वास कोण विचारी ठेवील ! मूल उपजल्यावर एक दिवसपर्यंत त्याला दुधाचीहि जरुर नसते. भूक कोठून लागणार ! पण हा विचार आमचे हरदास करीत नाहींत व त्यांच्या प्रतिपादनानें श्रोत्यांची विचारशक्ति दडपून टाकली जाते.

वारा वाहण्याचा जास्तींत जास्त वेग तासास १००।१२५ मैल यापेक्षां जास्त नाहीं. बालकांड सर्ग १७ श्लोक २० मध्यें सांगितल्याप्रमाणें बापाच्या पराक्रमाप्रमाणें पुत्राचा पराक्रम असे. म्हणून या वेगापेक्षां जास्त वेगानें मारुती उडणें शक्य नाहीं. पृथ्वीपासून सूर्याचें अंतर नऊ कोटी मैलांपेक्षां जास्त आहे. तेथें पोचण्यास मारुतीस किती वर्षें लागतील याचा अंदाज कोणीहि करील. त्यांतून मारुती बाळ क्षुधेनें अतिशय पीडित झालेलें, म्हणून एकसारख्या वेगानें खाण्यापिण्याशिवाय आकाशांत उडणें अशक्य.

पृथ्वीपासून वर जसजसें जावें तसतशी उष्णता कमी होऊन थंडी वाढते असा अनुभव आहे. पण आमच्या रामायणाचें कथन याचे उलट ! बरें, विसंगति इतक्यानेंच पुरी होत नाहीं.

यमेव दिवसं ह्येष ग्रहीतुं भास्करं प्लुतः ।
तमेव दिवसं राहुर्जिघृक्षति दिवाकरम् ॥ (उ. कां. ३५।३१)

ज्या दिवशीं सूर्याला धरण्याकरितां यानें उड्डाण केलें त्याच दिवशीं राहूनेंहि सूर्याला ग्रस्त करण्याचें मनामध्यें आणिलें होतें. पुढल्याच श्लोकांत राहूला चंद्रार्कमर्दन असें म्हटलें आहे. यावरून चंद्र, सूर्य या

दोघांसहि एकटा राहूच ग्रासतो असें या वाल्मीकीचें मत दिसतें. त्याच्या हिशेबीं राहू व केतू एकच. हनुमानजन्म पौर्णिमेला झाला व त्या दिवशीं सूर्यग्रहण असें हरिदास सांगतात हेंहि आमच्या भोळया श्रोत्यांस पटतें. रामायणांतील हा घोटाळा आमच्या भाविकांस पटतो. पटला नाहीं तरी त्याविरुद्ध ब्र काढण्याची छाती त्यांना होत नाहीं.

## ग्रहणांचा घोटाळा

हनुमान सूर्याचा ग्रास करण्यास गेला तेव्हां सूर्यतापापासून वायु (त्याचा खरा बाप) यानें तुषारांच्या समुदायानें शीतल होऊन त्याचें रक्षण केलें. हनुमान सूर्याच्या रथासमीप गेला. तेथें सूर्याला गिळण्याला राहू आला होता. त्याला मारुतीचा धक्का लागून तो कोलमडून पलीकडे सरला. नंतर इंद्रलोकीं जाऊन देवगणासहवर्तमान बसलेल्या देवराज इंद्राला तो क्रोधयुक्त राहू भिवया चढवून म्हणाला, (उ. कां. ३५ । ३३) ‘हे बलवृत्रघातका इंद्रा, सूर्यचंद्र हें क्षुधा दूर करण्याचें साधन तूं मला दिलें असून तेंच तूं दुसऱ्याला दिलेंस काय? (तेंच ३४) मी आज अमावास्येचे दिवशीं सूर्याला ग्रस्त करण्याच्या उद्देशानें आलों असतां दुसराच राहू येऊन त्यानें सूर्याला ग्रस्त केलें.’ (तेंच ३५) (येथें पर्व शब्द आहे. त्याचा अर्थ अमावास्या असा लेले शास्त्र्यानीं केला आहे. पण अष्टमी, चतुर्दशी, पूर्णिमा व अमावास्या यांतील कोणत्याहि दिवसास पर्व म्हणतात.) इंद्राला राग येऊन तो उत्तम हत्तीवर बसून सूर्याकडे निघाला. राहू त्याच्यापुढें धांवला. हेंहि एक फळ आहे असें समजून मारुती राहूवर धांवला. तेव्हां राहू घाबरून आश्रयासाठीं इंद्राकडे पळाला. इंद्राचा ऐरावत हाहि एक फळ आहे असें समजून त्याच्याकडे मारुती धांवला, आणि इंद्रानें त्याच्यावर वज्र फेकलें. इंद्राच्या वज्रानें ताडित झालेला हा मारुती पर्वतावर पडला व पडतां पडतां त्याची डावी हनु मोडली. वायु इंद्रावर क्रुद्ध झाला व त्यानें सत्याग्रह करून सर्व भूतांचा श्वासोच्छ्वास बंद केला. पुढें देव, गंधर्व, भुजंग, व गुह्यक ह्या प्रजासहवर्तमान (या सर्वांचा श्वासोच्छ्वास बंद झाला असतांहि) ब्रह्मदेव आपला पुत्र घेऊन वायु बसला होता तेथें गेला. (श्लो. ६५). ब्रह्मदेवानें मारुतीला उठविलें व वायूनें आपला सत्याग्रह सोडला.

ही सर्वच कथा अशक्य कोटींतील, न घडण्यासारखी असल्यानें इचें खंडन करण्याचीहि जरूर नाहीं. पण ही कथा हनुमजयंतीला दरसाल सांगण्यांत येते व आमच्या भोळया लोकांचा भोळेपणा दरसाल ताजा केला जातो. या कथांचा खोटेपणा उघड उघड सांगणारे उपदेशक आम्हांस पाहिजेत.

### टाकाऊ कल्प–कथा

हनुमानाच्या उत्पत्तीच्या व त्याच्या बालपणच्या पराक्रमाच्या कथा सर्वस्वीं टाकाऊ आहेत. तो फार वेगवान, चपळ, वाऱ्यासारखा धांवणारा म्हणून त्यास मारुती असें कोणी म्हणणें स्वाभाविक आहे. तेवढ्यावरून मरुतानें अंजनीच्या पोटीं गर्भ ठेविला असें म्हणणें म्हणजे तिचा गौरव होत नाहीं व हनुमानाचाहि होत नाहीं; ही गोष्ट हा अवतारसर्ग घुसड-णाऱ्याच्या लक्षांत आली नाहीं. सुग्रीव एक देवाच्या बीजाचा असो, पण त्याचा शत्रू त्याचा भाऊ वाली असाच इंद्रापासून उत्पन्न झालेला व म्हणून बलवान दाखविण्यांतील औचित्य समजणें कठीण आहे. अद्भुत जन्मासंबंधीं चर्चा इतकी पुरे.

हनुमान, वाली, सुग्रीव, नल, नील वगैरे वानर होते असें कितीहि अट्टाहासानें रामायणांत सांगितलें असलें तरी ते सर्व मनुष्ययोनींतील होते यांत कांहीं संशय नाहीं. कथेला अद्भुतता आणण्यासाठीं या सर्वांस शेपट्या लाविल्या आहेत. बालकांड अध्याय (१७) श्लोक १६।१७ यांत हनुमाना-संबंधीं महत्त्वाचा उल्लेख आहे. तो सर्व मुख्य मुख्य वानरांमध्यें बुद्धिवान आणि बलवान होता, वेगामध्यें गरुडाची बरोबरी करणारा, कांतिमान आणि वज्रदेही होता. सर्व वानरांत मारुती बुद्धिमान होता असें सांगण्यानें बृहस्पती-पासून जन्मलेल्या तारापेक्षांहि तो बुद्धिमान होता हें स्पष्टच आहे. बृहस्पतीपेक्षां वायु हा कमी बुद्धीचा यांत संशय नाहीं. यावरून देवांपासून यांची सांगितलेली उत्पत्ति केवळ काल्पनिक होय. ती खरीच असती तर प्रत्येकाच्या ठायीं बापाचे गुण आले असल्यानें बृहस्पतीची बुद्धिमत्ता ताराला आली असती व तो वायुसुतापेक्षां जास्त बुद्धिमान असावयास पाहिजे होता. तसें नसल्यानें अवतारकल्पना खोटी आहे असें सिद्ध होतें.

## हनुमानाचे गुण

त्यापुढें किष्किंधा कांडाच्या दुसऱ्या सर्गात हनुमानाची गांठ पडते. सुग्रीवाला हुडकीत राम-लक्ष्मण पंपा सरोवरावर आले. आपणांस मारण्यासाठीं वालीनें यांना पाठविलें अशी भीति त्यांना पाहून सुग्रीवास पडली. त्यावेळीं

उवाच हनुमान्वाक्यं सुग्रीवं वाक्यकोविदः ॥ १३ ॥

भयभीत झालेल्या सुग्रीवाला संभाषणज्ञ हनुमान म्हणाला. कोणत्या वेळीं काय बोलावें व कसें बोलावें हें त्यास बरोबर कळत असे. सुग्रीवाची भीति अस्थानीं आहे असें त्यानें थोडक्यांत पटवून दिलें. राम–लक्ष्मणांची चौकशी करण्यास व त्यांचा येण्याचा उद्देश समजून घेण्यास सुग्रीवानें त्यालाच पाठविलें. ( किष्किंधा कांड सर्ग २ श्लो. २४।२९ )

राम लक्ष्मणाकडे येऊन गोड भाषण करून आपण कोण, कोणाकडून आलों, हें त्यानें कळविलें. लक्ष्मणानें रामाची सर्व हकीकत हनुमानास सांगितली, व लक्ष्मण म्हणाला,

अहं चैवच रामश्च सुग्रीवं शरणं गतौ । कि. कां. ४।१७

मी व राम सुग्रीवाला शरण आलों आहोंत. नंतर त्यानें त्या उभयतांना सुग्रीवाकडे नेऊन त्यांचें काम सुनाविलें. हनुमानानें राम हा तुला शरण आला आहे असें स्पष्टच त्या दोघांसमक्ष सांगितलें. पुढें उभयतांचें सख्य झालें व मारुतीनें अग्नि पेटवून तें अग्निसाक्षिक केलें.

हनुमान हा सुग्रीवाचा मुख्य मंत्री होता, व तो सुग्रीवाच्या हितास जपत होता. त्याच्या सल्ल्याप्रमाणें वागून सुग्रीवानें रामाच्या हातून आपला भाऊ वाली याचा वध करविला व रामानें त्यास राज्यावर बसविलें, व वालीपुत्र अंगदास युवराजपद दिलें. नंतर रामानें त्या नगरीबाहेरच्या गुहेंत पावसाळा काढला. सुग्रीव ऐषआरामांत मग्न झाला असतां त्यास हनुमान जागा करीत असे. तरी तो रामकार्याची हेळसांड करूं लागल्यानें लक्ष्मणानें त्याचे राजवाड्यांत जाऊन त्याला चांगली तंबी दिली. तेव्हां सुग्रीवानेंच सर्व दिशांस वानर पाठवून सीतेचा शोध करविला. अंगदाच्या पुढारीपणाखालीं हनुमानास दक्षिण दिशेस पाठविलें. हनुमानानें लंकेस जाऊन सीतेला भेटून अशोक वनाचा उच्छेद करून रावणाची भेट घेतली.

तेव्हां रावणाच्या आज्ञेनें प्रहस्तानें मारुतीस तूं कोठला, कोण व रावणाच्या निवासस्थानामध्यें तुझा प्रवेश होण्याचें कारण काय, असें विचारलें. ( सुंदरकांड ५१।१२ ) त्यानें आपल्या उत्तरांत—

केनचिद्राजकार्येण आगतोऽस्मि तवान्तिकम् ।। १८ ।।
दूतोऽहमिति विज्ञेयो राघवस्यामितौजसः ।
श्रूयतां चापि वचनं मम पथ्यमिदं प्रभो ।। १९ ।।

मी रामकार्याकरितां आलों आहे. रामाचा दूत वगैरेवरून हनुमान रामाचा सेवक झाला असें म्हणतां येत नाहीं. कारण हे श्लोक ५० वे सर्गांत शेवटचे आहेत व पुढल्या सर्गांत तेंच भाषण पुढें चालविलें आहे; त्यांत पहिलेंच वाक्य

अहं सुग्रीवसंदेशादिह प्राप्तस्तवांतिके ।। २ ।।

हें आहे. सुग्रीवाच्या आज्ञेनें मी तुझ्याकडे आलों आहे असें तो स्पष्ट सांगतो. नंतर लंका जाळून तो सुग्रीव व राम यांचेकडे परत गेला. येथपर्यंत तरी तो सुग्रीवाचाच नोकर होता, व त्याच्या आज्ञेनें रामाचें कार्य करीत होता हें स्पष्ट आहे.

**मारुती रामसेवक नव्हे**

हनुमान हा सुग्रीवाचा नोकर, आपला नव्हे असें युद्धकाण्डाच्या पहिल्या सर्गांत रामानेंच कबूल केलें आहे. सीताशुद्धीचें महाकठीण काम करून परत आल्यावर राम त्याची स्तुति करितो. तींत तो म्हणतोः—

भृत्यकार्यं हनुमता सुग्रीवस्य कृतं महत्, ।
एवं विधाय स्वबलं सदृशं विक्रमस्य च ।।

हनुमानानें आपल्या पराक्रमाला अनुरूप असें मोठ्या शक्तीचें, भृत्य या नात्यानें कर्तव्य असलेलें, सुग्रीवाचें मोठें कार्य केलेलें आहे.

तन्नियोगे नियुक्तेन कृतकृत्यं हनूमता ।
न चात्मा लघुतां नीतः सुग्रीवश्चापि तोषितः ।। ११ ।।

कार्य सांगितलेल्या हनुमानानें तें कार्य पार पाडलें, स्वतःला हलकेपणा आणूं दिला नाहीं आणि सुग्रीवालाहि संतुष्ट केलें. ( ११ )

वालीवधाच्या पूर्वी केलेल्या कराराप्रमाणें सीतेला परत मिळविण्याच्या कामीं सुग्रीवानें रामास सैन्यासह साह्य करावयाचें होतें. त्याप्रमाणें सुग्रीव ससैन्य रामाबरोबर गेला. त्यानें नलाकडून दहा योजनें रुंद व शंभर योजनें लांब असा सेतु बांधविला. मोठ्या वानरसेनेसह राम लंकेस पोंचला. रावणाच्या सैन्याबरोबर मोठें युद्ध झालें. हनुमानानें फार पराक्रम केला.

## रामासाठीं त्याची मेहनत

रावणवधानंतर सीतेला आणण्यास रामानें हनुमानालाच पाठविलें. कारण तो तिला पूर्वी भेटलेला होता व त्यावर तिचा विश्वास होता. तें काम त्यानें केलें. पुढें पुष्पक विमानांत बसून राम, लक्ष्मण, सीता हे सर्व सेनेसह किष्किंधेस आले. तेथें सुग्रीवाच्या राण्या व मुख्य मुख्य वानर सरदारांच्या बायका विमानांत घेऊन राम अयोध्येस निघाला. हनुमान हा सुग्रीवाचा आपत्कालचा अमात्य, युद्धांत फार पराक्रम केलेला, म्हणून त्यास बरोबर घेणें योग्यच होतें. भारद्वाजाश्रमास रामाचा मुक्काम पडल्यावर पुढें भरताकडे बातमी पाठविण्यास हनुमानाची योजना रामानें केली हेंहि साहजिक होतें.

रामाला अभिषेक झाल्यावर रावणाबरोबरच्या युद्धांत कार्यकर्त्या पराक्रमी वीरांस बक्षिसें वांटण्यांत आलीं. त्यांत हनुमानाची कामगिरी विशेष महत्त्वाची असल्यानें रामानें महीषि सीतेकडून त्याचा सत्कार करविला. इतर सर्वांना योग्यतेप्रमाणें बक्षिसें दिलीं.

येथपर्यंत तरी हनुमान हा सुग्रीवाचा सेवक होता. सुग्रीवाची नोकरी सोडून रामाची सेवा करण्यास तो राहिला असता तर तसा स्पष्ट उल्लेख पाहिजे. तसा तर नाहींच पण त्याचे उलट हनुमान परत गेल्याचा स्पष्ट पुरावा आहे.

> विभीषणोऽथ सुग्रीवो हनुमाञ्जांबवांस्तथा ।
> सर्वे वानरमुख्याश्च रामेणाक्लिष्ट कर्मणा ॥ ८५ ॥
> यथार्हं पूजिताः सर्वे कामै रत्नैश्च पुष्कलैः ।
> प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥

**बक्षिसांची वांटणी**

बिभीषण, सुग्रीव, हनुमान, जांबवान, व इतरहि सर्व वानरश्रेष्ठ या सर्वांचें उदार पराक्रम करणाऱ्या रामानें असंख्य रत्नें व इष्ट वस्तु देऊन योग्यतेनुरूप पूजन केलें, व नंतर ते सर्वहि मनामध्यें संतुष्ट होऊन आल्या मार्गानें परत गेले. ( युद्धकांड २८।८५,८६ ). युद्धकाण्डाचा व रामायणाचा हा शेवटचाच सर्ग. उत्तरकाण्ड प्रक्षिप्त आहे. पण त्यांतहि तोच सूर निघतो. ( पहा सर्ग ३९ श्लोक १६।१७।१८।१९ )

हनूमन्तं च नृपतिरिक्ष्वाकूणां महारथः
अंगदंच महाबाहूमङ्कमारोप्य वीर्यवान् ॥ १६ ॥
रामः कमलपत्राक्षः सुग्रीवमिदमब्रवीत्
" अंगदस्ते सुपुत्रोऽयं मंत्री चाप्यनिलात्मजः ॥ १७ ॥
सुग्रीवमंत्रितं युक्तौ ममापि च हिते रतौ
अर्हतो विविधां पूजां त्वत्कृते वै हरीश्वर " ॥ १८ ॥

अंगद व हनुमान यांना रामानें आपल्या मांडीवर बसविलें व म्हटलें, " हे सुग्रीवा, अंगद हा तुझा सत्पुत्र असून वायुपुत्र तुझा मंत्री आहे. हे मसलतीमध्यें निपुण असून माझ्या हिताविषयीं तत्पर आहेत. तुझ्याकरितां मी यांची नानाप्रकारांनीं पूजा करण्यास योग्य आहे. " ( १६।१७।१८ ). असें म्हणून आपल्या अंगावरील दागिने काढून ते त्यांच्या अंगावर बांधले. वानरराक्षसांनीं चैनींत दोन महिने काढले. पुढें—

राघवस्तु महातेजाः सुग्रीवमिदमब्रवीत् ॥ १ ॥
" गम्यतां सौम्य किष्किंधां दुराधर्षां सुरासुरैः ।
पालयस्व सहामात्यो राज्यं निहतकंटकम् ॥ २ ॥
अंगदं च महाबाहो प्रीत्या परमया युतः ।
पश्य त्वं हनुमंतं च नलं च सुमहाबलम् " ॥ ३ ॥

राम सुग्रीवाला म्हणाला, " हे विनयसंपन्न, देव आणि दैत्य यांना अजिंक्य असलेल्या किष्किंधा नगरीला जा आणि अमात्यासहवर्तमान तूं

निष्कंटक झालेल्या राज्याचें परिपालन कर. ( २ ) हे महापराक्रमी सुग्रीवा, मोठ्या आनंदानें तूं अंगद, हनुमान आणि अत्यंत महाबलाढ्य नल यांना अवलोकन कर."

रामानें हनुमानाला सुग्रीवाबरोबर परत पाठवून त्यावर कृपादृष्टि ठेवण्यास त्याच्या धन्यास म्हणजे सुग्रीवास बजाविलें आहे.

यावरून हनुमान हा सुग्रीवाचा सेवक होता. तो सेवा सोडून रामाचा सेवक कधींहि झाला नाहीं. तो सुग्रीवाबरोबर परत गेला. पुन्हां येऊन रामाची सेवा केल्याचा दाखला वाल्मीकि रामायणांत नाहीं. पण राम स्वर्गास जाण्याच्या वेळीं इतरांबरोबर तो भेटण्यास आला होता. पण तो रामाबरोबर देहपात न करितां परत गेला आहे. हनुमान हा रामाचा सेवक व भक्त ही कल्पना पुढें कोणी तरी पसरविली आहे. तिला सत्याचा आधार दिसत नाहीं.

तो वानर असल्यानें तो हुमदांडगा, फारशी अक्कल नसलेला, सांगकाम्या होता असा त्याचेविषयीं तिसरा समज आहे.

तो वानर म्हणजे पशु नव्हता; मनुष्यच होता. कविकल्पनेनें लावलेली शेपटी आतां कापूनच टाकली पाहिजे.

रामाला साह्य करणाऱ्या वानरांची उत्पत्ति बालकांडाच्या १७ व्या सर्गांत दिली आहे. तेथें हनुमानाविषयीं "सर्व वानरमुख्येषु बुद्धिमान्बलवानपि" (श्लोक १७) असें म्हटलें आहे. सर्व वानरांत तो बुद्धिमान् होता. यानंतर हनुमानाची गांठ किष्किंधा कांडांत पडते. रामलक्ष्मण ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव–सख्य जोडण्यास गेले असतां तो त्यांस भेटतो. त्याप्रसंगीं त्याचे स्वगत विचार व त्यानें केलेलीं प्रकट भाषणें पाहिलीं असतां त्याच्या चातुर्याची ओळख पटते. त्या कांडाच्या दुसऱ्या सर्गांत रामलक्ष्मणाला पाहून सुग्रीव घाबरला होता, तेव्हां त्याच्या मंत्र्यांपैकीं एक हनुमान त्याचेकडे गेला, व त्यास त्यानें शांत केलें. हा प्रसंग १४ ते १८ श्लोकांत वर्णिला आहे.

या प्रसंगीं वाल्मीकीनें हनुमानास **वाक्यकोविद:** (संभाषणज्ञ) असें विशेषण लाविलें आहे. घाबरलेल्या माणसास भरंवसा देतांना प्रथम भयाचें

कारण नाहीं असें सांगावें लागतें; नंतर त्याला थोडें दटावावेंहि लागतें. हे दोन्ही प्रकार हनुमानानें योजिले आहेत. सुग्रीवानें त्याला रामलक्ष्मणांकडे पाठविलें.

राम–लक्ष्मणांशीं त्याची भेट तिसरे सर्गांत वर्णिली आहे. त्यानें आपलें रूप सोडून शठबुद्धीनें तापसाचें रूप घेतलें. " आणि नम्रपणें राघवाजवळ जाऊन व त्यांना प्रणिपात करून, मधुर व मनोहर शब्दांनीं त्या वीरांशीं भाषण करून त्यांची त्यानें यथायोग्य रीतीनें प्रशंसाहि केली." नंतर मृदु शब्दांनीं विचारूं लागला. हें चतुर भाषण श्लोक ४ ते २४ पर्यंत आहे. त्यानंतर त्यानें आपल्या धन्याची हकीकत थोडक्यांत देऊन आपण त्याचा सचिव आहे असें सांगितलें. रामानें स्वतः उत्तर दिलें नाहीं. सुग्रीवाबरोबर सख्य करण्यास तो आला होता. पण सुग्रीवाच्या सचिवाबरोबर आपल्या सचिवानें बोलणें बरें असें जाणून रामानें लक्ष्मणास त्याच्याशीं बोलण्यास सुचविलें.

रामाच्या मनावर हनुमानाच्या भाषणाची किती छाप पडली हें पाहिल्यास त्याची योग्यता कळून येते. राम म्हणतो,—

तमभ्यभाष सौमित्रे सुग्रीवसचिवं कपिम् ।
वाक्यज्ञं मधुरैर्वाक्यैः स्नेहयुक्तमरिंदम ॥ २७ ॥
नानृग्वेदविनीतस्य नायजुर्वेदधारिणः ।
नासामवेदविदुषः शक्यमेवं विभाषितुम् ॥ २८ ॥
नूनं व्याकरणं कृत्स्नं अनेन बहुधा श्रुतम् ।
बहुव्याहरतानेन न किंचिदपभाषितुम् ॥ २९ ॥
न मुखे नेत्रयोश्चापि ललाटे च भ्रुवोस्तथा ।
अन्येष्वपि च सर्वेषु दोषः संविदितः क्वचित् ॥ ३० ॥
अविस्तरमसन्दिग्धमविलंबितमव्ययम् ।
उरस्थं कंठगं वाक्यं वर्तते मध्यमस्वरम् ॥ ३१ ॥
संस्कारक्रमसंपन्नामद्रुतामविलंबिताम् ।
उच्चारयति कल्याणीं वाचं हृदयहर्षिणीम् ॥ ३२ ॥

अनया चित्रया वाचा त्रिस्थानव्यंजनस्थया ।
कस्य नाराध्यते चित्तमुद्यतासेररेरपि ॥ ३३ ॥
एवंविधो यस्य दूतो न भवेत्पार्थिवस्य तु ।
सिध्यंति हि कथं तस्य कार्याणां गतयोऽनघ ॥ ३४ ॥
एवं गुणगणैर्युक्ता यस्य स्युः कार्यसाधकाः ।
तस्य सिध्यंति सर्वार्था दूतवाक्यप्रचोदिताः ॥ ३५ ॥

### हनुमानाची तारीफ

**अर्थ**–हे लक्ष्मणा, प्रेमयुक्त, शत्रूचें दमन करणारा आणि संभाषणज्ञ अशा त्या सुग्रीवमंत्री वानराशीं मधुर शब्दांनीं तूं कांहीं तरी बोल. (२७) ज्यानें ऋग्वेदाचा अभ्यास केलेला नाहीं, ज्यानें यजुर्वेद धारण केलेला नाहीं आणि जो सामवेद जाणत नाहींच नाहीं, त्याला असें भाषण करतां येणें शक्य नाहीं. (२८) खरोखर संपूर्ण व्याकरण यानें अनेक वेळां ऐकलेलें आहे. कारण, हा जरी पुष्कळ बोलत होता तरी कांहींहि अशुद्ध याच्या तोंडांतून निघालेले नाहीं. (२९) मुख, नेत्र, ललाट, भिवया, आणि इतरहि सर्व अवयव यांपैकीं कोठेंहि याचे ठिकाणीं दोष दृष्टोत्पत्तीस आला नाहीं. (३०) याच्या भाषणांत उगीच पाल्हाळ नाहीं; तें संदिग्ध नाहीं, अस्खलित आहे, ऐकणाऱ्याला कंटाळा आणण्यासारखें नाहीं. आणि मनामध्यें उत्कृष्ट रीतीनें घेऊन विवरापासून तें श्रोत्याच्या कानावर पडत असल्यामुळें त्याचा उच्चार मध्यम स्वरानें होत आहे. (३१) त्या त्या वर्णाचे संस्कार क्रमानें अंतःकरणावर ठसविण्यास समर्थ, त्वरारहित, विलंबशून्य आणि म्हणूनच हृदयाला आनंद देणारी अशी शुभवाणी हा उच्चारीत आहे. (३२)ऊर, कंठ, आणि शिर या तीन्ही ठिकाणीं अभिव्यक्त होणाऱ्या याच्या या अद्भुत वाणीनें खड्ग उपसून तयार असलेला शत्रू जरी झाला तरी कोणाचें बरें चित्त अनुकूल होणार नाहीं ? ( ३३ ). हे निष्पापा, या प्रकारचा दूत ज्या राजापाशीं नसेल त्याचीं कृत्यें सिद्धीस कशी जाणार ? ( ३४ ). या प्रकारच्या गुणसमुदायांनीं युक्त असलेले कार्यसाधक ज्याच्यापाशीं असतील त्याचे दूताच्या भाषणानें बोधित केलेले सर्वहि मनोरथ सिद्धीस जातील.

## स्वाभिमानी मारुती

रामानें सुचविल्याप्रमाणें लक्ष्मण हनुमानाशीं बोलूं लागला. तो म्हणाला, "सुग्रीवाचे गुण आम्हांस माहीत आहेत व आम्ही त्यालाच शोधित आहोंत." इतक्यावरूनच सुग्रीवाशीं यांचें कांहीं काम आहे हें जाणून त्यानें धूर्तपणें "सुग्रीवाचा मनोरथ आतां परिपूर्ण होईल" असा तर्क बांधून तो आनंदित झाला. (सर्ग ४।१). तो मनामध्यें म्हणाला, "त्या महात्म्या सुग्रीवाला राज्यप्राप्ति अवश्य होणार, कारण हा महापुरुष कांहीं कार्याच्या उद्देशानें येथें आला आहे." रामलक्ष्मणामध्यें राम श्रेष्ठ आहे हें त्यानें तर्कानें जाणलें होतें, व दुय्यमाशीं वाटाघाट करण्यापेक्षां मुख्याशींच बोलणें महत्त्वाचें हा पोंच ठेवून त्याच्याशीं लक्ष्मण बोलला होता, तरी तो रामाकडे वळून त्याच्याशींच बोलूं लागला. यांत मारुतीचा स्वाभिमान दिसून येतो. याहि प्रसंगीं रामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें सर्व हकीकत सांगून सीताशोधासाठीं सुग्रीवाच्या साह्याची कशी जरूर आहे व राम या कामाकरितां सुग्रीवास शरण आला आहे असें डोळयांस अश्रू आणून दीनवाणीनें सांगितलें. हनुमानास यामुळें जास्तच स्फुरण आलें व तो आपल्या मालकाचा मोठेपणा व्यक्त करीत, परंतु रामालाहि चढविण्यासाठीं त्याची स्तुति करीत म्हणाला, "अशा प्रकारचे बुद्धिमान, जितेंद्रिय, क्रोध जिंकलेले आणि वानरराजानें भेट घेण्यास योग्य अशांचें दर्शन झालें ही सुदैवाचीच गोष्ट आहे." (सर्ग ४।२६) नंतर त्यानें मोठ्या खुबीनें सुग्रीवाला वालीनें कसें हांकून दिलें हें थोडक्यांत सांगून तो म्हणाला, "तस्मात् तो सूर्यपुत्र सुग्रीव सीतेच्या शोधासंबंधानें आम्हांसहवर्तमान तुमचें साह्य करील." (४।२८).

## चातुर्याचें उदाहरण

या ठिकाणीं हनुमानाचें चातुर्य फार वरच्या दर्जाचें दाखविलें आहे. वालीच्या वैरामुळें सुग्रीवाचा वनवास व साह्य देण्याचें वचन याच्यामधला दुवा म्हणजे वालीचा वध हा त्यानें मोठ्या खुबीनें सुचविला आहे. मारेकऱ्यासारखें हलक्या दर्जाचें काम सुचवितांना स्पष्ट शब्दांत बोलण्याची सुरवात केली जात नाहीं, व्यंजनेनें तें सुचवावें लागतें. हनुमानानेंहि धूर्तपणानें तेंच केलें. लक्ष्मण त्याचा हेतु समजला व तसें तो रामाजवळ

बोलला. नंतर त्या दोघांस घेऊन हनुमान सुग्रीवाकडे गेला. पण त्यानें त्यांना एकदम सुग्रीवाकडे नेलें नाहीं. तसें करण्यानें सुग्रीवाचें महत्त्व कमी झालें असतें. म्हणून त्यानें रामलक्ष्मणाला ऋष्यमूक पर्वतावर ठेवून आपण एकटाच मलय पर्वतावर सुग्रीवाकडे गेला. याप्रसंगीं त्यानें रामाचें महत्त्व वर्णून तो आपल्यासारख्याचें सख्य जोडण्यास योग्य आहे असें सांगितलें. व त्यानें रामाची व सुग्रीवाची गांठ घालून देऊन त्यांचें सख्य अग्निसाक्षिक करून दिलें. अशा रीतीनें राम–सुग्रीव परस्पर मित्र झाले.

## सुग्रीवाची कानउघाडणी

वालीचा वध झाल्यावर त्याची पत्नी तारा फार शोक करूं लागली. त्या वेळीं वानर सेनापति हनुमान यानें तिचें सांत्वन करण्यासाठीं भाषण केलें. त्यावरूनहि त्याचा शहाणपणा व वक्तृत्व हीं दिसून येतात. (पहा सर्ग २१ श्लोक १ ते १०). त्याचप्रमाणें २६ वे सर्गात सुग्रीवाला राज्याभिषेक करण्याची परवानगी हनुमानानेंच मिळविली आहे. अभिषेकानंतर पावसाळयांत सुग्रीव, रुमा व तारा या दोघींबरोबर आणि इतर तरुण स्त्रियांबरोबर विलास करीत चैनीनें राहिला. त्याला रामाच्या कामाची आठवण राहिली नाहीं. पण जबाबदार प्रधानमंत्री म्हणून हनुमान जागरूक होता. त्यानें सुग्रीवास केलेला सुबोध सर्ग २९ श्लोक १० ते २८ पर्यंत आहे. त्यांत मित्रकार्य करण्याविषयीं परोपरीनें सांगितलें आहे. या भाषणाला 'कालाला उचित' असें पुढील श्लोकांत म्हटलें आहे. कालाला उचित भाषण शहाण्या व धोरणी माणसालाच करतां येईल. तें ऐकून सुग्रीवानें सर्व वानर जमविण्यास हुकूम सोडले.

## हितोपदेशी मंत्री

इकडे पावसाळयाचे दिवस संपले तरी सीताशोधाचें (शुद्धीचें) काम हातीं घेण्याचा उद्योग न दिसल्यामुळें रामास संशय व क्रोध येऊन त्यानें सुग्रीवाची कानउघाडणी करण्यास लक्ष्मणास पाठविलें. लक्ष्मण रागानेंच आला व त्यानें अंगदाला सुग्रीवाकडे पाठविलें. अंगदानें सुग्रीवाकडे जाऊन लक्ष्मण क्रोधाविष्ट झाल्याचें कळविलें. लक्ष्मणाच्या कोपाचें कारण काय हें सुग्रीवाच्या ध्यानीं येईना. तो म्हणाला, "मित्र विनाकारण क्रुद्ध झाला आहे.

त्यामुळें मात्र मला भीति उत्पन्न झाली आहे. यासाठीं लक्ष्मणाच्या कोपाचें कारण काय हें विचारपूर्वक ठरविण्यास त्यानें आपल्या मंत्र्यांस सांगितलें. हनुमान हा मुख्य मंत्री होता. स्वतःच्या तर्कानें जाणून त्यानें केलेलें भाषण सर्ग ३२ श्लोक १० ते २२ पर्यंत दिलें आहे. त्यानें रामाच्या कोपाची योग्य मीमांसा केली असून सुग्रीवाकडून झालेली चूक निर्भीडपणें स्पष्ट केली आहे. हा क्रोध घालविण्याचा उपाय "हात जोडून लक्ष्मणाची कृपा संपादन करणें" हा त्यानें ठासून सांगितला आहे. व खऱ्या सेवकाचें कर्तव्यहि स्पष्टपणें मांडलें आहे. "हितोपदेशाविषयीं नेमलेल्या मंत्र्यांनीं जें कांहीं हित असेल तें राजाला अवश्य सांगितलें पाहिजे आणि म्हणूनच मी भय न बाळगितां निश्चित भाषण करीत आहे" असें बजाविलें. यावरूनहि हनुमानाच्या योग्यतेची अटकळ करितां येते.

## बुद्धिमत्तेची खूण

सीताशोधाकरितां सुग्रीवानें वानरांच्या टोळ्या पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या दिशांस पाठविल्या. हनुमान दक्षिण दिशेस पाठविलेल्या टोळींत होता, व तिचें प्रमुखत्व अंगदाकडे होतें. सर्व विंध्य पर्वत हुडकूनहि सीतेचा शोध न लागण्यानें निराश होऊन शोधासाठीं म्हणून ते स्वयंप्रभेच्या विवरांत शिरले. तेथें तिच्याशीं बोलण्याचें काम हनुमानालाच करावें लागलें. ( सर्ग ५२ ) तिच्या कृपेनें ते त्या विवराबाहेर आल्यावर मुदतीचा महिना टळून गेला असें पाहून अंगद निराश झाला व परत गेलों असतां सुग्रीव आपणास जीवें मारल्या-शिवाय राहणार नाहीं म्हणून येथेंच समुद्रकिनारीं प्रायोपवेशन करूं या असें तो म्हणाला. त्याला बऱ्याच वानरांनीं अनुमोदन दिलें. यावर तारानें उपसूचना आणली, कीं मरण्यापेक्षां स्वयंप्रभेच्या विवरांत जाऊन राहावें. ती जागा सुरक्षित आहे, आपल्याविरुद्ध सुग्रीवाचें कांहीं चालणार नाहीं व तेथें पुष्पें, उदक, भोज्य, व पेय पदार्थ यांची चंगळ आहे. सर्वांना हा विचार पसंत पडला. ( सर्ग ५३). हनुमानाला हें पसंत पडलें नाहीं. तो स्वामिनिष्ठ होता व अंगदानें येथें स्वतंत्र राज्य करावें हें त्याला इष्ट नव्हतें. म्हणून त्या अंगदाला हनुमानानें ताराप्रभृतींपासून वेगळा काढण्याचा उपक्रम केला. ( सर्ग ५४ श्लो. ५ ) प्रथमतः चार उपायांपैकीं भेदाची प्रशंसा

करण्याकरितां आपल्या भाषणाच्या जोरावर त्या सर्व वानरांना विचारदृष्ट्या अंगदापासून फोडलें. (श्लोक ६) आणि याप्रमाणें त्या सर्वांचें मत अंगदाहून भिन्न केल्यावर चौथा उपाय जो दंड त्यानें युक्त अशा नाना प्रकारच्या भीतिजनक वाक्यांनीं अंगदाला तो भय उत्पन्न करूं लागला. (७) हें भाषण ८ ते २२ श्लोकपर्यंत फार उत्तम आहे व यावरून हनुमानाची बुद्धिमत्ता, सुग्रीवाविषयींची निष्ठा व सर्व बाजू लक्षांत घेऊन विचार करण्याची पात्रता दिसून येते.

## समयज्ञता व चातुर्य

संपातीनें दिलेल्या माहितीप्रमाणें १०० योजन समुद्र उडून गेल्यावर लंका बेट लागतें.. हें अंतर तोडून परत येण्याचें सामर्थ्य हनुमानाचे अंगीं आहे असें पाहून त्यालाच पाठविण्यांत आलें; हें लक्षांत घेतल्यास शक्तीच्या बाबतींत त्याचा श्रेष्ठपणा सिद्ध होतो. लंकेंत गेल्यावर त्यानें केलेला शोध व त्याचीं आत्मगत भाषणें त्याच्या निरीक्षण शक्तीचा पुरावा देतात. सीता प्रथम दृष्टीस पडल्यावर "विशाल नेत्रांनीं युक्त असलेल्या या सीतेकरतांच महाबलाढ्य वालीचा व वीर्यामध्यें रावणाची बरोबरी करणाऱ्या कबंधाचा वध झाला (सुं. १६।७) आणि जगद्विख्यात सुग्रीवाला हिच्यामुळेंच वालीनें रक्षिलेलें वानरांचें दुर्लभ ऐश्वर्य प्राप्त झालें." (११) इत्यादि त्याचे विचार त्याच्या धोरणी स्वभावाची जाणीव करून देतात. सीतेचा शोध लावल्यावर तिला आश्वासन दिल्याशिवाय परत गेल्यास ती कदाचित् प्राणत्याग करील यासाठीं तिची भेट कशी घ्यावी या विचारांत त्यानें उलट सुलट केलेल्या कल्पना पाहतां त्याची बुद्धि कुशाग्र होती असें दिसतें. संस्कृत वाणीनें बोलल्यास मी रावण आहें असें तिला भासेल. पण आपण रामगुणकीर्तन केल्यास सीता लक्ष देऊन ऐकेल व मग आपली भेट सीता घेईल वगैरे योजना करून त्यानें सीतेची भेट घेतली आहे. ही भेट त्याच्या अपेक्षेप्रमाणें सुफल झाली. या प्रसंगीं हनुमानाचीं भाषणें कालाला व प्रसंगाला अनुरूप व शहाणपण दाखवणारीं आहेत.

सीतेचा निरोप घेऊन हनुमान निघाला, तेव्हां त्याचे आत्मगत विचार त्याची योग्यता दाखवितात :

कार्ये कर्मणि निर्वृत्ते यो बहून्यपि साधयेत् ।
पूर्वकार्याविरोधेन स कार्यं कर्तुमर्हति ॥ सर्ग ४१-५॥
नह्येकः साधको हेतुः स्वल्पस्यापीह कर्मणः
यो ह्यर्थं बहुधा वेद स समर्थोऽर्थसाधने ॥ ६ ॥

## सांगकाम्या नव्हे

'मुख्य कार्य पार पडल्यानंतर पहिल्या कार्याशीं विरोध न येतां जो अनेक कार्यें पार पाडतो तोच हातीं घेतलेलें काम शेवटास नेण्यास समर्थ होतो (५). अल्पस्वल्प जरी कार्य असलें तरी एकाच उपायानें पार पडेलच असें नाहीं; यास्तव अनेक प्रकारांनीं उपाय योजण्याचें ज्याला माहीत असतें तोच कार्य शेवटास नेण्यास समर्थ होतो. (६). तस्मात् सीतेचा शोध लावणें येवढेंच जरी कार्य करण्याचा माझा प्रथम निश्चय होता, तरी शत्रूचा व आपला युद्धप्रसंग प्राप्त झाला असतां आपणांमध्यें आणि शत्रूमध्यें विशेष काय आहे हें खरें खरें समजून आल्यानंतर जर मी वानराधिपति सुग्रीवाकडे गेलों तर यजमानाच्या आज्ञेप्रमाणें खरें खरें काम मीं केल्यासारखें होईल.' हनुमान हा केवळ सांगकाम्या नव्हता. मालकानें सांगितलेलें काम तर करावयाचेंच, परंतु मुख्य हेतूला पोषक अशीं दुसरीं कृत्यें आपल्या जबाबदारीवर पुरीं पाडावयाचीं अशा हिंमतीचा व आत्मविश्वासवान् असा तो होता. या कामीं चांगलीच बुद्धिमत्ता लागते, व ती हनुमानाचे ठिकाणीं भरपूर होती.

## रामाचा दूत

बागेचा विध्वंस केल्यानें राक्षसांबरोबर युद्धाचा प्रसंग घडवून आणला. अखेर इंद्रजितानें त्याला पकडून नेऊन रावणापुढें उभें केलें. तूं कोण असा प्रश्न झाल्यावर त्यानें "वानरराज सुग्रीवाचा मी दूत आहें व तेथूनच मी येथें आलों आहें," असें उत्तर दिलें. (सुं. ४८।६२) वनाच्या विध्वंसाचें कारण विचारलें असतां साधारणपणें पटेल असें उत्तर त्यानें मोठ्या चातुर्यानें दिलें आहे. तो म्हणाला, "मी वानरच, येथें राक्षस राजाच्या दर्शनाकरितां आलों आहे. तें हें दर्शन मला दुर्लभ आहे असें समजून दर्शनाकरितां मी राक्षस राजाच्या वनाचा विध्वंस केला. कांहीं रामकार्याकरितां

मी तुझ्यासमीप आलों आहें. यास्तव अतुल सामर्थ्यवान रामाचा मी दूत आहे असें समजून, हे प्रभो, माझें हें हितकारक भाषण तूं श्रवण कर." ( सुं. ५१ श्लो. १४ ते १९ ). पुढील सर्गांतील सुग्रीवाचा वकील म्हणून केलेलें भाषण मोठ्या मुत्सद्द्यास शोभण्यासारखें आहे. राजे लोक परस्परांस बंधु म्हणून अनादिकालापासून म्हणत आले आहेत. या ठिकाणींहि भ्राता सुग्रीव असें हनुमान म्हणत आहे, व त्याचा निरोप तुझ्या हिताचा असणार असें तो सुचवित आहे. ५१ व्या सर्गाच्या ४६ व्या श्लोकांत या भाषणास वाल्मीकि

स सौष्ठवोपेतमदीनवादिनः कपेर्निशम्याप्रतिमोऽप्रियं वचः ॥

'दीनवाणीचें अवलंबन न करितां भाषण करणाऱ्या त्या वानराचें तें सयुक्तिक परंतु अप्रिय भाषण' असें वर्णितो. हनुमान हा श्रेष्ठ दर्जाचा वक्ता होता असें सिद्ध होत आहे. हनुमानानें लंकेंत काय काय केलें याचा सारांश सर्ग ५६ श्लोक २३।२४ यांत दिला आहे.

"राक्षसान्प्रवरान्हत्वा नामविश्राव्य चात्मनः ॥
समाश्वास्य च वैदेहीं दर्शयित्वा परं बलम् ॥ २३ ॥
नागरीमाकुलां कृत्वा वंचायित्वा च रावणम् ॥
दर्शयित्वा बलं घोरं वैदेहीमभिवाद्यच" ॥ २४ ॥

## रामाला सल्ला दिला

"श्रेष्ठ श्रेष्ठ राक्षसांचा वध करून, आपलें नांव गाजवून, सीतेला आश्वासन देऊन, अपरिमित सामर्थ्य प्रकट करून, लंकानगरीमध्यें दाणादाण उडवून देऊन, रावणाला फसवून, भयंकर बल प्रकट करून आणि सीतेला अभिवंदन करून" ( २३।२४ ) तो आला.

अंगद प्रमुख वानरांकडे परत गेल्यावर "दृष्टा देवी" इतकेंच संक्षेपानें सांगून हनुमानानें आपला विनय दाखविला आहे. पुढें वर्णन केलें तें तिच्या दुःखी स्थितीचें! आत्मश्लाघा बिलकुल केली नाहीं हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. तोच प्रकार रामाची प्रथम भेट झाली व रामानें "सीता देवी कोठें आहे व माझ्याविषयीं तिचें आचरण कसें आहे" असें विचारलें

तेव्हां दिलेल्या उत्तरांत आहे. ( सर्ग ६५ ). शंभर योजनें समुद्र उल्लंघून लंकेस गेलों व तेथें सीता पाहिली, इतकेंच त्यानें प्रथम सांगून पुढील सर्व भाषण सीतेच्या स्तुतिपर केलें आहे. वीर, वक्ता, मुत्सद्दी इत्यादि गुण हनुमानाचे ठायीं असून विनयसंपन्नतेमुळें त्याच्या या अनेक गुणांस शोभा आली होती. वानरसेनेचा तळ समुद्रावर पडल्यावर रावणाबरोबर कुरापत काढून भांडण करून बिभीषण रामाकडे आला. आकाशांतच उभा राहून आपण आल्याची वर्दी द्या असें तो ओरडला. सुग्रीवानें लक्ष्मणासमक्ष रामाला तें वर्तमान कळविलें. सुग्रीवाचे मतें बिभीषण आपल्याकडे शत्रुभावानें आला आहे, त्याच्यावर तुटून पडून त्याचा नाश करावा. त्याचें बोलणें ऐकून राम हनुमानादिक इतर वानरांस म्हणाला, "तुमचा सल्ला या कामीं काय आहे?" अंगद, शरभ, जांबवान, मैंद यांनीं आपले अभिप्राय दिले; पण ते सर्वच संदिग्ध होते. अमुक स्थिति आहे, अमुकच करावें असें कोणी सांगत नाहीं. "तदनंतर शास्त्र—ज्ञानाचा ज्याला संस्कार झालेला आहे असा मंत्रिश्रेष्ठ हनुमान अर्थानें परिपूर्ण, मधुर, मित व स्पष्ट असें भाषण करूं लागला." (यु. १७।५०) ५१ व ५२ श्लोकांत त्यानें आपला विनय व्यक्त केला आहे. पण इतरांनीं दिलेल्या अभिप्रायावर त्याला टीका करावी लागली. तो म्हणाला, गुणदोषविवेचनासंबंधानें जें सचिवांनीं आपणाला सांगितलें त्यांत मला दोष दिसत आहे. कारण अमुक एक गोष्ट करावी असा त्यांच्या सांगण्यापासून कांहीं एक निश्चय ठरवितां येत नाहीं. (श्लो. ५३) भलत्याच ठिकाणीं हा बिभीषण प्राप्त झाला आहे असें जांबवानानें म्हटलें आहे. (५६) त्यावर हनुमान म्हणतो, कीं ज्याप्रमाणें आपण येथें योग्य ठिकाणीं व योग्य समयीं प्राप्त झाला आहां त्याप्रमाणें तो योग्य ठिकाणीं व योग्य समयींच प्राप्त झाला आहे. रावणापेक्षां आपण उत्तम आहांत असा निश्चय करून आणि उभयतांचे ठिकाणीं असलेले गुणदोष पाहून हा आला आहे (५७) रावणाचे ठिकाणीं दुष्टपणा आणि आपले ठिकाणीं असणारा पराक्रम दृष्टीस पडल्यानंतर त्याचें जें येथें आगमन झालें आहे तें त्याच्या बुद्धीला अनुरूपच आहे. (५८) अखेर तो आपला अभिप्राय स्पष्टपणें देतो. "आपला उद्योग पाहून, रावण दुर्वृत्त आहे असें

अवलोकन करून आणि आपल्या हातून वालीचा वध होऊन सुग्रीवाला अभिषेक झाल्याचें श्रवण करून (६६) राज्याच्या हेतूनें हा समजून उमजून येथें आलेला आहे; आणि असें आहे म्हणूनच त्याचा संग्रह करणें मला उचित दिसत आहे." (६७) हनुमानाचें अनुमान बिनचूक असल्यानें रामास व इतरांस तें पसंत पडलें.

## चांगला बातमीदार

रावणवध झाल्याचें वर्तमान सीतादेवीस कळविण्याचें काम रामानें हनुमानाला सांगितलें तें त्यानें किती उत्तम रीतीनें केलें हें युद्धकांडाच्या ११३ व्या सर्गांत आहे. भरद्वाज आश्रमीं राम पोंचल्यावर व तेथें त्याचा मुक्काम झाल्यावर राम आल्याचें आनंदाचें वर्तमान भरतास कळविण्याची कामगिरी हनुमानावरच पडली व ती त्यानें उत्तम रीतीनें पार पाडली.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून 'माकड' असल्यानें त्याला फारशी अक्कल नव्हती म्हणजे इतर माकडांप्रमाणें तो निर्बुद्ध होता असा जो लोकांचा समज आहे तोहि वाल्मीकि रामायणांत वर्णिल्याप्रमाणें चुकीचा आहे. हनुमान हा सुशिक्षित, विद्वान व चतुर मुत्सद्दी होता.

## चिरंजीवित्वाचें निराकरण

हनुमान चिरंजीव आहे असा एक समज आहे. चिरंजीव म्हणजे दीर्घकाळ वांचणारा. मुळींच मरण नाहीं असा मात्र नव्हे. याला आधार उत्तरकाडांत सर्ग ४० व सर्ग ९९ यांत दिला आहे.

रामाला राज्याभिषेक झाल्यावर त्यानें दोन महिने सुग्रीवादींस ठेवून घेतलें व नंतर त्यांची पाठवणी केली. त्यावेळीं हनुमान नम्र होऊन रामाला म्हणाला : ( उत्तरकांड सर्ग ४० श्लोक १६–१९ )

"स्नेहो मे परमो राजंस्त्वयि तिष्ठतु नित्यदा ।
भक्तिश्च नियता वीर भावो नान्यत्र गच्छतु ॥ १६ ॥
यावद्रामकथा वीर चरिष्यति महीतले ।
तावच्छरीरे वत्स्यंति प्राणा मम न संशयः ॥ १७ ॥

यच्चैतच्चरितं दिव्यं कथा ते रघुनंदन ।
तन्ममाप्यसरसो नाम श्रावयेयुर्नरर्षभ ॥ १८ ॥
तच्छ्रुत्वाहं ततो वीर तवचर्यामृतं प्रभो ।
उत्कंठां तां हरिष्यामि मेघलेखामिवानिलः" ॥ १९ ॥

अर्थः–" हे राजा, तुझे ठिकाणीं सर्वदा माझें पराकाष्ठेचें प्रेम असो; भक्ति अचल राहो. आणि माझ्या मनाचा कल तुझ्याशिवाय दुसरीकडे न जावो. (१६) हे वीरा, जोंपर्यंत भूतलावर रामकथा सुरू राहील तोंपर्यंत माझ्या शरीरामध्यें प्राण राहतील; याविषयीं संशय नसावा. (१७) हे रघुनंदना, पुरुषश्रेष्ठा, हें तुझें कथारूप दिव्य चरित्र मला अप्सरा कथन करोत. (१८) म्हणजे हे वीर प्रभो, वायु ज्याप्रमाणें मेघपंक्ति हरण करून नेतो त्याप्रमाणें मी तुझें चरितामृत श्रवण करून तुझ्या दर्शनासंबंधाची आपली इच्छा पूर्ण करून घेईन."

राम सिंहासनावरून उठला आणि त्याला प्रेमानें भेटून म्हणाला,

" एवमेतत्कपिश्रेष्ठ भविता नात्र संशयः ।
चरिष्यति कथा यावदेषा लोके च मामिका ॥२१॥
तावत्ते भविता कीर्तिः शरीरेप्यसवस्तथा ।
लोकाहि यावत्स्थास्यन्ति तावत्स्थास्यति मे कथा " ॥२२॥

अर्थः–" हे वानरश्रेष्ठ, या तुझ्या म्हणण्याप्रमाणें होईल यांत संशय नाहीं. ही माझी कथा जोंपर्यंत जगतामध्यें राहील, (२१) तोंपर्यंत कीर्तिसहवर्तमान तुझ्या शरीराचे ठिकाणीं प्राण राहतील, आणि जोंपर्यंत त्रैलोक्य राहील तोंपर्यंत माझ्या कथा राहतील." (२२) यानंतर रामानें त्याचे आभार मानिले, व आपल्या गळ्यांतील हार काढून तो त्याच्या गळ्यांत घातला. ते सर्वहि आपल्या घरीं निघून गेले; असें ३० वे श्लोकांत आहे. यावरून हनुमानहि गेला हें उघड आहे.

**बिभीषणाला आशीर्वाद**

रामाच्या निर्याणसमयीं त्यानें सर्वांस बोलाविलें. त्यांत सुग्रीव बिभीषणहि आले. सुग्रीवाला रामानें बरोबर घेतले. त्यावेळीं बिभीषणाला राम म्हणाला,

"यावत्प्रजा धरिष्यन्ति तावत्त्वं वै बिभीषण ॥
राक्षसेंद्र महावीर्य लंकास्थः स्वं धरिष्यसि ॥ २५ ॥
यावच्चंद्रश्चसूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी ॥
यावच्च मत्कथा लोके तावद्राज्यं तवास्त्विह ॥ २६ ॥
शासितस्त्वं सखित्वेन कार्यं ते मम शासनम् ॥
प्रजाः संरक्ष्य धर्मेण नोत्तरं वक्तुमर्हसि" ॥ २७ ॥

अर्थः– "हे बिभीषणा, हे महावीर्यवान् राक्षसाधिपते, जोंपर्यंत भूतलावर प्रजा आहे तोंपर्यंत लंकेमध्यें राहून तूं आपला देह धारण कर. ( २५ ) सूर्य, चंद्र, व पृथ्वी हीं जोंपर्यंत आहेत तोंपर्यंत येथें तुझें राज्य असो. ( २६ ) मित्रत्वानें मीं तुला आज्ञा केली आहे. व तूं माझ्या आज्ञेप्रमाणें वागणें अवश्य आहे. तूं धर्मानें प्रजेचें रक्षण कर. यावर कांहीं एक उत्तर करूं नकोस."

तमेवमुक्त्वा काकुत्स्थो हनूमन्तं तथा ब्रवीत् ।
"जीविते कृतबुद्धिस्त्वं मा प्रतिज्ञां विलोपय ॥
मत्कथाः प्रचरिष्यंति यावल्लोके हरीश्वर ।
तावद्रमस्व सुप्रीतो मद्वाक्यमनुपालयन्" ॥३१॥

अर्थः–याप्रमाणें बिभीषणाला सांगितल्यानंतर राम हनुमानाला म्हणाला, "जिवंत रहाण्याविषयीं तूं निश्चय केला आहेस. यास्तव तूं आपली प्रतिज्ञा निष्फळ करूं नकोस. (३०) जोंपर्यंत जगतामध्यें माझ्या कथा प्रचलित राहातील, तोंपर्यंत माझ्या आज्ञेचें परिपालन करून तूं सुप्रसन्नमनानें भूतलावर स्वस्थ रहा." (३१) याप्रमाणें महात्म्या रामानें हनुमानाला सांगितलें असतां त्याला मोठा हर्ष झाला आणि तो म्हणाला (३२). जोंपर्यंत जगतामध्यें तुझी कथा प्रचलित राहील तोंपर्यंत तुझ्या आज्ञेचें परिपालन करून मी भूतलावर राहीन. ( ३३ ). नन्तर

जांबवन्तं तथोक्त्वा तु वृद्धमब्रह्मसुतं ।
तथा मैन्दं च द्विविदं चैव पंच जांबवतासह ॥३७॥

यावत्कलिश्च संप्राप्तस्तावज्जीवत सर्वदा ॥३५॥

हा शाप कीं वर ?

अर्थः—नंतर वृद्धब्रह्मपुत्र जांबवान, मैंद व द्विविद यांनाहि रामानें तसेंच सांगितलें. आणि जांबवान, हनुमान, बिभीषण, द्विविद व मैंद या पांचांना तो म्हणाला, "जोंपर्यंत कलियुग आहे तोंपर्यंत तुम्ही जिवंत रहा. (३५) "यावत्कलिश्चसंप्राप्तः' याचें भाषांतर शास्त्रीबुवांनीं 'जोंपर्यंत कलियुग आहे तोंपर्यंत.' असें केलें आहे. तें बरोबर दिसत नाहीं. कलियुग लागेपर्यंत असें पाहिजे. तसें म्हटल्यास या पांचहि चिरंजीवांची आयुर्मर्यादा द्वापारयुगाचे अंतीं खलास झाली व ते आतां हयात नाहींत असें होतें. फार तर कलियुगाचा आरंभ झाल्यावर तरी त्यांनीं देह सोडला असला पाहिजे. बिभीषण व हनुमान चिरंजीव आहेत असा समज आहे. पण जांबवान, द्विविद, मैंद यांच्या चिरंजीवित्वाची जाणीव कितीकांना आहे ! चिरंजीवपणाच्या या निव्वळ गप्पा आहेत. त्यांच्यावर विश्वास ठेवण्याचें काम भोळ्याभाबड्यांनीं करावें. अशाप्रकारचें चिरंजीवित्व हा एक शाप होय. दीर्घायु असावें, पण मर्यादेबाहेरचें आयुष्य म्हणजे दुःखपरंपराच. बिभीषण हा भ्रातृद्रोही व नीच मनोवृत्तीचा म्हणून त्याची दुष्कीर्ति कायम रहावी या हेतूनें त्याला रामानें चिरंजीवित्व दिलें, म्हणजे त्याच्या दुष्कृत्याची कायमची जाहिरात केली असें वाटूं लागतें.

मारुतीचा पराक्रम, बुद्धिमत्ता हीं विशेष सरस असल्यानें रामकथा लोकांत आहे तोंपर्यंत मारुतीचें कीर्तिशरीरहि कायमच रहाणार, या हेतूनें 'चिरंजीव हो' असें सांगणें विचाराला पटेल. मर्त्य देहानें जगणें शक्य नाहीं, व तें इष्टहि नाहीं. तसा कोणी जगल्यास तो आपण दुःखी राहून इतरांसहि दुःखीच करील. सनातन्यांच्या मताप्रमाणें आमच्या धर्माचें न बदलणारें म्हणून चिरंजीव स्वरूप आज सर्व हिंदूंच्या अवनतीस व दुःखास कारण झालें आहे. देशकालवर्तमानाप्रमाणें त्यांत सुधारणा होईल तरच आम्ही हिंदु सुखी होऊं व प्रगतीस जाऊं.

ब्रह्मचर्याचें थोतांड

हनुमान हा ब्रह्मचारी होता म्हणजे तो स्त्रीसुखपराङ्मुख होता असा एक समज आहे.

संन्यासी आणि ब्रह्मचारी ।
तरी उभयतां नैष्ठिक ब्रह्मचारी ।
अष्टमैथुनांची परी ।
वर्जनी ब्रह्मचर्याचारीं असावें ॥
–( रंगनाथ योगवासिष्ठ, मनोलय प्रकरण, ओवी ४७३. )

संदर्शनं स्पर्शनं केलिः कीर्तनं गुह्यभाषणम् ।
संकल्पोध्यवसायश्च क्रियानि वृत्तिरेव च ॥
एतन्मैथुनमष्टांगं प्रवदन्ति मनीषिणः ।
विपरीतं ब्रह्मचर्यं एतदेवाष्टलक्षणम् ॥

असा हा ब्रह्मचारी शब्दाचा रूढ अर्थ आहे. पण या शब्दाचा यौगिक अर्थहि चांगला आहे; व तो शब्द चार आश्रमाच्या यादींत येतो. अमरकोषाचा टीकाकार या शब्दाचा विग्रह असा देत आहे.

ब्रह्म वेदः । तदध्यनार्थं
व्रतमपि ब्रह्म । तच्चरतीति णीतिः ।

ब्रह्म म्हणजे वेद. त्याच्या अध्ययनाचें व्रत हाहि ब्रह्मशब्दाला अर्थ आला, तें व्रत आचरतो म्हणून इन् प्रत्यय लागून ब्रह्मचारिन् हें पद सिद्ध होतें. त्याचें प्रथमेचें एकवचन ब्रह्मचारी या शब्दाचा हा मुख्य अर्थ आहे. विद्या शिकणारानें आपलें सर्व लक्ष्य ती संपादन करण्याकडे लाविलें पाहिजे. स्त्रीसमागमाकडे त्याचें चित्त जाऊं नये म्हणून ब्रह्मचारी आश्रमांत स्त्रीत्याग हें महत्त्वाचें अंग ठरलें; यासाठीं

कर्मणा मनसा वाचा सर्वावस्थासु सर्वदा ।
सर्वत्र मैथुनत्यागो ब्रह्मचर्यं तदुच्यते ॥

असा ब्रह्मचारी शब्दाचा अर्थ रूढ झाला. आज रोजीं विद्यासंपादन करणारा असो नसो, तो विवाहित नसेल तर त्याला ब्रह्मचारी म्हटलें जातें. विद्या शिकणाराला ब्रह्मचारी म्हणत नाहींत. आर्यसमाजी मात्र विद्यार्थ्यास ब्रह्मचारी म्हणतात.

हनुमान मारुती हा ब्रह्मचारी होता हें खरें; पण तो ज्ञानसंपादन करणारा विद्यार्थी या अर्थानें ब्रह्मचारी होता, स्त्रीविषयपराङ्मुख या अर्थानें नव्हता असें रामायणावरून दिसतें. रामाची व त्याची प्रथम भेट झाली त्यावेळीं त्याच्याशीं झालेल्या संभाषणावरून तीन वेद व व्याकरण यांचें अध्ययन यानें केलें असलें पाहिजे असें राम म्हणतो. त्याचप्रमाणें त्याची विद्वत्ता पुष्कळच ठिकाणीं दिसून येत आहे. त्याचें बोलणें तर्कशुद्ध व भाषा प्रौढ असते. चांगल्या विद्वानाशिवाय इतरांना हें शक्य नाहीं. वानरांमध्यें याच्या तोडीचा ज्ञानी कोणी नसल्यानें ज्ञान-संपादन करणारा या अर्थी ब्रह्मचारी हें विशेषण त्यांच्या लोकांत प्रसिद्ध असावें. मारुतीच्या विद्वत्तेवरून हा तर्क करण्यांत आलेला आहे. मारुतीच्या घरीं स्त्रिया होत्या यावरून तो स्त्रीपराङ्मुख नव्हता हेंहि दिसून येतें. पहा, किष्किंधा कांड सर्ग ३३. लक्ष्मणाला किष्किंधेंत राजमार्गानें नेलें. तेथें कोणकोणाचीं घरें होतीं ते श्लोक ९।१०।११ यांत दिलें आहे. अंगद, मैंद, द्विविथ, गवय, गवाक्ष, गज, शरभ, विद्युन्मालि, संपाति, सूर्याक्ष, हनुमान, वीरबाहु, सुबाहु, नल, कुमुद, सुषेण, तार, जांबवान, दधिवक्त्र, नील, सुपाटल, सुनेत्र, "याहि महात्म्या वानरश्रेष्ठांचीं मोठीं मजबूत व उत्कृष्ट घरें राजमार्गामध्यें लक्ष्मणानें अवलोकन केलीं." (१२)

या घरांचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :

> पांडुराभ्र प्रकाशानि गंधमाल्ययुतानि च ।
> प्रभूत धनधान्यानि स्त्रीरत्नैः शोभितानि च ॥ १३ ॥

हीं गृहें श्वेतवर्ण अभ्राप्रमाणें प्रकाशणारीं असून सुगंधि द्रव्यांनीं व पुष्पांनीं भरलेलीं होतीं, आणि त्याचप्रमाणें विपुल धनधान्यांनीं तीं संपन्न असून सर्वोत्कृष्ट स्त्रियांनीं सुशोभित झालेलीं होतीं. इतरांबरोबर हनुमानाचाहि वाडा त्या राजरस्त्यावर होता व त्यांतहि सर्व चैनीच्या व सुखोपभोगाच्या वस्तू होत्या. सुगंधी द्रव्य व पुष्पें, धनधान्य हीं सर्व ऐषआराम भोगण्याचीं साधनें आहेत, व यांचा कळस सुंदर स्त्रिया या होत. त्याहि प्रत्येक घरांत बहुत होत्या, तशा मारुतीच्याहि घरीं असल्या पाहिजेत; तशा नव्हत्या व मारुती हा स्त्रीसंग वर्ज करणारा होता असें सांगण्याचा

वाल्मीकीचा उद्देश असता तर त्यानें वरील यादींत हनुमानाचें नांव गाळलें असतें किंवा तो एकच या सर्वांना अपवाद होता असें स्पष्टपणें सांगितलें असतें. बरें, हनुमान हा सुग्रीवाचा अमात्य होता. ज्याला बायका व मुलें नाहींत असा सुखपराङ्मुख सडा फटिंग सुग्रीवाची सेवा करीत राहणेंहि संभवनीय नाहीं. वगैरेवरून पाहतां **मारुती इतरांसारखाच आपल्या बायका घेऊन मोठ्या इतमामानें राहाणारा असा दरबारी माणूस असला पाहिजे असें दिसतें.** सीताशुद्धीसाठीं हनुमान लंकेंत गेला व सीतेला शोधण्यासाठीं त्याला रात्रींच सर्व घरें धुंडावीं लागलीं तेव्हां,

स्त्रीणां मदनविद्धानां दिविचाप्सरसामिव ।
शुश्राव कांचीनिनदं नूपुराणांच निस्वनम्

(सुंदरकांड स. ४ श्लोक ११.)

अर्थः–स्वर्गांतील अप्सराच कीं काय, अशा दिसत असलेल्या व मदनानें व्याकूळ झालेल्या स्त्रियांच्या तोरड्यांचा व कमरपट्यांचा शब्द त्याच्या कानांवर येऊं लागला. (११). हे सर्व विलासाचे प्रकार मारुतीला समजले असें दिसतें. तो खरोखरच स्त्रीविषयपराङ्मुख असता तर तें त्यास समजणें शक्य नव्हतें. रावणाच्या अंतःपुरांत गेल्यावर रावण, "मद्यपान करून व सुरतक्रीडा करून पडला होता, अशाप्रकारें महाकपि हनुमानानें त्याला अवलोकन केलें." (सुं. १०।११) सुरतक्रीडेचा अनुभव असणारालाच ही स्थिति ओळखतां येईल. (सर्ग ११ श्लो. ७।८). त्यांत झोपेमध्यें एकमेकींच्या सौंदर्यासंबंधानें बोलत असून योग्य रीतीनें गायनाचा अर्थ बोलून दाखविणाऱ्या, स्थल व काल यांना अनुरूप असें योग्य भाषण करणाऱ्या, उत्कृष्ट रीतीनें सुरतक्रीडा करणाऱ्या, आणि अलंकारांनीं भूषित झालेल्या हजार स्त्रिया त्या पानभूमीवर असल्याचें त्या वानरसेनाधिपति हनुमानानें अवलोकन केलें. निजलेल्या स्त्रियांत उत्कृष्ट रीतीनें सुरतक्रीडा करणाऱ्या निवडून काढण्याचें काम नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याला कसें होणार? त्यासाठीं अनुभविकच इसम पाहिजे. या बाबतींत जास्त विस्तार करण्याची जरूर नाहीं. युद्धकांडांतील एकच प्रसंग देऊन हा मुद्दा संपवितों.

युद्धकांड ( सर्ग १२८ ) यांत भरद्वाजाश्रमांत रामानें मुक्काम केल्यावर त्याच्या आगमनाची वार्ता सांगण्यास हनुमानाला भरताकडे पाठविलें. तेथें जाऊन त्यानें ती शुभवार्ता भरतास सांगितली. हर्षानें थोडा वेळ त्यास कांहीं सुचेनासें झालें. त्यानें मारुतीला आलिंगन दिलें व तो म्हणाला,

प्रियाख्यानस्य ते सौम्य ददामि ब्रुवतः प्रियम् ॥ ४४ ॥
गवां शतसहस्रंच ग्रामाणां च शतं परम्
सुकुंडलाः शुभाचारा भार्याः कन्यास्तु षोडश ॥ ४५ ॥
हेमवर्णाः सुनासोरुः शशिसौम्याननाः स्त्रियः
सर्वाभरणसंपन्नाः संपन्नाः कुलजातिभिः ॥ ४६ ॥

अर्थः—हे सौम्य प्रियवृत्तांत कथन करणाऱ्या तुला मी काय बरें प्रिय वस्तु अर्पण करूं ? ( ४४ ) एक लक्ष गाई, शंभर उत्कृष्ट गांव आणि कुंडलें व सर्व भूषणें यांनीं युक्त असलेल्या, कुलीन जातिवंत व शुभ आचरण, उत्कृष्ट नासिका व मांड्या, चंद्राप्रमाणें सौम्य मुख व सुवर्णतुल्य कंठ यांनीं संपन्न असलेल्या सोळा कन्या भार्या म्हणून मी तुला अर्पण करतों. ( ४५।४६ ). ही देणगी नाकारली नसल्यानें ती स्वीकारली असलीच पाहिजे. याप्रमाणें मारुतीच्या जनानखान्यांत एकदम सोळा भार्यांची भर पडली. हनुमान बलवान होता व मोठा वीर होता, पण स्त्रीविषयपराङ्मुखता त्याचे ठिकाणीं नव्हती व त्याचें बल विषयपराङ्मुखतेवर अवलंबून नव्हतें. ब्रह्मचर्याच्या पालनानें अचाट सामर्थ्य येतें या समजुतीस आधार नाहीं.

आज हनुमानाविषयीं भाविक लोकांचे समज काय आहेत व ते कसे खोटे आहेत हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. तो रामाचा एकनिष्ठ सेवक होता ही समजूत अगदीं खोटी आहे. तो अव्वलपासून अखेरपर्यंत सुग्रीवाचा नोकर. सुग्रीवानें सांगितल्यावरून तो रामाचे कामगिरीवर गेला व ती त्यानें उत्तमप्रकारें पार पाडली.

तो शेपटीवाला माकड अशी दुसरी समजूत आहे व त्यामुळें तो निर्बुद्ध असावा असेंहि समजलें जातें. हे दोन्हीहि समज चुकीचे आहेत. तो

मनुष्यच होता व तो विद्वान्, बहुश्रुत आणि चाणाक्ष होता. तो चिरंजीव आहे. म्हणजे आजहि हयात आहे अशी समजूत आहे. तीहि विचारास न पटणारी आहे. ही कथा उत्तरकांडांतील आहे व उत्तरकांड प्रक्षिप्त आहे. तसें न मानलें तरी माणसाचें आयुष्य मर्यादित आहे.

तो ब्रह्मचारी म्हणजे स्त्रीविषयपराङ्मुख होता हा समजहि रामायणांत जे थोडे उल्लेख सांपडले त्यावरून खोटा ठरतो. त्याला पूर्वींच बायका होत्या व भरतानें त्यांत सोळांची भर घातली.

हनुमान ही रामायणांतील एक श्रेष्ठ दर्जाची विभूति आहे. सुग्रीवाची सेवा पतकरल्यावर त्याच्या पडत्या काळींहि बायकांची आशा सोडून तो सुग्रीवाबरोबर अरण्यांत गेला व त्यानें मालकाबरोबर कष्ट सोसले. मोठ्या धूर्तपणानें राम व सुग्रीव यांचा स्नेह जुळवून आणून वालीचा घात रामाकडून करविला, व सुग्रीवास राज्यप्राप्ति करून दिली. सुग्रीवाबरोबर लंकेवर हल्ला चढवून मोठा पराक्रम केला. युद्धांत त्याचा पहिला नंबर असे तसा मसलतीच्या कामींहि त्याचा मुत्सद्दीपणा अव्वल दर्जाचा असे. याप्रमाणें वाल्मीकि रामायणाप्रमाणें हनुमान हा एक श्रेष्ठ पुरुष आहे. पण त्याच्यावर देवत्वाचा आरोप करून त्यावर तेलशेंदराचें चोपडण घातल्यामुळें त्याच्या थोर गुणांची आम्हांस विस्मृति झाली आहे.

—महाराष्ट्र शारदा, डिसेंबर-जानेवारी १९३५–३६.

# रामायणांतील आणखी कांहीं स्थळें

शृंगबेरपुरः— ही गुह नामक निषादाधिपतीची राजधानी. अयोध्येहून राम दुपारीं निघाला असें धरलें तर तो संध्याकाळीं तमसेवर पोंचला व दुसरे दिवशीं शृंगबेरपुरास गेला असें लिहिलें आहे. आजच्या अयोध्येहून अंतर फार तर ६० मैल होईल. पण मग शरयू हीच गोग्रा मानावी लागते. तिचा गंगेशीं झालेला संगम पाटणा शहरापासून फारसा दूर नाहीं. म्हणजे आज जी अयोध्या दाखविली जाते तेथून शृंगबेरपुराचें अंतर फार जास्त पडतें. याबद्दलचे विचार पूर्वींच दिले आहेत. त्यावरून अयोध्येप्रमाणेंच शृंगिबेरपुर हेंहि गांव आर्यावर्तांतील नसावें असें वाटूं लागतें. संस्कृत भाषेच्या साहाय्यानें नांवाचा अर्थ केल्यास कसा अनर्थ होतो हें दाखविलें आहे. कुबेर शब्दाचाहि संस्कृताभिमान्यांनीं ओढूनताणून भलताच अर्थ केला आहे. हा कुबेर यक्षांचा राजा असून शंकराचा मित्र आहे व हा फार कुरूप आहे. याला तीन पाय, एक डोळा, आठ दांत आहेत असें पुराणांत वर्णन आहे. कुरूप देवांची आम्हांला मोठी हौस!

इजिप्त, पालेस्ताईन, अरबस्तान, वगैरेकडील भाषांना सेमिटिक भाषा म्हणतात. आर्य भाषा याहून अगदीं भिन्न आहेत. म्हणजे भाषांचीं दोन मोठीं कुलें आहेत. एक आर्य व दुसरें सेमिटिक. ग्रीक, लाटिन, संस्कृत, फारशी, झेंद वगैरे आर्यकुली भाषा. अरबी, यहुदी, पुराण इजिप्तची या सेमिटिक कुलांतील. या सेमिटिक भाषांत कबीर या शब्दाचा अर्थ थोर असा आहे. पुराण मिसरांत कबीरि या नांवाचे देव होते व त्यांचा दर्जा इतर देवांपेक्षां कधीं कधीं खालचा समजत. पता, सेकरी, ओसिरि असे तीन कबीरि मानीत किंवा हीं तीन नांवें एकाचींच मानीत. फिनिशियन लोक कबीरि आठ आहेत असें मानीत.

आमचा कुबेर हा यक्षांचा राजा. यक्ष हे देवयोनीचे पण जरा कमी दर्जाचे. यावरून कुबेर हा इजिप्तच्या कबीरीचें हिंदी रूप दिसत आहे.

शृंगिबेर हें संस्कृतरूप आहे. इजिप्तचें रूप सेरेन+कबीर असें होतें. या कबीराचें देऊळ मेंफिस म्हणजे अजादोंमध्यें होतें. जवळच तेल्-एल्-कबीर या नांवाचा पर्वतहि आहे.

पालेस्ताईन देशाच्या दक्षिणेस कबीरि या नांवाचे लोक राहात. ते लुटारू, दरवडेखोर समजले जात. रामायणांतहि शृंगबेरपुरचा राजा निषादांचा अधिपति आहे. निषाद ही एक गुन्हेगार, दरवडे घालणारी जात समजली जाई. याप्रमाणें विचार करितां निषाद व त्यांचें शहर शृंगबेरपूर हीं दोन्हीहि इजिप्त देशांतील. लुटारी कबीरींचा उल्लेख संस्कृत भाषेंत निषाद या शब्दानें केला आहे असें दिसत आहे. याप्रमाणें अयोध्या व शृंगबेरपुर दोनहि ठिकाणें अर्यावर्तांतील नाहींत. वाल्मीकि रामायणांत दिलेल्या वर्णनांवरून तीं परदेशीच असावींत. इजिप्तच्या पुराण इतिहासावरून तीं दोन्ही इजिप्तांतली असावीं असें अनुमान होतें.

**चित्रकूट**—आज प्रयागपासून ७५ मैलांवर एक साधारणशी टेकडी दाखवतात व हा रामाचा चित्रकूट म्हणतात. रामायणांत हें अंतर २०।२५ मैलच आहे असें सांगितलें आहे.

चित्रकूट यांत दोन पदें आहेत. चित्र व कूट. चित्र याचा अर्थ १. चकचकीत. २. चित्रविचित्र रंगाचा. कूट म्हणजे ढीग किंवा शिखर. पर्वतासंबंधीं बोलावयाचें असल्यास चित्रं कूटं यस्य सः, ज्याचें शिखर चित्रविचित्र किंवा चकचकीत आहे तो. साधारणसा डोंगर असल्यास ज्याचा ढीग चकचकीत आहे तो. असा पर्वत किंवा डोंगर प्रयागजवळ नाहीं. पण मिसरांतील मेंफिस म्हणजे अजादोंजवळ नदीच्या पलीकडील तीरावर पांढऱ्या संगमर्मरच्या खाणी आहेत व त्या सूर्याच्या उन्हांत फार चकचकीत दिसतात. याला तुरा पर्वत म्हणतात. याला समांतर असा उत्तरेच्या अंगास दो शिरि म्हणजे रक्तपर्वत आहे. यालाहि चित्रकूट म्हणतां येईल. असे चित्रकूट या प्रांतांत आणखीहि आहेत. एकूण, चित्रकूट इकडचा नसून इजिप्तचा असावा.

**नंदिग्राम**—हिंदुस्थानांतील अयोध्येजवळ नंदीचें देऊळ असल्याचा दाखला मिळत नाहीं. दक्षिण हिंदुस्थानांत अशीं नंदीचीं देवळें आहेत.

पण तीं अयोध्येपासून फार दूर. मिसरचा जुना इतिहास या बाबींत चांगला प्रकाश पाडतो. तेथें ऑसिरिस या नांवाचा देव होता. आमचा शिव किंवा शंकर व ऑसिरिस एकच. या देवाला सोडलेले बैल असत. त्यांस ऑसिरिसचे अवतार समजत. ते त्यांच्याकरितां मुद्दाम बांधलेल्या देवळांत राहात. ते मेल्यावर त्यांच्या प्रेतांत मसाला भरून त्यांची ममी करून त्या ममी एका भुयारांत ठेवल्या जात. स्त्राबो नांवाच्या ग्रीक इतिहासकारानें या देवळाचें वर्णन प्राचीन कालीं केलें आहे. त्याप्रमाणें शोध करितां सन १८५० सालीं मारिएट याला हें एपिसचें देऊळ व नंदींची ममी ठेवण्याची जागा हीं दोन्ही सांपडलीं. ही ममी ठेवण्याची जागा मेंफिसजवळच्या सक्कारा या गांवीं होती. तेथें जमिनीखालीं खडकांत लेणीं कोरून त्यांत या बैलांच्या ममी ठेवीत. रामायणांतील नंदिग्राम हें सक्कारा गांव असावें. एपिस व बसव हे शब्द एकच आहेत. बसव हा शब्द द्रविड भाषेंत नंदीचा वाचक आहे. चित्रकूट, नंदिग्राम हीं दोन्हीहि आर्यावर्तीय नव्हत. तीं इजिप्शिन असावीं असा पुरावा मिळतो.

दंडका–दंडकारण्य

दण्डक– एक इक्ष्वाकुपुत्र हा लहानपणापासून मूढ व उन्मत्त असे. हा विंध्याद्रि व शैवल या पर्वतांमधील प्रदेशाचा राजा. यानें एकदां आपल्या भृगुकुलोत्पन्न गुरुकन्येवर बलात्कार केल्यामुळें गुरूच्या शापानें याचा नाश झाला व तो देश अरण्यप्राय झाला. म्हणून त्यास दण्डकारण्य असें नांव पडलें. दंडकाला शिक्षा करण्यासाठीं म्हणून या प्रदेशावर चिखलाचा पाऊस पडला व त्याखालीं सर्व दडपून गेलें. याचा अर्थ हा चिखलाचा प्रदेश असावा. गंगेच्या मुखाजवळ असा प्रदेश आहे. पण रामायणांत सांगितलेली दण्डका तेथें नव्हती. ती चित्रकूट पर्वताजवळ होती. चित्रकूट पर्वत तर प्रयागजवळ नाहीं. तो इजिप्तमधील तुरा किंवा दोशिरीपर्वत धरल्यास तेथें चिखलाचे प्रदेश नाईल नदीच्या मुखांजवळचे आहेत व त्याला हें दंडकेचें वर्णन पूर्णपणें लागू पडतें. या प्रदेशाला देन्देरा म्हणजे दहातायरा असें म्हणत. याजवळच झोआनतानिस गांव होतें. जनस्थान हें त्याचें संस्कृतीकरण आहे. येथें खर व त्याची फौज असे. रामानें तिचा नाश केला.

पंपा व किष्किंधा यांचा विचार वाली कोण होता याचा तपास करतांना करणें बरें. पंपा एक सरोवर होतें व एकदां ती नदी होती असेंहि आढळतें व किष्किंधा ही नगरी होती ती अमुकच असें सांगणें कठीण आहे.

लंका—रामाचा मुख्य शत्रु रावण व त्याची राजधानी लंका. हें बेट आजचें सिलोन नव्हे. कारण रामायणांत दिलेलें लंकेचें वर्णन सिंहलद्वीपाशीं मुळींच जुळत नाहीं. रामेश्वरापासून तें शंभर योजन नाहीं. तें मोठ्या उंच डोंगरावर वसलेलें नाहीं. आर्य लोकांना माहीत असलेल्या लंका बेटाचा उल्लेख ज्योतिषशास्त्रांत येतो. हें शहर विषुववृत्तावर अवंतीच्या थेट दक्षिणेस होतें. पहिला मेरिडियन (अक्षांश) या दोन स्थळांतून जात असे. सीलोन बेट विषुववृत्तावर नाहीं व अवंतीच्या थेट दक्षिणेसहि नाहीं. यामुळें त्या बेटास लंका हें नांवच योग्य नाहीं. वास्तविक पहातां अशोकाचा पुत्र सीलोनला जाण्यापूर्वीं आर्यांना सीलोनची विशेषशी माहिती नव्हती. लंका याचा अर्थ कोणतेंहि बेट असा घ्यावा लागेल.

रामाची लंकेवरची स्वारी फार थोड्या मुदतीची आहे व म्हणून ती फार दूरची असणें शक्य नाहीं. या मुद्याचा जरा बारकाईनें विचार करूं.

वालिवध श्रावणांत झाला.

पूर्वोऽयं वार्षिको मासः श्रावणः सलिलागमः ।
प्रवृत्ता सौम्यभ्य चत्वारो मासा वार्षिकसंज्ञिताः ॥
(कि. कां. सर्ग २६ श्लोक १४)

कार्तिके समनुप्राप्ते त्वं रावणवधे यतः ॥
(कि. कां. स. २६।१७)

वर्षाः समयकालं तु प्रतिज्ञाय हरीश्वरः ।
व्यतीतांश्चतुरो मासान्विहरन्नावबुध्यते ॥
(कि. कां. ३०।७८)

मार्गशीर्षांत सीतेचा शोध करण्यासाठीं हनुमानादि वानरांस पाठविलें व त्यांस एक महिन्याची मुदत दिली होती व ती मुदत पुरी होत आली

म्हणून वानर प्रायोपवेशनास बसले होते. त्या सुमारास हनुमान लंकेंत गेला तेव्हां सीताहरणास दहा महिने झाले होते. म्हणजे माघअखेरीस किंवा फाल्गुनच्या सुरवातीस सीतेला रावणानें नेलें होतें. यापुढील दोनच महिन्यांत राम किष्किंधेहून निघाला व समुद्रावर जाऊन तेथें शतयोजन सेतु त्यानें बांधला व लंकेस जाऊन रावणाबरोबर युद्ध करून रावणवध त्यानें केला, अशी रामायणकथा आहे. आज दाखवित असलेली किष्किंधा जर खरी असेल आणि सीलोन बेट हीच जर लंका असेल तर किष्किंधेहून समुद्रापर्यंत जाण्यास व पूल बांधण्यास दोन महिने आजच्या कालींहि पुरावयाचे नाहींत. मग तेव्हां प्रवाससाधनें अनुकूल नसतां ही हकीकत घडली हें विश्वास ठेवण्यासारखें बिलकूल नाहीं.

याप्रमाणें विचार करतां नारदानें सांगितलेल्या छोट्या रामायणांत दिलेलीं गांवांचीं नांवें व त्यांचीं वर्णनें हिंदुस्थानांतील नव्हेत असेंच निःसंशय दिसून येत आहे. रामायणांत स्थळांसंबंधानें वर्णनें अगदींच त्रोटक व जीं दिलेलीं आहेत तसली स्थिति आर्यावर्तांत कोठेंहि सांपडणें कठिण.

किष्किंधेपासून लंकेपर्यंत वाटेंत शहरें, नद्या, पर्वत वगैरे कांहीं लागलींच नाहींत काय? कारण कोणाचेंहि नांव दिलेलें नाहीं. ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. यावरून हें रामाचें हिंदी आक्रमण निव्वळ काल्पनिक दिसत आहे.

स्थळावरून विचार करीत असतां नारदीय रामायणांत उल्लेख नसलेल्या एका स्थळाचा निर्देश करणें अयोग्य होणार नाहीं. राम वगैरे विवाह करून मिथिलेहून परत आल्यावर भरत आपल्या मामाबरोबर आजोळीं गेला. तो तिकडे बारा वर्षें राहिला. आईबापांची त्यास आठवण होई व इकडे आईबापांसहि त्याची आठवण होई, पण त्यास या दीर्घ कालांत आणण्याची तजवीज झाली नाहीं हें आश्चर्य आहे. दशरथ मरण पावल्यावर त्यास स्वार पाठवून आणविलें आहे. त्याच्या प्रवासाचा विचार करतांना केकयांचें गिरिव्रज व अयोध्या यांमधील प्रदेशांची तपासणी करितां येईल. अयोध्या कांडाच्या ६८ वे सर्गांत दूत अयोध्येहून केकयाला जाण्याची कथा आहे.

दत्तपथ्यशना दूता जग्मुः स्वं स्वं निवेशनम् ।
केकयांस्ते गमिष्यन्तो हयानारुह्य संमतान् ॥१०॥

अर्थः—मार्गात पडणाऱ्या भोजनाकरितां ज्यांच्यापाशीं द्रव्य दिलें आहे असे ते दूत आपणाला पसंत अशा अश्वांवर आरूढ होऊन केकय देशाला जाण्याकरितां आपआपल्या घरीं गेले. (१०)

ततः प्रास्थानिकं कृत्वा कार्यशेषमनन्तरम् ।
वसिष्ठेनाभ्यनुज्ञाता दूताः संत्वरितं ययुः ॥११॥

तदनंतर जाण्याकरितां उरलेसुरलेली तयारी करून वसिष्ठ मुनींनीं अनुज्ञा दिलेले ते दूत सत्वर चालते झाले. ॥११॥

न्यन्तेनापरतालस्य प्रलंबस्योत्तरं प्रति ।
निषेवमाणास्ते जग्मुः नदीं मध्येन मालिनीं ॥ १२ ॥
ते हास्तिनपुरे गंगां तीर्त्वा प्रत्यङ्मुखं ययुः ।
पंचालदेशमासाद्य मध्येन कुरुजांगलम् ॥ १३ ॥
सरांसि च सुफुल्लानि नदीश्च विमलोदकाः ।
निरीक्षमाणाजग्मुस्ते दूताः कार्यवशाद् द्रुतम् ॥ १४ ॥
ते प्रसन्नोदकां दिव्यां नानाविहगसेवितां ।
उपातिजग्मुर्वेगेन शरदण्डां जलाकुलाम् ॥ १५ ॥
निकूलवृक्षमासाद्य दिव्यं सत्योपयाचनम् ।
अभिगम्याभिवाद्यं तं कुलिंगां प्राविशन्पुरीम् ॥ १६ ॥
अभिकालं ततः प्राप्य तेजोभिभवनाच्च्युताः ।
पितृपैतामहीं पुण्यां तेरुरिक्षुमतीं नदीम् ॥ १७ ॥
अवेक्ष्यांजलिपानांश्च ब्राह्मणान्वेदपारगान् ।
ययुर्मध्येन बाल्हीकान् सुदामानं च पर्वतम् ॥ १८ ॥

विष्णोः पदं प्रेक्षमाणाः विपाशां चापि शाल्मलीम् ।
नदीर्वापितटाकानि पल्वलानि सरांसि च ॥ १९ ॥
पश्यन्तो विविधांश्चापि सिंहान्व्याघ्रान्मृगान्द्विपान् ।
ययुः पथातिमहता शासनं भर्तुरीप्सवः ॥ २० ॥
ते श्रांतवाहना दूताः विकृष्टेन सता पथा ।
गिरिव्रजं पुरवरं शीघ्रमासेदुरंजसा ॥ २१ ॥
भर्तुः प्रियार्थं कुलरक्षणार्थं भर्तुश्च वंशस्य परिग्रहार्थम् ।
अहेडमानास्त्वरया स्म दूता रात्र्यां तु ते तत्पुरमेव याताः ॥२२॥

अर्थः—अपरताल देशाच्या पश्चिम बाजूला आणि प्रलंब देशाच्या उत्तर बाजूला असलेल्या मालती नदीवर उतरून ते त्या नदींतून पलीकडे गेले. (१२) (ईशान्य दिशेस जाण्याकरितां निघालेले) ते दूत पंचाल देशाला येऊन हस्तिनापुरासमीप गंगा उतरल्यावर पश्चिमेकडे वळून कुरु-जांगल देशाला जाणाऱ्या मधल्या रस्त्यानें चालले. (१३) पुष्पांनीं फुललेलीं सरोवरें आणि निर्मळ उदकानें युक्त असलेल्या नद्या मार्गामध्यें दृष्टि पडत असतांनाहि ते दूत (मध्यें न थांबतां) जरुरीच्या कामामुळें सत्वर पुढें चालते झाले. (१४) निर्मल उदक, नाना प्रकारचे पक्षी यांनीं सेवित आणि उदकानें क्षुब्ध अशा शरदंडा नामक दिव्य नदीसमीप जाऊन ते ती नदी ओलांडून पुढें गेले (१५). शरदण्डा नदीच्या पश्चिम तीरावर अभिवंदन करण्यास योग्य असलेल्या सत्योपयाचन नामक दिव्य वृक्षांशीं गेल्यावर दूतांनीं त्याला प्रदक्षिणा केली आणि नंतर ते कुलिंगा नामक राजधानीमध्यें प्रविष्ट झाले (१६). तदनंतर तेजोभिभवन गांवांतून निघून अभिकाल नामक गांवाला आल्यावर इक्ष्वाकूंचा पिता व पितामह यांचा जिच्याशीं संबंध आहे अशी पुण्य इक्षुमती नदी ते तरून गेले. (१७) बाल्हीक देशांत राहणाऱ्या वेदपारंगत ब्राह्मणांना ओंजळींनीं पाणी पितांना पाहून ते दूत बाल्हीक देशांतून सुदाम पर्वताला चालते झाले. (१८) तदनंतर सुदाम पर्वतावर असलेलें विष्णूचें स्थान पहाण्याचा उद्देश मनांत धरून आणि विपाशा व शाल्मली या नद्या अवलोकन करून

नद्या, वापी, तडाग, तळीं, सरोवरें, नाना प्रकारचे सिंह, व्याघ्र, मृग आणि गज अवलोकन करीत करीत त्यांना पाठविणाऱ्या प्रभु वसिष्ठाची आज्ञा सिद्धीस नेण्याची इच्छा धरणारे ते दूत मोठ्या मार्गानें चालते झाले. ( २० ) नंतर उपद्रवरहित असा बराच लांब मार्ग चालून आल्यामुळें वाहनें श्रांत होऊन गेलेले ते दूत गिरिव्रज नामक श्रेष्ठ नगराला अनायासें सत्वर गेले. ( २१ ) प्रभु वसिष्ठाची मर्जी संपादन करण्याकरितां, प्रजाकुल रक्षण करण्याकरितां आणि दशरथ राजाच्या वंशजांचें जें वंशपरंपरागत राज्य त्याचा भरताकडून स्वीकार होण्याकरितां उपेक्षा न करणारे ते दूत रात्रींच्या रात्रींच त्वरेनें त्या नगराला चालते झाले. ( २२ ).

या दूतांना प्रवास करण्यास किती दिवस लागले हें सांगितलेलें नाहीं. परंतु भरत आपल्या आजोळाहून निघाल्यापासून अयोध्येस पोंचला तोंपर्यंत सात रात्री गेल्या होत्या असें सांगितलें आहे. म्हणजे सात दिवस व सात रात्रींचा त्याचा प्रवास होता. यांतील सहा दिवस त्याचे सैन्याबरोबरच गेले व त्या सैन्यांत हत्ती, घोडे, उंट असून गाढवें व बैल हीं जनावरें व पायांनीं चालणारे शिपाईहि होते. म्हणजे हा प्रवास दर दिवसाला २५।३० मैलांपेक्षां जास्त होणें शक्य नाहीं. शेवटीं भरतानें घोड्यावरून दौड केली तीहि ४०।५० मैलांपेक्षां जास्त असणें शक्य नाहीं. एकंदरींत सात दिवसांचा प्रवास २०० मैलांपेक्षां जास्त होणें संभवनीय नाहीं.

आजच्या अयोध्येपासून सिंधु नदापर्यंतचें अंतर यापेक्षां पुष्कळच जास्त आहे. म्हणून केकय हा देश आर्यावर्तांतच होता असें म्हणावें लागेल. पण आजचें बाल्ख शहर हें प्राचीन बाल्हीक म्हणतात.

भरत आजोळीं १२ वर्षें राहिला. त्यास दशरथानें त्या मुदतींत बोलविलें नाहीं. केकय देश ७ दिवसांत पोंचण्याइतका जवळ असता तर आईच्या भेटीसाठीं तरी त्याच्या कैक फेऱ्या झाल्या असत्या. तशा त्या झालेल्या नसल्यानें केकय देश पुष्कळच दूर असला पाहिजे असें अनुमान होतें.

केकय देशाचा राजा भरताचा आजा याचें नांव अश्वपति आहे. यांत कांहीं तरी अर्थ भरलेला आहे. त्याच्या सैन्यांत व देशांत घोड्यांचा मोठा भरणा असून आजूबाजूच्या देशांत त्यांचा तोटा असावा. अश्वपतीनें

भरताला देणगी दिली आहे तिचा विचार करणें योग्य होईल.

“ तस्मै हस्त्युत्तमांश्चित्रान्कंबलानजिनानि च ।
सत्कृत्य केकयो राजा भरताय ददौ धनम् ” ॥
( अयोध्या काण्ड सर्ग ७० श्लोक १९ ).

अंतःपुरेतिसंवृद्धान् व्याघ्रवीर्यबलोपमान् ।
दंष्ट्रायुक्तान्महाकायान् शुनश्चोपायनं ददौ ॥२०॥
रुक्मनिष्कसहस्रे द्वे षोडशाश्वशतानि च ।
सत्कृत्य केकयीपुत्रं केकयो धनमाविशत् ॥२१॥

यांतील उत्तम चित्रविचित्र कंबलें, वाघाच्या बलाचे कुत्रे आणि सोळाशें घोडे या बाबी लक्षांत घेण्यासारख्या आहेत. कंबल म्हणजे लोकरीचें वस्त्र. पण या ठिकाणीं तें उत्तम शालीसारखें चित्रविचित्र मौल्यवानच घेतलें पाहिजे. शिकारी कुत्रे घरीं वाढविलेले दिले आहेत. ते शिकारी मोठे कुत्रे होते. यावरून सदरचा मुलूख डोंगराळ असावा व थंड हवेचा असावा. त्याशिवाय अत्यंत बारीक व मृदु अशी लोकर मिळणें कठीण व कुत्रींहि मोठीं असणें कठीण. म्हणजे हा मुलुख आजच्या आर्यावर्तांतील होता असें म्हणतां येत नाहीं.

ऐरावतानैंद्रशिरान्नागान्वै प्रियदर्शनान् ।
खरान् शीघ्रान्सुसंयुक्तान्मातुलोऽस्मै धनं ददौ ॥ २३ ॥

ऐरावत कुलांतील आणि इंद्रशिरनामक देशांतील दिसण्यांतहि मनोहर असलेले गज आणि उत्कृष्ट रीतीचें सामानसुमान घातलेले शीघ्रगामी खर असें धनहि मातुलानें त्याला दिलें. ( २३ ) हत्ती देणें हें योग्यच. पण शीघ्रगामी खर यांना येथें धन म्हटलें आहे व ते खर स्वारीचे आहेत; ही गोष्ट लक्षांत घेतली असतां खर म्हणजे गाढव हें मोठें प्रतिष्ठेचें वाहन केकय देशांत होतें हें स्पष्ट होतें. म्हणजे हा देश हिंदुकुश पर्वताच्या पलीकडे कोठेंतरी असला पाहिजे. इतकेंच नव्हे तर आजचें अफगाणिस्तान व इराण हा देश मूळचा आर्यांचाच असल्यानें त्याच्याहि पलीकडचा हा देश असला पाहिजे.

सात दिवसांत भरत अयोध्येस पोंचला ही गोष्ट संभवनीय मानावयाची असल्यास अयोध्या आज दाखवितात ती नसून तिकडेच कोठें तरी असली पाहिजे. मेंफिस म्हणजे ग्रीकांची (यवनांची) अजादों ही अयोध्या असावी असें वर दाखविलेंच आहे. तसें असल्यास केकय देश असूरियांत असावा.

रामायणांत वर्णिलेला दूतांचा केकय देशाला जातां वेळचा मार्ग आणि केकय देशाहून येण्याचा भरताचा मार्ग हे दोन्ही आजच्या अयोध्येस रामाचें राज्य होतें असें मानल्यास निव्वळ काल्पनिक दिसतात. दूत जातांना त्यांस प्रथमतः मालती नदी लागली. भरत दुसऱ्या वाटेनें आला असला तरी त्याला ही नदी लागावयास पाहिजे होती. दूत हस्तिनापुराजवळ गंगा उतरून गेले. पण हस्तिनापुराजवळ गंगा नदी नाहीं, यमुना आहे. गंगा हा शब्द सामान्य नदीचा वाचक म्हणून प्रयोजिला आहे असें म्हटलें तरच वाल्मीकीची अब्रू राहील. रामायणावरील टीकाकाराला हीच अडचण आल्यामुळें गंगा म्हणजे कोणतीहि नदी असा अर्थ त्यास करावा लागला. दूतांना गिरिव्रजाजवळ सुदाम पर्वत लागला तर भरताला सुदामा नदी लागली. पंपा पुष्किरिणीच्या संबंधांतहि पंपा नांवाची नदी दिली आहे. कवीच्या इच्छेस येईल त्याप्रमाणें नदी, पर्वत वगैरेस नांवें देण्यांत येत असें दिसतें.

रामायणास इतिहास म्हणतात व त्यांत दिलेली सर्व हकीकत या आर्यावर्तांत व दक्षिणेंत मिळून घडली असा समज आहे. पण रामायणांत दिलेली हकीकत या कामीं अगदीं कुचकामी आहे. रामायणांत सांगितलें याशिवाय या संबंधाचा अन्य पुरावा बिलकूल नाहीं. यासंबंधानें कोठेंहि कोरीव लेख नाहीं, चित्रें खोदलेलीं नाहींत किंवा दुसरा कसलाहि पुरावा नाहीं. यामुळें किष्किंधा, पंपा, पंचवटी, जनस्थान वगैरे स्थळें अनेक ठिकाणीं दाखविण्यांत येतात. ही गोष्ट विचारांत घेतल्यास रामायणकथेचें क्षेत्र हिंदुस्थान नसून दुसरेंच असलें पाहिजे असें वाटतें.

नारदीय रामायणांत पुरुष-स्त्रियांचीं अनेक नांवें आलीं आहेत. त्यांचा विचार करून या शंकेवर विशेषसा प्रकाश पडणारा नाहीं. यासाठीं तो प्रयत्न करण्याचें कारण नाहीं.

महाराष्ट्र-शारदा-फेब्रुवारी १९१६

# रामायणाचें मूळ

आंध्र प्रांतांतील मल्लादि वेंकटरत्नम् यांनीं प्रथमतः या विषयावर ग्रंथ लिहून रामायणाच्या इतिहासाचें मूळ इजिप्तांत आहे असें प्रतिपादिलें. त्यावरून रामायणाचा अभ्यास या नव्या दृष्टीनें करूं लागल्यावर काय काय नजरेस आलें हें मागील तीन लेखांत दिलेलें आहे. रामायणकथा परदेशी आहे. तिची माहिती वाल्मीकीस मुळींच नव्हती. नारदासारख्या प्रवाशा-कडून ती वाल्मीकीस मिळाली असें रामायणाच्या पहिल्याच श्लोकावरून अनुमान होतें. पहिल्याच सर्गांत नारदानें वर्णिलेलें रामाचें चरित्र आहे व त्याचाच विस्तार पुढील रामायणांत केलेला आहे. या नारदीय रामायणांत स्त्री-पुरुषांचीं अनेक नांवें आलीं असून स्थलांचींहि कांहीं नांवें नमूद केलीं आहेत.

**रामकथा इजिप्तमधली ?**

राम हा आर्यावर्तांतील सूर्यवंशी राजा व त्याचा यथातथ्य इतिहास वाल्मीकीनें लिहिला अशी सार्वत्रिक समजूत असल्यानें महाभारत, भागवत वगैरे ग्रंथांत कोणत्या तरी निमित्तानें रामकथा घुसडून दिलेली आढळते. इतर कवींनींहि आपल्या कवित्वाच्या जोरावर वाल्मीकीच्या काव्याच्या आधारानें रामायणें रचिलीं आहेत. प्राकृत कवींनींहि तेंच काम केलें. अशा रीतीनें रामचरित्र सर्वांच्या परिचयाचें झालें आहे. त्यावर नाटकें लिहिलीं गेलीं. बायकांचीं गाणीं झालीं. एकंदरींत, रामकथा सर्व हिंदूंस अवगत आहे व राम एतद्देशीय अशीच सर्वांची समजूत आहे. या समजुतीस जबर धक्का देण्याचें काम वेंकटरत्नम् यांनीं मोठ्या धैर्यानें व पदरास खार लावून केलें याबद्दल त्यांस धन्यवाद देणें जरूर आहे.

रामायणांत जीं व्यक्तींचीं नांवें आहेत त्यावरून विचार करण्यास फारसा वाव नाहीं. संस्कृत भाषेंतील धातु व एकाक्षरी कोष यांच्या मदतीनें वाटेल त्या भाषेंतील वाटेल त्या शब्दाला थोडी विकृति करून संस्कृत रूप देतां येतें व त्याचा अर्थ लावतां येतो. यासाठीं व्यक्तींच्या नांवांवरून

विचार करण्यास फारशी सवड मिळत नाहीं. पण स्थळांच्या नांवावरून विचार करण्यास जागा आहे. बहुतेक सर्व स्थलांचीं नांवें सार्थ आहेत. उदाहरणार्थ अयोध्या, शृंगबेरपुर, चित्रकूट, जनस्थान वगैरे. स्थलांच्या संबंधानें चौकशी करण्यास आणखी एक दिशा मिळते. ती आजची त्यांची स्थिति ही होय. हीं स्थलें आर्यावर्तांतील असल्यास तीं कोठकोठें होतीं हें आज दाखवितां आलें पाहिजे. आज बरींच स्थळें दाखविण्यांत येतात. कांहीं कांहीं वेळ तरी एकच स्थळ अनेक ठिकाणीं दाखविण्यांत येतें. या प्रसंगीं तेथील लोकांत अभिनिवेश उत्पन्न होऊन प्रत्येक जण आपल्याजवळच्या स्थळीं राम होता असें अट्टाहासानें प्रतिपादन करितो.

## सरयूचा घोटाळा

पहिल्या लेखांत प्रथम अयोध्या शहरासंबंधानें रामायणांतील वर्णन देऊन तें वर्णन हिंदुस्थानांतील अयोध्येस कसें लागू पडत नाहीं हें दाखविलें आहे. शृंगबेरपुराविषयीं आलेली अडचण निराळया तऱ्हेची आहे. ही निषादपति गुह याची राजधानी गंगा व सरयू यांच्या संगमावर वसलेली. सरयू ही मानस सरोवरांत उगम पावलेली म्हणून तिला सरयू असें नांव मिळालें असें रामायण म्हणतें. मानस सरोवरांतून तीन नद्या उगम पावतात; सिंधू ही पश्चिमेकडे वहात जाऊन पुढें दक्षिणगामिनी होते. दुसरी ब्रह्मपुत्रा ही पूर्वेकडे वहात जाऊन पुढें दक्षिण दिशेनें वाहून समुद्रास मिळते. तिसरी सतलज ही दक्षिणेकडे वहात जाऊन पूर्वी स्वतंत्रपणें समुद्रास मिळे. आतां ती सिंधूस मिळते. अयोध्या या तिन्हींपैकीं कोणत्याहि नदीवर नाहीं. आजची अयोध्या गोग्रा नदीवर दाखविली जाते. गोग्रा हीच पूर्वीची सरयू म्हणावी तर गोग्रा हिचा उगम मानस सरोवरांतून नाहीं. राम वनवासाला निघाल्यावर तो प्रथम लमस्त नदीवर पोंचला व तेथें त्यांनीं रात्र घालविली. ही नदी अयोध्येपासून जवळच अगदीं उथळ असावी. कारण, रामाचा रथ नांवेच्या साधनाशिवाय पलीकडे गेलेला आहे. दुसरे दिवशीं संध्याकाळीं सीता, राम, लक्ष्मण शृंगवेरपुरास पोंचले. तेथें नावेनें गंगाभागीरथी उतरून ते पायीं प्रयागास आले. गोग्रा हीच सरयू असल्यास या प्रवासांत मोठा हेलपाटा आहे. आज अयोध्येपासून

प्रयागचें जें अंतर आहे त्याच्या निदान दुप्पट तरी अयोध्या ते गोग्रा, गंगासंगम व तेथून प्रयाग हें अंतर आहे. प्रयागहून ते चित्रकूटावर जाऊन राहिले. तेथें राहिल्याची वर्दी काढून भरत रामाच्या भेटीस आला आहे. तोहि श्रृंगवेरपुराहूनच आला. यावरून मूळ कथेंत अयोध्या, श्रृंगवेरपूर, प्रयाग हीं ठिकाणें एका सरळ रेषेंत किंवा एका मोठ्या रस्त्यावर असावीं असें अनुमान होतें. राम लंकेहून परत पुष्पक विमानानें आला व भरद्वाजाश्रमांत त्याचा एक रात्र मुक्काम पडला, तेव्हां त्यानें भरतास आपल्या आगमनाची खबर देण्यास हनुमानास पाठविलें. त्यालाहि श्रृंगवेरपुराहूनच रस्ता सांगितला आहे. यावरून तो हमेशचा रस्ता असला पाहिजे. म्हणजे आज जीं स्थानें अयोध्या, श्रृंगवेरपुर, चित्रकूट म्हणून दाखविलीं जातात, तीं रामायणांत सांगितलेलीं नसून रामायण कथा दुसऱ्याच प्रदेशांत घडली असावी.

## दण्डकारण्याचें मूळ

रामायणांत सांगितलेलीं दुसरीं ठिकाणें दण्डका, जनस्थान, पंपा वगैरे-विषयींहि तेंच अनुमान निघतें. किष्किंधाहि याच वर्गांतील. हीं ठिकाणें विंध्याच्या दक्षिणेस कां उत्तरेस असा प्रश्न उद्भवतो. आज हीं सर्व स्थानें विंध्याच्या दक्षिणेस दाखविलीं जातात. पण सीतेचा शोध करण्यास सुग्रीवानें वानर पाठविले त्यांतील दाक्षिण दिशेस पाठविलेल्या टोळीस विंध्य पर्वत सर्व शोधण्यास सांगितलें व त्याप्रमाणें त्यांनीं केल्याचें वर्णन आहे. यावरून सुग्रीवाची किष्किंधा विंध्याच्या उत्तरेस असली पाहिजे. हिंदुस्थानांतील दाखविण्यांत येणाऱ्या स्थळांशीं रामायणकथा अगदींच विसंगत आहे. दाक्षिण दिशेकडे पाठविलेल्या टोळीला काय काय लागेल याची यादी सुग्रीवानें दिली. तींत प्रथम एक हजार शिखरांचा विंध्य शोधण्यास सांगितलें. त्यानंतर नर्मदा नदी लागते. पुढें गोदावरी, कृष्णावेणी व महानदी या लागतील असें सांगितलें. सातपुडा व तापी यांचा विसर पडला कीं काय ! कां हा पर्वत व ही तापी नदीच त्या काळीं नव्हती, अशा शंका येतात. मेखल व उत्कल हे प्रांत लागतील असें सांगितलें. हे आज ओरिसांत आहेत. मेखल प्रांताची राजधानी माहिष्मती नगर नर्मदा तीरावर होतें. दशार्णांतील नगरें शोधण्यास सांगितलें आहे. हा दशार्ण देश माळव्याच्या उत्तरेस

होता. यावरून किष्किंधा याच्याहि उत्तरेस असली पाहिजे. यानंतर अवन्ती व आब्रुवन्ती हीं नगरें पाहाण्यास सांगितलें. अवन्ती ही प्रसिद्ध उज्जयनी. पुढें अनेक देश सांगितलें आहेत. त्यांचा विचार करण्याची जरूर नाहीं. तथापि सुग्रीवाची किष्किंधा आर्यावर्तांतील म्हणावयाची असल्यास ती विंध्य पर्वताच्या उत्तरेस व माळव्याच्याहि उत्तरेस असली पाहिजे. पंपा तेथेंच असणार. जनस्थान, पंचवटी वगैरे त्याच्याहि उत्तरेस पाहिजेत. यावरून आज जीं या नांवाचीं स्थानें दाखविलीं जातात तीं खरीं नाहींत. सर्व घोटाळा आहे. नद्यांचीं व शहरांचीं आणि देशांचीं दिलेलीं नांवें कोणीहि, कोठेंहि, केव्हांहि घुसडावींत असा प्रकार दिसत आहे. गोदावरीचें नांव दोन वेळ आलें आहे, त्यावरून तरी पंचवटी व जनस्थान गोदेवर नव्हतें असें ठरतें. या एकंदर घोटाळया-वरून रामाचें हें परिभ्रमण आर्यावर्तांतील नसून रामकथेचें रूपांतर करणाऱ्यानें परदेशी नांवांना संस्कृत रूप दिलें होतें. राम हा अवतार ठरविला गेला व तो आर्य राजा होता हा भ्रम दृढ झाल्यावर आर्यावर्तांतील नद्या, पर्वत, शहरें, देश वगैरेंचीं नांवें पुढें अनेकांनीं आंत घुसडलीं असावींत व मूळ रामायणांतील नांवें गांवांस वगैरे ठेवलीं असावींत व या रीतीनें राम हा या देशचा असा पुरावा केला असें अनुमान होतें. असे प्रकार रामायणांत आणखी बऱ्याच ठिकाणीं आहेत.

### अगस्ति आश्रमाची आठवण

निरनिराळ्या ऋषींच्या आश्रमांत कोठें चार महिने, कोठें आठ महिने, कोठें वर्ष, कोठें दीड वर्ष असें काढून वनवासाचीं दहा वर्षें संपल्यावर राम पुन्हां सुतीक्ष्ण मुनीच्या आश्रमास गेला. तेथें रामाला अगस्त्य मुनींचें दर्शन घ्यावें अशी इच्छा झाली व त्याला सुतीक्ष्णानें अगस्त्याश्रमाचा मार्ग सांगितला. सुतीक्ष्ण म्हणतोः—

"अयमाख्यामि ते राम यत्रागस्त्यो महामुनिः ॥ ३७ ॥
योजनान्याश्रमात्तात याहि चत्वारि वै ततः ।
दक्षिणेन महाञ्छ्रीमानगस्त्यभ्रातुराश्रमः ॥ ३८ ॥

तत्रैकां रजनीं व्युष्य प्रभाते राम गम्यताम् ।
दक्षिणां दिशमास्थाय वनखंडस्य पार्श्वतः ॥ ४१ ॥
तत्रागस्त्याश्रमपदं गत्वा योजनमंतरम् ।
रमणीये वनोद्देशे बहुपादपशोभिते " ॥ ४२ ॥

( अरण्यकाण्ड सर्ग ११)

अर्थः–" हा मी तुला अगस्ति कोठें राहातात तें सांगतों. ( ३७ ) बा रामा, या आश्रमांतून चार योजनेंपर्यंत तूं दक्षिणेस जा म्हणजे अगस्ति मुनींच्या भ्रात्याचा एक मोठा भव्य आश्रम तेथें आहे. ( ३८ ) हे रामा, त्या ठिकाणीं एक रात्र वास्तव्य कर आणि प्रभातकालीं वनप्रदेशाच्या बाजूनें दक्षिण दिशेचें अवलंबन करून जा ( ४१ ) दक्षिण दिशेस एक योजनपर्यंत प्रदेश तूं चालून गेलास म्हणजे विपुल वृक्षांनीं सुशोभित अशा रम्य वनप्रदेशामध्यें अगस्ति मुनींचा आश्रम तूं अवलोकन करशील." (४२)

सुतीक्ष्णानें त्यांना सांगितलें:–

अद्यैव गमने बुद्धिं रोचयस्व महामते ॥४४॥

तूं आजच जाण्याचा बेत कर. याप्रमाणें सुतीक्ष्ण मुनीचें भाषण श्रवण करून भ्रात्या लक्ष्मणासह रामानें त्याला अभिवंदन केलें आणि अगस्ति मुनींकडे जाण्याचा उद्देश मनांत धरून सीता व लक्ष्मण यांसह तो राम तेथून निघाला (४५).

हें बोलणें सकाळचें स्नानसंध्याधिक आन्हिक कर्म आटोपल्यावर झालें असलें पाहिजे. म्हणजे आजच्या भाषेंत सकाळचे आठ तरी वाजले असतील. त्याच वेळीं सुतीक्ष्ण त्यांस अगस्तीकडे जाण्यास सांगतो व ते तिघे निघतात. अगस्ति भ्रात्याचा आश्रम चार योजनें म्हणजे सोळा कोस दूर होता. हें अंतर त्यांना सूर्यास्तापूर्वी चालून जाणें भाग होतें. कारण, रानांतून न पाहिलेल्या मार्गानें जावयाचें होतें. बरें, रस्ता तरी सपाटीचा म्हणावा तर तसेंहि नाहीं.

पश्यन्वनानि चित्राणि पर्वतांश्चाभ्रसन्निभान् ।
सरांसि सारितश्चैव पथि मार्गवशानुगाम् ॥४६॥

व जातां जातां मार्गामध्यें प्राप्त झालेलीं अद्‌भुत वनें, मेघांसारखे पर्वत, सरोवरें आणि नद्या पहात पहात तो मार्गानें चालला. ते अगस्तीच्या भावाच्या आश्रयास पोचले. नंतर सूर्य अस्तास गेला ( श्लोक ६९ ). सोळा कोस अंतर इतक्या थोड्या वेळांत काटणें सीतेसारख्या सुकुमार स्त्रीला कठीणच. पुढें दुसरे दिवशीं राम अगस्त्याश्रमास पोचले.

येथें शंका अशी येते, कीं राम हा दहा वर्षेपर्यंत निरनिराळ्या ऋषींचीं दर्शनें घेत व कांहीं महिने प्रत्येक ठिकाणीं राहात होता. सुतीक्ष्णाच्या आश्रमांत तो निदान दोन वेळ आला व सुतीक्ष्णाच्या आश्रमापासून अगस्त्याश्रम केवळ ५ योजनें अंतरावर असतां राम यापूर्वीच त्याच्या दर्शनास कसा गेला नाहीं ?

ऋषींचीं नांवें जीं वर आलीं आहेत त्यापेक्षां अगस्तीची योग्यता फार मोठी होती. या अगस्त्यानें वातापि राक्षसास पोटांत जिरवून टाकलें होतें. त्यानें समुद्रांत राहणाऱ्या कालकेय असुराचा नाश समुद्र पिऊन केला. नहुष राजाला ' सर्प हो ' असा शाप यानेंच दिला. विंध्याद्रीला पालथा घालून त्याचा उंच वाढण्याचा गर्व यानेंच हरण केला. म्हणून अगस्तीचा आश्रम विंध्याच्या दक्षिणेस असला पाहिजे असें होतें.

## विंध्य-गर्व-परिहार

येथें कोणी शंका घेईल कीं राम अवतारीं अगस्ति विन्ध्याच्या उत्तरेस आश्रय करून होता व विन्ध्य वाढूं लागल्यानें त्यानें त्यास मी परत येईपर्यंत पडून रहा असें सांगून दक्षिणेंत जाऊन तिकडे आश्रम केला असावा. या शंकेस जागा नाहीं. रामाच्या पूर्वींच विंध्यपर्वताला अगस्तीनें पालथा घातल्याची गोष्ट झाली होती. याच सर्गांत अगस्तीचें वर्णन करतांना राम लक्ष्मणास सांगतो—

मार्गं निरोद्धुं सततं भास्करस्याचलोत्तमः ।
संदेशं पालयंस्तस्य विन्ध्यशैलो न वर्धते ॥ ८६ ॥

" मेरूपर्वताशीं स्पर्धा करून सूर्याचा मार्ग नेहमीं अडवूं पाहाणारा श्रेष्ठ पर्वत विंध्याद्रि त्या अगस्तिमुनींची आज्ञा परिपालन करून राहिला असल्यामुळें अद्यापि वृद्धिंगत होत नाहीं. "

यावरून हा आश्रम रामाच्या वेळींहि दक्षिणेसच असला पाहिजे. म्हणजे रामानें विंध्य पर्वत ओलांडला पाहिजे. पण तसा उल्लेख कोठेंहि नाहीं इतकेंच नव्हे तर पंचवटी, जनस्थान, किष्किंधा वगैरे सर्व जागा विन्ध्याच्या उत्तरेस होत्या. पण पंचवटी तर अगस्त्याश्रमाजवळ होती. मग अगस्त्याश्रम विंध्याच्या उत्तरेस, का दक्षिणेस ही शंका कायमच राहाते.

राम चित्रकूटावर असतां तपस्वी भयभीत होऊन दुसरीकडे जाण्याकरितां उत्सुक झाले आहेत असें त्याला दिसलें. (अयोध्याकांड सर्ग ११६ श्लो. १) त्यानें तपास केला तेव्हां—

"त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रतिवर्तते ।
रक्षोभ्यः तेन संविग्ना कथयन्ति मिथः कथाः ॥ १० ॥
रावणावरजः कश्चित्खरो नामेह राक्षसः ।
उत्पाट्य तापसान्सर्वाञ्जनस्थाननिवासिनः" ॥ ११ ॥

अर्थः—"तुझ्यामुळें राक्षसापासून हें भय तपस्वी लोकांना प्राप्त झालेलें आहे. आणि त्यामुळें हे तपस्वी उद्विग्न होऊन आपआपसांत बोलत आहेत. (१०) रावणाचा कोणी कनिष्ठ भ्राता खर नामक राक्षस येथें आहे. त्यानें जनस्थानामध्यें राहणारे सर्व तपस्वी उध्वस्त केले. (११) त्या भीतीनें आम्ही हें अरण्य सोडून जातों" असें ऋषी म्हणाले.

यावरून खर राक्षसाचें स्थान व जनस्थान हीं चित्रकूटाजवळच होतीं असें दिसतें. यावरून अगस्त्याचा आश्रमहि त्याचेबरोबर विन्ध्याच्या उत्तरेसच असला पाहिजे असें होतें. सर्वच घोटाळा दिसून येतो.

राम दक्षिणेंत आला होता असें दाखविण्याची जरूरी भासली, तेव्हां राम आल्याच्या पुराव्यादाखल ही अगस्त्याच्या भेटीची कथा घुसडून दिलेली आहे, असें म्हणणें भाग आहे. सुतीक्ष्णापासून केवळ दीड दिवसाच्या वाटेवर व त्याचे अरण्यांत ( श्लोक ३१ ) अगस्त्याश्रम असता, तर राम दहा वर्षांत त्याच्या दर्शनास बरेच वेळां गेला असता. पण दहा वर्षांत त्यास अगस्त्याची दाद लागली नाहीं, हें आश्चर्य आहे. अगस्त्यदर्शनाची कथा क्षेपक आहे हें थोडासा विचार करणारास दिसून येईल. महाभारतांत

अगस्ति ऋषीचें अचाट सामर्थ्य वर्णिलें आहे. थोर ऋषीचा आशीर्वाद रामास मिळाला पाहिजे म्हणून त्यास, त्याची पत्नी लोपामुद्रा ईस, व अगस्तीच्या भावास या ठिकाणीं खेचून आणलें आहे. व त्याच्याकडून वैष्णव धनु, ब्रह्मदत्त बाण व अक्षय्य भाते आणि इंद्रदत्त खड्ग यांस देवविलें. येथें अगस्तीच्या पत्नीची राम-लक्ष्मण-सीता यांना भेट झाल्याचा उल्लेख नाहीं हें आश्चर्य आहे. अगस्तीच्या भावाचें नांवहि देण्याची जरूरी वाल्मीकीस किंवा ही कथा घुसडून देणारास वाटली नाहीं हेंहि दुसरें आश्चर्य आहे.

## रामेसूचा इतिहास

रामायणकथा वाल्मीकीनें दिव्यदृष्टीनें पाहिली व नन्तर लिहिली ही खुळी समजूत आमच्या भोळसट हिंदूंनीं उराशीं बाळगल्यामुळें रामायणांतील सारे घोटाळे व गैर मेळ आमच्या लोकांस सुसंबद्ध वाटत आले आहेत. विचारशक्तीला सोडल्यावर असाच प्रकार व्हावयाचा !

रामायणांत सांगितलेली अयोध्या, शृंगवेरपुर, चित्रकूट, दंडका, जनस्थान वगैरे स्थळें आर्यावर्तांतील नव्हत व रामाचा इतिहासहि इकडचा नव्हे असें व्यतिरेकानें, पूर्वीच्या तीन लेखांत व चालू लेखांत अगस्त्याची कथा बनावट असें प्रतिपादिलें आहे. मल्लादि व्यंकटरत्नम् यांच्या मतानें इजिप्तचा पराक्रमी राजा रामेसु याची कथा रामायण कथेचें मूळ आहे. सदरची कथा भाषांतरित न करितां रूपांतरित झाल्यानें व त्यामुळें त्या कथेला आर्यावर्ती रूप देण्याचा प्रयत्न केल्यानें आमचे भाबडे लोक फसले. रामाला अवतार बनविल्यावर आमच्या भोळेपणाची सीमा झाली व आमचे लोक रामायणांतील प्रत्येक गोष्ट खरी धरून चालूं लागले.

इजिप्त हा पुराण देश आहे. तेथील सुधारणा फार प्राचीन आहे. खिस्तपूर्व तेरावे शतकांत रामेसु हा इजिप्तचा राजा १२९२ ते १३२५ पर्यंत होता. हा एकोणिसाव्या वंशाचा. याचे पूर्वी अठरा वंशांचे राजे होऊन गेले. यांचे ६०।६२ तरी राजे झाले होते. पहिल्या वंशाचा राजा मेना खि. पू. ५५०० वर्षांपूर्वी झाला. म्हणजे ही संस्कृति किती प्राचीन आहे हें दिसून येतें. यांचा इतिहास बराचसा उपलब्ध आहे. मेना हा राजा फार प्राचीनकाळीं होऊन गेला. त्यानें नाईल नदीला जोडणारें

एक मोठें सरोवर खोदलें. हें सरोवर व नाईल नदी आणि पलीकडचा भाग यांत मेंफीस शहर होतें. याचें ग्रीक भाषांतर अजादों–अजोध्या-अयोध्या. रामायणांत हें शहर मनूनें निर्माण केलें असें आहे.

( पहा रामायण बालकांड स. ५ श्लो. ६ )

अयोध्या नाम नगरी तत्रासील्लोकविश्रुता
मनुना मानवेंद्रेण या पुरी निर्मिता स्वयम् ॥

मेंफिस मेनानें वसविलें. मेना याचें रूपांतर मनु करणें साहजिक आहे. अयोध्येचें वर्णन रामायणांतलें फार अतिशयोक्तीचें आहे. तसलें मोठें शहर दशरथाच्या राज्यासारख्या लहान राज्याची राजधानी असणें शक्य नाहीं. याउलट मेंफिस हें मोठें शहर होतें असें ग्रीक व अरब इतिहासकारांनीं लिहिलें आहे. अयोध्येंत उंटांची व गाढवांची गर्दी होती हें वर्णन हिंदुस्थानांतील शहरास लागू पडत नाहीं. पण इजिप्तच्या अजादोंला तें बरोबर लागू पडतें.

## मनू व मानस सरोवर

एकोणिसाव्या वंशाचा रामेसिस हा प्रख्यात राजा होता. त्या वेळच्या चित्रलिपींत 'राम उसर' किंवा 'रामेसु' असें नांव लिहिलेलें आढळतें. त्याचें रूपांतर संस्कृत भाषेंत राम करणें साहजिक आहे. शिवाय रम् धातूपासून राम शब्द सिद्ध करतां येऊन रमविणारा, आनंद देणारा असा चांगला अर्थहि निघतो.

रमन्ते योगिनोऽनन्ते सत्यानन्दे चिदात्मनि ।
इति रामपदेनासौ पर आत्मभिधीयते ॥

असें वेदांती म्हणतातच.

इजिप्त हा नदीमातृक देश. मोठी नदी काय ती नाईल अथवा नील. बाकीचा देश बहुतेक वालुकामय सपाट. मधेंमधें थोडे डोंगर असा हा सपाटीचा मुलूख आहे. रामायणांतील वर्णनहि त्याच प्रकारचें आहे. रामाला मोठे डोंगर कोठें चढावे उतरावे लागले नाहींत.

अयोध्या ही सरयू नदीवर वसली होती व सरयू मानस सरोवरांतून उगम पावल्यानें तिला तें नांव मिळालें असें रामायण सांगतें. हें वर्णन आजच्या हिंदी अयोध्येस लागू नाहीं असें वर दाखविलेंच आहे. पण तें इजिप्तच्या अजादोस चांगलें लागतें. नाईल नदीला जोडणारें असें मोठें सरोवर मेनानें खणल्याचा उल्लेख आहे. या सरोवरांत नाईल नदीच्या वरच्या भागांतूनच पाणी घेतलें होतें. यावर अजादो वसलें असल्यानें मानस सरोवरांतून उगम पावलेली नदी असें वर्णन करतां आलें.

सुमंत हा दशरथाचा मंत्री होता व रथ हाकणारा तोच होता. रामायणांत रथाचा उल्लेख आला कीं तेथें सारथी सुमंत असावयाचाच असा नियम ठरला आहे. दशरथाच्या दरबारांत सारथ्यांचा इतका तुटवडा होता काय, अशी शंका येते. या दरबाराशिवाय अन्यत्र असा तुटवडा नाहीं. प्रत्येक क्षत्रिय वीर रथी; प्रसंगीं सूताचें काम करण्यास लायक असे व कृष्ण व शल्य हे अर्जुन व कर्ण यांचे सारथी झाले. इजिप्तमध्यें ता–उर्–त या नांवाची देवी होती. तिच्या मूर्ती सांपडल्या आहेत, यावरून मंत्री व सारथी अशीं दोन कामें करण्याचा भास होतो.

शृंगबेरपुरः– टीकाकारांनीं या नांवाचा लावलेला अर्थ कसा कुचकामी आहे हें पूर्वीच्या लेखांत दाखविण्यांत आलेंच आहे. येथील राजा गुह. हा निषादांचा अधिपति होता. निषाद ही चोऱ्या, लुटालूट करणारी जात होती.

रामायणांत ' शृंगि–बेर–पुर ' असें नांव दिलें आहे. व टीकाकार याप्रमाणें पदें पाडतात. पण इजिप्तमध्यें सेरेन–कबीर असें नांव होतें. तेथें तेल–एल–कबीर या नांवाचा एक डोंगर आहेच. कबीरी लोकहि लुटालूट करणारेच होते.

चित्रकूटासंबंधानें टीका पूर्वीच केलेली आहे. रामायणांतील वर्णन आजच्या चित्रकूटास मुळींच लागू पडत नाहीं. पण इजिप्तमध्यें मात्र मेंफिसच्या जवळच जे डोंगर आहेत, त्यांस चित्रकूट असें म्हणणें योग्य आहे. या डोंगरास तुराचा डोंगर म्हणतात. या डोंगरांत अगदीं शुभ्र दगड निघतो व त्यावर सूर्यकिरण पडल्यावर त्याचें तेज फार पडतें. या डोंगरास चित्रकूट हें नांव शोभेल. तेथून जवळच दोशिरी नांवाचा डोंगर आहे. तो

तांबड्या दगडाचा आहे. त्यासहि चित्रकूट हें नांव शोभेल. पण प्रयाग-जवळ डोंगरच नाहीं, व ज्याला चित्रकूट म्हणतात त्याला तें नांव मुळींच शोभत नाहीं.

## इजिप्तचें नंदिग्रामाशीं साम्य

नंदिग्रामाचीहि तीच अवस्था. नंदिग्राम म्हणजे नंदीची पूजा ज्या गांवीं चालते तें गांव. नंदी हा शिवाचें वाहन म्हणून नंदिग्रामांतील लोक शिवाचे भक्त. असें स्थान रामायणांत कोठेंहि वर्णिलेलें नाहीं. अयोध्येच्या-जवळ तसें स्थान असल्याचा उल्लेखहि नाहीं, पण भरत हा नंदिग्रामांत राहूं लागला व तें स्थान अयोध्येच्याजवळच होतें, तेथून रामाची स्वारी मोठ्या लवाजम्यानें व समारंभानें अयोध्येस गेल्याचें वर्णन आहे. हें नांव रामायण-कथेंत येण्याचें कारण अयोध्या हीच इजिप्तची मेंफिस—अजादों होती व तिच्याजवळच नंदिग्राम होतें, हें आहे. मेंफिसला लागूनच सक्कारा म्हणून गांव होतें. तेथें पवित्र नंदी ठेवीत असत व मेल्यावर त्याची ममी करून ती पुरीत.

## इजिप्तचा पुराण धर्म

या नंदीचें वर्णन दिल्यास इजिप्तच्या पुराण धर्मावर थोडाबहुत प्रकाश पडेल. प्राचीन इजिप्तला त्या काळाच्या भाषेंत ‘की मी’ म्हणत. याचा अर्थ काळी जमीन असा होता. तो देश मूळापासूनच शेतकीप्रधान असल्यानें काळीचें महत्त्व तेथें मोठें असणें साहजिकच आहे. ग्रीकांनीं त्याला इजिप्त हें नांव दिलें. त्या देशांत ठिकठिकाणीं तेथील देवांचीं (ग्रामदेवतांचीं) मोठीं मंदिरें असत. प्रत्येक मोठ्या शहरचा रक्षणकर्ता, एकेक स्वतंत्र देव असे. कांहीं चतुष्पाद पशु व पक्षीहि पवित्र मानले जात व त्यांच्याकरितां स्वतंत्र झोपडें, घर किंवा मंदिर असे. त्यांची निगा ठेवण्या-साठीं, वेळच्या वेळीं अन्नपाणी देण्यासाठीं, स्वतंत्र माणसें असत; धार्मिक विधि करण्यास पुजारी असत. या पवित्र पशुपक्ष्यांची सबंध जातच पवित्र मानली जात होती. त्यांतल्या एखाद्या प्राण्यास जाणून बुजून मारणारास देहांत शासन होई. बहिरी ससाणा किंवा गरुड, इबेक्स (बकरा) किंवा मांजर कोणाच्या हातून मेल्यास तो मनुष्यवधासारखा मोठा गुन्हा मानला जाई. नंदी

म्हणजे बैल. हाहि एक पवित्र प्राणी मानला होता. व त्याचीं स्वतंत्र देवळें असत. यांत ठेवण्यासाठीं निवड मोठया कसोशीनें होई. चंद्राच्या कोरीच्या आकाराचें चिन्ह एका कुशीस असावें लागे किंवा पांढरा त्रिकोण कपाळावर असावा; पंख पसरलेल्या उडत्या गिधाडाचें चिन्ह पाठीवर असलें पाहिजे व जिभेखालीं काळया रंगाची गांठहि पाहिजे. हीं सगळीं चिन्हें एकाच बैलाच्या ठिकाणीं मिळणें अशक्यच. यासाठीं जास्तींत जास्त व जवळ जवळ पाहिजे तशीं लक्षणें मिळालीं म्हणजे त्यास पसंत करीत. मृत नंदीच्या शोकप्रदर्शनार्थ करण्यांत येणारीं कर्में व मुंडण नवीन नंदी मिळेपर्यंत चालू राही. मिळाल्यावर त्याला निलोपोलिस येथें ४० दिवस चांगला भरपूर चारा देऊन ठेवीत. नंतर त्याला एका नावेनें सोन्याच्या मखरांतून मेंफिस येथें आणीत व तेथें त्याला स्वतंत्र देवळांत ठेवीत. पण मोठ्या मिरवणुकींत त्याला बाहेर काढीत, तेव्हां त्याचेबरोबर गाणाऱ्या मुलांचा घोळका असे. देवळांत दोन दालनें समोरच असत. कोणास शकुन पाहावयाचा असल्यास नंदी उजव्या दालनांत जातो का डाव्यांत जातो यावरून अनुकूल प्रतिकूल उत्तर सांगण्यांत येई. देवळाच्या मधल्या चौकांत आणल्यावरून त्याचें दर्शन लोकांस मिळे. नंदीच्या आईचेंहि यालगत दुसरें देऊळ असे.

## जनस्थानाचें खरें नांव ?

या नंदीला धूपदीप दाखवीत, उत्तम दारूहि नैवेद्यासाठीं असे. बैल बळीहि दिले जात. या नंदीला पंचवीस वर्षांपेक्षां जास्त ठेवीत नसत असें प्लूटार्क म्हणतो. तेवढें वय झालें, कीं त्याचे पुजारी त्याला एका तळ्यांत बुडवीत. त्यानंतर त्याच्या डोक्यांत व पायांत मसाला भरून ममी करीत व नंतर सेरापियम या जागीं दफन करण्याचा मोठा समारंभ होई. त्या कामीं मोठा खर्च करावा लागे. ही जागा सक्कारा ह्या गांवीं होती. तें खरें नंदिग्राम. हें मेंफिसला लागूनच होतें. सन १८५० सालीं मारियेट याला तपास करतांना नंदीचें देऊळ व त्याच्या दफनाचें सेरापियन सांपडलें. त्यांत पुष्कळच नंदीच्या ममी मिळाल्या. अयोध्येच्याजवळ नंदिग्राम होतें असें

रामायण म्हणतें. हिंदी अयोध्येजवळ त्याचा थांग नाहीं. इजिप्शन अजादोंजवळ मात्र नंदिग्रामाचा चांगलाच पत्ता लागतो.

दंडकाः— या अरण्यांत राम जाऊन राहिला असें रामायण म्हणतें. पण दण्डका कोठें होती यासंबंधानें किती घोटाळा आहे हें वर दाखविलेंच आहे. चित्रकूटपर्यंत दंडका होती असें एका ठिकाणीं आहे. पण आजचा समज दंडका गोदावरी व कृष्णा नदीपर्यंत खालीं होती. इतकेंच नव्हे तर हंपीपर्यंतहि होती. पुराणांतील विंध्य व सातपुडा यांचे मध्यें होती, असें आहे. सात दिवस चिखलाचा पाऊस पडल्यानें ती सर्व चिखलमय होती असें सांगितलें आहे. मोठ्या नदीच्या मुखाजवळ असा दलदलीचा प्रदेश असतो. भागीरथीच्या मुखाजवळचें सुंदरबन प्रसिद्ध आहे. सिंधूच्या मुखाजवळहि तशीच दलदल आहे. इजिप्तच्या नाईल नदीच्या मुखाजवळ अनेक फाटे होऊन तो प्रदेश कर्दममय आहे व तेथें दक्षिणच्या अंगास वसलेल्या गांवास देदेरा असें नांव होतें. त्याचें संस्कृतीकरण दण्डका झालें असावें असें दिसतें.

हीच गोष्ट जनस्थानाची. येथें खर रहात होता व त्याचे लोक ऋषींस त्रास देत. हें जनस्थान दंडकारण्यांत म्हणजे दलदलीच्या मुलुखांत होतें. रामेसीसच्या वेळीं नील नदीच्या एका मुखाजवळ झोनतानित नांवाचें शहर होतें. त्या नांवाचें संस्कृतीकरण जनस्थान असें झालें असावें. एकंदरींत, रामायणांत जीं गांवें हिंदुस्थानांत अमुक ठिकाणीं होतीं असें ठाम सांगतां येत नाहीं, त्याच गांवचा पत्ता इजिप्तच्या भूमींत बरोबर लागतो. यावरून रामायणकथा आर्यावर्तात मुळींच घडली नसून ती इजिप्तांत घडली असें मल्लादी व्यंकटरत्नम् म्हणतात तेंच खरें असें दिसतें.

— महाराष्ट्र-शारदा-एप्रिल १९३६.

# रामराज्यांतील प्रजाजन

रामराज्यांतील प्रजेसंबंधानें विशेषशी माहिती रामायणांत नाहीं. ती मोठ्या सुखांत व संतुष्ट होती एवढेंच वर्णन आहे. रामानें सीतेचा त्याग केला याला कारण प्रजेचें सीतेविषयीं विरुद्ध मत असें सांगितलें आहे. या कामीं प्रजेचें मत स्पष्ट झालें आहे. रावणाच्या घरीं सीता दूषित झाली, तिची अग्निशुद्धि म्हणजे निव्वळ थोतांड, थाप अशीच त्यांची समजूत होती.

आज आमच्या सनातनी हिंदूंची समजूत त्याच्या अगदीं उलट आहे. सीतादेवी ही महासाध्वी असून रावणाच्या बंदींत तिनें हालांत दिवस काढले व आपलें पावित्र्य संभाळलें. तथापि रामाची किंवा इतरांची शंका घालवण्यासाठीं तिनें अग्नींत प्रवेश केला; त्यांतून ती जिवंत निघाली व तिच्या पवित्रपणाविषयीं सर्वांची खात्री झाली वगैरे वगैरे.

या मुद्याचा वाल्मीकि रामायणाच्या आधारें जरा विस्तारानें विचार करणें बरें. रावणाचा वध झाला आणि बिभीषणाला रामाच्या आज्ञेनें लंकेच्या राज्याचा अभिषेक केला गेला, नंतर रामानें हनुमानाला सीतेकडे पाठविलें. राम म्हणाला, "हे सौम्या, महाराज बिभीषणाची आज्ञा घेऊन तूं लंका नगरीमध्यें जा आणि सीतेला कुशल वर्तमान कळीव. हे वक्त्यांमध्यें श्रेष्ठ हनुमाना, मी व सुग्रीवासह लक्ष्मण कुशल असून रणामध्यें रावणाचा वध झाल्याचें तूं सीतेला कळीव......आणि तिचा निरोप घेऊन इकडे परत ये." (युद्धकांड सर्ग ११२ श्लो. २४,२५,२६) हनुमान सीतेकडे गेला. तो केवळ सांगकाम्या नव्हता. तो नांवाजलेला वक्ता होता. त्याचें भाषण यु. कां. सर्ग ११३ यांत श्लोक ७–१३ पर्यंत आहे. शेवटचे दोन श्लोक विशेष ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. तो म्हणतो, "रावणाच्या घरीं असलेल्या तुला आतां भय बाळगण्याचें कारण नाहीं. कारण हें लंकेचें ऐश्वर्य बिभीषणाच्या स्वाधीन केलेलें आहे. तूं आतां विश्वासानें स्वस्थ हो; तूं आतां स्वतःच्या घरींच आहेस आणि तुझ्या दर्शनास उत्सुक झालेला हा आनंदित बिभीषण पण इकडेच येत आहे."

(१३.) हर्षातिशयानें सीतेला कांहीं बोलवेना. पण त्यानें पुन्हां प्रश्न केल्यामुळें तिला आपलें मौन सोडावें लागलें. त्यांचें कांहीं वेळ संभाषण झाल्यावर " रामाकडे मी जात आहे. त्याला कांहीं निरोप सांगावयाचा असल्यास सांग." असें तो म्हणाला. ती म्हणाली, " भक्तवत्सल भर्त्याच्या दर्शनाची मला इच्छा आहे." हनुमान रामाकडे येऊन त्यानें सीतेचा निरोप कळविला. तेव्हां रामाचें मुख कांहींसें अश्रूंनीं भरून गेलें, कांहीं वेळ त्यानें विचार केला व खालीं मान घालून दीर्घ सुस्कारा सोडून जवळ बसलेल्या बिभीषणाला तो म्हणाला, " दिव्य उटि लावून व दिव्य अलंकारांनीं भूषित होऊन शिरःस्नात झालेल्या सीतेला येथें घेऊन ये. विलंब लावूं नको."

त्याप्रमाणें सीतेला थोड्याच वेळांत बिभीषणानें रामाकडे आणलें. "सीता आल्याचें श्रवण करतांक्षणींच रामाला रोष, हर्ष व दैन्य हीं सर्वच प्राप्त झाली."..." हर्षरहित झालेल्या त्या रामानें 'सीतेला सत्वर माझ्या-समीप येऊं दे' " असें बिभीषणाला सांगितलें. त्याप्रमाणें सीता जवळ आली व तिनें विस्मयानें, आनंदानें व प्रेमानें आपल्या पतीच्या मुखाकडे पाहिलें. बाजूला नम्रपणें उभी असलेली सीता पाहून राम आपलें हृद्गत बोलून दाखवूं लागला. आपल्या, सुग्रीवाच्या व हनुमानाच्या पराक्रमाचें वर्णन करून आपल्या अपमानाचा आपण कसा सूड घेतला हें त्यानें सांगितलें. " सीतेकडे पहात असलेल्या रामाचें हृदय लोकापवादाच्या भीतीनें द्विधा झालें." तो म्हणाला, " रावणाचा वध करून मीं माझ्या अपमानाचें परिमार्जन केलें आहे व तुला परत मिळविलें आहे. तुझें कल्याण असो. माझ्या मित्राच्या साह्यानें जो या मोठ्या संग्रामाचा मीं खटाटोप केला, तो मीं तुझ्याकरितां केलेला नाहीं. अपवाद टाळून आपली कीर्ति राखावी, याकरितां व आपल्या प्रख्यात वंशाला आलेला कमीपणा नाहींसा करण्यासाठीं मीं हें केलें. तुझ्या वर्तनासंबंधीं संदेह उत्पन्न झाल्यामुळें तूं माझ्या दृष्टीला अतिशय प्रतिकूल झाली आहेस. म्हणून हे जानकी, मी तुला अनुज्ञा देतों, तूं आज वाटेल तिकडे चालती हो; तुला दहा दिशा मोकळ्या आहेत. तुझ्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. पुष्कळ दिवसांपासून ही आपणावर प्रेम करणारी आहे, असा लोभ

मनामध्यें धरून कोण बरें कुलीन व तेजस्वी पुरुष परगृहीं राहिलेल्या स्त्रीचा पुनरपि स्वीकार करणार आहे ? रावणाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या आणि त्यानें दुष्ट नजर ठेवलेल्या तुझा, कुलीन म्हणवणारा मी कसा बरें स्वीकार करूं ? ज्या हेतूनें मीं तुला जिंकलें तो माझा हेतु सिद्ध झाला. तुझ्या ठायीं माझ्या मनाची आसक्ति नाहीं. तूं वाटेल तिकडे चालती हो. हे भद्रे, मनाचा निश्चय करून ही गोष्ट मीं तुला सांगितली आहे. आतां तुझी इच्छा असल्यास लक्ष्मणापाशीं अथवा भरतापाशीं तूं खुशाल रहा. हे सीते, शत्रुघ्नावर अथवा सुग्रीवावर, बिभीषण राक्षसावर किंवा तुला सुख लागेल तेथें आपलें चित्त ठेव. आपल्या घरीं राहिलेल्या दिव्य कांतियुक्त व मनोहर अशा तुला पाहून रावणानें एक क्षणहि तुझी उपेक्षा केली नसावी." ( युद्धकांड सर्ग ११५ श्लोक १३ ते २४ ).

हें ऐकून सीता मोठ्यानें रडूं लागली, तिला मोठी लाज वाटली. पण आपलीं आंसवें पुसून ती तेजस्वी सीता रामाला म्हणाली, "यःकश्चित् पुरुष एकाद्या स्त्रीला अनुलक्षून भाषण करतो त्याप्रमाणें अशाप्रकारचें हें कर्णकटु व अयोग्य भाषण मला अनुलक्षून आपण करतां ! आपणाला जशी मी वाटतें तशी मी नाहीं याचा प्रत्यय आपणांस येईल हें मी आपणास आपल्या पातिव्रत्यरूप सदाचरणाच्या शपथेवर सांगत आहे. सामान्य स्त्रीचें आचरण पाहून संपूर्ण स्त्रीजातीविषयीं आपण शंका घेत आहांत. पराधीन झाल्यामुळें मला परपुरुषाचा जो स्पर्श झाला, तो माझ्या इच्छेविरुद्ध होता. दुर्दैवामुळें ती गोष्ट घडून आली. माझ्या आधीन असलेलें माझें हृदय तें तर आपल्या ठिकाणींच रत आहे; परंतु शरीर माझ्या स्वाधीन नसल्यानें मी पराधीन स्त्री काय करणार बरें ? परस्परांवर प्रेम वृद्धिंगत झालें असून आणि पुष्कळ दिवसपर्यंत दोघे एकत्र राहिलों असूनहि माझी परीक्षा आपणांस झाली नसेल तर मात्र मी कायमचीच बुडालें. 'मी तुझा त्याग केला आहे' असा निरोप तुम्ही हनुमानाबरोबर पाठवला असता तर मीं प्राणत्याग केला असता व आपणांस जीव धोक्यांत घालून युद्ध करण्याचे श्रम पडले नसते; व आपल्या मित्रांसहि क्लेश झाले नसते. बाल्यावस्थेमध्यें ज्या उद्देशानें माझें पाणिग्रहण केलें त्याचीहि आपण पर्वा केली नाहीं आणि त्याचप्रमाणें माझी भक्ति व शील

या सर्वांकडेच आपण पाठ केली आहे." (यु. कां. सर्ग ११६ श्लो. ५ ते १५)

अश्रूंनीं कंठ दाटून आल्यामुळें अशा रीतीनें रडत रडत भाषण करणारी सीता चिंताक्रांत झालेल्या दीन लक्ष्मणाला म्हणाली, "हे लक्ष्मणा, माझ्यासाठीं चिता तयार कर. चिता हें या संकटाचें औषध आहे. मिथ्यापवादानें ग्रस्त झालेल्या मला जिवंत राहण्याची इच्छा नाहीं. गुणांनीं संतुष्ट न झालेल्या भर्त्यानें लोकसमाजामध्यें त्याग केलेल्या मला आतां मरणाचेंच अवलंबन करणें योग्य असल्यामुळें मी अग्नीमध्यें प्रवेश करते." (यु. कां. सर्ग ११६, श्लो. १७ ते १९)

तिचा जीव देण्याचा निश्चय झाला होता. अग्नींतून जिवंत बाहेर येणें तिला शक्य नव्हतें असें या उद्गारांवरून दिसतें.

लक्ष्मणाला राग येऊन त्यानें रामाकडे पाहिलें. पण रामाचें मन जाणून त्यानें मुकाट्यानें चिता रचली. सीतेनें रामाला प्रदक्षिणा घालून दैवतांना व ब्राह्मणांना ( हे राक्षसांतील असले पाहिजेत ) नमन केलें व अग्नीजवळ जाऊन म्हणालीः—

"माझें चित्त जर रामापासून केव्हांहि दूर जाणारे नसेल तर जगत्साक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील. (२५) माझें वर्तन शुद्ध असून राम मला दूषित समजत आहे हें खरें असेल तर लोकसाक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील." (२६) असें म्हणून निर्भय होऊन तिनें अग्निप्रवेश केला. बाल व वृद्ध यांनीं गजबजलेला मोठा समाज, सर्व प्राणी, ऋषी, देव आणि गंधर्व, दानव, त्रैलोक्य यांनीं तिला अग्निप्रवेश करतांना पाहिलें असें वर्णन केलें आहे. स्त्रिया आक्रोश करूं लागल्या व हायहाय असा फारच मोठा ध्वनि राक्षस व वानर यांच्यामध्यें उसळला (३४).

पुढील ११७ सर्ग रामाकडे देव येऊन स्तुति करतात, अशा विषयाचा अवतारकल्पनेनें भरलेला प्रक्षिप्त असला पाहिजे. त्याचा विचार करण्याची जरूर नाहीं. ११८ वा सर्ग तसाच आहे. त्यांत 'अग्नि सीतेला मांडीवर घेऊन बाहेर पडला.' (श्लो. १.) ती चिता उडवून देऊन आणि जनककन्या सीतेला घेऊन मूर्तिमान अग्नि तेथून सत्वर बाहेर निघाला. (२) पुन्हां

चौथ्या श्लोकांत, ‘त्या सीतेला मांडीवर घेऊन अग्नीनें रामाला सीता शुद्ध असल्याविषयीं निर्वाळा दिला व ‘शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या या निष्पाप सीतेचा तूं स्वीकार कर. हिला उद्देशून तूं कांहीं एक भाषण करूं नको अशी माझी तुला आज्ञा आहे’ असेंहि बजावलें.’ (श्लो. ५–१०). नंतर राम त्या अग्नीला म्हणाला, “सर्व लोकांसमक्ष सीतेची शुद्धि होणें अवश्य होतें. कारण ही शुभ सीता रावणाच्या अंतःपुरांत पुष्कळ दिवस राहिलेली आहे. (१३) तस्मात् हिची शुद्धि न करितां जर मीं हिचा स्वीकार केला असता तर दशरथपुत्र राम विषयलंपट व बालिश आहे असें मला लोक म्हणाले असते.” (१४) सीता शुद्ध आहे व रावणाच्या हातून ती दूषित होणें अशक्य होतें असें प्रतिपादून राम म्हणतो, ‘विचारी पुरुषाच्या हातून ज्याप्रमाणें कीर्तीचा त्याग होणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें त्रैलोक्यामध्यें शुद्ध ठरलेल्या मिथिलेच्या राजकन्या जानकीचा त्याग माझ्या हातून होणें शक्य नाहीं. (१९) तुम्हां सर्वांच्या हितकारक उपदेशाप्रमाणें मला अवश्य वागलें पाहिजे. तुम्ही जगताचे अधिपति असून माझ्यावर प्रेम करणारे आहांत आणि हिताची गोष्ट मला सांगत आहांत.’ (२०) पुढील ११९ व्या सर्गांत स्वर्गस्थ पित्याची म्हणजे दशरथाची भेट झाली व त्यानें रामलक्ष्मणास मांडीवर घेऊन आलिंगन दिलें; ही कथा कितपत विश्वसनीय आहे याचा विचार वाचकांनीं करावा.

सीता अग्नींतून जिवंत बाहेर आली व ती निष्पाप आहे असें अग्नीनें व इतर देवांनीं रामाला सांगितलें; ही गोष्ट बिभीषणादि सर्व राक्षस, सुग्रीवादि सर्व वानर, राम आणि लक्ष्मण यांच्यासमक्ष घडली, व या सर्वांस रामानें आपल्या राज्याभिषेकाकरितां पुष्पक विमानांतून अयोध्येस आणलें.

ही सर्व मंडळी रामाचा पाहुणचार खात अयोध्येंत दोन महिने राहिली होती. रावणाबरोबरचें युद्ध व रामलक्ष्मणादि वीरांचे पराक्रम हा लोकांत चालू विषय होता. वानर, राक्षस वगैरे प्रत्यक्ष पहाणाऱ्याच्या तोंडून युद्ध व सीतेचें अग्निदिव्य या गोष्टी सर्व अयोध्यावासी जनांनीं पुनःपुनः ऐकल्या असल्या पाहिजेत. भाटांनीं त्यावर कवनें रचून तीं दरबारांत व

इतरत्र गायिलीं असावींत. आजच्या भाषेंत बोलावयाचें झाल्यास ठिक-ठिकाणीं मोठमोठ्या सभा भरवून त्यांत ही युद्धकथा व सीताशुद्धि अनेक वानर व राक्षस वक्त्यांनीं जीव तोडून सांगितली असेल, (त्या काळीं वर्तमानपत्रें असल्यास) अनेक संपादकांनीं व बातमीदारांनीं त्यांच्या भेटी घेऊन त्यांच्या मुलाखती भपकेदार वर्णनासह देऊन आपल्या पत्राचे अनेक रकाने भरून काढून, रामाच्या सर्व प्रजेला या बाबतींत सुशिक्षित केलें असेल.

पण हे सर्व प्रयत्न पालथ्या घागरीवर पाणी ओतल्यासारखें निष्फळ झाले असें म्हणावें लागतें. पालथ्या घागरींत पाण्याचा थेंबहि शिरत नाहीं त्याप्रमाणें अयोध्यावासी जनांच्या हृदयांत निदान सीतेच्या पवित्रपणा-विषयींची खात्री शिरली नाहीं, म्हणजे त्यांना ती विश्वसनीय मुळींच वाटली नाहीं. सीता ही दूषित झाली आहे अशीच त्यांची समजूत झाली असल्यानें वानर आणि राक्षस आणि खुद्द रामलक्ष्मण हे आम्हांस बनवूं पहात आहेत. यांच्या सांगण्यावर विश्वास ठेवणें म्हणजे आम्हांस कांहीं अक्कल नाहीं, शक्य अशक्य जाणण्याची पात्रता नाहीं असें जाहीर करण्यासारखेंच आहे असें ते परस्परांशीं बोलत असावे. चिता रचून पेटवलेल्या अग्नींत पुरुष किंवा स्त्री शिरल्यास ती सही-सलामत बाहेर येणें, अग्निदेव प्रकट होऊन, त्यानें सीतेला रामाच्या हवालीं करणें, महादेव, इंद्र, ब्रह्मदेव वगैरे देव येऊन त्यांनीं सीता शुद्ध असल्याची खात्री करणें व शेवटीं १४ वर्षांपूर्वी मयत झालेला दशरथ पार्थिव देहानें येऊन रामलक्ष्मणास मांडीवर घेऊन, सीतेविषयीं त्यांनीं संशय घेऊं नये असें बजावणें या गोष्टी अशक्य कोटींतील आहेत, यावर विश्वास ठेवणाऱ्याच्या ठिकाणीं सदसद्विवेकबुद्धि नाहीं असें म्हणणें भाग आहे अशी रामाच्या प्रजेची खात्री झाली होती असें पुढील हकीकती-वरून दिसतें.

रामराज्य फार उत्तम. त्याची प्रजा धर्मनिष्ठ व राजावर संतुष्ट अशी होती अशी वार्ता भरतानेंच रामास सांगितल्याची कथा उत्तरकांड सर्ग ४१ याच्यांत आहे. पुढील श्लोक पहा. भरत म्हणतोः—' हे वीरा, तूं राज्य करूं लागल्यापासून अमानुष प्राणीहि वारंवार वाचायुक्त असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. (१८) हा पूर्ण महिना लोटून गेला तरी मर्त्य जनांना

आरोग्य असून, हे राघवा, जीर्ण झालेल्या प्राण्यांनाहि मृत्यु येत नाहीं. (१९) हे राजा, स्त्रियांना निरोगी मुलें होत आहेत, मानव हृष्ट व पुष्ट शरीरानें युक्त आहेत आणि नगरवासी जनांना अधिकच हर्ष झाला आहे. (२०) अमृततुल्य उदक पाडणारा पर्जन्य वेळेवर वृष्टि करीत आहे; हे वायूहि सुखस्पर्शानें युक्त व कल्याणकारक वहात आहेत. (२१) त्याचप्रमाणें हे राजा, नगरांतील व देशांतील लोक 'अशा प्रकारचा राजा आम्हांला नेहमीं असो' असें नगरामध्यें बोलत आहेत.' (२२)

त्याच दिवशीं अंतःपुरांत जाऊन सीतेचे डोहाळे पुरविण्यासाठीं 'उद्यां तुला वनांत पाठवतों' असें आश्वासन देऊन राम आपल्या सुहृदासह मधल्या चौकांत गेला. तेथें बसला असतां ते खुषमस्करे त्यास नानाप्रकारच्या गोष्टी व बातम्या सांगत असत. एकंदरींत दहा खुषमस्कऱ्यांचीं नांवें दिलीं आहेत. त्यांतील भद्राला रामानें विचारलें, 'हे भद्रा, नगरामध्यें व देशामध्यें काय चाललें आहे? नगरांतील व देशांतील लोक माझ्यासंबंधीं काय काय बोलत आहेत? आणि त्याचप्रमाणें सीता, भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न व माता कैकेयी यांच्यासंबंधानेंहि लोक काय बोलत असतात? कारण राजे वनांमध्यें असोत अथवा राज्यावर असोत; लोक त्यांना कांहीं ना कांहीं नांवें ठेवीत असतातच." (उत्तरकांड सर्ग ४३ श्लो. ४–९). यावर भद्र हात जोडून म्हणाला, "हे राजा, नगरवासी जनांच्या गोष्टी चांगल्या चाललेल्या असतात. रावणाच्या वधामुळें प्राप्त झालेला विजय तर नगरांतील लोक फारच वाखाणीत आहेत." यावर जास्त आग्रह करून राम म्हणाला, "तर मग जें कांहीं असेल तें सर्व तूं कांहीं एक शिल्लक न ठेवतां मला इत्थंभूत कथन कर (९). बरींवाईट भाषणें माझ्यासंबंधानें नगरवासी लोक काय काय करीत असतात? तूं कांहीं एक भीति मनामध्यें न बाळगतां कुटाळ लोक देशामध्यें माझ्याबद्दल काय बोलत असतात तें निर्भयपणें व निःशंकपणें कथन कर" (११). भद्र हात जोडून म्हणाला, "हे राजा, चवाठे, बाजार, रस्ते, वनें आणि उपवनें यांमध्यें लोक तुझ्यासंबंधानें जें कांहीं बरेंवाईट बोलत असतात तें ऐक (१३). "समुद्रावर सेतुबंधन हें दुष्कर कृत्य रामानें केलें. हें कृत्य देव दानवांच्या

ह्यातूनहि घडल्याचें कोणत्याहि वृद्ध लोकांच्यामुद्धां ऐकण्यांत नाहीं (१४). अजिंक्य रावणाचा, सैन्य व वाहनें यांसह वध करून राक्षसांसहवर्तमान ऋक्ष व वानर रामानें स्वाधीन करून घेतले (१५). संग्रामामध्यें रावणाचा वध करून सीता घेतल्यानंतर क्रोध मागें सारून त्यानें तिला पुनरपि घरीं आणिलें (१६). परंतु सीतेच्या समागमापासून त्या रामाच्या मनाला काय बरें सुख वाटत असेल ? जिला पूर्वी रावणानें बलात्कारानें अंकावर घेऊन हरण करून नेलें ( १७ ) पूर्वी लंकेंत नेल्यानंतर अशोक वनामध्यें नेऊन ठेविलें असतां जी राक्षसांच्या आधीन होती, तिला राम कसें दूषण देत नाहीं ? ( १८ ) आतां स्त्रियांसंबंधानें असला प्रकार आम्हांलाहि सहन होऊं लागेल. कारण, जसें राजा करूं लागतो तसें लोकहि त्याला अनुसरून वागूं लागतात. " ( १९ ) अशीं नानाप्रकारचीं भाषणें, हे राजा, नागरिक जन सर्व नगरामध्यें, व देशामध्यें तुझ्यासंबंधानें करीत असतात. " ( २० ) हें ऐकून राम अतिशय कष्टी झाला व त्यानें बाकीच्या मित्रांस विचारलें. त्या सर्वांनींच भद्र सांगत आहे याप्रमाणें हें निःसंशय खरें आहे असें सांगितलें.

पुढें रामानें सीतेचा त्याग केला.

रावणाच्या घरीं सीता राहिल्यानें ती दूषित झाली. तिला व्यभिचार घडला अशीच समजूत अयोध्यावासी नागरिकांची व राज्यांतील रयतेची झाली होती. सीतेनें अग्नींत शिरून दिव्य केलें. साक्षात् अग्नीनें ती पवित्र आहे अशी सर्वांसमक्ष रामाची खात्री केली. वगैरे कथांवर त्यांच्यापैकीं कोणीहि भरंवसा ठेवला नाहीं. अग्नींत शिरलेलें माणूस पवित्र असो किंवा अपवित्र असो तें जिवंतपणीं बाहेर येणें संभवनीय नाहीं. यासाठीं सीता तशी सुरक्षित अग्नींतून निघाली ही कथा केवळ थोतांड आहे, असें त्या लोकांनीं ठरविलें. यावरून रामाची प्रजा ही विचार करणारी होती. आजच्या आमच्या लोकांसारखी बनावट भाकड कथांवर डोळे झांकून विश्वास ठेवणारी नव्हती असें म्हणणें भाग आहे.

सीतेनें अग्निदिव्य केलें तें आम्हीं पाहिलें असें सांगणारे साक्षीदार पुष्कळ होते व त्यांनीं जीव तोडून कितीहि सांगितलें, तरी त्यांच्यावर

विश्वास त्या काळच्या लोकांनीं ठेवलेला नाहीं. आजचे आम्ही हिंदू या अद्‌भुत कथेवर विचारशक्तीला रजा देऊन विश्वास ठेवीत आहोंत.

आजच्या आम्हा आर्यांची विचारशक्ति नाहींशी होण्याचें कारण काय याचा विचार जरूर झाला पाहिजे. जी गोष्ट रामाच्या वेळीं खोटी ठरली; ती रामायणांत लिहिली म्हणूनच खरी असली पाहिजे असें आजचे हिंदु मानीत आहेत, हा मोठा चमत्कार आहे. या स्थितीला उन्नति म्हणावी कीं अवनति म्हणावी हें विचार करणारांस सहज समजेल. आमच्यांत अंधश्रद्धेचें पीक म्हणा किंवा खूळ म्हणा फार माजलें आहे. भरतानें रामराज्याचा वर्णन केलेला उतारा एकेचाळीसाव्या सर्गांतील दिला आहे. त्यांत १८ व्या श्लोकांत ‘तूं राज्य करूं लागल्यापासून अमानुष प्राणीहि वारंवार वाचायुक्त असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें.’ असें एक वाक्य आहे. पोपटासारखे पक्षी वाचायुक्त आजहि आहेत. पण इतरांना मानवी वाचा फुटली असें सांगणारा सांगो, पण ऐकणाऱ्यावर विचार करण्याची जबाबदारी आहे. परंतु रामायणाचे भाषांतरकार लेलेशास्त्री हे या श्लोकावर पुढील टीप देतात. “एकाद्या विशिष्ट राजाच्या पुण्यप्रभावामुळें अमानुष प्राण्यांना मनुष्यवाचा पुरातनकालींहि प्राप्त होती असें यावरून दिसतें.” भोळा बिचारा लेलेशास्त्री! रामायणांत लिहिलेलें खोटें कसें असेल! तें खरें असलेंच पाहिजे, अशी भाबडी समजूत करून घेऊन बसलेला ! आज शेकडों वर्षें अशीच समजूत आम्हां हिंदूंची होऊन बसली आहे व त्यामुळें आम्ही आमची विचारशक्ति गमावून बसलों आहोंत. अमानुष प्राणी रामाच्या वेळीं बोलत होते त्यावर ज्यांचा विश्वास बसतो त्यांना साधुसंताच्या नांवावर दडपून दिलेले चमत्कार खरेच वाटतात, ज्ञानोबानें रेड्याच्या तोंडून वेद बोलवले, ही गोष्ट खोटी म्हणण्याची हिंमत त्यांच्या अंगीं नसते. कोणत्याहि विद्यमान किंवा मृत साधूच्या साधक चेल्यांनीं सांगितलेलें बनावट चमत्कार त्यांना खरे वाटतात व ते साधूंच्या भजनीं लागतात. बुवाबाजीचें मूळ या आजच्या हिंदु लोकांच्या विचारशक्तीच्या ऱ्हासांत आहे. आमचे हरिदास व पुराणिक धार्मिक भोळेपणा वाढवण्याचें काम सतत करीत असतात व आम्ही त्यांना उत्तेजन देत आहोंत. असा भोळेपणा वाढत राहील तोंपर्यंत बुवाबाजी कायम रहाणारच. एकाद्यादुसऱ्या साधूचीं बरीवाईट कृत्यें प्रसिद्ध केल्यानें

कदाचित् त्या व्यक्तीचें महत्त्व कमी होईल, पण आमचा भोळेपणा कायम आहे व तो वाढवण्याचे पद्धतशीर प्रयत्न हरिदास व पुराणिक यांच्या हातून कळत वा न कळत होत आहेत, तोंपर्यंत बुवाबाजीला आळा पडणें अशक्य आहे.

अरबी भाषेंतील सुरस गोष्टी व रामायणांतील गोष्टी या अद्‌भुततेंत सारख्या आहेत; पण पहिल्या काल्पनिक आहेत हें सर्वांस माहीत असतें. म्हणून त्यांच्या वाचनानें कल्पनाशक्ति वाढते हा फायदाच आहे. विशेषें-करून लहान वयाच्या मुलांस या गोष्टी सांगणें चांगलें. पण रामायणांतील कथा अज्ञानवर्धक आहेत. त्यांच्या पठणानें बालांची, तरुणांची आणि वृद्धांची विचारशक्ति कुंठित होते. हा विचारशक्तीचा ऱ्हास केवळ धार्मिक विषयापुरता मर्यादित रहात नाहीं. इतर व्यावहारिक विषयांतहि आमचा समाज मागें पडला आहे. यासाठीं विचारशक्तीला आवळून टाकणाऱ्या बेड्या तोडून टाकण्याचें काम आमच्या विद्वानांनीं हातीं घ्यावें. हें देशसेवेचें मोठेंच काम आहे.

—किर्लोस्कर, एप्रिल १९३६.

# दाशरथी राम अनार्य होता ?

रामायणकथा आर्यावर्तांत मुळींच घडली नाहीं आणि दक्षिण हिंदुस्थानांत तर नाहींच नाहीं, असें रामायणकथेंत आलेल्या स्थळांचा विचार करून मागील कांहीं लेखांत दाखविलें. त्यांत आलेल्या व्यक्तींच्या नांवांवरूनहि विचार करतां येईल. पण त्यावरून निःसंशय अनुमान काढणें कठीण. तींच तींच नांवें थोड्याशा फरकानें निरनिराळ्या देशांत सांपडणें साहजिक आहे. तेव्हां तो प्रयत्न सोडून देऊं.

परंतु संस्कृति, विचार, चालीरीति, कायदे यांची गोष्ट निराळी आहे. ज्याची त्याची संस्कृति, आचारविचार, कायदे म्हणजे स्मृतींत दिलेले नियम हे ठराविक असतात. आमच्या आर्यसंस्कृतीहून पाश्चात्य संस्कृति भिन्न आहे. त्यामुळें आमच्या व त्यांच्या आचारविचारांतहि भिन्नपणा असतो.

दोन ठिकाणच्या आचारांत व विचारांत सर्व बाबतींत फरक असतोच असें नाहीं. कांहीं थोड्या ठळक बाबतींतच असतो. या फरकावरूनच दोन देशांचा भिन्नपणा ओळखावयाचा आहे.

पहिलें उदाहरण वालीवधाचें आहे. वाली व राम यांचें वैर नसतां, वालीनें रामाचा कसलाहि अपराध केला नसतां व वाली सुग्रीवाशीं द्वन्द्व-युद्ध करीत असतां रामानें वालीला बाणानें मारावें हें कृत्य अगदीं अधर्म्य आहे. मन्वादि स्मृतिकारांनीं अशा युद्धाचा निषेधच केला आहे.

( मनु–अध्याय ७ श्लोक ९२ )

न सुप्तं न विसन्नाहं न नग्नं न निरायुधम् ।
नायुध्यमानं पश्यन्तं न परेण समायतम् ॥

अर्थः–निजलेल्याला, कवच काढलेल्याला, नग्नाला, शस्त्रहीनाला, न लढणाऱ्याला व दुसऱ्याशीं युद्ध करणाऱ्याला मारूं नये. अशा कांहीं गोष्टी न करण्याच्या सांगितल्यावर मनु म्हणतो :

एषोऽनुपस्कृतः प्रोक्तो योधधर्मः सनातनः ।
अस्माद्धर्मान्न च्यवेत क्षत्रियो घ्नन् रणे रिपून् ॥ ९८ ॥

वाली सुग्रीवाबरोबर लढत असता रामानें ही मनूची आज्ञा मोडली. राम आर्य क्षत्रिय असतां तर तो स्मृतीप्रमाणें युद्धधर्म बरोबर पाळता. कारण मनूनें सांगितल्याप्रमाणेंच इतर स्मृतींचा अभिप्राय आहे. (पहा याज्ञवल्क्य स्मृति अ. १ श्लो. ३२६ ). पण या स्मृतिवचनांचा अनादर रामासारख्यानें केला. त्याचें कारण तो आर्यसंस्कृतीचा नसल्यानें त्याला हा क्षात्रधर्मच मान्य नव्हता हें आहे. कोणीकडून तरी आपला कावा साधावयाचा ! Everything is fair in love and war. अशी पाश्चात्यांची नीति आहे. तिला अनुसरणारा राम अनार्यच असला पाहिजे असें या कृतीवरून दिसतें.

या कृत्याबद्दल वालीनें त्यास दोष दिलाच. तो म्हणाला :

सतां वेषधरं पापं प्रच्छन्नमिव पावकम् ।
नाहं त्वामाभिजानामि धर्मच्छद्माभिसंवृतम् ॥
विषये वा पुरे वा ते यदा पापं करोम्यहम् ।
न च त्वामवजानेऽहं कस्मात्त्वं हंस्यकिल्बिषम् ॥
मामिहा प्रतियुध्यन्तमन्येन च समागतम् ॥

( कि. स. १७ श्लो. २३–२५ ).

### सीतेला दुसरीकडे जाण्याचा उपदेश

अर्थः—सज्जनांचा वेष धरणारा तूं वस्तुतः पापी असून झाकलेल्या अग्नीसारखा धर्माचें सोंग घेतलें आहेस. तुझ्या देशांत किंवा नगरांत मीं जर कांहीं पाप केलें नाहीं; आणि तुझी अवज्ञा केली नाहीं तर तूं मजसारख्या निरपराध्याचा कां वध केलास ! तुझ्याशीं युद्ध न करितां दुसऱ्याशीं भिडलों असतां माझा वध कां केलास ! इत्यादि.

या भाषणाला १८ व्या सर्गाच्या पहिल्या श्लोकांत वाल्मीकीनें “ दिसण्यांत कठोर परंतु हितावह, विनययुक्त आणि धर्म व अर्थ यांना

धरून असणारें " असें म्हटलें आहे. याला रामानें दिलेलें उत्तर त्याला न शोभण्यासारखें आहे. त्यांत असत्य भरपूर आहे. पहा, राम म्हणतो, ( सर्ग १८ ) " पर्वत, वनें व अरण्यें यांसह इक्ष्वाकु वंशजांना ही भूमि दिलेली आहे व म्हणून पशू , पक्षी व मनुष्यें यांच्यावर अनुग्रह आणि त्यांचा निग्रह करण्याचा अधिकारहि त्यानें दिलेला आहे. या पृथ्वीचें पालन भरत करीत आहे, व त्यानें धर्मरक्षणार्थ आमची व इतर राजांची योजना केलेली आहे. " मग रामाच्या पादुका नेऊन त्या सिंहासनावर स्थापून रामप्रतिनिधि म्हणून भरत राज्य करीत होता हें कथन खोटें असलें पाहिजे. इतर राजे जसे जनक, केकयाचा अश्वपति व लंकेचा रावण हेहि भरताच्या व त्याच्यापूर्वी दशरथाच्या आज्ञेत होते असें म्हणावयाचें काय ? पुढील नववे व दहावे श्लोकांत सर्व पृथ्वीचा राजा भरत आहे असें खोटेंच सांगितलें आहे. आम्हीहि धर्म-वृद्धीची इच्छा धरून संपूर्ण पृथ्वीवर संचार करीत आहों, हें विधान धादांत खोटें आहे. वालीचें मोठें पाप म्हणजे त्यानें धाकट्या भावाची बायको बळकावली हें. भावाच्या बायकोवर त्या वेळीं हक्कच होता. तें कृत्य अधर्म्य नव्हतें. हें खुद्द देवगुरू ब्रहस्पतीच्या ममतेशीं झालेल्या संगावरून सिद्ध आहे. इतकेंच नव्हे तर ही गोष्ट खुद्द रामालाहि मान्य होती. वनवासाला जाण्यापूर्वी सीतेचें सांत्वन करतांना, "भरताच्या मर्जीप्रमाणें वागून त्याच्या-जवळ राहणें तुला शक्य आहे." ( अयोध्याकांड सर्ग २६ श्लो. २६ ) असें त्यानें म्हटलें. यांत स्पष्टता नाहीं, पण कसें वागावें हें ध्वनित केलें आहे. युद्धकांडांत ११५ वे सर्गांत रामानें सीतेला स्पष्ट सांगितलें आहे. रावणाकडे राहिल्यानें ती दूषित झाली म्हणून राम म्हणतोः—

" यदर्थं निर्जिता मे त्वं सोयमासादितो मया ।
नास्ति मे त्वय्यभिष्वंगो यथेष्टं गम्यतामिति ॥२१॥
तदद्य व्याहृतं भद्रे मयैतत्कृतबुद्धिना ।
लक्ष्मणे वाथ भरते कुरु बुद्धिं यथासुखम् ॥२२॥
शत्रुघ्ने वाथ सुग्रीवे राक्षसे वा बिभीषणे ।
निवेशय मनः सीते यथा वा सुखमात्मनः ॥२३॥

अर्थः–" ज्याच्याकरितां मीं तुला जिंकिलें तो हा माझा उद्देश सिद्धीस गेला आहे. आतां तुझ्या ठिकाणीं माझ्या मनाची आसक्ति नाहीं; तूं वाटेल तिकडे चालती हो. (२१) भद्रे, मनाचा निश्चय करून ही गोष्ट मीं तुला सांगितली आहे. आतां तुझी इच्छा असल्यास लक्ष्मणापाशीं किंवा भरतापाशीं तूं खुशाल रहा. (२२) हे सीते, शत्रुघ्नाजवळ, सुग्रीवाजवळ, बिभीषण राक्षसाजवळ किंवा तुला नीट वाटेल तेथें राहण्याचें तूं मनामध्यें आण." (२३)

रामाच्या बोलण्याचा आशय स्पष्ट आहे. लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न हे रामाचे भाऊच, तेव्हां त्यांचीं नांवें प्रथम घेतलीं. सुग्रीवाबरोबर अग्निसाक्षिक सख्य केल्यानें तो भाऊ झाला व अशा पद्धतीनें झालेल्या भावांत एकमेकांची बायको उपभोगण्याचा हक्क येत असे.

(पहा उत्तरकांड सर्ग ३४ श्लो. ४०।४१।४२ ).

## जुन्या काळची जुनी रीत

"सोऽहं दृष्टबलस्तुभ्यं इच्छामि हरिपुंगव ।
त्वयासह चिरं सख्यं सुस्निग्धं पावकाग्रतः ॥ ४० ॥
दाराः पुत्राः पुरं राष्ट्रं भोगाच्छादनभोजनम् ।
सर्वमेवाविभक्तं नौ भविष्यति हरीश्वर" ॥ ४१ ॥
ततः प्रज्ज्वालयित्वाग्निं तावुभौ हरिराक्षसौ ।
भ्रातृत्वमुपसंपन्नौ परिष्वज्य परस्परम् ॥ ४२ ॥

अर्थः–" हे वानरश्रेष्ठ, प्रसिद्ध सामर्थ्य ज्याचें आहे असा मी अग्नीसमक्ष तुझ्याशीं अत्यंत प्रेमयुक्त असें चिरकाल सख्य करण्याची इच्छा करीत आहें (४०) हे वानराधिपते, धर्मपत्न्या, पुत्र, नगर, राष्ट्र, भोग्य वस्तु, आच्छादन, भोजन, हें सर्व आपलें समाईक असो" (४१) नंतर ते उभयता वानरराक्षस अग्नि पेटवून परस्पराला आलिंगून भ्राते बनले. (४२) नंतर रावणानें एक महिना वालीचा पाहुणचार सुग्रीवाप्रमाणें राहून घेतला असें ४४ वे श्लोकांत सांगितलें आहे. रामानें सुग्रीवापाशीं अग्नि पेटवून सख्य केलें आहे. त्यालाहि हा विधि व याच्या अंतर्गत कल्पना

माहीत होत्या. यावरून मानीव, कृत्रिम भावांमध्यें धर्मपत्न्यांचा उपभोग मान्य होता, तर सख्ख्या भावांमध्यें. तो मान्य असलाच पाहिजे हें उघड आहे. त्यामुळें वालीनें रुमेचा उपभोग घेतला म्हणून तो देहान्तशासनास पात्र झाला हें रामाचें म्हणणें अगदीं असत्य, भ्रामक, कांहीं तरी नसता दोष वालीचे अंगीं चिकटवून आपण केलें तें योग्य असा कांगावा करण्यासारखें आहे. या एकंदर प्रकारावरून वालीवधाचें कृत्य आर्यावर्तांत चालू असलेल्या धर्मशास्त्राला प्रतिकूल आहे. असें कृत्य करणारा विख्यात राजा दुसऱ्या धर्मशास्त्राला मानणारा परकीय असला पाहिजे असें अनुमान होतें.

## राजाचे त्या वेळचे आचार

आणखी विचार येतो तो. अग्निसाक्षिक सख्य, व त्याच्या अंगभूत भाऊ होऊन जनानखान्यापर्यंतचा उपभोग ही चाल आर्यांत होती काय? रामायणांत अशा सख्याचे दोन दाखले आहेत. इतर कोणत्या ग्रंथांत असल्याचें आमच्या ऐकिवांत नाहीं. ही चाल अनार्य असल्यास रामायणकथा परदेशची व रामहि परदेशी हें कबूल करावें लागेल.

राम हा मन्वादि आर्यस्मृति पाळणारा नव्हता असें दुसऱ्या एका वर्तनावरून दिसतें. राजाचा आचार कसा असावा याविषयीं आमच्या स्मृतिकारांचा मोठा कटाक्ष आहे. राजाचें मुख्य कर्तव्य प्रजापालन. बाकी धार्मिक व कार्मिक कार्यांकडे थोडा वेळ देणें योग्य. यावर मनुस्मृतींतील दोन श्लोक पुरे आहेत :

उत्थाय पश्चिमे यामे कृतशौचः समाहितः ।
हुताग्निर्ब्राह्मणांश्चार्च्य प्रविशेत्स शुभां सभां ॥१४५॥
तत्र स्थितः प्रजाः सर्वाः प्रतिनंद्य विसर्जयेत् ।
विसृज्य च प्रजाः सर्वाः मंत्रयेत्सह मंत्रिभिः ॥ १४६ ॥

अ. ७

अर्थ:—भल्या पहाटेस उठून शौचादि आटपून अग्नींत आहुति देऊन व ब्राह्मणांचा सत्कार करून शुभसभागृहांत जावें. तेथें सर्व प्रजेला आनंद देऊन (म्हणजे त्यांच्या तक्रारी ऐकून त्या दूर करणें, न्याय देणें) रजा द्यावी व नंतर मंत्र्यांबरोबर मसलती कराव्या, इत्यादि. आपलीं धर्मकार्यें

करण्यास राजानें विद्वान पुरोहित नेमावा असें इतर स्मृतींतहि आहे, याचा उद्देश स्पष्ट आहे. प्रजारक्षणाकडे राजाला भरपूर वेळ मिळाला पाहिजे. रामायणांत रामाची दिनचर्या कशी सांगितली आहे पाहूं.

( उ. का. सर्ग ४२ )

प्राप्तयोर्विविधान्भोगान् अतीतः शिशिरागमः ॥ २६ ॥

ते उभयता ( सीता राम ) नाना प्रकारचे भोग भोगीत असतांना हिवाळा निघून गेला. ( २६ )

पूर्वाह्णे धर्मकार्याणि कृत्वा धर्मेण धर्मवित् ।
शेषं दिवसभागार्धं अंतःपुरगतोऽभवत् ॥ २७ ॥
सीतापि देवकार्याणि कृत्वा पौर्वाह्णिकानि वै ।
श्वश्रूणामकरोत्पूजां सर्वासामविशेषतः ॥ २८ ॥
अभ्यगच्छत्ततो रामं विचित्राभरणांबरां ।
त्रिविष्टपे सहस्राक्षं उपविष्टं यथा शची ॥ २९ ॥

अर्थः– धर्मवेत्ता राम पूर्वाह्णसमयीं धर्मकार्यें यथाविधि उरकल्यानंतर दिवसाच्या अवशिष्ट राहिलेल्या अर्ध्या भागामध्यें अंतःपुरांत जात असे. (२७) आणि सीताहि सकाळचीं देवकार्यें आटोपून सर्व सासवांची एकसारखी पूजा केल्यानंतर (२८) स्वर्गामध्यें असलेल्या इंद्राकडे जाणाऱ्या शचीप्रमाणें विचित्र भूषणें व रत्नें धारण करून रामाकडे जात असे. (२९). यावरून धर्मकृत्याकडे अर्धा दिवस व अंतःपुरांत बाकीचा वेळ अशी रामाची दिनचर्या असावी. त्यांतून उपभोगाचा कंटाळा आल्यास मधल्या चौकांत जाऊन खुषमस्कऱ्याबरोबर मजेंत काळ घालवावा, असें पुढील सर्गाच्या पहिल्याच श्लोकांत सांगितलें आहेः–

तत्रोपविष्टं राजानं उपासन्ते विचक्षणाः
कथानां बहुरूपाणां हास्यकाराः समन्ततः ॥

( सर्ग ४३ श्लो. १ )

## रामराज्याची वास्तविक कल्पना

अर्थः–समयसूचक असे खुषमस्करे लोक नाना प्रकारच्या गोष्टी राजा बसला असतांना सांगून त्याची सर्व प्रकारें सेवा करीत असत. हे खुषमस्करे होते. राज्यांतील बरीवाईट बातमी आणणारे हेर नव्हते हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. एकंदरींत रामाचा वेळ धर्म व काम यांच्या सेवनांत जात होता. राज्यकारभाराची काळजी त्याला बिलकूल नव्हती. कारण तें काम पूर्वीप्रमाणेंच भरताकडे सोपविलेलें होतें. रामायणांत सांगितल्याप्रमाणें रामराज्याची कल्पना असेल तर तसलें रामराज्य आम्हांस नको. मनुस्मृतींत सांगितल्याप्रमाणें प्रजेच्चीं गाऱ्हाणीं स्वतः ऐकणारा व तीं दूर करणारा राजा आम्हांस पाहिजे. रामाच्या राज्यांत राम हा धर्मकृत्यें व विलास यांत वेळ घालवी. प्रजेकडे पाहण्याचें काम भरताकडे व इतर अधिकारी वर्गाकडे. स्मृतीची योजना राजानें स्वतः कारभार पाहण्याची. रामायणी राज्यकारभार अधिकारी वर्गाच्या हातीं. राजा केवळ तटस्थ. अशी स्थिति पुराण इजिप्तांत होती असा दाखला मिळतो.

From '**Social Life in Ancient Egypt**' by W. M. Flinders Petrie.

P. 31. ' The King was held in by being part of a highly organised official machinery, in which every one knew their own business, and his official acts were part of that machinery.

P. 9. ' The religious functions of the Egyptian Kings are not sufficiently recorded to show their origins. He certainly performed the daily sacrifice, acting as supreme priest for the country, and every funeral offering was nominally made in his name. He seems to have had the position, well known in many other countries, that the welfare of the land depended upon his vitality and actions; Another matter, which surprised the Greeks was his entire subservience to the laws not only in Government but in private life.'

P. 37. ( After rising ), ' Then came the ceremonial purification, the assumption of the robes and insignia, and

proceeding to the sacrifice. Before that act the high priest, with king and people standing around him, prayed for the health and prosperity of the king, recited the praises of the king, and then a curse on all offences that had been ignorantly committed, laying the blame on the ministers. This must have been a considerable criticism of affairs, which owing to the great power of the priesthood would be hard to control officially; it is said that this was to guide and check the royal conduct. It is not stated whether the manual act of sacrifice was by the king or the high priest, but it was the king's ceremony, and he inspected the entrails. Then followed the sermon, when the priests read edicts, laws and historical passages fitting for the time.

'The powers of the king were strictly limited. "He could not do any public business; condemn or punish any man to gratify his own humour or revenge, or for any unjust cause; but was bound to do according as the laws had ordered in every particular case......The kings, therefore, carrying this even hand towards all their subjects, were more beloved by them than by their own kindred." Though this is a later statement, it is to be accepted for the early times, as in the VIth dynasty a queen was tried by a judge, who wrote the report with another judge, the king taking no part, and not appearing to act in the case. He may probably have given judgment finally, in this case as in other serious cases, but the examination and condemnation of criminals was entirely a matter of legal procedure.'

सारांश- ( ३१ ) पुराण इजिप्तच्या राज्ययंत्राचें राजा हें एक चक्र होतें व इतर कामगार हेहि त्या यंत्राचे लहानमोठे भाग होते. आपआपलें काम कसें करावें याची माहिती प्रत्येकास असावी लागे. राजाच्या नांवानें सुटणारे हुकूम या राजयंत्रांतूनच निघत असत.

( ९ ) इजिप्तच्या राजास नित्य करावीं लागणारीं धार्मिक कर्मे मुळांत कशीं सुरू झालीं हें समजण्यास भरपूर साधन नाहीं. त्याला रोज अग्नींत आहुति द्याव्या लागत व त्या कामीं सर्व राष्ट्राचा तो श्रेष्ठ याजक असे. मृतासाठीं दिलेलीं दानें त्याच्याच नांवानें होत. राजाचें ओज व त्याचीं धर्मकर्में यावर राज्याचें कल्याण अकल्याण अवलंबून असतें अशी इतर बऱ्याच देशांप्रमाणें इजिप्तचीहि समज होती. तेथील राजाला राज्यकारभारांत व खाजगी जीवनांत कायद्याच्या जोखडाखालीं मान द्यावी लागे; याचें ग्रीक लोकांना फार आश्चर्य वाटे.

## इजिप्शियन राजांची दिनचर्या

(३७) शयनांतून उठल्यावर राजाला धर्मशास्त्रांत सांगितलेल्या नियमाप्रमाणें शौचमुखमार्जन, स्नान वगैरे करावें लागे. नंतर राजचिन्हें, झगा वगैरे घालून राजा यज्ञमंडपांत जाई. मुख्य याजकाजवळ राजा व इतर उभे राहात आणि राजाला आरोग्य असावें व त्याचा उत्कर्ष व्हावा असें तो देवाजवळ मागणें करी. नंतर राजाचें गुणवर्णन करून त्याच्या हातून न कळत घडलेल्या चुकांची जबाबदारी त्याच्या मंत्र्यांवर टाकून त्यांचा निषेध करी. या प्रसंगीं राज्यकारभारांत घडलेल्या बऱ्याच भल्याबुऱ्या बाबींची छाननी होत असे. उपाध्याय वर्गाचें प्रस्थ फारच वाढल्यामुळें त्यांना गप्प करणें कठीण होतें. राजानें आपल्या धर्मापासून किंचित्‌हि ढळूं नये अशी दक्षता त्यानें घ्यावी म्हणून ही योजना होती. आहुति देण्याची क्रिया राजा स्वतः करी, का मुख्य याजकाकडून करवी हें नमूद नाहीं. पण हा नित्याचा यज्ञ राजाचा म्हणून होता व बली दिलेल्या पशूंचीं आंतडीं त्यास स्वतः तपासावीं लागत असत. हें झाल्यावर मुख्य याजक प्रवचन करी; त्यांत त्या कालाला व प्रसंगाला अनुसरून असलेल्या धर्मशास्त्रांतील नियम आणि पूर्वीच्या इतिहासांतील घडलेल्या गोष्टी यांची चर्चा असे.

राजाचे अधिकार नियमानें बांधलेले होते. आपली लहर लागेल त्याप्रमाणें निग्रह किंवा अनुग्रह करणारे हुकूम त्याला देतां येत नसत. कोणावर दांत ठेवून त्याला दोषी ठरवितां येत नसे. प्रत्येक बाबींत धर्मशास्त्रांतील ठरीव नियमाला अनुसरूनच त्याला वागावें लागे. याप्रमाणें सर्व प्रजेशीं

निःपक्षपातीपणानें वागणें राजाला भाग असल्यानें त्याचेवर प्रजेची मोठी भक्ति असे. तशी राजघराण्यांतील माणसांची किंवा दरबारांतील सेवकांची असणें शक्य नव्हतें. सहाव्या वंशाचें राज्य असतां प्रत्यक्ष राणीची चौकशी एका न्यायाधीशानें केली व दुसऱ्या जजाच्या मदतीनें त्यानें आपला निर्णय लिहिला असें नमूद आहे. या चौकशीच्या कामीं अखेरचे हुकूम राजाचे नांवानें निघत. याप्रमाणें या राणीच्या खटल्यांतहि निघाला असेल. परंतु कोणाचीहि चौकशी होऊन अपराधी शाबीद होण्याचें काम पूर्णपणें नियमास अनुसरून चाले.

यावरून राम हा आर्यावर्तांतील स्मृति मानणारा राजा नसून पुराण मिसरच्या कायद्यानें जखडलेला राजा असावा असें दिसतें. तेथें राजाचा पुष्कळच वेळ धर्मकर्मांत जाई. रामाची दिनचर्याहि उत्तरकांड सर्ग ४२ श्लोक २७ यांत थोडक्यांत दिली आहे.

पूर्वाह्णे धर्मकार्याणि कृत्वा धर्मेण धर्मवित्
शेषं दिवसभागार्धं अंतःपुरगतोऽभवत् ॥

धर्मवेत्ता राम पूर्वाह्ण समयीं धर्मकार्यें यथाविधि उरकून दिवसाच्या अवशिष्ट राहिलेल्या अर्ध्या भागामध्यें अंतःपुरांत जात असे. राज्यकारभाराचें काम रामानें भरताच्या अंगावर टाकलें होतें. पुराण इजिप्तांत तें काम अधिकारी वर्ग पूर्वींपासून बांधून दिलेल्या नियमाप्रमाणें करी. मिळून हिशेब एकच. धर्मकर्मांत रामाचा वेळ फार जात असे याचा पुरावा युद्धकांड सर्ग १२८ यांतहि मिळतो.

पौंडरीकाश्वमेधाभ्यां वाजिमेधेन चासकृत् ।
अन्यैश्च विविधैर्यज्ञैरयजत्पार्थिवात्मजः ॥ ९४ ॥
दशाश्वमेधानाजह्रे सदश्वान्भूरिदक्षिणान् ॥ ९५ ॥
राघवश्चापि धर्मात्मा प्राप्य राज्यमनुत्तमम् ॥ ९६ ॥
ईजे बहुविधैर्यज्ञैः ससुहृद्भ्रातृबांधवः ॥ ९७ ॥

अर्थः— राजकुमार रामानें पौंडरीक, अश्वमेध आणि विशेषतः वाजिमेध वारंवार करून इतरहि नाना प्रकारचे यज्ञ केले. ( ९४ )

उत्कृष्ट अश्व आणि विपुल दक्षिणा यांनीं युक्त असे दहा अश्वमेध त्यानें केले.(९५) धर्मात्म्या रामाला अनुपम राज्य प्राप्त झाल्यानंतर पुत्र, भ्राते व बांधव यांसह त्यानें नानाप्रकारचे यज्ञ केले. (९७) इत्यादि उल्लेखांवरून रामाचा बहुतेक काळ धर्मकृत्यांत जात असून राज्यकारभाराची दगदग त्यास नव्हती असें दिसतें. यावरून तो आर्यावर्तांतील राजा नसून इजिप्तचा राजा असावा असें वाटूं लागतें. इजिप्तच्या राजाचा वेळ धर्मकृत्यांत जास्त जाई व न्याय वगैरे देण्याचें काम इतर अधिकारी करीत.

## राम हा आर्य नव्हे !

इजिप्तमध्यें पुरोहित किंवा याजक वर्गाचें मोठें महत्त्व असे. दररोज हवनाच्या वेळीं राजाला ईशप्रार्थना ऐकविली जाई. तींत त्याच्या राज्यव्यवस्थेंतील चुकांबद्दल क्षमा भाकण्यांत येई. पुढें एक प्रवचन होई. त्यांत मागील राजांचे दाखले देऊन राजानें कसें वागलें पाहिजे हें त्याच्या मनावर ठसविण्यांत येई......

भिन्नभिन्न शहरच्या देवळांचीं उत्पन्नें वाढलीं व त्यामुळें सुंदर मंदिरें बांधतां आलीं व याजकांची संपत्तिहि फार वाढली.

रामायणांत देवस्थानांचें वर्णन नाहीं. काशी येथील विश्वनाथ हें प्रसिद्ध पुरातन देवस्थान आहे; पण त्याचाहि उल्लेख कोठेंच मिळत नाहीं. रामकालीं मूर्तिपूजाच नव्हती असें म्हणावयाचें कीं काय ? इजिप्तच्या इतिहासांत व तेथील प्राचीन धर्मांत प्रत्येक शहरचा एकेक प्रसिद्ध देव असे व राजा या प्रत्येक देवस्थानाचें दर्शन घेऊन तेथें हवन करीत असे. रामायणांत हीं देवस्थानें मुळींच नमूद नाहींत. त्यांची जागा ऋषींच्या आश्रमांनीं पटकाविली आहे. या आश्रमांत कोठेंहि देवांच्या मूर्ति नाहींत.

प्राचीन इजिप्तच्या राज्यांत राजाकडे मुख्य काम राष्ट्राच्या भरभराटीकरितां नित्य व नैमित्तिक हवन, यज्ञ वगैरे करणें हें असे. आर्यांच्या स्मृतींप्रमाणें मुख्य काम दंड म्हणजे न्याय देणें हें असे. प्राचीन इजिप्तांत न्याय देण्याचें काम स्वतंत्र असलेले न्यायाधीश करीत. राजाची लहर वगैरे त्यांत चालत नसे. म्हणून तेथें राजा हा फार लोकप्रिय असे.

ज्या ठिकाणीं राज्यघटनेप्रमाणें राज्यकारभार चालतो व राजा केवळ त्या घटनायंत्राचें एक चक्र होऊन राहतो, तेथें राजा हा प्रजेला फार प्रिय असतो हा अनुभवच आहे. इंग्लंडच्या राजाचें महत्त्व व लोकप्रियतेचें मूळ यांतच आहे. याच कारणानें प्राचीन इजिप्तांत राजा लोकप्रिय असे व म्हणूनच रामराज्याची कीर्ति तिकडे दुमदुमत होती. रामायणकारांनीं तिकडील काव्याचें रूपांतर करून ही कथा आर्यावर्तांतील असा भास उत्पन्न केला; तेव्हां रामराज्याची कल्पना येथेंहि पसरली व आज प्रजेला सुख देणाऱ्या राजाला रामाची व त्या राज्यकारभाराला रामराज्याची उपमा देण्यांत येत असते. पण ही कल्पना अगदींच परदेशी आहे.

—महाराष्ट्र-शारदा, मे १९३६

# राम अनार्य होता !

मागील लेखांत रामचरित्रांतील दोन प्रसंग घेऊन त्या त्या प्रसंगीं रामानें केलेलें वर्तन आर्यांच्या स्मृतिवचनांस विरुद्ध कसें होतें हें दाखविलें. पहिलें उदाहरण वालीयुद्धाचें. वाली हा सुग्रीव नांवाच्या आपल्या भावाबरोबर द्वंद्वयुद्ध करण्यांत गुंतला असतां त्यावर रामानें बाण सोडून त्याचा वध केला. हें कृत्य मन्वादि सर्व स्मृतिकारांच्या मतानें क्षत्रियास न शोभण्यासारखें अधर्म्य आहे. तें रामानें केलें व त्या कामाची त्याला शरमहि वाटली नाहीं. यावरून राम हा भिन्न संस्कृतीचा असावा व त्या संस्कृतीप्रमाणें असें कृत्य निंद्य नसावें म्हणूनच त्याच्यासारख्या वीरानें तें बिनदिक्कत आचरणांत आणलें असें अनुमान निघतें.

दुसरें उदाहरण रामाच्या दिनचर्येचें होतें. राम हा दिवसाचा अर्धा भाग यज्ञ, आहुति वगैरे धर्मकृत्यांत घालवी व पुढला अर्धा भाग आणि रात्र जनानखान्यांत ऐषआरामांत घालवी. प्रत्यक्ष राज्याचा कारभार भरताकडे सोपविला होता. आमच्या आर्यस्मृतिकारांच्या मताप्रमाणें राजाचें पहिलें व मुख्य काम प्रजेचीं गाऱ्हाणीं ऐकून तीं दूर करणें व नंतर इतर गोष्टी. धर्मकर्में करण्यास जरूर तर पुरोहिताची नेमणूक करावी अशी सवलत दिलेली आहे. याप्रमाणें राजाचें कर्तव्य राज्यकारभारावर स्वतः नजर ठेवणें हें आहे. रामाचें वर्तन या आर्यपद्धतीस सुटून झालेलें आहे. रामाचा सर्व काळ धर्मकृत्यांत किंवा सुखोपभोगांत जाई व प्रजारक्षणासाठीं भरताची योजना होती. हा आचार प्राचीन इजिप्त देशांत होता असें सर फ्लिंडर्स पेट्री यांच्या ग्रंथांतील उताऱ्यावरून दाखविलें आहे. तशा प्रकारचा आचार रामाकडून घडला असल्यानें राम हा पुराण इजिप्तचा राजा असावा अशा अनुमानास बळकटी येते.

तिसरें उदाहरण सीता-त्यागाचें आहे. रावणानें सीतेला जबरदस्तीनें उचलून नेली व ती त्याच्या अशोक वनांत एक वर्ष होती. अशोक वन हें नांवाप्रमाणें अरण्य नव्हतें, तर तो विलास भोगण्याचा एक उत्कृष्ट बाग

होता. हनुमान सीताशोधासाठीं लंकेस गेला, तेव्हां त्यानें या अशोक वनाचें वर्णन केलें आहे. त्यांत एक रम्य नदी असून “नानाप्रकारच्या पक्षिगणांनीं युक्त असलेलीं सरोवरें त्या कपिश्रेष्ठ वायुपुत्र हनुमानानें अवलोकन केलीं.” (सुंदरकांड १४।३२)

कृत्रिमां दीर्घिकां चापि पूर्णां शीतेन वारिणा ॥
मणिप्रवरसोपानां मुक्तासिकत शोभिताम् ॥ ३३ ॥
विविधैर्मृगसंघैश्च विचित्रां चित्रकाननाम् ॥
प्रासादैः सुमहद्भिश्च निर्मितैर्विश्वकर्मणा ॥ ३४ ॥
काननैः कृत्रिमैश्चापि सर्वतः समलंकृताम् ।

शीत जलानें परिपूर्ण अशी एक तयार केलेली वापीहि तेथें त्यानें अवलोकन केली. त्या वापीला उत्कृष्ट रत्नाच्या पायऱ्या केलेल्या होत्या; मोत्याच्या वाळूनें ती सुशोभित झालेली होती. (३३) नानाप्रकारच्या पशुसमुदायांनीं ती मनोहर दिसत होती; सभोंवतीं असलेल्या चित्रविचित्र वनांनीं ती युक्त होती, आणि विश्वकर्म्यानें निर्माण केलेल्या प्रचंड राजवाड्यांनीं (३४) व कृत्रिम वनांनींहि ती सर्व बाजूंनीं भूषित झालेली होती.

एकंदरींत अशोक वन हा चैनीनें विलास करण्यासाठीं उत्तम प्रासाद असलेला मोठा, सुंदर, मनोहर बाग होता व त्यांत रावणानें सीतेला ठेविलें होतें.

अशोक वन हें विशेष नाम नसून अशा प्रकारच्या विलासोपभोग करण्याच्या स्थानाला तें सामान्य नाम असावें. उत्तरकांडाच्या ४२ व्या अध्यायांत पहिल्याच श्लोकांत अयोध्येंतील अशोक वनांत राम सीतेसह क्रीडण्यास गेल्याचा उल्लेख आहे.

स विसृज्य ततो रामः पुष्पकं हेमभूषितम् ।
प्रविवेश महाबाहुः अशोकवनिकां तदा ॥ १ ॥

या वनांतहि लंकेप्रमाणेंच अनेक वृक्ष व सुंदर पक्षी होते. वापीहि होत्या, त्यांत माणकाच्या पायऱ्या केल्या होत्या, त्यांच्या आंतील फरशी स्फटिकांची केलेली होती.

नंदनं हि यथेंद्रस्य ब्रह्मं चैत्ररथं यथा ।
तथाभूतं हि रामस्य काननं संनिवेशनम् ॥ १५ ॥
बह्वासनगृहोपेता लतासनस्तमावृताम् ।
अशोकवनिकां स्फीतां प्रविश्य रघुनंदनः ॥१६॥

इंद्राच्या नंदनवनाप्रमाणें अथवा ब्रह्मदेवानें निर्माण केलेल्या चित्ररथाच्या वनाप्रमाणें त्या रामाच्या वनाचा आकार होता. (१५) विपुल आसनें व गृहें यांनीं युक्त असून लतासनांनीं व्याप्त झालेल्या त्या भव्य अशोक वनामध्यें रघुनंदन रामानें प्रवेश केला. (१६).

एकंदरींत सीतेला लंकेंतील अशोक वनांत ठेविलें होतें, तें वन अयोध्येंतील विलास वनाप्रमाणेंच होतें. लंकेंत व अयोध्येंत सीता ही अशोक वनांत होती.

रामापासून वियोग झाल्यामुळें सीता फार कष्टी असे. तिच्या विरहावस्थेचें वर्णन हनुमानानें केलेलें आहे. रामानें रावणाचा वध केल्यावर पहिलें काम बिभीषणाकडून रावणाच्या शवाची व्यवस्था लावण्याचें केलें व दुसरें काम त्याला लंकेचा राजा म्हणून अभिषेक करविला हें होतें.

लंकापुरवासी प्रजेनें बिभीषणाकडे मंगल नजराणा आणला तो त्यानें तसाच रामाला अर्पण केला.

यानन्तर रावणवधाची वार्ता कळविण्यास सीतेकडे हनुमानास पाठविलें :

" अनुज्ञाप्य महाराजं इमं सौम्य बिभीषणम् ।
प्रविश्य नगरीं लंकां कौशलं ब्रूहि मैथिलीम् ॥२४॥
वैदेह्या मां च कुशलं सुग्रीवं च सलक्ष्मणम् ।
आचक्ष्व वदतां श्रेष्ठ रावणं च हतं रणे ॥२५॥
प्रियमेतदिहाख्याहि वैदेह्यास्त्वं हरीश्वर ।
प्रतिगृह्य तु संदेशं उपावर्तितुमर्हसि " ॥२६॥

( यु. कां. सर्ग ११२ ).

अर्थः– " हे सौम्य, बिभीषणाची आज्ञा घेऊन तूं लंकानगरीमध्यें जा आणि सीतेला कुशल वर्तमान कळीव (२४). हे वक्तयांमध्यें श्रेष्ठ हनुमाना,

मी व सुग्रीवासहवर्तमान लक्ष्मण कुशल असून रणामध्यें रावणाचा वध झाल्याचें तूं सीतेला कळव (२५). हे वानराधिपते, हें प्रियवृत्त सीतेला कळीव व तिचा निरोप घेऊन इकडे परत ये." (२६)

त्याप्रमाणें हनुमान अशोक वनांत गेला. त्यानें संस्कारसहित सीता अवलोकन केली. सीतेला त्यानें रामाचा निरोप जरा विस्तारपूर्वक खुलवून सांगितला. सीता हर्षोन्मादानें बोलण्यास असमर्थ झाली. हनुमानानें पुन्हां प्रश्न केल्यावर ती बोलूं लागली. पुढें परत जातांना हनुमान म्हणाला, "रामाची तूं गुणसंपन्न धर्मपत्नी योग्य आहेस. हे देवि, आतां रामाला कांहीं निरोप सांगावयाचा असल्यास तूं माझ्यापाशीं सांग. म्हणजे मी जिकडे राम आहे तिकडे जातों." सीतेनें सांगितलें, "भक्तवत्सल भर्त्याच्या दर्शनाची मला इच्छा आहे." हनुमानानें हा निरोप रामास कळविला. ( सर्ग ११३ )

हा निरोप ऐकून रामाला अश्रू आले व दीर्घ सुस्कारा टाकून पृथ्वीकडे पाहात तो बिभीषणाला म्हणाला, "दिव्य उटी लावून व दिव्य अलंकारांनीं भूषित होऊन शिरःस्नात झालेल्या सीतेला तूं येथें घेऊन ये. विलंब लावूं नकोस." त्याप्रमाणें अलंकार लेववून सीतेला रामाकडे आणलें.

राम आपलें हृद्गत तोंडानें बोलून दाखवूं लागला,

( सर्ग ११५ श्लोक १ )

"एषासि निर्जिता भद्रे शत्रुं जित्वा रणाजिरे ।
पौरुषाद्यदनुष्ठेयं मयैतदुपपादितम् ॥ २ ॥
गतोऽस्म्यंतममर्षस्य धर्षणा संप्रमार्जिता ।
अवमानश्च शत्रुश्च युगपन्निहतौ मया ॥ ३ ॥
अद्य मे पौरुषं दृष्टं अद्य मे सफलः श्रमः ।
अद्य तीर्णप्रतिज्ञो ऽहं प्रभवाम्यद्य चात्मनः ॥ ४ ॥
या त्वं विरहिता नीता चलचित्तेण रक्षसा ।
दैवसंपादितो दोषो मानुषेण मया जितः ॥ ५ ॥

संप्राप्तमवमानं यस्तेजसा न प्रमार्जति
कस्तस्य पौरुषेणार्थो महताप्यल्पचेतसा " ॥ ६ ॥

" हे कल्याणि, संग्रामामध्यें शत्रूचा पराजय करून तुला मीं जिंकून आणलें आहे. पुरुष–प्रयत्नानें जें कांहीं करतां येण्यासारखें आहे तें हें मीं केलें आहे (२). आज क्रोधाची समाप्ति झाली असून शत्रूनें केलेल्या स्त्रीहरणरूप अपमानाचीहि मीं फेड केली आहे. आणि अपमान व शत्रू या दोहोंचेंहि पारिपत्य मीं एकदमच केलें आहे (३). आज माझा पराक्रम लोकांच्या दृष्टीं पडला; आज माझ्या श्रमाचें सार्थक झालें. आज मी आपली प्रतिज्ञा शेवटास नेली आणि आज मी स्वतंत्र झालों (४). चंचल चित्तानें युक्त झालेल्या राक्षसानें तुला एकटी असतां नेलें हा अनर्थ दैवामुळें घडला व तो मीं मनुष्यानें साध्या पराक्रमानें नाहींसा केला (५). अपमान झाला असतां जो तेजाच्या योगानें त्याचें परिमार्जन करीत नाहीं त्या मंदमति पुरुषाचा पराक्रम मोठा जरी असला तरी त्याचा उपयोग काय ? " (६) याप्रमाणें बोलत असलेल्या रामाचें भाषण ऐकून सीता अश्रूंनीं भरून गेली आणि मनाला प्रिय असलेल्या सीतेकडे पाहाणाऱ्या रामाचें हृदय लोकापवादाच्या भीतीनें द्विधा झालें. (सर्ग ११५ श्लो. १०।११.) पुढें राम तिला म्हणाला, " रावणाचा वध अपमान परिमार्जनाकरितां मीं केला व तुला परत मिळविली. पण हा सारा खटाटोप मी तुझ्या प्राप्तीसाठीं केलेला नव्हता. " (१३।१४).

" रक्षता तु मया वृत्तं अपवादं च सर्वतः ॥
प्रख्यातस्यात्मवंशस्य व्यंगं च परिमार्जता ॥ १६ ॥
प्राप्तचारित्र्यसंदेहा मम प्रति मुखे स्थिता ॥
तद्गच्छत्वानुजानेद्य यथेष्टं जनकात्मजे ॥
एतादशदिशो भद्रे कार्यमस्ति न मे त्वया ॥ १८ ॥
कः पुमांस्तु कुले जातः स्त्रियं परगृहोषिताम् ॥
तेजस्वी पुनरादद्यात्सुहृल्लोभेन चेतसा ॥ १९ ॥

रावणांकपरिक्लिष्टां दृष्टां दुष्टेन चक्षुषा ॥
कथं त्वां पुनरादद्यां कुलं व्यपदिशन्महत् ॥ २० ॥
यदर्थं निर्जिता मे त्वं सोऽयमासादितो मया ॥
नास्ति मे त्वय्यभिष्वंगो यथेष्टं गम्यतामिति ॥ २१ ॥
तदद्यव्याहृतं भद्रे मयैतत्कृत बुद्धिना ॥
लक्ष्मणे वाथ भरते कुरु बुद्धिं यथा सुखम् ॥ २२ ॥
शत्रुघ्ने वाथ सुग्रीवे राक्षसे वा बिभीषणे ॥
निवेशय मनः सीते यथा वा सुखमात्मनः" ॥ २३ ॥

अर्थः—" आपलें वर्तन कायम राखण्याकरितां अपवाद सर्वस्वीं टाळण्याकरितां आणि आपल्या प्रख्यात वंशाला आलेला कमीपणा नाहींसा करण्याकरितां मीं हें केलें. (१६). तुझ्या वर्तनासंबंधानें संदेह आल्यामुळें माझ्या संमुख उभी असलेली तूं माझ्या दृष्टीला अतिशय प्रतिकूल झाली आहेस. (१७) हे जनककन्ये, मी तुला अनुज्ञा देतों. तूं आज वाटेल तिकडे चालती हो. हे भद्रे, या दशदिशा तुला मोकळ्या आहेत; तुझ्याशीं मला आतां कांहीं एक कर्तव्य नाहीं; (१८). पुष्कळ दिवसांपासून ही आपणावर प्रेम करणारी आहे असा लोभ मनामध्यें धरून, कोण बरें कुलीन व तेजस्वी पुरुष परगृहीं राहिलेल्या स्त्रीचा पुनरपि स्वीकार करणार आहे ? (१९). रावणाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या आणि त्यानें दोषदृष्टीनें अवलोकन केलेल्या तुझा स्वीकार कुलीन म्हणविणारा मी कसा बरें करूं ? (२०). ज्याच्याकरितां मी तुला जिंकलें तो हा माझा उद्देश सिद्धीस गेला आहे. आतां तुझ्या ठिकाणीं माझ्या मनाची आसक्ति नाहीं; तूं वाटेल तिकडे चालती हो (२१). हे भद्रे, मनाचा निश्चय करून ही गोष्ट मीं तुला सांगितली आहे. आतां तुझी इच्छा असल्यास लक्ष्मणापाशीं अथवा भरतापाशीं तूं खुशाल रहा (२२). अथवा हे सीते, शत्रुघ्नाजवळ, सुग्रीवाजवळ, बिभीषण राक्षसाजवळ किंवा तुला सुख मिळेल तेथें राहण्याचें तूं मनामध्यें आण " (२३). अखेर तो आणखी म्हणाला,

" तुझ्यासारख्या सुंदर स्त्रीला आपल्या घरीं ठेवून रावण तुझी उपेक्षा करील असें संभवत नाहीं. "

या रामाच्या भाषणावरून त्या काळच्या कुलीन म्हणविणाऱ्या पुरुषाचे विचार कळून येतात.

१. रावणवध करून सीतेला जिंकून आणलें. सर्ग ११५।२.

२. शत्रूनें स्त्री हरण केली हा अपमान पुसून न काढणाऱ्याच्या पराक्रमाचा काय उपयोग ?

३. रावणाचा वध अपमानमार्जनाकरितां केला; सीतेच्या प्राप्तीच्या लोभानें केला नाहीं. श्लो. १३।१४.

४ सीता हरण करून नेली हा वंशाला कमीपणा आला होता तोहि शत्रुवधानें धुऊन काढला.

५. सीतेच्या वर्तनासंबंधानें संदेह आल्यामुळें तिनें पाहिजे तिकडे जावें. अर्थात् तिचा त्याग केला.

६. परक्याच्या घरीं राहिलेल्या स्त्रीला कुलीन पुरुष स्त्री करणार नाहीं.

७. म्हणून परपुरुषाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या व त्याची पाप दृष्टि पडलेल्या सीतेचा स्वीकार कुलीन म्हणविणारा राम करणार नाहीं.

८. सीतेसारखी सुंदर स्त्री रावणाच्या घरीं शुद्ध राहणें संभवनीय नाहीं.

यांतील पहिल्या मुद्यावरून रामाला आर्यांची विवाहसंस्था मान्य नव्हती असें दिसतें. सीतेला जिंकून आणल्याकारणानें तिची वाटेल तशी व्यवस्था लावण्यास राम मुखत्यार होता. म्हणून त्यानें तूं वाटेल तिकडे जा असें तिला सांगितलें. लग्नबंधन तुटलें अशीच त्याची समजूत. दुसरा, तिसरा व चौथा हे मुद्दे वस्तुतः एकच आहेत. सीतेची पुनः प्राप्ति हा युद्धाचा हेतूच नाहीं. वंशाच्या इभ्रतीचा बचाव करण्यासाठीं युद्ध केलें.

पांचवा व सहावा या मुद्यांचा विचार एकत्र करणें बरें. परक्याच्या घरीं राहिलेल्या स्त्रीचा स्वीकार कुलीनानें करतां नये. म्हणून सीतेच्या शुद्ध वर्तनासंबंधानें शंका आल्यानें तिला हांकून देणेंच योग्य; यावरून स्त्रीच्या इच्छेविरुद्ध कोणी तिचा उपभोग घेतल्यास ती स्त्री टाकून देण्यास

पात्र होते व तिच्याशीं झालेला विवाहसंबंध तुटतो असा रामाच्या भाषणाचा आशय आहे. इतकेंच नव्हे, तर रावणाच्या अंकाचा स्पर्श झालेल्या व जिच्यावर रावणाची पापदृष्टि पडली त्या सीतेचा स्वीकार रामासारख्या कुलीन राजानें करणें योग्य नाहीं असें राम मोठ्या आढ्यतेनें सांगत आहे.

स्त्रियांच्यासंबंधाची ही हलकी कल्पना व व्यभिचारदोषास्तव स्त्रीचा त्याग या गोष्टी रामाला कितीहि पसंत असल्या तरी त्या आर्यांच्या सर्व स्मृतिकारांच्या मताविरुद्ध आहेत. रामाच्या भाषणांत काय मुद्दे आहेत ते येथें स्पष्टपणें मांडले आहेत. स्त्रीला तिच्या इच्छेविरुद्ध जबरीनें कोणी स्पर्श केल्यास किंवा तिच्यावर पापी नजर टाकल्यास ती त्याग करण्याच्या लायकीची होते, तिचा स्वीकार करण्यानें उच्च कुलीनाच्या कुलास कलंक लागतो, असा रामाचा अभिप्राय आहे. आमचे पूर्वीचे सर्व स्मृतिकार या मताच्या विरुद्ध आहेत व व्यभिचार हें पातक गणून त्यांनीं स्त्री व पुरुष या उभयतांसहि प्रायश्चित्त सांगितलें आहे. **यावरून राम आमच्या हिंदी संस्कृतींत वाढलेला नसून परक्या संस्कृतीचा अभिमानी आहे असें दिसून येतें.**

वर उतारा दिल्याप्रमाणें झालेलें रामाचें भाषण ऐकून सीता प्रथमतः अतिशय घाबरून गेली. ( सर्ग ११६ श्लोक १ ) तिनें लज्जेनें मान खालीं घातली ( श्लो. २ ) नंतर अश्रूंनीं भरलेलें आपलें मुख पुशीत पुशीत गद्गद वाणीनें हळू हळू आपल्या भर्त्याला ती म्हणाली ( श्लो. ४ ):- " हे वीर, एखादा यःकश्चित् पुरुष एखाद्या क्षुद्र स्त्रीला अनुलक्षून भाषण करितो त्याप्रमाणें असलें हें कर्णकटु व अयोग्य भाषण मला अनुलक्षून आपण कां बरें करीत आहां ? ( श्लो. ५ ) आपण जशी मला समजत आहां तशी मी नाहीं याचा आपणाला प्रत्यय येईल, हें मी आपल्या सदाचरणाच्या शपथेवर आपणाला सांगत आहें. ( ६ ) हे प्रभो, पराधीन झाल्यामुळें जो मला परपुरुषाचा स्पर्श झाला तो माझ्या इच्छेनें झाला नाहीं. दुर्दैवामुळें ती गोष्ट घडून आली. (८). माझ्या आधीन असलेलें माझें हृदय तें तर माझें आपल्यापाशींच आहे, परंतु शरीर मात्र माझ्या स्वाधीन नसतांना मी पराधीन स्त्री काय बरें करणार ? (९) हे मान्य रामा,

परस्परांचें प्रेम वृद्धिंगत झालें असून आणि पुष्कळ दिवसपर्यंत उभयतांचें एकत्र वास्तव्य झालें असूनहि जर माझी परीक्षा आपणाला झाली नसेल तर मात्र मी कायमचीच बुडालें. (१०). मी लंकेंत असतां वीर हनुमान माझ्या शोधासाठीं आला, तेव्हांच 'तुझा मी त्याग केला आहे' असें मला कां कळविलें नाहीं ? (११). तसा आपला निरोप कळतांच मीं जीविताचा त्याग केला असता. (१२). तसें झालें असतें तर जीव धोक्यांत घालून युद्ध करण्याचे श्रम आपणाला करावे लागले नसते व आपल्या मित्रमंडळीसहि विनाकारण क्लेश पडले नसते." (१३).

"त्वया तु नृपशार्दूल रोषमेवानुवर्तता ॥
लघुनेव मनुष्येण स्त्रीत्वमेव पुरस्कृतम्" ॥ १४ ॥

"क्रोधानें आधीन होऊन आपण एखाद्या क्षुद्र मनुष्याप्रमाणें सामान्य स्त्रीजातीला अनुसरूनच माझ्यासंबंधानें विचार केला आहे." (१४).

या भाषणावरून व्यभिचारी स्त्रीचा त्याग करणें हें सीतेला गैर दिसत नाहीं; कारण तीहि रामाच्याच संस्कृतीची होती. आर्य संस्कृतीप्रमाणें स्मृतींनीं प्रायश्चित्त सांगितलें आहे ही गोष्ट तिच्या माहितींतहि नाहीं. तिचें म्हणणें आपण शुद्ध आहों; सामान्य स्त्रीच्या हातून जसें वर्तन घडावें असें आपणास वाटतें तसें माझ्याकडून झालेलें नाहीं, असें आहे. नंतर तिनें लक्ष्मणास सांगितलें, "लक्ष्मणा, माझ्याकरितां चिता तयार कर. चिता हें या संकटाचें औषध आहे. कारण मिथ्या प्रवादानें ग्रस्त झालेल्या मला जिवंत राहण्याची इच्छा नाहीं. (१८). गुणांनीं संतुष्ट न झालेल्या भर्त्यानें लोकसमाजामध्यें त्याग केलेल्या मला मरणाचाच अवलंबन करणें योग्य असल्यामुळें मी अग्नीमध्यें प्रवेश करिते" (१०). रामाची याला संमति आहे असें मुद्रेवरून ओळखून लक्ष्मणानें चिता तयार केली. हा वेळपर्यंत अग्निदिव्याची कल्पना कोणासच नव्हती. दुसरें कोणीहि सुचवीत नाहीं. सीता चिता रचण्यास सांगते व तीहि आपला उद्देश स्पष्ट करिते. "मिथ्या प्रवादानें ग्रस्त झालेल्या मला जिवंत राहण्याची इच्छा नाहीं."

चिता पेटविल्यावर अधोमुख बसलेल्या रामाला प्रदक्षिणा करून सीता प्रदीप्त होत असलेल्या अग्नीकडे वळली (२३). देव-ब्राह्मणाला नमन करून हात जोडून अग्नीला बोलली,

" यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ।
तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ॥ २५ ॥
यथा मां शुद्धचारित्रां दुष्टां जानाति राघवः ।
तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः " ॥ २६ ॥
एवमुक्त्वा तु वैदेही परिक्रम्य हुताशनम् ।
विवेश ज्वलनं दीप्तं निःशंकेनांतरात्मना ॥ २७ ॥

अर्थः– " माझें चित्त जर रामापासून नित्य दूर जात नसेल तर जगत्साक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील ( २५ ). माझें वर्तन शुद्ध असून राम मला दुष्ट समजत आहे हें जर खरें असेल तर लोकसाक्षी अग्नि माझें सर्व प्रकारें रक्षण करील " ( २६ ). याप्रमाणें भाषण करून व अग्नीला प्रदक्षिणा करून मनांत कांहीं एक भीति न आणतां सीतेनें प्रदीप्त अग्नीमध्यें प्रवेश केला ( २७ ). हें सर्वांनीं पाहिलें; बाल व स्त्रिया यांनीं हाहाकार केला, ऋषी, देव व गंधर्व यांनीं सीतेला अग्निप्रवेश करतांना पाहिलें.

तदनंतर याप्रमाणें हाय हाय करीत असलेल्या लोकांचीं भाषणें ऐकून मनामध्यें खिन्न झालेल्या धर्मात्मा रामाचे नेत्र अश्रूंनीं व्याकुळ झाले आणि तो एक मुहूर्तभर विचार करूं लागला. ( यु. कां ११७ ) संस्कृत भाषेंत मुहूर्त ( घटका=४८ मिनिटें ). परंतु मुहूर्त याचा अर्थ क्षण असाहि आहे. क्षण म्हणजे सहा मिनिटें असाहि काल दिला आहे. एकंदरींत मुहूर्त शब्दानें निश्चित कालाचा बोध होत नाहीं. नंतर राजा कुबेर, पितरांसहवर्तमान मन, देवराज सहस्रनयन इंद्र, जलाधिपति वरुण, तीन नेत्रांनीं युक्त असलेला वृषभध्वज महादेव, आणि सर्व जगताचा उत्पादक व त्यामध्यें श्रेष्ठ ब्रह्मदेव हे सर्वहि सूर्यतुल्य तेजस्वी विमानामध्यें आरूढ होऊन व एकत्र जुळून लंकेमध्यें आल्यानंतर

रामाजवळ आले. ( २, ३, ४ ) " तूं स्वतः देवगणामध्यें श्रेष्ठ असल्याचें कसें जाणत नाहींस ? " असें सर्व श्रेष्ठ देवांनीं रामाला विचारिलें. (७)

राम म्हणतो:- " मी स्वतः दशरथपुत्र मनुष्य असल्याचें समजत आहें. तथापि मी वस्तुतः कोण आहें आणि माझी प्रकृति कोणती आहे हें आपण मला कथन करावें. " ( १२ ) तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला, " चक्रायुध धारण करणारा असा जो प्रभु नारायणदेव तो तूं आहेस. " ( १४ ) इत्यादि रामाची स्तुति हें एक स्तोत्रच झालेलें आहे, तें १४-३३ श्लोक पर्यंत आहे. येथें ११७ सर्ग समाप्त होतो. संबंध सर्ग क्षेपक असला पाहिजे. यामध्यें आलेलीं देवांचीं नांवें रामायणांत यापूर्वी कोठेंहि आढळत नाहींत. इतक्या देवांनीं येऊन गर्दी करण्याचें कारणहि दिसत नाहीं. कोणी रामभक्तानें हें स्तोत्र वा हा सर्ग घुसडून दिला आहे.

ब्रह्मदेवानें केलेलें हें शुभभाषण ऐकल्यावर अग्नि सीतेला मांडीवर घेऊन बाहेर पडला. (सर्ग ११८ श्लोक) आणि टवटवीत पुष्पांचीं भूषणें जिनें धारण केलीं आहेत आणि जी निर्दोष आहे अशा सीतेला मांडीवर घेऊन अग्नीनें रामाला अर्पण केलें. ( ४ ). लोकांसमक्ष अग्नि त्या वेळीं म्हणाला, " हे रामा, ही सीता, हिचे ठिकाणीं दोषाचा संपर्क नाहीं. ( ५ ). वाणीनें, मनानें, बुद्धीनें व दृष्टीनें हिनें तुजविषयीं सद्वृत्ताचें उल्लंघन केलें नसून हिचें वर्तन उत्कृष्ट आहे. (६). शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या या निष्पाप सीतेला तूं स्वीकार. हिला उद्देशून तूं कांहीं-एक भाषण करूं नकोस अशी माझी तुला आज्ञा आहे. " ( १० ). राम अग्नीला म्हणाला:- " लोकांसमक्ष सीतेची शुद्धि होणें अवश्य होतें. कारण ही शुभ सीता रावणाच्या अंतःपुरामध्यें पुष्कळ दिवसपर्यंत राहिलेली आहे. ( १३ ). तस्मात् हिची शुद्धि न करितां हिचा स्वीकार केला असता तर दशरथपुत्र राम विषयलंपट व बालिश आहे असें लोक मला म्हणाले असते. ( १४ ). सीता शुद्ध आहे. सीतेला भ्रष्ट करण्याचें सामर्थ्य रावणाला नव्हतें. ( १६।१७). विचारी पुरुषाच्या हातून ज्याप्रमाणें कीर्तीचा त्याग होणें शक्य नाहीं त्याप्रमाणें त्रैलोक्यांत शुद्ध अशा मिथिल राजकन्या जानकीचा माझ्या हातून त्याग होणें शक्य नाहीं. ( १९ ).

तुम्हां सर्वांच्या हितकारक उपदेशाप्रमाणें अवश्य वागलें पाहिजे. ” ( २० ). याप्रमाणें देवांना सांगून रामानें प्रिय सीतेचा स्वीकार केला आणि सुखाचा उपभोग घेतला.

नंतर महादेव पुढें सरसावले. सर्वांना आनंद देऊन शेवटीं स्वर्गास ये व विमानांत राजा दशरथ आला आहे त्याला तूं व लक्ष्मण हे दोघेहि वंदन करा असें त्यांनीं सांगितलें. ( ८ ) विमानारूढ पित्याला उभयतांनीं वंदन केलें. ( ९ ). दर्शन घेतलें. ( १० ). दशरथाला अतिशय आनंद झाला. ( ११ ). आणि त्याला अंकावर घेऊन व बाहूंनीं आलिंगन देऊन विमानारूढ असलेल्या त्या महापराक्रमी प्रभु दशरथानें रामाशीं संभाषण केलें व सुनेला मुली अशी हांक मारून तो म्हणाला, “ हे वैदेही, रामानें जो हा पूर्वीं तुझा त्याग केला होता त्यासंबंधानें तूं त्याच्यावर क्रोध करूं नको. तुझें हित इच्छिणाऱ्या रामानें तुझ्या शुद्धीकरितां हें केलें आहे. ” ( ३३ ). पुढें दशरथ इंद्रलोकास गेला.

या अग्निशुद्धीच्या कामीं सीतेला अग्नीनें मांडीवर घेणें, दशरथानें रामाला मांडीवर घेणें, या चालीविषयीं दोन शब्द सांगणें जरूर आहे. रामानें लक्ष्मणाला व भरताला मांडीवर घेतल्याविषयीं उल्लेख आहे व हे दोघे रामापेक्षां फार तर एक दोन दिवसांनींच लहान असतील. रामानें अगडबंब मारुतीला व अंगदालाहि मांडीवर घेतल्याचा उल्लेख उत्तरकांडांत आहे. कोणाचाहि सत्कार करतांना त्याला मांडीवर घेण्याची चाल रामाच्या देशांत असावी. ही हिंदी आर्यांची चाल होती असें दिसत नाहीं.

सर्व वानर व ऋक्ष यांस जिवंत करून त्यांसह बिभीषणाचे थोडे राक्षस घेऊन राम अयोध्येस पोंचला व त्यास राज्याभिषेक सीतेसह झाला. पाहुणे मंडळी दोन महिने राहिली. सर्वांची रामानें थाटानें पाठवणी केली.

—महाराष्ट्र-शारदा-जून १९३६

# रामाचें अनार्य वर्तन

रामानें आपल्या अभिषेकसमारंभासाठीं बिभीषण व त्याचे मंत्री, सुग्रीव व त्याचे मुख्य मुख्य वानर अयोध्येस आणले होते. सीतेचें अग्निदिव्य, अग्निदेवानें मांडीवर घेऊन तिला रामाचे स्वाधीन करणें व ती शुद्ध आहे असें बजावणें, महादेव, ब्रह्मदेव वगैरे देवांनीं तसेंच सांगणें, राजा दशरथ विमानांतून येऊन त्यानें रामास आलिंगन देऊन सीतेच्या पावित्र्याची खात्री देणें, वगैरे गोष्टी खरोखर घडल्या असल्यास त्या या सर्वांनीं पाहिल्या असल्या पाहिजेत व या अद्भुत गोष्टीची चर्चा त्यांनीं अयोध्येंत पुष्कळांबरोबर करणें साहजिक आहे.

पण रामराज्यांतील प्रजाजनांस सीतेचा पवित्रपणा मुळींच पटला नाहीं. त्यांच्या मतें मरण पावलेला दशरथ आलिंगन देण्यासारख्या जड देहानें विमानांतून आला व त्यानें सीतेला दोन शब्द सांगितले ही गोष्ट निव्वळ थाप होती. तीवर त्यांनीं बिलकूल विश्वास ठेवला नाहीं. पेटविलेल्या चितेंत एक मुहूर्तभर राहिल्यावर सीतेला कांहीं इजा झाली नाहीं व अग्निदेवानें खुद्द देह धारण करून तिच्या पावित्र्याबद्दल खात्री दिली ही गोष्टहि त्यांना विश्वास ठेवण्यास योग्य नाहीं असेंच वाटलें. महादेव, ब्रह्मदेव वगैरे प्रकट होणें ही गोष्टहि बनावट अशीच त्यांची समजूत झाली होती. यावरून रामराज्यांतले प्रजाजन चिकित्सक बुद्धीचे तरी असावेत किंवा सीताशुद्धीची कथा मागाहून कोणी तरी रचून रामायणांत घुसडून दिली असावी, असें अनुमान निघतें. आजच्या रामायणांत सीताशुद्धीसंबंधाची जी सविस्तर हकीकत आली आहे तींत राम सीता वगैरे नांवें बदलून दुसरी नांवें घालून गोष्ट तयार करून कोणास सांगितल्यास ती खरी आहे, तसें घडलें असेल असें मानणारा कोणीहि भेटणार नाहीं. राम व सीता हे विष्णु व लक्ष्मी यांचे अवतार मानले गेल्यानें त्यांच्या बाबतींत अद्भुत गोष्टी घडून येणें संभवनीय आहे असें भोळसर भक्तिवानास आज वाटतें. याप्रमाणें धर्मभोळेपणानें आमची विचारशक्ति व चिकित्सक बुद्धि लयास नेली आहे. याचें वाईट

परिणाम आमच्या लोकांस निरनिराळ्या प्रकारानें भोगावे लागत आहेत.

## लोकापवादाची अवास्तव भीति

ही सीतेची अग्निशुद्धि, अग्नीनें सीतेला दिलेलें सर्टिफिकेट, महेश्वरादि देवतांचा निर्वाळा व खुद्द दशरथाची भलामण या साऱ्या गोष्टी प्रजाजनांच्या चिकित्सक बुद्धीस मुळींच पटल्या नाहींत. या सर्व गोष्टी बनावट व अविश्वसनीय अशीच त्यांची खात्री असली पाहिजे. त्या काळीं नागरिकांना काय वाटलें व ते आपआपसांत काय बोलत होते, याविषयीं रामाचा मित्र व खुषमस्कऱ्या भद्रच सांगत आहे. ( उ. कां. स. ४३. ).

" शृणु राजन्यथा पौराः कथयंति शुभाशुभम् ।
चत्वरापणरथ्यासु वनेषूपवनेषु च ॥
दुष्करं कृतवान्रामः समुद्रे सेतुबंधनम् ।
अश्रुतं पूर्वकैः कैश्चिद्देवैरपि स दानवैः ॥
रावणश्च दुराधर्षो हतः सबलवाहनः ।
वानराश्च वशं नीता ऋक्षाश्च सह राक्षसैः ॥
हत्वा च रावणं संख्ये सीतामाहृत्य राघवः ।
अमर्षं पृष्ठतः कृत्वा स्ववेश्म पुनरानयत् ॥
कीदृशं हृदये तस्य सीतासंभोगजं सुखम् ।
अंकमारोप्य तु पुरा रावणे न बलाद्धृताम् ॥
लंकामपि पुरा नीतामशोकवनिकां गताम् ।
रक्षसां वशमापन्नां कथं रामो न कुत्स्यति ॥
अस्माकमपि दारेषु सहनीयं भविष्यति ।
यथा हि कुरुते राजा प्रजास्तमनुवर्तते ॥
एवं बहुविधा वाचो वदन्ति पुरवासिनः ।
नगरेषु च सर्वेषु राजञ्जनपदेषु च " ॥ श्लो. १३–२०.

अर्थ:–" हे राजा, चवाठे, बाजार, रस्ते, वनें आणि उपवनें यांमध्यें लोक तुझ्यासंबंधानें जें काय बरेंवाईट बोलत असतात तें ऐक. ( १३ ). समुद्रामध्यें सेतुबंधन हें दुष्कर कृत्य रामानें केलें. हें कृत्य देवदानवांच्या हातूनहि घडल्याचें कोणत्याहि वृद्ध लोकांच्यासुद्धां ऐकण्यांत नाहीं. (१४). अजिंक्य रावणाचा, सैन्य व वाहनें यांसह, वध करून राक्षसांसह ऋक्ष व वानर रामानें स्वाधीन करून घेतले. ( १५ ). संग्रामामध्यें रावणाचा वध करून सीता घेतल्यानंतर क्रोध मागें सारून त्यानें तिला पुनरपि घरीं अणिलें. ( १६ ). सीतेच्या संभोगापासून त्या रामाच्या मनाला काय बरें सुख वाटत असेल ? जिला पूर्वी रावणानें बलात्कारानें अंकावर घेऊन हरण करून नेलें, (१७). इतकेंच नव्हे, परंतु पूर्वी लंकेत नेल्यानंतर अशोक वनामध्यें नेऊन ठेविलें असतां जी राक्षसांच्या आधीन झालेली होती, तिला राम दूषण कसें देत नाहीं ? (१८). आतां स्त्रियांसंबंधानें असला प्रकार आम्हांलाहि सहन होऊं लागेल. कारण जसें राजा करूं लागतो तसें लोकहि त्याला अनुसरून वागूं लागतात. (१९). अशीं नानाप्रकारचीं भाषणें, हे राजा, नागरिकजन सर्व नगरामध्यें व देशामध्यें तुझ्यासंबंधानें करीत असतात." (२०)

बाकीच्या मित्रांनींहि भद्र सांगतो तें खरें आहे असें त्याच्या प्रश्नाला उत्तर दिलें. भद्राच्या व इतर मित्रांच्या सांगण्यावरून त्या काळच्या लोकांची स्त्रियांच्या पातिव्रत्याविषयीं काय समजूत होती हें उघड होतें. सीतेला रावणानें जबरदस्तीनें नेलें ही गोष्ट सर्वांस माहीत होती. अशोक वनासारख्या विलासी ठिकाणीं राक्षसांच्या आधीन असल्यानें ती देहानें अशुद्ध झाली असली पाहिजे ही त्यांची कल्पना होती. याच वेळीं सीता गरोदर आहे असें सर्वांस जाहीर झाल्यामुळें तर त्यांच्या सीतेच्या चारित्र्याविषयींच्या शंकेस जोरच आला असावा. स्त्री एकदां भ्रष्ट झाली कीं ती कायमचीच भ्रष्ट होते, तिला घरांत घेणें योग्य नाहीं, ती नीति नाहीं असेंच त्यांचें मत असावें. अशा स्त्रीला रामानें घरांत घेतल्यामुळें, त्यानें सार्वजनिक नीतीला मोठा धक्का दिला व वाईट उदाहरण घालून दिलें, अशी त्यांना भीति वाटली. रामाचें उदाहरण पाहून नागरिकांमध्येंहि व्यभिचार खपूं लागेल व नीतिबंधनें शिथिल

होतील असें त्यांस वाटल्यामुळेंच सर्व अयोध्यानगरभर व राज्यभर हीच चर्चा चालली होती. यावरून व्यभिचारी स्त्रीचा अंगीकार त्या काळच्या व त्या देशच्या प्रचलित नीतीस मान्य नसल्यामुळें फार मोठी खळबळ उडाली होती असें दिसतें.

सीतेला घेऊन राम परत आल्यावर राज्याभिषेकाचा मोठा समारंभ झाला. त्यावेळीं सीतेच्या पातिव्रत्याविषयीं शंका घेण्याची हिंमत कोणासच झाली नाहीं. पण ती गर्भार आहे असें कळल्यावरच या लोकापवादास जोर आला. यावरून सीतेचा गर्भ रामापासून नाहीं, इतराचा आहे अशी त्यांची खात्री झाल्यावरच रामाच्या वर्तनाबद्दल प्रजेंत तीव्र असंतोष पसरला असें दिसतें. असल्या विचारसरणीवर "सीता लंकेहून आली तेव्हां दोन महिन्याची गर्भार होती" हें वरेरकरमामांचें विधान आधारलेलें असावें. व्यभिचारी स्त्रीचा त्यागच करणें योग्य, प्रायश्चित्तानें शुद्ध करून घेतां येत नाहीं असाच रामाचे प्रजाजन व राम यांचा कायदा असावा.

नंतर रामानें आपल्या तिघां भावांस बोलावून आणलें. (उ. कांड सर्ग ४५) तो त्यांना म्हणालाः—

"सर्वे श्रुणुत भद्रं वो मा कुरुध्वं मनो ऽन्यथा ।
पौराणां मम सीतायां यादृशी वर्तते कथा ॥ २ ॥
पौरापवादः सुमहांस्तथा जनपदस्य च ।
वर्तते मयि बीभत्सा सा मे मर्माणि कृंतति ॥ ३ ॥
जानासि त्वं यथा सौम्य दंडके विजने वने ।
रावणेन हृता सीता स च विध्वंसितो मया ॥ ५ ॥
तत्र मे बुद्धिरुत्पन्ना जनकस्य सुतां प्रति ।
अत्रोषितामिमां सीतां आनयेयं कथं पुरीम् ।
प्रत्ययार्थं ततः सीता विवेश ज्वलनं तदा ॥ ६ ॥
प्रत्यक्षं तव सौमित्रे देवानां हव्यवाहनः ।
अपापां मैथिलीमाह वायुश्चाकाशगोचरः ॥ ७ ॥

चंद्रादित्यौ च शंसेते सुराणां संनिधौ पुरा ।
ऋषीणां चैव सर्वेषां अपापां जनकात्मजाम् ॥८॥
एवं शुद्धसमाचारा देवगंधर्वसंनिधौ ।
लंकाद्वीपे महेन्द्रेण मम हस्ते निवेदिता ॥ ९ ॥
अंतरात्मा च मे वेत्ति सीतां शुद्धां यशस्विनीम् ।
ततो गृहीत्वा वैदेहीमयोध्यामहमागतः ॥ १० ॥
अयं तु मे महान्वादः शोकश्च हृदि वर्तते ।
पौरापवादः सुमहांस्तथा जनपदस्य च ॥ ११ ॥
अकीर्तिर्यस्य गीयेत लोके भूतस्य कस्यचित् ।
पतत्येवाधमान् लोकान्यावच्छब्दः प्रकीर्त्यते ॥ १२ ॥
अकीर्तिर्निंद्यते देवैः कीर्तिर्लोकेषु पूज्यते ।
कीर्त्यर्थं तु समारंभः सर्वेषां सुमहात्मनाम् ॥ १३ ॥
अप्यहं जीवितं जह्यां युष्मान्वा पुरुषर्षभाः ।
अपवादभयाद्भीतः किं पुनर्जनकात्मजाम् " ॥ १४ ॥

अर्थः– " तुमचें कल्याण असो; दुसरीकडे लक्ष न देतां तुम्ही सर्व श्रवण करा. सीतेविषयीं माझ्यासंबंधानें लोक काय बोलत आहेत तें तुम्ही ऐका. (२). नगरांतील व देशांतील लोकांचा फारच मोठा अपवाद आहे. ते माझी निंदा करीत आहेत व ती निंदा माझ्या मर्माचा भेद करीत आहे (३). हे विनयसंपन्न, निर्जन दंडकारण्यामध्यें रावणानें सीता कशी हरण करून नेली व त्याचा वध मीं कसा केला हें तूं जाणतच आहेस (५). या ठिकाणीं राहिलेली सीता अयोध्या नगरीप्रत मला कशी नेतां येईल, ही शंका त्या जनककन्येसंबंधानें मला तेथेंच आली होती. तेव्हां खात्रीकरितां सीता अग्नीमध्यें प्रविष्ट झाली (६) हे लक्ष्मणा, देवांचे संनिध हव्य नेणाऱ्या अग्नीनें व आकाशामध्यें संचार करणाऱ्या वायूनें मैथिली निष्पाप असल्याचें तुझ्या समक्षच सांगितलें आहे. (७). आणि सर्व ऋषी व देव यांचे संनिध सूर्य–चंद्रांनींहि पूर्वी जनककन्या

निष्पाप असल्याचें कथन केलें आहे. (८). याप्रमाणें देव आणि गंधर्व यांचे संनिध आचरणानें शुद्ध झालेली सीता लंकाद्वीपामध्यें महेंद्रानें माझ्या हातीं दिली. (९). आणि यशस्विनी सीता शुद्ध असल्याची माझ्या मनामध्यें खात्री आहे. तेव्हां सीतेला घेऊन मी अयोध्येला आलों. (१०). परंतु माझ्यासंबंधानें ही मोठीच निंदा सांप्रत सुरू झाल्यामुळें माझ्या मनाला दुःख होत आहे. कारण, नगरांतील, देशांतील लोकांचा फारच मोठा माझ्यासंबंधानें अपवाद आहे. (११). जगतामध्यें ज्या कोणा प्राण्याची निंदा होऊं लागते, तो प्राणी ती निंदा कायम असेपर्यंत नरकामध्यें पडून राहतो. (१२). देवहि अपकीर्तीची निंदा करीत असतात; कीर्तीची लोकांमध्यें प्रशंसा होत असते आणि सर्वहि महात्मे कीर्ति संपादन करण्याकरितांच खटपट करीत असतात. (१३). हे पुरुषश्रेष्ठ हो, लोकापवादरूप भयाला भिऊन मी जीविताचा अथवा तुमचाहि त्याग करीन; मग जनककन्येची गोष्ट पाहिजे कशाला ?" (१४).

## भवभूतीनें रामाला सावरलें !

या शेवटच्या श्लोकांत तर रामानें सीतेची किंमत बरीच कमी केलेली आहे. लोकांच्या अपवादाला तो फार किंमत देत आहे. लोकापवाद टाळण्यासाठीं राम स्वतःचा जीव देण्यास तयार आहे, आपल्या भावांचाहि त्याग करण्यास तो तयार होईल. मग जनकात्मजेची काय बिशाद ? स्त्रीची किंमत रामाच्या दृष्टीनें फारच कमी. ‘किं पुनर्जनकात्मजाम् ?’ असें तो म्हणतो. माझ्या जिवाची किंमत सर्वांत जास्त, त्याच्याच खालोखाल किंमत भावांची, सीता त्यांचेपेक्षां कितीतरी हलक्या किंमतीची, असें राम कंठरवानें सांगत आहे. भवभूतीसारख्या महाकवीला ही रामाची उक्ति अस्वाभाविक व रामास कमीपणा आणणारी अशी वाटली. म्हणून त्यानें आपल्या उत्तररामचरित नामक नाटकांत—

"स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा" ॥

असा श्लोक रामाच्या तोंडीं घातला. प्रजेला खुष करण्याकरितां स्नेह, दया, सौख्य, फार काय जानकी देखील टाकतांना मला व्यथा होणार नाहीं,

असें भवभूति रामाकडून वदवितो. यांत सीतेची योग्यता स्नेह, दया व सौख्य यांपेक्षां मोठी दाखविली आहे. " किं पुनर्जनकात्मजाम् " व " यदि वा जानकीमपि " यांतील फरक सहृदय वाचक जाणतीलच.

रामानें नरकवासाचें कारण अपकीर्ति दिलेलें आहे. " जगतामध्यें ज्या कोणा प्राण्याची निंदा होऊं लागते तो प्राणी ती निंदा कायम असेपर्यंत नरकामध्यें पडून राहतो. " हें विधान आमच्या कर्मांच्या सिद्धांताला विरुद्ध आहे. मनुष्य हा आपल्या शुभ व अशुभ कर्मांप्रमाणें स्वर्गांत किंवा नरकांत वास करतो. कर्मांचा क्षय झाला म्हणजे दुसरा जन्म घेतो. " क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशंति " असेंच मत उपनिषदांतहि प्रतिपादिलें आहे. ( आर्तभाग, याज्ञवल्क्य संवाद बृहदारण्य उपनिषद अ. ३ ब्रा. २ कं. १३.)

" पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेनेति । "

यावर शांकरभाष्य

तस्मात्पुण्यो वै शास्त्रविहितेन पुण्येन कर्मणा भवति तद्विपरीतेन विपरीतो भवति पापः पापेन इति ।

पुढील ब्राह्मणाच्या उपोद्घातांत याचा विचार जरा जास्त विस्तारानें केलेला आहे.

तत्र अपुण्येन स्थावरजंगमेषु स्वभावदुःखबहुलेषु नरकतिर्यक्प्रेतादिषु च दुःखमनुभवति पुनःपुनर्जायमानः म्रियमाणश्च इत्येतत् राजवर्त्मवत्सर्वलोकप्रसिद्धम् । यस्तु शास्त्रीयः पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति तत्रैव आदरः क्रियते इह श्रुत्या ।

**अर्थः**– तेथें पापकर्मानें पर्वतवृक्षादि स्थावर, पशुपक्ष्यादि जंगम अशीं शरीरें घेऊन किंवा स्वाभाविक दुःखप्रचुर अशा नरक किंवा कीटक किंवा प्रेत अशा शरीरांत राहून वारंवार जन्म घेत व मरण अनुभवीत दुःख भोगतो. हें राजमार्गाप्रमाणें सर्व लोकांत प्रसिद्ध आहे.

**ही भीति आर्यांना नसे**

आमच्या यमाला धर्म अशी संज्ञा आहे. तो प्रत्येक जीवाच्या पापपुण्याप्रमाणें निवाडा देतो. चित्रगुप्त या पापपुण्याचा हिशेब ठेवतो. अशा

प्रकारचा कर्मवाद हें या आर्यभूचें विशेष आहे. रामाची समजूत याचे उलट आहे.

> अकीर्तिर्यस्य गीयेत लोके भूतस्य कस्यचित् ।
> पतत्येवा धर्मान्लोकान् यावच्छब्दः प्रकीर्त्यते ॥

कोणाची जगांत निंदा झाल्यास ती निंदा कायम असेपर्यंत तो नरकांत पडून असतो ही रामाची समजूत. ही निंदा सकारण असो निष्कारण असो; नरकवास निश्चित ! सीतेचा अंगीकार केला ही गोष्ट रामाच्या दृष्टीनें योग्य होती. लोकांच्या दृष्टीनें अयोग्य ठरल्यामुळें रामाची निंदा होऊं लागली. ही निष्कारण निंदा कायम राहिली तर आपणास नरकवास येईल ही रामाला भीति पडली व म्हणून त्यानें निष्कारण होत असलेली निंदा टाळण्यासाठीं निष्पाप अशा सीतेचा त्याग केला. स्वतःच्या कर्माप्रमाणें जीवाला सुखदुःख भोगावें लागतें हा आर्यावर्ताचा कर्मवाद. दुसऱ्यांच्या निंदास्तुतीप्रमाणें जीवास नरक किंवा स्वर्गवास घडतो हा रामाच्या देशाचा समज. यावरून रामाचा देश आर्यावर्त नव्हता; अगदीं निराळा होता हें स्पष्ट होत आहे; कारण मरणानंतरच्या अवस्थेविषयीं त्यांची कल्पना आर्यावर्ताच्या कल्पनेहून अगदीं निराळी होती.

इजिप्तचे फारो राजे आपली कीर्ति मागें राहावी म्हणून आपल्या प्रेता-करितां पिरामिडच्या आकाराच्या समाधी बांधीत व आंत सर्व सुखसोयी करीत. आपली कीर्ति जोंपर्यंत आहे तोंपर्यंत आपणास सुख मिळेल ही त्यांची भावना होती. पिरामिड बांधतांना हजारों लोकांस कैक वर्षेपर्यंत राबावें लागे व त्या कामीं त्यांच्यावर पुष्कळ जुलूम होत असे. या जुलुमाची क्षिती फारोस नसे. कारण लोक ती गोष्ट थोडेच वर्षांत विसरून जातील व आपली कीर्ति मागें राहील ही त्यांची खात्री होती. रामाची मनोरचना याच ठशाची आहे हें थोड्या विचारांतीं दिसून येईल.

रामाच्या मतें सीता निष्पाप आहे, व तशी खात्री मोठमोठ्या देवांनीं, खुद्द अग्नीनें व दशरथानें दिलेली होती. असें असतांहि साध्वी व गर्भवती अशा धर्मपत्नीचा त्याग करण्यास राम तयार होत आहे हें आमच्या आर्यसंस्कृतीच्या विरुद्ध आहे. आमच्या

समजुतीप्रमाणें पितरांचें ऋण फेडण्यासाठीं पुत्राची जरुरी आहे. आपला गर्भ जिच्या उदरीं आहे अशा भार्येचा त्याग आर्य केव्हांहि करणार नाहीं. राम त्याग करीत आहे यावरूनहि तो आर्यावर्तांतील नव्हे असें म्हणणें भाग येतें.

सीता गर्भवती होती. सीतात्यागाचा निश्चय करण्यापूर्वीं थोडेच तास रामानें सीतेला विचारिलें होतें.

" किमिच्छसि वरारोहे कामः किं क्रियतां तव "

उ. कां. श्लो. स. ४२।३१

" हे सुंदरी, तूं काय इच्छितेस ? तुझे कोणते डोहाळे पुरवावे ?"

यावर सीता हास्य करून रामाला म्हणाली –

" तपोवनानि पुण्यानि द्रष्टुमिच्छामि राघव ॥
गंगातीरोपविष्टानां ऋषीणामुग्रतेजसाम् ।
फलमूलाशिनां देव पादमूलेषु वर्तितुम् ॥३३॥
एष मे परमः कामो यन्मूलफलभोजिनाम् ।
अप्येक रात्रिं काकुत्स्थ निवसेयं तपोवने " ॥३४॥

अर्थः–" हे राघवा, पवित्र तपोवनें अवलोकन करण्याची आणि फळें व मुळें भक्षण करून गंगातीरीं वास्तव्य करीत असलेल्या महातेजस्वी ऋषींच्या चरणासमीप राहण्याची मला इच्छा झाली आहे. (३३). हे काकुत्स्था, फळें व मुळें भक्षण करणाऱ्या ऋषींच्या तपोवनामध्यें एक रात्र तरी वास्तव्य करावें ही माझी उत्कट इच्छा आहे." (३४). यावर 'ठीक आहे,' असें आश्वासन देऊन राम म्हणाला :–

" विश्रब्धा भव वैदेहि श्वोगमिष्यस्यसंशयम् । "

" हे वैदेही, स्वस्थ राहा; तूं उद्या निःसंशय जाशील." (३५) यावेळीं सीतेला टाकून देण्याचा उद्देश रामाच्या मनांत होता असें म्हणण्यास आधार नाहीं. रामानें प्रामाणिकपणें वचन दिलें असें सांगण्याचा वाल्मीकीचा आशय आहे. कारण तो याच श्लोकाच्या पहिल्या अर्धांत

रामाला अक्लिष्टकर्मा असें विशेषण लावतो. "तथेति च प्रतिज्ञातं रामेणाक्लिष्टकर्मणा" याचा अर्थ लेलेशास्त्री "पवित्र कर्म करणाऱ्या रामानें" असा करितात. लोक काय बोलतात हें खुषमस्कऱ्याकडून समजल्यावरच सीतेचा त्याग करण्याचा निश्चय रामानें केलेला आहे. ही गोष्ट सीतेला वचन दिल्यानंतरची आहे. तिघां भावांना बोलावून आणल्या वेळीं त्यांना फार मोठेपणा दिला गेला आहे. (पहा सर्ग ४४.)

तान्परिष्वज्य बाहुभ्यां उत्थाप्यच महाबलः ।
आसनेष्वासतेत्युक्त्वा ततो वाक्यं जगाद ह ॥ १९ ॥

अर्थः—नंतर त्यांना हातांनीं कवटाळून धरून व उठवून आसनावर बसा असें त्यांना सांगून म्हणाला (१९).

यांत रामानें फारच साखर पेरली आहे. तो म्हणतो:

भवंतो मम सर्वस्वं भवंता जीवितं मम
भवद्भिश्च कृतं राज्यं पालयामि नरेश्वराः ॥ २० ॥
भवन्तः कृतशास्त्रार्थाः बुद्धया च परिनिष्ठिताः ।
संभूय च मदर्थोऽयमन्वेष्टव्यो नरेश्वराः ॥ २१ ॥

### भावांना दटावणी

"तुम्ही माझें सर्वस्व व माझें जीवित आहां; आणि हे राजपुत्रहो, तुम्हींच संपादन केलेलें राज्य मी परिपालन करीत आहें (२०) तुमची बुद्धि परिपक्क झाली असून शास्त्रतात्पर्यहि तुम्हीं जाणलें आहे. व त्याप्रमाणें तुम्ही वागतहि आहां. यास्तव हे राजपुत्र हो, तुम्ही सर्व मिळून मी काय म्हणत आहें याचा विचार करा. (२१) यानंतरचें रामाचें भाषण ४५ वे सर्गांतील वर दिलेलेंच आहे. भावांचा विचार घेण्यासाठीं त्यांना बोलावून आणलें. त्यांची तारीफ केली. त्यांना आपलें म्हणणें सांगितलें. पुढें मीं कसें करावें हें तुम्ही मला सांगा, असें पूर्वी म्हटलें होतें तरी त्यांचें म्हणणें न ऐकतां रामानें आपला निकाल दिला. तो बजावण्याची कामगिरी लक्ष्मणावर सोंपविली व आपल्या पायांची व जीविताची शपथ घातली. भावाचा सल्ला न घेतांच राम लक्ष्मणास म्हणतो:—

" श्वस्त्वं प्रभाते सौमित्रे सुमन्त्राधिष्ठितं रथं ।
आरुह्य सीतामारोप्य विषयान्ते समुत्सृज ॥ १६ ॥
गंगायास्तु परेपारे वाल्मीकेस्तु महात्मनः ।
आश्रमो दिव्य संकाशः तमसातीरमाश्रितः ॥ १७ ॥
तत्रैतां विजने देशे विसृज्य रघुनन्दन ।
शीघ्रमागच्छ सौमित्रे कुरूष्व वचनं मम " ॥ १८ ॥

अर्थः- " हे लक्ष्मणा, उद्यां सकाळीं सुमंत्र सारथी ज्याच्यावर आहे अशा रथावर आरूढ होऊन तूं सीतेला वर घे आणि या देशाच्या हद्दीपलीकडे सोडून दे. (१६). गंगा ओलांडून गेल्यावर तमसा नदीचे तीरीं महात्म्या वाल्मीकि मुनींचा दिव्य आश्रम आहे. (१७). तस्मात् हे रघुनंदना लक्ष्मणा, तेथें निर्जन प्रदेशामध्यें हिला सोडून देऊन तूं सत्वर परत ये. हें माझें म्हणणें ऐक. " (१०).

यावर तीन भावांपैकीं कोणी तरी उलट बोलेल अशी रामाला भीति होती, म्हणून भावांचीं तोंडें बंद करण्यासाठीं राम म्हणतो :-

" न चास्मि परिवक्तव्यं सीतां प्रति कथं च न ।
तस्मात्त्वं गच्छ सौमित्रे नात्र कार्या विचारणा ॥१९॥

" सीतेसंबंधानें याचे उलट तूं मला कांहीं एक सांगूं नकोस. तस्मात् हे लक्ष्मणा, याविषयीं कांहीं एक विचार न करितां तूं चालता हो." (१९). इतक्यानेंहि कार्य भागेल असें रामास वाटेना म्हणून तो लक्ष्मणास व इतर भावांस शपथ घालीत आहेः—

" अप्रीतिर्हि परा मह्यं त्वयैतत्प्रतिवारिते ।
शापिता हि मया यूयं पादाभ्यां जीवितेन च " ॥ २० ॥

" तूं याला आड येशील तर मला अतिशय दुःख होईल. यास्तव मीं आपल्या पायांची व जीविताची तुम्हांला शपथ घातली आहे." (२०) पण इतक्यानेंच भाऊ गप्प बसतील असें त्यास वाटेना, म्हणून त्यांस तो दरडावण्यासाठीं दम भरीत आहेः—

"ये मां वाक्यान्तरे ब्रूयुः अनुनेतुं कथं च न ।
अहिता नाम ते नित्यं मदभीष्टविघातनात् ॥ २१ ॥
मानयन्तु भवन्तो मां यदि मच्छासने स्थिताः ।
इतोऽद्य नीयतां सीता कुरुष्व वचनं मम" ॥ २२ ॥

"माझ्या भाषणाविरुद्ध माझी समजूत करण्याकरितां कसल्याहि प्रकारचें भाषण करतील त्यांच्या योगानें मला इष्ट असलेल्या गोष्टींचा विघात होत असल्यामुळें ते माझे सर्वदा शत्रू समजले जातील. (२१). तुम्ही जर माझ्या आज्ञेप्रमाणें वागत असाल तर मला मान द्या. सीतेला येथून घेऊन जा. हें माझें म्हणणें ऐक." (२२).

**बंधूंशीं अरेरावीची वागणूक**

दुसऱ्यांचें म्हणणें ऐकण्याची तयारी नाहीं असें हें रामाचें अरेरावीचें वर्तन आहे. भावांना सल्ला देण्याकरितां बोलाविलें. सल्ला द्या असें प्रथम सांगितलें आणि आपला निश्चय त्यांस सांगून त्याप्रमाणें अंमलबजावणीचा एकदम हुकूम दिला.

बरें, सीतेला तरी तिच्यावर कोणता प्रसंग ओढवणार याची कल्पना देऊन तिच्या मनाची तयारी करावयाची संधि देणें योग्य असतां राम तसें कांहींच करीत नाहीं. गरीब बिचारी भाबडी सीता ! डोहाळे काय म्हणून रामानें विचारल्यावर ऋषींचे आश्रम पहाण्याची इच्छा आहे असें तिनें सांगितलें होतें. त्याचा फायदा–अगदीं अयोग्य फायदा–राम घेत आहे–अगदीं विश्वासघात करीत आहे.

"पूर्वमुक्तोऽहमनया गंगातीरेऽहमाश्रमान् ।
पश्येयमिति तस्याश्च कामः संवर्त्यतामयम्" ॥

"गंगातीरीं असलेले आश्रम अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे, असें तिनें पूर्वींच मला सांगितलें आहे. यास्तव ही तिची इच्छा परिपूर्ण होऊं दे." (२३). लक्ष्मणाला ही गोष्ट मान्य करावी लागली व त्याप्रमाणें दुसरे दिवशीं त्यानें बतावणीहि चांगली केली. दुसरे दिवशीं लक्ष्मणानें सुमंत्रास रथ जोडून आणण्यास सांगितलें. रामराज्यांत सर्व गोष्टींची सुबत्ता असून

सारथ्यांचा मात्र तुटवडा होता. केव्हांहि काम पडो, सुमंत्राला आपलें मंत्रिपदाचें काम खालच्या अधिकाऱ्याकडे सोपवून घोडे हाकण्यासाठीं चाबूक हातीं घ्यावा लागत आहे. त्यानें त्याप्रमाणें रथ जोडून आणला असें लक्ष्मणास कळविलें. नंतर

एवमुक्तः सुमंत्रेण राजवेश्मनि लक्ष्मणः ।
प्रविश्य सीतामासाद्य व्याजहार नरर्षभः ॥

सर्ग ४६ श्लोक ६

" त्वया किलैष नृपतिर्वरं वै याचितः प्रभुः ।
नृपेण च प्रतिज्ञातं आज्ञप्तश्चाश्रमं प्रति ॥ ७ ॥
गंगातीरे मया देवि ऋषीणामाश्रमाञ्शुभान् ।
शीघ्रं गत्वा तु वैदेहि शासनात्पार्थिवस्य नः ॥ ८ ॥
अरण्ये मुनिभिर्जुष्टे अवनेया भविष्यसि " ।

अर्थ:—याप्रमाणें सुमंत्रानें सांगितलें असतां लक्ष्मण राजवाड्यामध्यें गेला आणि सीतेसन्निध जाऊन तो पुरुषश्रेष्ठ तिला म्हणाला, (६) " तूं खरोखर या प्रभुराजापाशीं आश्रमाला जाण्यासंबंधानें एक वर मागितला होतास आणि त्यानें तो देण्याचें कबूल करून मला आज्ञा केली आहे. (७) हे देवि वैदेहि, आमच्या राजाच्या आज्ञेनें गंगातीरीं ऋषींच्या शुभ आश्रमांमध्यें सत्वर जाऊं या. (८) मुनींनीं आश्रित अशा अरण्यामध्यें मी तुला पोंचविणार आहें. "

भाबड्या सीतेला ही गोष्ट खरी वाटली !

एवमुक्ता तु वैदेही लक्ष्मणेन महात्मना ॥ ९ ॥
प्रहर्षमतुलं लेभे गमनं चाप्यरोचयत् ।
वासांसि च महार्हाणि रत्नानि विविधानि च ॥ १० ॥
गृहीत्वा तानि वैदेही गमनायोपचक्रमे ।
इमानि मुनिपत्नीनां दास्याम्याभरणान्यहम् ॥ ११ ॥
वस्त्राणि च महार्हाणि धनानि विविधानि च ।

अर्थ:–याप्रमाणें महात्म्या लक्ष्मणानें सीतेला सांगितलें असतां (९) तिला अनुपम हर्ष झाला, आणि जाण्याचेंहि तिनें मनामध्यें आणलें. नंतर मोठीं मूल्यवान वस्त्रें व नाना प्रकारचीं रत्नें तिनें बरोबर घेतलीं. आणि "हीं भूषणें, मोठीं मूल्यवान वस्त्रें व नाना प्रकारच्या वस्तु मी ऋषिपत्न्यांना देईन" असें म्हणून ती जाण्यास निघाली.

भिकार लक्षणें

येथें एक शंका येते. त्या काळचे रथ दोन चाकांचे व दोन घोडे जोडलेले लहानच असत. सीता, लक्ष्मण व सुमंत्र अशीं तीन माणसें रथावर बसल्यावर ऋषिपत्न्यांना देण्यासाठीं घेतलेलीं भूषणें, मौल्यवान वस्त्रें व नानाप्रकारच्या वस्तू ठेवण्यास जागा कोठें मिळाली ! दुसरा रथ बरोबर नव्हताच. वास्तविक पाहतां रामासारख्या श्रीमान् सम्राटाची अभिषिक्त राणी डोहाळे पुरविण्यासाठीं वनांत जाते. तिच्याबरोबर एकहि दासी नसावी हें चमत्कारिक नव्हे काय ! बालकांडाच्या ७४ वे सर्गांत जनकानें आपल्या कन्यांस आंदण काय काय दिलें याची नोंद श्लोक ३।४।५।६ यांत आहे. त्यांत

दर्दौ कन्याशतं तासां दासीदासमनुत्तमम् ।

त्या चौघींपैकीं प्रत्येकीबरोबर सख्या शंभर शंभर कन्या आणि उत्कृष्ट दास व दासी दिल्या होत्या असा उल्लेख आहे. या वेळीं राम केवळ राजपुत्र होता. युवराजहि नव्हता. महाराज झाल्यावर महाराज्ञीचा परिवार वाढला पाहिजे. बरें, न वाढतां तितकाच राहिला असें मानलें तरी या गर्भार स्थितींत सीतेबरोबर एकहि दासी जाऊं नये व तिनें नेऊं नये हें मोठेंच चमत्कारिक दिसतें. साधारण श्रीमंताच्या किंवा कमी उत्पन्नाच्या सरदाराच्या बायकोबरोबर एक तरी बाई माणूस असतेंच. पण रामाच्या महाराणीबरोबर एकहि दासी नसावी, तिचे सामान–सुमानास आणखी एखादा रथदेखील नसावा हें मोठें चमत्कारिक आहे.

आम्हीं लहानपणीं एक गोंधळ घातलेला पाहिला आहे. त्यांत गोंधळी राजा विक्रमाची कथा सांगत असतात. राजाच्या घरच्या एका मेजवानीचें वर्णन करण्याच्या भरांत गोंधळीबुवा आले व "राजा विक्रमाच्या घरीं । गाडग्यागाडग्यांनीं खीर वाढी ॥" असें दोनतीनदां म्हणाले. राजाच्या घरांतील भांडीं निदान चांदीचीं तरी असतात, याची कल्पना वक्त्यास

कोठची ! त्याच्या घरांत गाडग्याशीं कारभार. त्याच भांड्याचें नांव नेहमींच्या सरावानें त्याच्या तोंडीं आलें. त्या गरीबाला खीर हें मोठें पक्वान्न आणि ती पुष्कळ पोटभर मिळाली म्हणजे तो खुष ! यामुळें इतर पक्वान्नांचीं नांवें त्याला घेतां आलीं नाहींत. रामायणाचा हा भाग घुसविणारा वाल्मीकि अशाच कल्पनाशक्तींत किंवा माहितींत दरिद्री असावा. तसा नसता तर त्यानें सीतेबरोबर जास्त दासदासी वगैरे लवाजमा दिला असता. याचे उलट अयोध्याकांडाचा वाल्मीकि कल्पनाशक्तींत मातबर होता. रामास परत आणण्यास भरत गेला तेव्हां वास्तविक फार मोठ्या लवाजम्याची जरूरी नव्हती. पण या वाल्मीकीला त्याचें काय ! वर्णनांत भली थोरली अतिशयोक्ति ! त्यानें केलेलें वर्णन अयोध्याकांड सर्ग ८३ मध्यें आहे. भरताबरोबर ९००० हत्ती, ६०००० रथ, एक लक्ष स्वार होते. याशिवाय प्रजाजन, व्यापारी वगैरे निराळेच. रामायणांत असे प्रकार अनेक ठिकाणीं आढळतील. सीतेला डोहाळे पुरविण्याच्या मिषानें लक्ष्मणानें नेली तेव्हां बरोबर एकहि दासी नव्हती व ऋषिपत्न्यांस देण्याकरितां वस्त्रें व अलंकार घेतले होते. त्यापलीकडे सीतेचें कांहीं सामानहि नव्हतें ! अशा रीतीनें सीतेस रामानें राज्याबाहेर निष्ठुरपणें हांकून दिलें. निघतेवेळीं राम तिला भेटला नाहीं, इतकेंच नव्हे तर तिला जीव कीं प्राण करणाऱ्या अशा तिच्या सासवांपैकीं कोणीहि लवकर परत ये असें सांगण्यास आली नाहीं !

## सारासार विचार

सीतेसंबंधानें पसरलेल्या लोकापवादाविषयीं व त्या लोकापवादामुळें प्रजेला संतुष्ट करण्याच्या हेतूनें तिला राज्याबाहेर नेऊन सोडण्याच्या निश्चयाविषयीं सीतेला पूर्णपणें अज्ञानांत ठेवण्याचें काय कारण होतें, याची कल्पना होत नाहीं. डोहाळे पुरविण्यासाठीं तुझ्या इच्छेप्रमाणें राम तुला तपोवनांत पाठवित आहे अशी तिची समजूत लक्ष्मणानें करून दिलेली दिसते.

सीतेला आपल्यावरील लोकापवादाची जाणीव करून दिली असती तर पूर्वी लंकेंत अग्निदिव्य करून रामाची खात्री केली तशी अयोध्यावासी जनांची पुन्हां तें किंवा दुसरें दिव्य करून तिनें खात्री केली असती. ती निष्पाप आहे अशी रामाची खात्री झाली होती, तर लोकांची खात्री होण्यासाठीं पुन्हा दिव्य करविणें कठीण नव्हतें. ब्रह्मदेव, महादेव वगैरे

सर्व देव सीतेच्या पातिव्रत्याची भलामण करण्यास जसे लंकेंत आले तसे ते अयोध्येसहि आले असते. राजा दशरथ पूर्वीप्रमाणें येऊन सर्व प्रजाजनांना सीतेच्या पावित्र्याची साक्ष देता तर त्यांचें तोंड मिटलें असतें. पण याप्रमाणें करण्याची संधि सीतेला मुळींच देण्यांत येत नाहीं, हें मोठें विलक्षण व आश्चर्यकारक दिसत आहे.

बरें, पुन्हां दिव्य करणें व देवांस येण्याचा त्रास देणें योग्य नाहीं म्हणून रामानें तसें करण्यास सीतेला सांगितलें नाहीं असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण नैमिषारण्यांत त्यानें अश्वमेध केल्याची कथा उ. कां. सर्ग ९५ यांत आहे. तेथें रामानें सीतेला पुन्हां दिव्याची अट घातली आहे. मग प्रथमच त्यानें कां घातली नाहीं हें कोडें राहतेंच. आपल्या यज्ञाकरतां रामानें सर्व ऋषींस बोलाविलें, परंतु वाल्मीकीस तो अगदीं रामराज्याच्या सीमेवर राहात होता तरी बोलाविलें नव्हतें. तो आपण होऊनच आपल्या दोन शिष्यांस घेऊन आला. व त्यांच्याकडून त्यानें रामायणाचे दररोज वीस वीस सर्ग पठण करविले. रामानें ते ऐकले. रामायण गाणारे दोघे सीतापुत्र असल्याचें कळल्यावर त्यानें दूत बोलावून त्यांना आपला निरोप वाल्मीकि मुनीस कळविण्यास पाठविलें. तो निरोप असा आहे.–

" यदि शुद्धसमाचारा यदि वा वीतकल्मषा ।
करोत्विहात्मनः शुद्धिं अनुमान्य महामुनिम् ॥४॥
छंदं मुनेश्च विज्ञाय सीतायाश्च मनोगतम् ।
प्रत्ययं दातुकामायाः ततः शंसत मे लघु ॥५॥
श्वः प्रभाते तु शपथं मैथिली जनकात्मजा ।
करोतु परिषन्मध्ये शोधनार्थं ममैव च " ॥६॥

अर्थः– " सीतेचें आचरण जर स्वाभाविकच शुद्ध असेल अथवा (आश्रमांत वास्तव्य केल्यामुळें) ती जर शुद्ध झाली असेल तर महर्षींची अनुज्ञा घेऊन तिनें आपल्या शुद्धीविषयीं येथें शपथ करावी. (४). असा भगवान वाल्मीकि मुनींना निरोप कळवून मुनींचा व सीतेचा अभिप्राय तुम्ही समजून घ्या आणि ती जर आपल्या आचरणाविषयीं खात्री करून देण्यास तयार असेल तर तसें मला लवकर येऊन कळवा. (५). उदईक

प्रभातकाळीं जनककन्या मैथिलीनें सभेमध्यें स्वतःवरील व माझ्यावरील अपवाद दूर करण्याकरितां शपथ करावी." (६). वाल्मीकीनें हें कबूल केलें व त्याप्रमाणें शपथ झाल्याची हकीकत ९७ वे सर्गांत आहे.

शपथेचा हा विधि लोकांची खात्री पटवून त्यांचीं तोंडें बंद पाडण्यासाठीं रामास पूर्वींच करविता आला असता. प्रजाजनांचें म्हणणें सीतेच्या हातून व्यभिचार घडला हें होतें. सीतेनें अग्निदिव्य केलें व ब्रह्मदेवादि देव, अग्नि व दशरथ यांनीं खात्री पटविली वगैरे कथा विश्वसनीय आहेत असें त्यांस पटेना. त्यांच्या समक्षच तो चमत्कार पुन्हां झाला असता तर त्यांना सीतेचें पावित्र्य पटलें असतें. पण तसें कांहीं एक न करतां व सीतेला पुढल्या संकटाची दखलगिरी न देतां डोहाळे पुरविण्याकरितां मी नेत आहे असा लक्ष्मणाकडून विश्वास दाखवून तिला फसविण्याचें कृत्य रामानें करावें हें आश्चर्य आहे. असें कृत्य एखाद्या सामान्य माणसाच्या हातून झालें असतें तर त्याच्यावर कडक टीका झाल्याशिवाय राहिली नसती. पण राम हा विष्णूचा अवतार अशी भुरळ लोकांना पडल्यामुळें त्यांची विचारशक्तीच कुंठित झाली व रामाच्या वर्तणुकीच्या बऱ्यावाईटपणाची चिकित्सा करण्याची हिंमत कोणासच होत नाहीं. सीतेला हद्दपारीची शिक्षा देण्याच्या व ती अंमलांत आणण्याच्या कामीं वसिष्ठ मुनींचा सल्ला कोणीच घेत नाहीं, हेंहि एक आश्चर्यच आहे. कां रामानें केलेला प्रकार योग्यच होता असें वसिष्ठाचेंहि मत होतें ! रामाचा निषेध त्यांनीं केला असा उल्लेखहि पुढें कोठें आलेला नाहीं. त्यांच्या मुग्धतेचा अर्थ त्यांची मान्यता या कामीं होती असा करावा काय ?

सीतेला रामानें दिलेली शिक्षा मन्वादि स्मृतिकारांच्या मताप्रमाणें अयोग्य होती. या कामीं रामानें आर्यस्मृतिकारांच्या मतें अधर्म्य कृत्य केलें आहे. पण राम हा अधर्मानें वागणारा नसल्यानें तो आर्यस्मृतींचें अनुशासन पाळणारा नव्हता, त्याचा धर्म अनार्यस्मृतींनीं घालून दिलेला होता व म्हणून तो हिंदी आर्य नसून परदेशी असला पाहिजे असें आम्हास दाखवावयाचें आहे.

— महाराष्ट्र-शारदा, जुलै १९३६

# रामाचें अनार्यत्व

सीतेला रावणानें पंचवटीहून जबरीनें नेलें व लंकेतील अशोक नांवाच्या विलासवनांत एक वर्षभर ठेविलें होतें. त्यामुळें ती शुद्ध राहिली नसावी अशी रामास व इतरांस शंका आली. ती घालविण्यासाठीं सीतेनें अग्नि-दिव्य केलें. ब्रह्मदेवादि सर्व देव, अग्नि व दशरथ वगैरेंनीं सीतेच्या पावित्र्याची खात्री दिल्यावर रामानें तिचा स्वीकार केला. सर्व अयोध्येस येऊन सीता व राम यांस राज्याभिषेक झाला व ते आनंदानें विलासांत काळ घालवूं लागले. पण सीतेच्या अग्निशुद्धीची हकीकत सर्व नागरिकांस व प्रजाजनांस खोटी वाटली व व्यभिचारी सीतेचा अंगीकार करणारा असा दोष ते रामास देऊं लागले. त्या वेळीं सीता गर्भवती होती. यामुळें तिच्या व्यभिचाराविषयीं लोकांमध्यें जास्तच चर्चा झाली. लोकांचीं क्षुब्ध झालेलीं मनें शांत करण्यास सीतेचा त्याग करणेंच योग्य असें रामास वाटून त्यानें लक्ष्मणाकडून तिला आपल्या राज्याच्या बाहेर काढून लावलें. राज्याभिषिक्त महिषीबरोबर एखादी दासी देखील जाऊं दिली नाहीं. तिचें राज्ञीपद काढून घेण्यांत आलें, नवऱ्यानें टाकलेल्या गरीबाच्या स्त्रीची अवस्था तिला प्राप्त झाली. तिच्या उदरनिर्वाहाचीहि कांहीं सोय केली नाहीं. तिच्या माहेरींहि तिला पोंचविली नाहीं. दयाळु वाल्मीकि ऋषि तिचा प्रतिपाळ करील असा भरंवसा मात्र धरला होता.

व्यभिचाराचा आरोप सीतेवर शाबीद मानून ही शिक्षा तिला भोगावयास लाविली, हें रामाचें कृत्य धर्माला सोडून आहे असें भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न या तिघांपैकीं एकालाहि म्हणतां आलें नाहीं; कौसल्या, कैकेयी व सुमित्रा या राजमातांनींहि या कामीं रामाचा निषेध केल्याचें दिसत नाहीं. वसिष्ठादिक गुरूंनींहि या कामीं रामाची कानउघाडणी केली नाहीं. यावरून त्या काळच्या रामाच्या देशांतील धर्मशास्त्राप्रमाणें व्यभिचारी स्त्रीचा त्याग करणें विहित होतें व त्याप्रमाणें रामानें योग्य तें धर्माचरण केलें. म्हणून रामप्रजेस

रामाविषयीं अभिमानच वाटला पाहिजे व त्याची जिकडेतिकडे वाहवा झाली असली पाहिजे.

परंतु व्यभिचारी स्त्रीस वागविण्याचे नियम मन्वादि स्मृतीप्रमाणें अगदीं निराळे आहेत. (पहा, मनु अध्याय ४१ श्लोक १७७।१७८)

विप्रदुष्टां स्त्रियं भर्ता निरुन्ध्यादेकवेश्मनि ।
यत्पुंसः परदारेषु तच्चैनां चारयेद्व्रतम् ।।
सा चेत्पुनः प्रदुष्येत्तु सदृशेनोपयंत्रिता ।
कृच्छ्रं चांद्रायणं चैव तदस्याः पावनं स्मृतम् ।।

अर्थः–व्यभिचारिणी स्त्रीला एका घरांत कोंडून ठेवावें व व्यभिचारी पुरुषाला सांगितलेलें प्रायश्चित्त तिच्याकडून करवावें. (१७७) समान वर्णाच्या पुरुषाबरोबर ती पुनः व्यभिचार करील तर तिला शुद्ध करण्याकरितां चांद्रायण व्रत करावें. (१७८)

याप्रमाणें मनूच्या मतानें केलेल्या प्रायश्चित्तानें व्यभिचार घडलेली स्त्री शुद्ध होते. रावणाबरोबर सीतेचा व्यभिचार झाला असें मानलें तरी रावण हा जन्मानें ब्राह्मणवर्णी व कर्मानें मोठा शूर लढवय्या असल्यानें क्षत्रियवर्णी होता. या कारणानें फार तर चांद्रायण व्रतानें तिची शुद्धि होणें योग्य होतें.

स्त्रिया या स्वभावतः शुद्ध आहेत. त्यांच्या हातून पाप किंवा व्यभिचार घडल्यास त्या प्रायश्चित्तानें शुद्ध होतात असें याज्ञवल्क्याचेंहि सांगणें आहे. (पहा याज्ञवल्क्य स्मृति अध्याय १ श्लोक : ७१)

सोमः शौचं ददौ चासां गंधर्वश्च शुभां गिरम् ।
पावकः सर्वमेध्यत्वं मेध्या वै योषितो ह्यतः ।।

अर्थः–स्त्रियांना चंद्रानें शौच, गंधर्वानें मधुरवाणी व अग्नीनें सर्व प्रकारची पवित्रता दिली असल्यानें स्त्रिया या पवित्रच आहेत.

व्यभिचारिणी स्त्रीला कसें वागवावें हें याज्ञवल्क्य त्याच अध्यायाच्या ७० व्या श्लोकांत सांगतो—

हृताधिकारां मलिनां पिण्डमात्रोपजीविनीम् ।
परिभूतामधः शय्यां वासयेद्व्यभिचारिणीम् ।।

अर्थः– व्यभिचारिणी स्त्रीचे घरांतील सर्व अधिकार काढून घेऊन अल्पमूल्य वस्त्रें वापरण्यास द्यावीं. केवळ जिवंत राहण्याइतकें अन्न देऊन तिचा अनादर करून भूमीवर शयन करण्यास लावावें.

पण ही शिक्षा कायमची नव्हती. स्त्रिया या स्वभावतः पवित्र असल्यानें ७२ वे श्लोकांत शिक्षेचा अवधि सांगितला आहे.

व्यभिचारादृतौ शुद्धिः गर्भे त्यागो विधीयते ॥ ७२ ॥

अर्थः–व्यभिचारिणी स्त्री ऋतुमती झाल्यावर व परपुरुषापासून गर्भ धारण करणारी स्त्री बाळंत झाल्यावर किंवा गर्भपतन पावल्यावर शुद्ध होते.

सीता व्यभिचारिणी झाली व तिला रावणापासून गर्भ राहिला होता असा लोकांचा समज झाला असला तरी त्या प्रसंगीं सीतेला फक्त अन्नवस्त्र देऊन एका लहानशा घरांत बंद करून तिला प्रसूतीपर्यंत ठेवणें स्मृतिवचनाप्रमाणें विहित होतें. रामानें शिक्षा दिल्याप्रमाणें 'घराबाहेर' हाकून लावणें हें कृत्य मनु व याज्ञवल्क्य यांच्या वचनान्वयें अधर्म्यच आहे.

मनु व याज्ञवल्क्य याशिवाय इतर स्मृतिकारहि व्यभिचाराला प्रायश्चित्तार्ह ठरवित आहेत. अंगिरा स्मृतींत स्त्रियांना पुरुषाच्या निम्में प्रायश्चित्त सांगितलें आहे.

अशीतिर्यस्य वर्षाणि बालो वाप्यूनशोडषः ।

प्रायाश्चित्तार्धमर्हन्ति स्त्रियो रोगिण एव च ॥३३॥

ऐंशी वर्षांचा वृद्ध, सोळा वर्षांखालील बालक, स्त्रिया व रोगी हे अर्ध-प्रायश्चित्ताला योग्य होत. बृहद्यमस्मृतीच्या ४ थ्या अध्यायांत

घृतं योन्यां क्षिपेद् घोरं परपुंसगता हि या ॥

हवनं च प्रयत्नेन गायत्र्या चायुतत्रयम् ।

ब्राह्मणान्भोजयेत्पश्चाच्छतमष्टोत्तरेण हि ॥३७।३८॥

अर्थः– परपुरुषाशीं व्यभिचार करणारे स्त्रीला तुपानें भरलेल्या भांड्यांत बसवावें. बाहेर काढल्यावर गायत्री मंत्रानें तीस हजार आहुती देऊन १०८ ब्राह्मणांस भोजन द्यावें, म्हणजे शुद्धि होते असें सांगितलें आहे.

पाराशर स्मृतीच्या दहाव्या अध्यायांत तर सर्वांत गर्ह्य अशा म्हणजे ब्राह्मणीच्या चांडालाबरोबर झालेल्या व्यभिचारास प्रायश्चित्त सांगितलें आहेः

चाण्डालैः सह संपर्कं या नारी कुरुते ततः ॥
विप्रान्दशावरान्कृत्वा स्वयं दोषं प्रकाशयेत् ।
आकंठसमिते कूपे गोमयोदककर्दमे ॥ १९ ॥
तत्र स्थित्वा निराहारा त्वहोरात्रेण निष्क्रमेत् ।
सशिखं वपनं कृत्वा भुंजीयाद्यावकौदनम् ॥ २० ॥
त्रिरात्रमुपवासित्वा त्वेकरात्रं जले वसेत् ।
शंखपुष्पीलतामूलं पत्रं वा कुसुमं फलम् ॥ २१ ॥
सुवर्णं पंचगव्यं च क्राथयित्वा पिबेज्जलम् ।
एकभुक्तंचरेत्पश्चाद्यावत्पुष्पवती भवेत् ॥ २२ ॥
व्रतं चरति तद्यावत्तावत्संवसते बहिः ।
प्रायश्चित्ते ततश्चीर्णे कुर्याद् ब्राह्मणभोजनम् ॥ २३ ॥
गोद्वयं दक्षिणां दद्याच्छुद्धिं पाराशरो ब्रवीत् ।
चातुर्वर्णस्य नारीणां कृच्छ्रं चांद्रायणं व्रतम् ॥ २४ ॥

अर्थः—चांडालाबरोबर व्यभिचार करणाऱ्या स्त्रीनें कमींत कमी दहा ब्राह्मणांच्या सभेंत आपलें कर्म कबूल करावें. नंतर शेण कालविलेल्या पाण्यानें खड्ड्यांत निराहार एक दिवस रात्र उभें राहावें. नंतर बाहेर येऊन डोक्याचे केस दोन बोटें कातरावे व यवाचा भात खावा. पुनः तीन रात्र उपवास करून एक रात्र पाण्यांत बसावें. शंखपुष्पी लतेचें मूळ, पान किंवा फूल, सोनें व पंचगव्य यांचा काढा करून प्यावा. यानंतर रजोदर्शन होईपर्यंत एक वेळ भोजन करावें. व्रत चालू असेपर्यंत घराबाहेर राहावें. प्रायश्चित्त पुरें झाल्यावर ब्राह्मणांना भोजन, दोन गाई दक्षिणा द्याव्या; अशी शुद्धि महर्षि पाराशरनें सांगितली आहे. चारी वर्णांच्या स्त्रियांच्या शुद्धीसाठीं कृच्छ्र व चांद्रायण व्रत आहे.

यथाभूमिस्तथा नारी तस्मात्तां न तु दूषयेत् ।

बंदिग्राहेण या भुक्ता हत्वा बद्ध्वा बलाद् भयात् ॥

मारून, बद्ध करून, घाबरवून जिचा उपभोग घेतला ती नारी भूमीसारखीच आहे, म्हणून अशा स्त्रीला दोष लावूं नये.

पराशराच्या मताप्रमाणें सीतेला जबरदस्तीनें नेल्यामुळें तिचा उपभोग रावणानें तिला घाबरवून केला असला तरी भूमीप्रमाणेंच सीता निर्दोष मानली पाहिजे. रावण हा वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण किंवा क्षत्रियवर्णी होता. त्याच्याशीं रत झाल्यानें सीता दूषित झाली असें वादाकरितां मानलें तरी ती कृच्छ्र व चांद्रायण व्रतानें शुद्ध झाली पाहिजे. हें चांद्रायण व्रत व कृच्छ्र आपल्या कुटुंबांत राहूनच करावयाचें आहे. नारीला वपन सांगितलें असलें तरी सर्व डोक्याचें मुंडन न करितां दोन बोटें केश कापून तें करावें असें याच स्मृतीच्या १० व्या अध्यायांत ५६-६० श्लोकांत सांगितलें आहे. पहा—

सर्वान्केशान्समुद्धृत्य छेदयेदंगुलिद्वयम् ॥

एवं नारीकुमारीणां शिरशो मुंडनं स्मृतम् ॥ ५६ ॥

सर्व केश वर उचलून दोन बोटें कातरावे. याला स्त्री व कुमारी–कन्यांचें मुंडन म्हणतात. ( ५६ ).

बंधुमध्ये व्रतं तासां कृच्छ्रचांद्रायणादिकम् ॥ ५९ ॥

गृहेषु सततं तिष्ठेच्छुचिर्नियममाचरेत् ॥

अर्थः– बंधुजनांमध्येंच राहून त्यांनीं कृच्छ्र चांद्रायणादि व्रत आचरावयाचें आहे. नेहमीं घरीं शुचि व नियम पाळून रहावें.

यावरून पाराशर मताप्रमाणें हि घरांतून हाकून लावण्याची शिक्षा धर्माला सोडून आहे असें स्पष्ट आहे.

कृत्वा सांतपनं कृच्छ्रं शुद्धेत्पाराशरो ऽब्रवीत् ।

सकृद्भुक्ता तु या नारी नेच्छन्ती पापकर्मिभिः ॥ २६ ॥

प्राजापत्येन शुद्ध्येत् ऋतुप्रस्रवणेन च ॥ २७ ॥

पंचविसावे श्लोकांत सांगितल्याप्रमाणें बांधून नेल्यास, मारण्याचें भय दाखवून किंवा बांधून जी अत्याचार करून भोगिली जाते तीच कृच्छ्रसांतपनानें शुद्ध होते. कोणा पाप्यानें स्त्रीच्या इच्छेविरुद्ध जबरीनें एक वेळ भोग घेतल्यास ती प्राजापत्य व्रत करून रजस्वला झाल्यावर शुद्ध होते.

याप्रमाणें सीतेला शुद्ध करून घेणें आर्यस्मृतींच्या आधारें योग्य होतें.

### वसिष्ठ स्मृतीचा पुरावा

ज्या वसिष्ठावर रामाच्या गुरुत्वाचा आरोप केला आहे, त्या वसिष्ठाच्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या स्मृतींत यासंबंधानें काय सांगितलें आहे तें पाहूं:—

मनसा भर्तुरतिचारे त्रिरात्रं यावकं क्षारौदनं वः भुंजानाऽधःशयीत । ऊर्ध्वं त्रिरात्रादप्सु निमग्नायाः सावित्र्यष्टशतेन शिरोभिर्जुहुयात् पूता भवतीति विज्ञायते ॥ वाक्संबंधे एतदेव मासं चरित्वोर्ध्वमासादप्सु निमग्नायाः सावित्र्याश्चतुर्भिरष्टशतैः शिरोभिर्जुहुयात्पूता भवतीति विज्ञायते ॥ ८ ॥ व्यवाये तु संवत्सरं घृतपटं धारयेत् ॥ ९ ॥ गोमयगर्ते कुशप्रस्तरे वा शयीतोर्ध्वं संवत्सरादप्सु निमग्नायाः सावित्र्याः त्र्यष्टशतेन शिरोभिर्जुहुयात्पूता भवतीति विज्ञायते ॥ १० ॥

अर्थः—मनानें दुसऱ्या पुरुषाची इच्छा करून पतीचा अनादर करणाऱ्या स्त्रीनें तीन रात्र यवाचें पाणी अथवा दूधभात खाऊन राहावें, भूमीवर शयन करावें, तीन रात्री झाल्यावर सावित्रीच्या शिरोमंत्रानें तुपाच्या ८०० आहुती नदीच्या पाण्यांत द्याव्या. असें करण्यानें ती शुद्ध होते. (७). जी स्त्री परपुरुषाला शब्दानें बोलवून पतीचा अनादर करते, तिनें वर सांगितलेले नियम एक महिना पाळावे. नंतर नदीच्या पाण्यांत सावित्रीच्या शिरोमंत्रानें तुपाच्या ३२०० आहुती दिल्यावर ती शुद्ध होते. (८).

परपुरुषाबरोबर संग करणाऱ्या स्त्रीनें एक वर्ष तूप लावलेलें वस्त्र नेसावें, (९) किंवा शेणाच्या खाईत किंवा गवताच्या ढिगांत निजावें. वर्षानंतर नदीच्या पाण्यांत तुपाच्या २४०० आहुती द्याव्या म्हणजे ती शुद्ध होते.(१०)

ब्राह्मणक्षत्रियविशां स्त्रियःशूद्रेण संगताः।

अप्रजाता विशुद्ध्यंति प्रायश्चित्तेन नेतराः ॥१४॥

अर्थः—शूद्राबरोबर संग करणाऱ्या ब्राह्मणक्षत्रियविशांच्या स्त्रियांना शूद्रापासून मूल झालें नसेल तर त्या शुद्ध होतात. मूल होणाऱ्या शुद्ध होत नाहींत. रावण हा शूद्र नसल्यानें, सीता त्याचेपासून गर्भवती झाली होती, असें वरेरकर मामांच्या मताप्रमाणें खरें असलें तरी, वसिष्ठमताप्रमाणें ती प्रायश्चित्तानें शुद्ध होण्यासारखी होती. स्त्रीला हाकून लावणें वसिष्ठास मान्य नाहीं.

देवल स्मृति ही काय सांगते पहा. या स्मृतींत सांगितल्याप्रमाणें उपाययोजना केल्यास बंगाल, संयुक्त प्रांत, पंजाब, सिंध वगैरे प्रांतांत हल्लीं घडणाऱ्या अत्याचारास थोडाबहुत आळा पडेल. निदान इतर धर्मीयांचा फायदा होणार नाहीं. पहाः—

अतःपरं प्रवक्ष्यामि प्रायश्चित्तमिदं शुभम्।

स्त्रीणां म्लेच्छैश्च नीतानां बलात्संवेशने क्वचित् ॥३६॥

ब्राह्मणी क्षत्रिया वैश्या शूद्रा नीता यदातन्त्यजैः।

ब्राह्मण्याः कीदृशं न्याय्यं प्रायश्चित्तं विधीयते ॥ ३७ ॥

ब्राम्हणी भजते म्लेच्छं अभक्ष्यं भक्षयेद्यदि।

पराकेण ततः शुद्धिः पादेनोत्तरतोत्तरान् ॥ ३८ ॥

न कृतं मैथुनं ताभिः अभक्ष्यं नैव भक्षितम्।

शुद्धिस्तादा त्रिरात्रेण म्लेच्छान्नेनैव भक्षिते ॥ ३९ ॥

अर्थः—ज्या स्त्रियांना म्लेंच्छ बलात्कारानें नेऊन त्यांच्याशीं संभोग करतात त्या प्रसंगींचें शुभ प्रायश्चित्त मी सांगतों (३६). जर ब्राह्मणी, क्षत्रिया, वैश्या, शूद्रा यांना अंत्यज बलात्कारानें नेईल तर ब्राह्मणीनें काय प्रायश्चित्त करावें ? (३७). जी ब्राह्मणी म्लेंछाला वश होऊन राहते व अभक्ष्यवस्तु ( गोमांसादि ) खाते ती परत घरीं आल्यावर पराक व्रत करण्यानें शुद्ध होते. अशा क्षत्रिय स्त्रीला तीन पाद पराक व्रत करण्यानें,

वैश्य स्त्रीला पराक व्रत अर्धें करण्यानें व शूद्र स्त्रीला चतुर्थांश पराक व्रत करण्यानें शुद्धि प्राप्त होते. (३८). जी ब्राह्मणी म्लेंच्छाशीं समागम करीत नाहीं व अभक्ष्यभक्षण करीत नाहीं, फक्त त्याच्या घरचें अन्न खाऊन राहते ती घरीं आल्यावर तीन रात्र पराक व्रत करून शुद्ध होते. (३९).

गृहीता स्त्री बलादेव म्लेच्छैर्गुर्वी कृता यदि ।
गुर्वी न शुद्धिमाप्नोति त्रिरात्रेणेतरा शुचिः ॥ ४७ ॥
येषां गर्भं विधत्ते या म्लेच्छात्कामादकामतः ।
ब्राह्मणी, क्षत्रिया, वैश्या, शूद्रावर्णेतरा च या ॥ ४८ ॥
अभक्ष्यभक्षणं कुर्यात्तस्याः शुद्धिः कथं भवेत् ।
कृच्छ्रं सांतपनं शुद्धिः घृतैः योनेश्च पावनम् ॥ ४९ ॥

अर्थः—ज्या स्त्रियांना म्लेंच्छ बलात्कारानें नेतात त्यांना म्लेंच्छापासून गर्भ राहिला असल्यास प्रसूतीपूर्वी तिला शुद्धि नाहीं. गर्भार न राहिलेल्या स्त्रिया तीन रात्री निराहार राहाण्यानें शुद्ध होतात. (४७). जी ब्राह्मणी, क्षत्रिया, वैश्या किंवा वर्णसंकर स्त्री खुशीनें अथवा इच्छेविरुद्ध म्लेंच्छापासून गर्भार होते व अभक्ष्यभक्षण करते तिची शुद्धि कशी होते? (४८।४९) ती कृच्छ्र सांतपन व्रत व घृतानें योनिसंस्कार केल्यानें शुद्ध होते.

असवर्णेन यो गर्भः स्त्रीणां योनौ निषिच्यते ।
अशुद्धा सा भवेन्नारी यावच्छल्यं न मुंचति ॥ ५० ॥
विनिःसृते ततः शल्ये रजसो वापि दर्शने ।
तदासा शुध्यते नारी विमलं कांचनं यथा ॥ ५१ ॥
स गर्भो दीयतेऽन्यस्मै स्वयं ग्राह्यो न कर्हिचित् ।
स्वजातो वर्जयेद्यस्मात् संकरः स्यादतो ऽ न्यथा ॥ ५२ ॥

भिन्नवर्णी पुरुषापासून गर्भधारणा केलेली स्त्री गर्भप्रसव होईपर्यंत किंवा रजोदर्शन होईपर्यंत अशुद्ध आहे. त्यानंतर ती सोन्याप्रमाणें शुद्धच आहे. अशा गर्भापासून झालेलें मूल दुसऱ्या जातींत देऊन टाकावें. त्याचें ग्रहण केल्यानें वर्णसंकर होईल. ( ५१।५२ ).

अत्रि स्मृतींतहि यालाच अनुसरून प्रायश्चित्ताला संमति आहे. पहाः—

अशुद्धा सा भवेन्नारी यावद् गर्भं न मुंचति।
असवर्णात्तु यो गर्भः स्त्रीणां योनौ निशिच्यते ॥१९१॥
विमुक्ते तु ततः शल्ये रजश्चापि प्रदृश्यते ॥१९२॥
तदासा शुध्यते नारी विमलं कांचनं यथा ॥१९३॥

अन्त्यज शब्दाची व्याख्या अत्रिस्मृतींत दिलेली आहे. (श्लोक १९५।१९६).

रजकश्चर्मकारश्च नटो बुरुड एव च।
कैवर्तमेदभिल्लाश्च सप्तैते अन्त्यजाः स्मृताः ॥
एतान् गत्वा स्त्रियो मोहात्भुक्त्वा च प्रतिगृह्य च ॥
कृच्छ्राब्दमाचरेज्ज्ञानादज्ञानादैन्दवद्वयम् ॥
सकृद्भुक्ता तु या नारी म्लेच्छैः सा पापकर्मभिः ॥१९७॥
प्राजापत्येन शुद्ध्येत ऋतुप्रस्रवणेन तु ॥
बलोद्धृता स्वयंवापि परप्रेरितया यदि ॥ १९८ ॥
सकृद्भुक्ता तु या नारी प्राजापत्येन शुद्धति ॥ १९९ ॥

परीट, ढोर चांभार, नट, बुरूड, कैवर्त, मेद, भिल्ल या सात जातींच्या लोकांना अंत्यज म्हणावें. यांच्याशीं मोहानें स्त्रिया जातील आणि त्यांचा भोग घेतला जाईल तर हें कृत्य जाणून झालें असल्यास एक वर्ष व अज्ञानानें झालें असल्यास दोन यास कृच्छ्र केल्यानें शुद्धि होते. पापकर्मी यवनांनीं एक वेळ भोगलेली स्त्री प्राजापत्य प्रायश्चित्तानें ऋतुस्नान झाल्यावर शुद्ध होते. तेंच प्रायश्चित्त जबरीनें ओढून नेल्यावर किंवा स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या प्रेरणेनें गेलेल्या एक वेळ भोगलेल्या स्त्रीला आहे.

संवर्त स्मृति

चांडालं पुकसं चैव श्वपाकं पतितं तथा।
एताः श्रेष्ठाः स्त्रियो गत्वा कुर्यांच्चांद्रायणव्रतम् ॥ १७३ ॥

याप्रमाणें बहुधा प्रत्येक स्मृतींत व्यभिचारी स्त्रीला प्रायश्चित्तानें शुद्धि होते असें सांगितलें आहे. तिचा त्याग करावा असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं.

रामानें तर सीतेचा त्याग केलेला आहे, व तो त्याग विशेष निष्ठुरपणें केलेला आहे. आमचे आर्यस्मृतिकार व्यभिचाराला पातक समजतात व शुद्धीसाठीं प्रायश्चित्त सांगतात. सर्व स्मृतींत पुरुषांनाहि व्यभिचाराबद्दल प्रायश्चित्त सांगितलें आहे. व तशाच अपराधाबद्दल स्त्रीला तेंच प्रायश्चित्त अर्ध प्रमाणांत द्यावें असें कांहीं स्मृतिकार सांगतात. आमचे आर्यस्मृतिकार व्यभिचाराच्या पातकाच्या बाबतींत स्त्रीपेक्षां पुरुषावर जास्त जबाबदारी ठेवीत आहेत. निदान त्यांनीं दोघांस समान प्रायश्चित्त सांगितलें आहे. पण आजचा आचार व लोकांचा समज पाहिल्यास आमच्या मूळच्या स्मृतींतील सर्व वचनें बाजूस टाकून देऊन पुरुषाचा व्यभिचार हें मुळींच पातक नाहीं, त्याला त्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याची आवश्यकता नाहीं; पुरुष हा सोन्याचें भांडें; तो नेहमींच शुद्ध; असा समज नेहमींच्या भाषणांत दिसतो व आचारहि तसाच. स्त्रिया मात्र मातीच्या भांड्यासारख्या एकदां भ्रष्ट झाल्या कीं त्यांना शुद्धि नाहीं. मातीचें भांडें फोडून टाकतात त्याप्रमाणें व्यभिचारी स्त्रियांना टाकून द्याव्या असा आजचा समज व आचार आहे. आमचें मूळचें शास्त्र तर याच्या अगदीं उलट. स्त्रिया मूळच्याच शुद्ध आहेत असें याज्ञवल्क्य व इतर ऋषी कंठरवानें सांगतात. तर त्या मूळच्या अशुद्ध असें समाज मानतो. पुरुष हा व्यभिचारानें पतित होतो असें शास्त्र सांगतें. याच्या उलट आजचे ब्राह्मणादि सर्व लोक पुरुष हा शुद्धच आहे असें मानतात. स्त्रियांच्या व्यभिचारदोषाचा परिहार प्रायश्चित्तानें होतो असें शास्त्र कंठरवानें सांगत आहे. तर तिचा त्यागच केला पाहिजे अशी आजची समजूत व आचार. आम्हां आर्यांची स्त्रियांविषयींची मूळची आदरबुद्धि व न्यायबुद्धि जाऊन तिच्या ठिकाणीं अनादर ,व सूड उगविण्याची बुद्धि उत्पन्न झाली आहे असें आज दिसून येत आहे.

शास्त्रकारांच्या वचनास बाजूला टाकून पुरुषांना मात्र वाटेल त्या सवलती व स्त्रियांना मात्र शास्त्राला पसंत नाहीं असा जाच, अशी आजची स्थिति आहे. पुरुषानें कोणत्याहि स्त्रीबरोबर व्यभिचार करावा. त्याला प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्याची जरूरी नाहीं. तो जन्मताच शुद्ध समजला जातो.

त्याच्याशीं व्यभिचार करणारी स्त्री समाजांतून पतित होते. तिला प्रायश्चित्तानें शुद्ध करून घेतां येतें ही गोष्ट बहुतेक विसरून गेलेली आहे. आमच्या समाजाची अशी ही स्थिति होण्याची जबाबदारी बरेच अंशानें रामाच्या वर्तुणुकीवर आहे, असें म्हणतां येईल.

वसिष्ठ स्मृतींतील वचनें वर दिलींच आहेत. व्यभिचाराचा आरोप सीतेवर शाबीत झाला असला तरी त्या पापाची प्रायश्चित्तानें शुद्धि व्हावयास पाहिजे. पण रामानें या वसिष्ठस्मृतीचा अनादरच केला आहे. यावरून स्मृतिकार वसिष्ठ हा रामाचा गुरु किंवा पुरोहित असणें संभवनीय नाहीं. राम हा आर्यस्मृति न मानणारा परदेशचा राजा असला पाहिजे.

राम हा आर्यावर्तांतील अयोध्येचा राजा व तो विष्णूचा अवतार अशी चुकीची समजूत झाल्यानें रामाची वागणूक योग्य असलीच पाहिजे असें वाटून सीतेला निर्दयपणें घालवून देण्याचें रामाचें कृत्य योग्य व धर्मशास्त्राला मान्य असेंच पुष्कळांस वाटूं लागलें. धर्मशास्त्राचा अभ्यास मागें पडला होताच. रामायणादि ग्रंथांच्या पारायणानें व हरिदासांनीं लाविलेलीं रामचरित्रपर आख्यानें ऐकून व्यभिचारी स्त्रीचा त्यागच विहित अशी लोकांची समजूत झाली. व याचा परिणाम स्त्रियांस वागविण्याचे कामीं निष्ठुरपणा वाढूं लागला आहे. स्त्रिया या याज्ञवल्क्य मतानें मूळच्या स्वभावतःच शुद्ध आहेत, ही कल्पना जाऊन स्त्रिया या अशुद्धच आहेत असा समज वाढत चालला. या अनिष्ट प्रकाराची जबाबदारी रामायणाच्या शिकवणीवर पडते.

स्मृतिकारांच्या वचनांचा विचार केल्यास स्त्रियांचा व्यभिचार ही प्रायश्चित्तानें शुद्ध होण्याची बाब होती. पतिव्रताधर्माचें बंड त्यावेळीं फार कमी होतें. आमचे पूर्वींचे आर्य ऋषिपूर्वज पातिव्रत्यावर फारसा जोर देत नसत. स्त्रीच्या हातून व्यभिचार झाल्यास तो गुन्हा कबूल केल्यास तो दोष कमी होतो अशी समजूत होती.

एका ऋतुयागांत ( शतपथ ब्राह्मण २–५–२, २० ) यजमानपत्नी आणतांना प्रतिप्रस्थाता काय करतो याचें वर्णन आहे.

“ नंतर प्रतिप्रस्थाता यजमानाची पत्नी बसली असेल त्या जागेकडे जातो, आणि तिला आणतांना विचारितो कीं, “ तूं कोणाबरोबर व्यभिचार

करतेस ! कारण एकाशीं लग्न लागलेली स्त्री जर दुसऱ्याबरोबर व्यभिचार करील तर ती वरुणाचा मोठा अपराध करील." असें विचारतांना प्रतिप्रस्थात्याचा उद्देश 'मनामध्यें कोणतीहि गोष्ट जाचत असतां यज्ञ करणें दोषावह आहे' हें तिला समजावें असा आहे. म्हणून तो असा प्रश्न विचारतो. आपलें पाप कबूल केलें असतां कमी होतें. कारण मग तें सत्यच होतें. याच कारणास्तव तो तिला विचारतो. जें पाप ती कबूल करणार नाहीं त्याचे परिणाम तिच्या नातेवाईकांस भोगावे लागतील."

(पहा ज्ञानकोष विभाग दुसरा पृष्ठ १५७)

पण रामायणकथा हिंदी आहे व त्यांतील धर्माचें तत्त्व या देशांत मान्य आहे असा समज वाढत चालला. तेव्हां स्त्रीधर्मांत पातिव्रत्यास महत्त्व आलें. व सीता–सावित्री पतिव्रता होत्या यावर जोर देण्यांत येऊं लागला. आजहि सीता या पतिव्रतांत अग्रगण्य आहेच. "पंचकन्या" म्हणून ज्यांना म्हणतात व ज्यांचें स्मरण नित्य करावें व त्यापासून मोठ्या पातकांचा नाश होतो असें सांगितलें आहे त्या पंचकडींतील चार रामायणांत वर्णिलेल्या स्त्रिया आहेत हें लक्षांत घेणें जरूर आहे. यावरून रामायणाचा पगडा आमच्या लोकांच्या मनावर किती दृढ आहे, हें दिसून येत आहे.

रामानें केलेला सीतेचा त्याग आमच्या स्मृतिकारांस मान्य नाहीं. म्हणजे रामाला आमच्या स्मृती मान्य नव्हत्या. त्याचा गुरुहि वसिष्ठ नव्हता. तो असता तर त्यानें वसिष्ठ–स्मृतीप्रमाणें आचरण केलें असतें. यावरून राम हा कोणत्यातरी लांबच्या देशाचा राजा होता. तो देश इजिप्त असावा असें मल्लादि व्यंकटरत्नम् प्रमाणेंच आम्हांसहि वाटतें.

सर फ्लिन्डर्स पेट्री यांच्या ग्रंथांतील एक अवतरण या ग्रंथांतील एका लेखांत दिलें आहे. त्यांतील अखेरच्या भागाचा मराठी आशय या ठिकाणीं उतरून घेतों.

"सहाव्या वंशाचें राज्य असतां प्रत्यक्ष राणीची चौकशी एका न्यायाधिशानें केली व दुसऱ्या न्यायाधिशाच्या मदतीनें त्यानें आपला निर्णय लिहिला असें नमूद आहे. या चौकशीच्या कामीं राजाला कांहीं भाग घेतां आला नाहीं. इतर मोठ्या गुन्ह्यांच्या कामीं अखेरचे हुकूम राजाच्या नांवानें

निघत त्याप्रमाणें या राणीच्या खटल्यांतहि निघाला असेल. पण कोणाची चौकशी होऊन अपराध शाबीद होण्याचें काम पूर्णपणें न्याय देण्याच्या पद्धतींत सांगितलेल्या नियमांस अनुसरून चाले."

प्राचीन इजिप्त देशाच्या राज्यपद्धतीस अनुसरून सीतेच्या बाबतींत वर्तन झालें आहे असें थोड्या विचारांतीं दिसून येतें. रामायणकथेंत सीतेची चौकशी झाल्याची व न्यायाधिशानें अपराध शाबीद मानल्याची हकीकत दिलेली नाहीं. तथापि तसा कांहीं तरी प्रकार असावा व त्या ठरावांत रामाला किंवा त्याच्या भावांना किंवा कोणाला फेरफार करण्याचा अधिकार नसावा. निमूटपणें तो ठराव अमलांत आणणें भाग होतें असेंच रामाच्या व इतरांच्या वर्तनावरून दिसतें. सीतेला नेऊन आपल्या राज्याच्या हद्दीबाहेर सोडण्यास रामानें लक्ष्मणास सांगितलें, तेव्हांहि "मला इष्ट असलेल्या गोष्टीचा विघात होत असल्यानें मजविरुद्ध बोलणारे शत्रू समजले जातील," असें राम स्पष्ट सांगत आहे. या ठिकाणीं 'अहित' शब्दाचा रूढार्थ शत्रु न घेतां हितविघात करणारे असा यौगिक अर्थ घेणें बरें दिसतें. राजानें न्याय देण्याच्या कामीं आपल्या इच्छेप्रमाणें ढवळाढवळ केल्यास प्रजा नाराज होऊन राजालाच काढून टाकतील अशी भीति त्यास असावी. एकंदरींत सीतात्यागाच्या बाबतींत रामानें जें वर्तन केलें तें हिंदी आर्यसंस्कृतीच्या अगदीं उलट होतें. तें पुराण मिसरच्या चालीरीतींस अनुसरून आहे असें दिसतें. या अखेरच्या पुराव्यानें पूर्वीचेंच अनुमान राम हा पुराण इजिप्तचा राजा असावा हें सिद्ध होत आहे.

—महाराष्ट्र-शारदा, ऑगस्ट १९३६

# रामायणांतील कांहीं अनार्य चाली

रामाच्या चरित्रांतील वालीवध, रामाचीं दिनचर्या व व्यभिचारासाठीं सीतेचा त्याग, या व यांच्या संबंधीं गोष्टी घेऊन राम हा आर्य संस्कृतीचा नव्हता व तो इजिप्शन संस्कृतीचा होता असें दाखविण्यांत आलें आहे. या काव्यांतील गौण पात्रांचा व गौण गोष्टींचा विचार करून त्यांचे आचार-विचार आर्य संस्कृतीस मिळते नाहींत, व ते इजिप्तच्या पुराण संस्कृतीस मिळते आहेत, असें आणखी दाखवावयाचें आहे.

प्रथमतः ताटकावधाचा प्रसंग घेऊं. ताटका ही आततायिनी होती म्हणून तिचा वध करणें प्राप्त होतें. यांत गैर झालें असें म्हणतां येत नाहीं. ती रामावर शिलांचा वर्षाव करीत होती, रामानें बाण मारून तिचे दोन्ही हात तोडून टाकले. (बालकाण्ड, श्लोक १७) त्यानंतर

ततश्छिन्नभुजां श्रांतां अभ्यासे परिगर्जतीम् ।
सौमित्रिरकरोत्क्रोधात् हृतकर्णाग्रनासिकाम् ॥ १८ ॥

'तेव्हां ती हाततुटकी ताटका थकून जाऊन लक्ष्मणासमीप गर्जना करूं लागली असतां सुमित्रापुत्र लक्ष्मणानें रागारागानें तिचे कान व नाक कापून काढले.' हा लक्ष्मणाचा पराक्रम तिरस्कारार्ह आहे. हाततुटकी व म्हणून असमर्थ झाल्यावर त्या स्त्रीचे नाक व कान कापणें हें कृत्य शूरास शोभत नाहीं. आमच्या आर्यस्मृतीप्रमाणें स्त्रीची अशी विटंबना करणें अगदीं गर्ह्य आहे. लक्ष्मणाची संस्कृति याप्रमाणें आर्यसंस्कृतीहून भिन्न होती हें दिसून येतें. रामानें लक्ष्मणाचा निषेध केला नाहीं यावरून हें कृत्य त्यास पसंत होतें. याप्रमाणें रामहि लक्ष्मणाच्याच अनार्य संस्कृतींत वाढलेला होता. शूर्पणखेचे नाककान कापून लक्ष्मणानें रामाच्या संमतीनें हाच पराक्रम गाजविल्याचें पुढें घडलें आहे. यावरून ही त्यांची युद्धनीतीच असावी.

**घोर तपश्चर्येंत मुलें**

आतां पुढें बालकांडाच्या ५७ वे सर्गांत विश्वामित्राच्या तपाचें वर्णन आहे.

स दक्षिणां दिशं गत्वा महिष्यासह राघव ।
तताप परमं घोरं विश्वामित्रो महातपाः ॥ २ ॥
फलमूलाशनो दान्तः चचार परमं तपः ।
अथास्य जज्ञिरे पुत्राः सत्यधर्मपरायणाः ॥ ३ ॥

**अर्थः**— महातपस्वी विश्वामित्र आपल्या पत्नीसह दक्षिण दिशेस गेला; आणि हे रघुवंशजा रामा, तेथें फारच भयंकर तपश्चर्या करूं लागला. (२). फलमूलें भक्षण करून त्या जितेंद्रिय विश्वामित्रानें उत्कृष्ट तपश्चर्या केली. नंतर सत्य व धर्म याविषयीं तत्पर असे पुत्र झाले. (३).

इंद्रियें दमन करणारा जितेंद्रिय, तपस्वी अनेक पुत्र होईपर्यंत तप करितो हें आमच्या आर्य कल्पनेला अमान्य आहे. आमच्याकडील साध्या अनुष्ठानांतहि व्रतस्थ राहावें लागतें. स्वस्त्रीसंग देखील करावयाचा नाहीं. यज्ञांतहि तसेंच. मग सिद्धि प्राप्त करून घेण्याच्या उद्देशानें केलेल्या तपांत इंद्रियांचें पूर्ण दमन केलेंच पाहिजे. येथें तर चार पुत्र विश्वामित्राला झाले तरी त्याचें तप चालूच आहे. ही कल्पना आर्यांची नसून इजिप्शन आहे. एकूण रामायणांतील विश्वामित्रहि तिकडचाच.

अयोध्याकांड सर्ग ६, श्लोक १ ते ४ यांत राम नारायणाचें ध्यान करूं लागला ( श्लोक १ ). नंतर आज्यस्थालि घेऊन नारायण देवतेला उद्देशून प्रज्वलित अग्नीमध्यें आज्याचा होम केला; ( श्लोक २ ). शेष राहिलेलें आज्य प्राशन करून आपणास प्रिय असलेली गोष्ट सिद्धीस जाण्याविषयीं त्यानें ईश्वराची प्रार्थना केली, आणि नारायण देवतेचें चिंतन करीत करीत तो राम देवगृहांत दर्भास्तरणावर सीतेसह वाङ्नियम व आत्मसंयमन करून पडला. ( श्लो. ३।४ ).

**तूप पिण्याची चाल कुणाची ?**

अग्नींत आहुति देण्याच्या तुपांतील अवशिष्ट तूप पिण्याची रूढी आर्यांत नाहीं. तें सर्व तूप मागाहून होमांत घालावें लागतें. रामायणांत सांगितलेली

चाल परदेशाची आहे. कोणत्याहि यज्ञ वगैरे विशेष कृत्यांत तुपाचें हवन सांगितलें आहे. पण अवशिष्ट तूप यजमानानें प्राशन करणें हा विधि आम्हांस तरी कोठें आढळलेला नाहीं. फक्त वाजपेययज्ञांत यजमानावर हुतशेष आज्यानें विधिपूर्वक अभिषेक करण्यांत येतो असें सांगितलें आहे. विवाहहोम हा बहुतेकांच्या माहितींतील आहे. यांत अवशिष्ट राहिलेलें तूप व लाह्या यांचें अखेर हवन केलें जातें. शेष राहिल्या आज्याचें प्राशन करणें ही चाल आर्यांची नव्हे.

The Sacrifices (in ancient Egypt) were of animals and vegetables, with libations of wine, and burning of incense. (पहा Encyclopoedia Britanica IXth edition Vol. VII page 719)

पुराण इजिप्तांत होम हा पशूच्या मांसाचा आणि वनस्पतीचा करीत. त्याबरोबर मद्यहि थोडें ओतीत व धूप जाळीत. यज्ञांत मद्याचा उपयोग आमच्याकडील सोमरसासारखाच. देवाच्या नांवानें थोडें अग्नींत टाकावयाचें व बाकीचें ऋत्विजांनीं पिऊन टाकावयाचें, असा प्रघात होता.

रामायण ग्रंथ बुद्धोत्तर कालांत तयार झाला. बुद्धाच्या शिकवणीनें यज्ञांतील हिंसा व सोमासारखें उन्मत्त करणारें म्हणजे अंगावर येणारें पेय नाहीसें झालें. मद्यसेवनहि बंद झालें होतें. मग त्याचा नैवेद्य सोडणें व अवशिष्ट पिणें ही चाल इकडे नव्हतीच. यामुळें तिकडील काव्याचें रूपांतर करतांना मद्याच्या बदला तूप हवन केलें गेलें, असें वर्णन करावें लागलें व त्याबरोबर अवशिष्ट तूप पिण्याचा प्रसंग रामावर आला.

अयोध्याकांड सर्ग ३५ श्लो. ९

"यथात्रयो हि राज्यानि प्राप्नुवन्ति नृपक्षये ।
इक्ष्वाकुकुलनाथेऽस्मिंस्तं लोपयितुमिच्छसि" ॥ ९ ॥

"राजाच्या मरणानंतर वयाच्या क्रमाला अनुसरून त्यांच्या पुत्रांना राज्यें प्राप्त होत असतात; परंतु हा इक्ष्वाकुकुलाचा अधिपति दशरथ जिवंत असतांनाच त्या क्रमाचा लोप करण्याची तूं इच्छा करीत आहेस." हें वचन सुमंत्र प्रधान कैकेयीस उद्देशून बोलत आहे. राजपुत्रांनीं आपल्या

वयाच्या क्रमानें राज्यावर बसावें याविषयींचा अयोध्येचा कायदा सुमंत्रासारखा जबाबदार मंत्री पुढें ठेवित आहे, तेव्हां तो त्या कालचा व त्या देशचा संप्रदाय असलाच पाहिजे. वालीसुग्रीव यांचे राज्यांतहि तीच चाल होती.

**राज्याचा वारसा कुणाकडे जावा ?**

त्यांचा बाप मेल्यावर थोरला भाऊ वाली बापाबरोबर युवराज होता तो राजा झाला व त्याचा धाकटा भाऊ सुग्रीव यास युवराजपद मिळालें. वालीला रामानें मारल्यावर युवराज सुग्रीव हा राजा झाला व वालीचा पुत्र अंगद यास युवराजपद मिळालें.

आपल्या वयाच्या क्रमानें राजपुत्रांनीं बापाच्या गादीवर बसावें अशी इक्ष्वाकुवंशाची परंपरा सुमंत्र सांगतो, ती कैकेयीला कबूलच आहे. ( पहा, अयोध्याकांड सर्ग ८ श्लो. १६ ).

भरतश्चापि रामस्य ध्रुवं वर्षशतात्परम् ।
पितृपैतामहं राज्यमवाप्स्यति नरर्षभः ॥

अर्थः—पुरुषश्रेष्ठ भरतालाहि रामानें शंभर वर्षें राज्य केल्यावर पितृपितामहादि परंपरेनें चालत आलेलें राज्य निःसंशय मिळेल.

आर्यांच्या स्मृतिग्रंथाप्रमाणें राजाच्या पश्चात् त्याच्या ज्येष्ठ पुत्राला वारसा येतो. तसा पुत्र असल्यास तो राजा होतो. मयत राजाच्या धाकट्या भावास गादी मिळण्याचा हक्क नाहीं. पण रामाच्या कुलांतील वारसाची चाल अगदीं भिन्न. भावांना वयाच्या क्रमानें राज्यप्राप्ति व्हावयाची. राम वनवास संपवून परत आल्यावर त्याला राज्याभिषेक झाला तेव्हां लगेच भरतास युवराजपद मिळालें. म्हणजे रामाच्या पश्चात् भरत राजा व्हावयाचा हें निश्चित होतें. यावरून राम हा निःसंशय आर्यांहून भिन्न अशा संस्कृतीचा असला पाहिजे.

राजा दशरथ मरण पावला, तेव्हां त्याच्या चार पुत्रांपैकीं कोणीहि जवळ नव्हतें. ( पहा, अयोध्याकांड सर्ग ६६ )

तैलद्रोण्यां तदामात्याः संवेश्य जगतीपतिम् ।
राज्ञः सर्वाण्यथादिष्टाः चक्रुः कर्माण्यनन्तरम् ॥१४॥

न तु संकालनं राज्ञो विना पुत्रेण मंत्रिणः ।
सर्वज्ञाः कर्तुमीषुस्ते ततो रक्षति भूमिपम् ॥१५॥

अर्थः– तदनंतर तेलानें भरलेल्या एका कढईमध्यें अमात्यांनीं त्या भूपतीला निजविलें. आणि वसिष्ठादिकांची आज्ञा झाल्यावर राजाच्या सर्व पुढल्या कर्मांची व्यवस्था ते करूं लागले. (१४). त्या सर्वज्ञ मंत्र्यांनां पुत्रांवांचून राजाचें प्रेत नेणें योग्य न वाटल्यामुळें ते त्या भूपतीला तेलाच्या कढईत ठेवून रक्षण करीत बसले. (१५).

**ममीकरणाचा स्पष्ट पुरावा**

पुत्र जवळ नाहीं म्हणून प्रेतरक्षण करून १२।१३ दिवस ठेवणें हा आर्यांचा संप्रदाय नाहीं. या आर्यावर्तांत हजारो राजे होऊन गेले. सर्वांचेच पुत्र मरणसमयीं जवळ असतात असें नाहीं. पण रामायणाखेरीज इतर कोणत्याहि ग्रंथांत तेलानें भरलेल्या कढईत प्रेत ठेवल्याचें उदाहरण नाहीं. जास्त वेळ प्रेत ठेवावयाचेंच नाहीं ही आमची चाल. मुलगा जवळ असो नसो. राजघराण्यांतील कोणी तरी इसम और्ध्वदेहिक कर्म करणारा नेमलेलाच असतो. पण राम व रामायण हीं दोनीहि अनार्य संस्कृतीचीं व त्यांचे देशांत प्रेताची ममी करण्याचा संप्रदाय होता. राजांच्या ममीकरणाकरितां तेलांत प्रेत ठेवणें हा पहिला पर्याय.

(पहा–'Religious Life in Ancient Egypt' by **W. M. Flinders Petrie**, p. 136.)

The period of dealing with the body is variously recorded, depending on changes of custom and differences of rank. The kings of the earliest dynasties had an interregnum of 45, 60 or 52 days, apparently for the ceremonies. In Genesis the period is put at 40 days embalming and, in all, 70 days' mourning. Later in the tale of Setna, the body is placed in the "Good House" till the 16th day, (apparently salted or spiced) then rapped till the 35th day, (the long process of bandaging) and laid out till the 70th day– that is mourning.

P. 137— In the preparation of the mummy, opening of the body was essential. This was done by a long slit,

usually on the left side, from the hip up to the ribs. The whole of the viscera and lungs were removed for separate embalming and only the heart was left. The interior of the body was coated with resins- and perfumes and then sewn up again, after which it was placed in the brine bath for some weeks. A simpler method was to inject a large quantity of cedar oil before placing in the brine; this allowed of a slow and inoffensive dissolution of the viscera, which were discharged with the oil afterwards; only skin and bone were left. The cheapest method was merely to remove the viscera and soak in brine. The salt bath, if used concentrated, would remove the water from the tissues and as well as prevent decomposition. The muscles were, however, not hardened by the salt, but were partly reduced to pulp. In the XXI dynasty it became usual to replace this by stuffing. The mouth and nose, were packed with a soft soap of butter and soda. The viscera, after soaking in salt, were then made up into parcels with bandages. In early times they were laid on a shelf in the tomb in jars.

In the new kingdom, the object in view was to retain the muscles of the body in a sound condition by saturation, with oils, even though shrunken, and some of the royal mummies are marvellously life-like."

हा उतारा पुष्कळच लांब झाला आहे. पण ममीकरणाच्या कृतीची माहिती वाचकांस व्हावी म्हणून तो दिला आहे. या उताऱ्याचा थोडक्यांत सारांश:–

' प्रेताची व्यवस्था होण्यास मयताच्या दर्जाप्रमाणें दीड दोन महिने लागत. पुढें पुढें तर एकंदर ७० दिवस लागत व तोंपर्यंत दुसरा राजा केला जात नसे.

' प्रेताच्या डाव्या अंगास कुल्यापासून बरगडीपर्यंत एक लांब चीर पाडून त्यांतून आंतडी, काळीज, फुप्फुसें वगैरे काढून तीं स्वतंत्रपणें मसाल्यांत

घालीत. रक्ताशय काढला जात नसे. शरीराच्या आंतल्या भागाला सुगंध-मिश्रित राळेचें लिंपण देत व ती चीर पुन्हां शिवून टाकीत. नंतर तें शरीर मिठाच्या पाण्यांत बुडवून ठेवीत. मिठाच्या पाण्यांत ठेवण्या अगोदर बरेंचसें तेल शरीरांत ओतणें ही सोपी युक्ति होती. या पद्धतींत आंतलीं आंतडीं व इतर अवयव मंद गतीनें पण घाण न सुटतां तेलाबरोबर द्रव होऊन बाहेर येत व कातडीं आणि हाडें तेवढीं शिल्लक रहात असत. कमी खर्चाची पद्धति म्हणजे कोथळ्यांतील आंतडीं वगैरे सर्व इंद्रियें काढून घेऊन मिठाच्या पाण्यांत बुडवून ठेवणें ही होय. पाण्यांत मिठाचें प्रमाण जास्त ठेवल्यास त्वचेंतील ओलावा नाहींसा होऊन कुजण्याची क्रिया बंद होत असे. मिठानें स्नायु घट्ट न होतां त्यांचा चुरा होई. २१ व्या वंशांत शरीरांत मसाला भरण्यास सुरवात झाली. नाक व तोंड हीं लोणी व सोडा यांच्यापासून केलेल्या लबलबीत साबणानें बंद करीत...नवीन राज्यांत स्नायु सुरक्षित राखण्याच्या उद्देशानें प्रेत तेलांत बुडवून ठेवीत...यामुळें शरीर आकसलें जाई. कांहीं राजांच्या ममी आश्चर्य करण्यासारख्या अगदीं ताज्या राहिल्या आहेत.'

महाभारत व पुराणें आणि वेदांतील ब्राह्मणें यांत राजांच्या मरणाच्या पुष्कळ कथा आहेत. पण प्रेत तेलांत ठेवण्याचा प्रकार वाचनांत व ऐकण्यांत दशरथाशिवाय दुसरा कुणाचा नाहीं. यावरून ही पद्धत आमचेकडे नसल्यानें दशरथ व त्याचे पुत्र इजिप्शन संस्कृतीचे होते असें अनुमान होतें.

दशरथाच्या मरणानंतर राज्यावर कोणास बसवावें यासंबंधानें दरबार भरविण्यांत आला. तेथें मोठे विद्वान ब्राह्मण अमात्यांसह जमले. ते वसिष्ठ-मुनीकडे तोंड करून बसले आणि राजकार्यासंबंधानें वेगवेगळीं बोलणीं बोलूं लागले. (अयो. सर्ग ६७ श्लो. ४). ते म्हणाले, "महाराज दशरथ स्वर्गवासी झाला आहे; राम अरण्यांत गेला आहे; तेजस्वी लक्ष्मणहि रामा-बरोबर चालता झाला आहे. ( ६ ). आणि उभयता शत्रुतापन भरत-शत्रुघ्न केकय देशांतील राजधानीमध्यें रमणीय राजवाड्यांत आपल्या आजोळीं आहेत." ( ७ ).

"इक्ष्वाकूणामिहाद्यैव कश्चिद्राजा विधीयताम् ।
अराजकं हि नो राष्ट्रं विनाशं समवाप्नुयात्" ॥ ८ ॥

" इक्ष्वाकु वंशजांपैकीं आजच्या आज कोणी तरी राजा करावा. कारण हें आपलें राष्ट्र असेंच अराजक राहूं दिलें असतां नाश पावेल." अराजक राष्ट्र कसें नाश पावतें याविषयीं विस्तार केल्यावर ते म्हणाले :-

" स नः समीक्ष्य द्विजवर्य वृत्तं नृपं विना राष्ट्रमरण्यभूतम् ।
कुमारमिक्ष्वाकुसुतं तथान्यं त्वमेव राजानमिहाभिषेचय" ॥३८॥

अर्थः- " हे द्विजश्रेष्ठ वसिष्ठमुने, आपण आमच्या म्हणण्याकडे लक्ष द्या; आणि इक्ष्वाकु कुलांतील एखाद्या राजपुत्राला अथवा दुसऱ्या कोणाला आपण आजच्या आज ह्या राज्याचा अभिषेक करा. कारण राजाविना हें राष्ट्र अरण्यवत् झालेलें आहे." (३८).

वसिष्ठाला ही सूचना पसंत पडली नाहीं. दशरथानें भरताला राज्य दिलेलें आहे, तेव्हां त्याला आणा असें ते म्हणाले, व सर्वांना तो विचार पसंत पडला.

पण या प्रसंगावरून एक राजा मेल्यावर राज्यावर कोणीं यावें यासंबंधानें अयोध्येच्या राज्यांतील लोकांचे कायदे काय होते तें दिसतें.

१. एक राजा मेल्यावर त्याच्या घराण्यांतील मंत्री व उपाध्यायवर्ग यांना पसंत पडेल त्या जवळच्या वा दूरच्या राजपुत्राला किंवा दुसऱ्या कोणालाहि राजा केला तरी चाले.

२. आपल्या मागें कोणी राजा व्हावें हें मरणापूर्वी सिंहासनस्थ राजानें ठरविल्यास तो राजा होई. राजाच्या ज्येष्ठ पुत्राला वारस मानला जात नसे.

ज्येष्ठ पुत्रच गादीवर बसावा असा इक्ष्वाकूंचा नियम आहे असा श्लोक भरताच्या तोंडीं घातला आहे. ( पद्य सर्ग ७४ श्लोक २२ ).

" सततं राजपुत्रेषु ज्येष्ठो राजाभिषिच्यते ।
राज्ञामेतत्समं तत्स्यादिक्ष्वाकूणां विशेषतः " ॥

अर्थः- " राजकुमारांमध्यें जो श्रेष्ठ असेल त्यालाच नेहमीं राज्याभिषेक होत असतो; ही गोष्ट सर्व राजांना सारखीच लागूं असून इक्ष्वाकु कुलांतील राजांमध्यें तर विशेषेकरून हा नियमच आहे. "

## आर्यांशीं विसंगत आचार

परंतु हा आचार वसिष्ठांना व इतर दरबाऱ्यांना माहीत नव्हता व तो त्यांना मान्य नव्हता असें वर दाखविलेंच आहे. इतकेंच नव्हे, तर दशरथाच्या शवाचें दहन झाल्यावर सर्व राज्यकार्यधुरंधर पुरुष एकत्र जुळून भरताला राज्य स्वीकारण्याचा आग्रह करूं लागले. ( सर्ग ७९ श्लो. १ ). ते म्हणतातः–

" त्वमद्य भव नो राजा राजपुत्र महायशः ।
संगत्या नापराध्नोति राज्यमेतदनायकम् " ॥ ३ ॥

अर्थ :– " हे महाकीर्तिमान राजपुत्रा, तूं आमचा राजा हो. तूं राजा होणें पित्याच्या आज्ञेशीं जुळत असल्यामुळें तुझ्याकडे कांहीं दोष येणार नाहीं. सांप्रत या राज्याला कोणी नायक नाहीं." (३). यावरून त्या देशचा आचार दिसून येत आहे. व तो आर्यांच्या विचारांशीं व नियमांशीं अगदींच विरुद्ध आहे. यावरून भरताच्या देशांत आर्यस्मृति प्रमाण नसून त्यांच्या स्वतंत्र स्मृति असाव्यात.

## प्रेतसंस्कारांतहि अनार्यत्व

दशरथाच्या प्रेतयात्रेंत –

शिबिकाभिश्च यानैश्च यथार्हं तस्य योषितः ।
नगरान्निर्ययुस्तत्र वृद्धैः परिवृतास्तथा ॥
सर्ग ७७ श्लोक १९

प्रसव्यं चापि तं चक्रुः ऋत्विजोग्निचितं नृपम् ।
स्त्रियश्च शोकसंतप्ताः कौसल्याप्रमुखास्तदा ॥२०॥

ततो रुदन्त्यो विवशा विलाप्य च पुनःपुनः ।
यानेभ्यः सरयूतीरमतेरुर्नृपांगनाः ॥२२॥

कृत्वोदकं ते भरतेन सार्धं नृपांगनामंत्रिपुरोहिताश्च ।
पुरं प्रविश्याश्रुपरीतनेत्रा भूमौ दशाहं व्यनयन्त दुःखम् ॥२३॥

अर्थः– योग्यतेप्रमाणें पालख्यांतून व रथांतून बसून वृद्धांनीं परिवेष्टित असलेल्या त्यांच्या स्त्रिया नगरांतून तेथें निघून गेल्या (१९). अश्वमेधांत

यज्ञ केलेल्या त्या राजाला ऋत्विजांनीं उलट्या प्रदक्षिणा घातल्या व कौसल्याप्रभृति स्त्रिया त्याच्याकरितां शोकाकुल झाल्या (२०). हें भाषांतर शास्त्रीबुवांचें आहे. तें चूक दिसतें. चक्रुः या क्रियापदाला ऋत्विजः व स्त्रियश्च अशीं दोन पदें कर्त्यांच्या स्थानीं आहेत. म्हणजे स्त्रियांनींहि शोकाकुल होऊन त्याला उलट्या प्रदक्षिणा घातल्या असा सरळ अर्थ होतो. बायकांनीं प्रदक्षिणा घातल्या कीं नाहीं, हा मुद्दा गौण आहे. त्या स्मशानांत गेल्या होत्या व 'नंतर शोकाधीन होऊन रडत असलेल्या त्या राजस्त्रिया वारंवार विलाप करून सरयूचे तीरीं आपआपल्या वाहनांतून खालीं उतरल्या. (२२). राजाची उदकक्रिया करून अश्रूंनीं नेत्र भरून आलेले ते मंत्री व पुरोहित आणि राजस्त्रिया भरतासहवर्तमान नगरामध्यें परत आले, आणि दहा दिवसपर्यंत भूमीवर पडून त्यानें त्यांचें अशौच काढिलें. (२३). या शेवटच्या वाक्याचेंहि भाषांतर चुकीचें दिसतें. एकटा भरत भूमीवर निजला नाहीं तर त्याच्याबरोबर मंत्री, पुरोहित व राजस्त्रिया यांनींहि तसेंच केलें असें श्लोकांत आहे.

राजस्त्रिया या स्मशानयात्रेबरोबर होत्या, त्यांनीं प्रेताला इतरांबरोबर उलट्या प्रदक्षिणा घातल्या व शरयू नदींत उतरून त्यांनीं मृताला उदक सोडलें. हा आचार आर्यांमध्यें नाहीं. "भार्या गृहद्वारि" घरच्या दरवाजांतच भार्येनें नवऱ्याच्या प्रेताचा निरोप घ्यावयाचा हा आमचा आचार. कौसल्यादि राजस्त्रियांनीं पाळलेला आचार आर्यांचा नव्हे.

आश्वलायन गृह्यसूत्रांत विधवेनें स्मशानांत जाऊन पतीच्या शवासंनिध निजावयाचें व "उदीर्ष्वनार्य" हा मंत्र म्हणून दिरानें किंवा घरच्या दासानें तिला उठवून परत आणावयाचें हा विधि सांगितला आहे. तसेंहि या ठिकाणीं झालेलें नाहीं. रामायणांत वर्णिलेला प्रकार आश्वलायन गृह्यसूत्राच्या विधीशीं विसंगत आहे. अनार्य आहे.

आणखी याशिवाय अनेक गोष्टी आर्यसंस्कृतीशीं विरुद्ध आढळतील.

—महाराष्ट्र-शारदा, सप्टेंबर १९३६

# रामायणकर्ता वाल्मीकि

ओकांच्या गीर्वाण लघुकोषाच्या ‘विशेष नामकोष’ या भागांत वाल्मीकिविषयीं माहिती थोडक्यांत पुढीलप्रमाणें दिली आहे:—

वाल्मीकि रामायणकर्ता प्रख्यात ऋषि (१) मातापितरांनीं तपार्थ वनांत जातांना यांस सोडून दिलें. (२) किरातांनीं याला उचलून चोरीचा धंदा करण्यास लाविलें. हा धनुर्विद्येंत निपुण होता. (३) एकदां एका महर्षींची गांठ पडून त्यानें स्त्रीपुत्रादिक तुझ्या पापाचा वांटा घेणार नाहींत अशी खात्री पटविल्यावर हा विरक्त झाला व अंगावर वारूळ (वल्मीक) वाढेपर्यंत यानें तप केलें. (४) याचा आश्रम तमसा तीरीं होता. (५) एका क्रौंचाला व्याधानें मारिलें, तेव्हां दयेनें श्लोकरूप वाणी याच्या तोंडांतून निघाली. नंतर ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून यानें रामायणकाव्य रचिलें. (६) रामानें सीतेचा त्याग केल्यावर यानें तिला पाळलें, व तिला कुश, लव हे पुत्र झाल्यावर त्यांचें सर्व शिक्षण यानेंच केलें. (७) नंतर त्यानें त्या तिघांना रामाकडे पोंचविलें.

यांतील (१), (२) व (३) हीं कलमें रामायणाबाहेरील ग्रंथांतील आहेत; रामायणांत या विधानांचा उल्लेख नाहीं. वाल्मीकीसंबंधानें खुद्द रामायणांत सांगितलेल्या वरच्या ४, ५, ६ व ७ या कलमांचा व इतर बाबींचा या लेखांत विचार होईल.

### राम व वाल्मीकि समकालीन नव्हत.

मुद्दा १—वाल्मीकि व राम समकालीन होते काय? ते समकालीन होते असें काव्यांतील विधानावरून दिसतें. बालकांडाच्या पहिल्या सर्गाच्या दुसऱ्या श्लोकांत—

‘कोन्वस्मिन्सांप्रतं लोके गुणवान्कश्च वीर्यवान्?’

इत्यादि प्रश्न वाल्मीकीनें नारदास तीन श्लोकांनीं केला आहे व त्याचें उत्तर ७–१९ या तेरा श्लोकांनीं नारदानें दिलें आहे. प्रश्नांत सांप्रत

असा निर्देश आहे व त्याला अनुसरून उत्तर आहे. यापुढें नारदानें रामचरित्र २८ ते ८९ या श्लोकांनीं वर्णिलें आहे. व त्यांत सर्व क्रियापदांचे प्रयोग भूतकालीं आहेत. यावरून नारदास इतका रामाचा इतिहास माहीत झाल्यावर त्याची व वाल्मीकीची भेट झाली आहे. यापुढील म्हणजे ९० ते ९७ या आठ श्लोकांतील सर्व क्रियापदें भविष्य काळीं आहेत. यावरून राम हयात होता असें दिसतें. यावरून राम व वाल्मीकि समकालीन होते असें म्हणतां येईल. पण रामायण हें काव्य बुद्ध-कालानंतर लिहिलें गेलें असें अंतर्गत पुराव्यावरून दिसतें. याचा विचार पुढें करण्यांत येईल.

मुद्दा २– राम व वाल्मीकि या एकाच आर्यावर्तांतील होते काय? प्रथम वाल्मीकीला रामाची कांहींच माहिती नव्हती. नारदानें थोडक्यांत रामचरित्र त्यास सांगितलें. यावरून ते एकाच देशांतील नसावेत असें अनुमान होतें. एका आर्यावर्तांतील असते तर येवढ्या मोठ्या पराक्रमी राजाची थोडीतरी माहिती वाल्मीकीला झाली असती. ब्रह्मदेवाच्या वरांतहि

‘वृत्तं कथय रामस्य यथाते नारदाच्छ्रुतम्’

असें आहे. म्हणजे नारदकथेचा विस्तारच त्यानें करावयाचा आहे. स्वतःची माहिती त्याला नाहीं.

## तमसा नदीचा घोटाळा

मुद्दा ३–वाल्मीकीचा आश्रम जिच्या कांठीं होता ती तमसा कोठें होती? रामाच्या कथेंत तमसेचा पहिला उल्लेख अयोध्याकांडांत ४५ व्या सर्गांत आढळतो. राम वनवासास जातांना त्याचा पहिला मुक्काम तमसेवर झाला असें पुढच्या सर्गाच्या आरंभींच सांगितलें आहे. रामाकरितां जरी वेगवान घोडे जुंपलेला रथ होता, तरी अयोध्यावासी ब्राह्मणादिकांबरोबर तो चालत गेला असें वर्णन आहे. त्यावरून रथहि माणसाच्या गतीइतका सावकाश चालला होता असें दिसतें. यावरून अयोध्येपासून तमसेचें अंतर फारसें नसावें. तमसा नदी ते रथानेंच उतरून गेले आहेत. नदीचें वर्णन असें आहे.

‘शीघ्रगामाकुलावर्तां तमसामतरन्नदीम्’।

[अयोध्या. स. ४७ श्लो. २८]

" वेगानें वाहणारी व घोटाळा करणाऱ्या भोंवऱ्यांनीं युक्त असलेली तमसा नदी उतरून गेला. " यावरून नदीची खोली फारशी नव्हती. ती उथळ होती असें दिसतें. ही तमसा भागीरथीसच मिळाली होती असें बालकांड सर्ग २ श्लोक ३ वरून दिसतें. तेथें म्हटलें आहे जाह्नव्यास्त्वविदूरतः ॥ तमसा उतरून गेल्यावर सूर्योदय झाला. पुढें कोसल देश ओलांडून राम पुढे गेला. प्रथम वेदश्रुतिनामक नदी उतरून तो दक्षिण दिशेस वळला आणि नंतर गोमतीहि त्यानें ओलांडली. ही नदी सागराला जाऊन मिळाली असें वर्णन आहे. ( सागरंगयाम् ) ही प्रत्यक्ष सागरास मिळाली असा अर्थ घेतां येईल. पण गोमती नदी गंगेला मिळून पर्यायानें सागराला मिळाली असा अर्थ घ्यावा लागेल. यानंतर त्यानें स्यंदिका नदी ओलांडली व पुढें त्यास गंगा नदी श्रृंगवेरपुरावर दिसली. तेथें नावेनें गंगानदी उतरून राम दक्षिणेकडे गेला. भरतहि याच मार्गानें गेला व परत आला आहे. यावेळीं भरतास तमसा लागल्याचा उल्लेख नाहीं. पण ती नदी पायउतार असल्यामुळें महत्त्वाची नाहीं म्हणूनहि उल्लेख करण्याची जरूरी पडली नसेल. एकंदरींत तमसा ही लहानशी नदी सरयू व भागीरथी यांच्या बेळक्यांत भागीरथीच्या उत्तरेकडून येऊन तिला मिळाली होती असें दिसतें.

ही अयोध्येच्या जवळच असली पाहिजे. तसें असेल तर वाल्मीकीचा आश्रम अयोध्येपासून फार दूर नसल्यानें वाल्मीकीचें आगमन अयोध्येंत वारंवार व्हावयास पाहिजे होतें. पण दशरथाच्या कारकीर्दीत किंवा रामराज्याभिषेकाच्या वेळीं इतर ऋषी आले त्यावेळींहि वाल्मीकि आला नाहीं ही गोष्ट संशय उत्पन्न करण्यासारखी आहे.

### भौगोलिक माहितींतील विसंगति

तमसेचा व वाल्मीकि–आश्रमाचा उल्लेख उत्तरकांडांत सर्ग ४६ यांत आहे. हा प्रसंग रामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें सीतेला वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सोडण्याचा आहे. सीतेला रथावर घालून लक्ष्मण निघाला तो राम ज्या वाटेनें वनवासास गेला त्याच वाटेनें गेला असावा. कारण त्यानें एक रात्र गोमती नदीच्या तीरावर एका आश्रमांत काढली आहे.

ततो वासमुपागम्य गोमतीतीर आश्रमे ॥

(उ. कां. स. ४६ श्लो. १९)

रथानें एक दिवसांत ते गोमतीतीराला आले व पुढें अर्धा दिवस रथ चालल्यावर ते गंगेच्या कांठाला पोंचले. तेथें नावेनें गंगा उतरून पलीकडच्या किनाऱ्यावर गेल्यावर तेथें लक्ष्मणानें सीतेला सोडलें व लक्ष्मण परत गेला. सीता तेथेंच रडत बसलेली मुनिकुमारांनीं पाहिली. त्यांनीं वाल्मीकीस कळविल्यावर ते आले व त्यांनीं सीतेला धीर देऊन आपल्या आश्रमांत नेलें. यावरून वाल्मीकीचा आश्रम अयोध्येपासून दीड दिवसाच्या रथाच्या वाटेवर व गंगा नदीच्या पलीकडच्या तीरावर होता असें दिसतें. तमसा तेथेंच असली पाहिजे. याच कांडाच्या ६५ व्या सर्गांत वाल्मीकि आश्रमास शत्रुघ्न एक रात्र वस्तीस राहिल्याचा उल्लेख आहे. (पहा श्लो. ४) शत्रुघ्न जरा सावकाश गेला असावा; कारण त्यानें वाटेंत दोन रात्री काढल्या असें सांगितलें आहे.

द्विराममंतरे शूरः उष्य राघवनंदनः ।

वाल्मीकेराश्रमंपुण्यं अगच्छद्वासमुत्तमम् ॥ २ ॥

या ठिकाणीं गंगा उतरल्याचा उल्लेख नाहीं. पण तो अध्याहृत घ्यावा लागेल.

वनवासास जातांना ज्या तमसेवर राम एक रात्र राहिला; ती तमसा नदी अयोध्येच्या जवळच होती. उत्तरकांडांतील तमसा रथानें दीड दिवसाच्या वाटेवर असून भागीरथीच्या दक्षिण तीरास होती. या दोन तमसा निरनिराळ्या घ्यावयाच्या का एक घ्यावयाची ? पहिली गंगेच्या उत्तर तीरास होती तर दुसरी दक्षिण तीरास. एक अयोध्येजवळ तर दुसरी दीडदोन दिवसाच्या वाटेवर. असा तमसेसंबंधानें व वाल्मीकि—आश्रमा-संबंधानें घोटाळा आहे.

शिवाय राम व वाल्मीकि हे एकदेशी नव्हते हें बालकांडाच्या पहिल्या सर्गावरून स्पष्ट आहे. तमसा दोन ठिकाणीं होती. म्हणजे भागीरथीच्या उत्तरतीरावर असें अयोध्याकांडांत सांगितलें आहे व ती भागीरथीच्या दक्षिणतीरावर होती असें उत्तरकांडांत आहे. यावरून वाचकांचा घोटाळाच

होत असून वाल्मीकि हा रामाच्या राज्याजवळ राहणारा होता ही गोष्ट विश्वसनीय दिसत नाहीं.

## आद्यकवीचा मान कुणाचा ?

मुद्दा ४– वाल्मीकि हा संस्कृत भाषेंतील आद्यकवि समजला जातो हें विश्वसनीय आहे काय !

रामायणाच्या बालकांडाच्या दुसऱ्या सर्गांत क्रौंचवधाची कथा वर्णिली आहे व "मा निषाद प्रतिष्ठां त्वम्" अशी शापवाणी वाल्मीकींच्या तोंडून निघाली आहे.

> " पादबद्धोऽक्षरसमः तंत्रीलयसमन्वितः ।
> शोकार्त्तस्य प्रवृत्तो मे श्लोको भवतुनान्यथा ॥ "
>
> ( बा. कां. २ )

चरणबद्ध अक्षरांनीं सम [ छंदःशास्त्रोक्त अक्षररचना दोषरहित ] आणि वीणा लावून वाद्यांसह गाण्यास योग्य असा जो श्लोक शोकाकुल झालेल्या माझ्या तोंडून [ सहज ] बाहेर पडला तो अकीर्तिरूप न होतां कीर्तिरूप होवो असें ते शिष्याला म्हणाले. स्नान करून आश्रमांत आल्यावर ब्रह्मदेव मुनीच्या भेटीस आले. त्यांना वाल्मीकींनीं तो श्लोक म्हणून दाखविला. ब्रह्मदेव म्हणाले,

> " श्लोक एवास्त्वयं बद्धोनात्रकार्या विचारणा ।
> मच्छंदादेव ते ब्रह्मन् प्रवृत्तेयं सरस्वती ॥ "

'हा तूं ग्रथित केलेला श्लोक यशोरूपच होईल. याविषयीं संशय घेण्याचें प्रयोजन नाहीं. कारण, हे ब्रह्मन्, माझ्या इच्छेनेंच तुझ्या ठिकाणीं ही सरस्वती प्रवृत्त झाली आहे.' नंतर नारदाकडून ऐकलेली रामकथा वर्णन करण्यास वाल्मीकीला ब्रह्मदेवानें सांगितलें. काव्यामध्यें श्लोकबद्ध करण्यास आज्ञा देऊन 'राम, लक्ष्मण, सीता, राक्षस इत्यादींचें प्रसिद्ध अथवा अप्रसिद्ध, इतरांना माहीत नसलेलें, सर्व माहीत होईल. यासंबंधानें तुझी वाणी यत्किंचित्‌हि असत्य होणार नाहीं,' असा वरहि दिला.

पण येथें रामायण हें पहिलें काव्य व वाल्मीकि हा आद्यकवि असें सांगितलेलें नाहीं. संस्कृत वाङ्मयांत मात्र रामायण हें आद्यकाव्य समजलें

जातें. त्यापूर्वीं पद्यमय रचना केवळ वेदांतच होती असें लिहिलेलें आढळतें. पण रामायण हा ग्रंथ बुद्धकालानंतर लिहिलेला आहे. यांत बुद्धास चोर म्हंटलें आहे. दशरथाच्या अश्वमेध यज्ञांत

ब्राह्मणा भुंजते नित्यं नाथवन्तश्च भुंजते ।
तापसा भुंजते चापि श्रवणाश्चैव भुंजते ॥

असा बालकांड सर्ग १४ श्लोक १२ वा आहे. यांत बुद्धभिक्षूहि त्या यज्ञांत पुरुखा झोडीत होते असें आहे. यावरून बुद्धकालानंतरचें रामचरित्र आहे हें उघड आहे. त्यापूर्वीं पुराणें होतीं. याच कांडाच्या ९ व्या सर्गाचा पहिला श्लोक आहे, त्यांत

श्रूयतां तपुरावृत्तं पुराणे च मया श्रुतम् ॥

असें सांगितलें आहे. तसेंच सुंदर कांडांत सर्ग २६ श्लोक १२ पुढील प्रमाणें आहे.

लोकप्रवादः सत्योऽयं पण्डितैः समुदाहृतः ।
अकाले दुर्लभो मृत्युः स्त्रिया वा पुरुषस्य वा ॥

अर्थः- 'स्त्रीला अथवा पुरुषाला वेळ आल्यावांचून मृत्यु दुर्लभ आहे ही जी पंडितांनीं लिहून ठेवलेली म्हण तीं अगदीं खरी आहे,' असें सीता म्हणते. या श्लोकाचा उत्तरार्ध छंदोबद्धच आहे. पण यावर अशी शंका घेण्यांत येईल कीं, म्हणी सर्वच छंदोबद्ध नसतात. ही म्हण गद्यमय असून वाल्मीकीनें ती श्लोकबद्ध केली असेल. ही शंका खरी आहे व म्हणून दुसरा निरुत्तर पुरावा देणें जरूर आहे. याच कांडाच्या ३४ व्या सर्गांतील ६ वा श्लोक पहाः

कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मां ।
एति जीवन्तमानंदो नरं वर्षशतादपि ॥

या श्लोकार्धाला गाथा म्हटलें आहे. याचा अर्थ गाण्यालायक पद्य म्हणजे छंदोबद्ध अशी ही म्हण होती. तिला लौकिकी असेंहि विशेषण दिलें आहे. यावरून सीतेच्या कालापूर्वी लौकिकी गाथा ब्याच होत्या व

राजकन्येच्या शिक्षणांत त्यांचाहि समावेश होत होता असें दिसतें. हा काल वाल्मीकीच्या पूर्वींचाच असला पाहिजे.

## रामायणाविषयीं मोठी भूल

यावरून सध्यांची समजूत रामायण हें पहिलेंच काव्य व वाल्मीकि हा आद्य कवि अशी आहे ती खरी नाहीं. कोणी तरी ती गप्प उठविली व आमचे लोक भोळसटपणानें ती खरी मानीत आले. या प्रसंगानें भोळसटांच्या एका समजुतीचा परामर्ष घेणें योग्य होईल. रामावतारापूर्वींच वाल्मीकींनीं ब्रह्मदेवप्रसादानें रामायण लिहिलें व नंतर त्याप्रमाणें घडून आलें असें कांहीं मानतात. भाऊशास्त्री लेल्यांसारख्यांची ही समजूत होती व भाषांतरांत ही समजूत मधून मधून झळकते. ही समजूत खरी मानावी तर रामायणकार वाल्मीकि व ज्याच्या आश्रमांत सीता प्रसूत झाली तो वाल्मीकि हे भिन्न काळचे असल्यानें भिन्नच मानावे लागतील व मग वाल्मीकीनें रामायण रचून लवकुशांस तें पढविलें या म्हणण्याची संगति राहणार नाहीं. पण बालकांडाच्या चौथ्या सर्गाच्या पहिल्या श्लोकांत वाल्मीकींनीं संपूर्ण उत्तरकांडासह काव्य रचलें व तें लवकुशांना पढविलें ( श्लोक ६ ) असें स्पष्ट वर्णिलें आहे. तेव्हां रामावतारापूर्वीं हें काव्य भविष्य म्हणून केलें हा समज निराधार आहे. वाल्मीकि हा संस्कृत भाषेंतील आद्य कवि नव्हे. रामायणकाराविषयीं ही एक भूल आहे.

ब्रह्मदेवाच्या वरामुळें त्यानें रामायण काव्य लिहिलें असा उल्लेख वाल्मीकीच्या कल्पनेचाच आहे. असले प्रसाद व वर मिळाल्याचे उल्लेख बहुतेक ग्रंथांतून आढळतात. आपल्या ग्रंथाची महति वाढवावी व त्याची चहा व्हावी या उद्देशानें ग्रंथकार म्हणून मोठ्या ऋषीचें नांव व त्याला मिळालेला वर याचें कथन करण्यांत येतें. चिकित्सकानें असल्या गोष्टींवर विश्वास ठेवणें योग्य नाहीं.

मुद्दा ५– वाल्मीकि ऋषि पूर्वीं चोऱ्या, दरवडे वगैरे घालीत होता. त्याला उपरति झाल्यावर त्यानें अंगावर वारूळ ( वल्मीक ) वाढेपर्यंत तप केलें. म्हणून त्यास वाल्मीकि असें नांव पडलें असें सांगण्यांत येतें. यांत तथ्य किती आहे ?

**वल्मीक शब्दावर कोटी ?**

रामायणांत ही कथा सांगितलेली नाहीं. वल्मीक शब्दावरून कोणी तरी ही कोटी केली असावी व एकदां कोणत्या तरी ग्रंथांत ती दडपून दिली म्हणजे आमचे लोक तिला खरी मानण्यास तयार असतात. वारूळ वाढेपर्यंत उघड्यावर स्थिर राहणें शक्य आहे कीं नाहीं हें थोड्या विचारांतीं समजून येईल. अयोध्याकांडाच्या ५६ व्या सर्गांत चित्रकूट पर्वतावर वाल्मीकि ऋषीच्या आश्रमाशेजारीं रामानें आपली पर्णकुटी बांधल्याचा उल्लेख आहे. पहा—

अभिगम्याश्रमं सर्वे वाल्मीकिमभिवादयत् ॥१६॥

या श्लोकाच्या भाषांतरावर भाऊशास्त्री लेल्यांची टीप पुढीलप्रमाणें आहे : "हे वाल्मीकि मुनि रामायण ग्रथित करणाऱ्या प्राचेतस वाल्मीकि मुनीहून भिन्न होते असें टीकाकार म्हणतात व हें त्यांचें म्हणणें कांहीं अंशीं संभवत आहे." रामायणकाराचा आश्रम भागीरथी व तमसा संगमावर होता. हा दुसरा वाल्मीकि चित्रकूट पर्वतावर राहात होता म्हणून हे दोघे समकालीन असले तरी भिन्नच असले पाहिजेत. यानेंहि अंगावर वल्मीक वाढेपर्यंत तप केलें असें म्हणणें नाहीं. प्रत्येकास नांव असतें त्याप्रमाणें यालाहि वाल्मीकि असें नांव मिळालें इतकेंच म्हणतां येईल. रामायण-काराचेंहि नांव असेंच मिळालेलें असावें. मग कोणी तरी वाल्मीकि शब्दावर कोटी करून अंगावर वल्मीक वाढलें म्हणून नांव पडलें असें ठोकून दिलें असावें.

मुद्दा ६—वाल्मीकि हा दशरथाचा मित्र होता असें लक्ष्मण सीतेस सांगत आहे यांत सत्य किती आहे ?

उत्तरकांडांत ४७ वे सर्गाचा १६ वा श्लोक

राज्ञो दशरथस्यैव पितुर्मे मुनिपुंगवः ।
सखा परमको विप्रो वाल्मीकिः सुमहायशाः ॥

असा आहे. तसा तो दशरथाचा मित्र असला तर लक्ष्मणानें वाल्मीकी-कडे नेऊन सीतेला त्यांच्या हवालीं करावयास पाहिजे होती. तसें त्यानें केलें नाहीं. सीतेला गंगेपार पोचवून तो तसाच तांतडीनें नावेनें परत

आलेला आहे. वाल्मीकीनें सीतेला आश्रमांत नेलें तेव्हां 'तूं दशरथाची सून, रामाची आवडती पट्टराणी व जनकराजाची कन्या आहेस, तुझें स्वागत असो' असें म्हटलें. दशरथ माझा मित्र आहे असें तो म्हणत नाहीं. तसा तो मित्र असता तर यावेळीं तसें सांगणें योग्य झालें असतें. पुढें सर्ग ६५ यांत शत्रुघ्न वाल्मीकीच्या आश्रमांत गेल्याची हकीकत आहे. वाल्मीकि हा दशरथाचा मित्र असता तर शत्रुघ्नाच्या भाषणांत किंवा वाल्मीकीच्या भाषणांत यासंबंधीं उल्लेख होणें योग्य होतें. केवळ औपचारिक स्वागत केलें आहे.

स्वमाश्रममिमं सौम्य राघवाणां कुलस्थ वै ।
आसनं पाद्यमर्घ्यं च निर्विशंकः प्रतीच्छ मे ॥

राजांचा व राजपुत्रांचा गौरव असाच करावा लागतो. दशरथाशीं मित्रत्व असतें तर या ठिकाणीं उल्लेख करण्यास पाहिजे होता.

## दशरथाचे व वाल्मीकीचे संबंध

बारा वर्षांनीं अयोध्येस परत जातांना पुन्हां वाल्मीकीच्या आश्रमांत शत्रुघ्नानें एक रात्र वस्ती केल्याची कथा ७१ व्या सर्गांत आहे. तेथेंहि दशरथाच्या मित्रत्वाचा उल्लेख नाहीं.

वाल्मीकीचा आश्रम फार तर दीड दिवसाच्या वाटेवर असल्यानें तो दशरथाचा मित्र असता तर यज्ञाच्या, रामविवाहाच्या व रामास राज्याभिषेक करण्याच्या वेळीं त्यास आमंत्रण गेलें असतें व ते त्या त्या प्रसंगीं आले असते. दशरथानें पुत्रप्राप्तीकरतां अश्वमेघ केला. त्या प्रसंगीं देशोदेशींचे ऋषी व यज्ञकर्मांत पारंगत असे ऋत्विज आणले. शूद्र व श्रमण यांचीहि चंगळ चालली होती. दशरथ राजा सुमंत नामक मंत्र्याला म्हणाला :

सुमंत्रावाह्य क्षिप्रं ऋत्विजो ब्रह्मवादिनः ।
सुयज्ञं वामदेवं च जाबालिमथ काश्यपम् ॥ ५ ॥
पुरोहितं वसिष्ठं च ये चान्ये द्विजसत्तमाः ॥

वाल्मीकि दशरथाचा मित्र असता तर त्याची आठवण दशरथास झाली असती व सुमंत्रानें त्यास आमंत्रण दिलें असतें. पण तसें झालेलें

नाहीं. जनकाकडे जातेवेळींहि त्याची आठवण झाली नाहीं. रामाच्या यौवराज्य-अभिषेकाच्या पूर्वी जी सभा भरविल्याचा उल्लेख अयोध्याकांड सर्ग १ मध्यें आहे त्यावेळींहि वाल्मीकीची कोणास आठवण झाली नाहीं.

### मोठमोठ्या समारंभांस वाल्मीकि गैरहजर

रावणवध करून राम अयोध्येला आला त्यावेळींहि त्याची आठवण कोणीं केली नाहीं व उत्तरकांडाच्या पहिल्या सर्गांत चारहि दिशेस राहणारे ऋषि रामाचें अभिनंदन करण्यास आपण होऊन आले त्यांचीं नांवें दिलीं आहेत, त्यांतहि वाल्मीकीचें नांव नाहीं. यावरून वाल्मीकि हा दशरथाचा मित्र होता ही लक्ष्मणानें निव्वळ थाप मारली असें दिसतें.

मुद्दा ७— हें काव्य कसें प्रगट झालें ?

### कुशीलवौ कीं कुशलवौ ?

बालकांडाच्या तिसऱ्या सर्गांत वाल्मीकीनीं आपल्या महाकाव्यांत कोणते कोणते विषय आणले त्याची जंत्री दिली असून चवथ्या सर्गांत काव्याचा विस्तार २४००० श्लोकांचा केला, असें नमूद केलें आहे. हें पठण करून सभेमध्यें सभ्यांच्या कानावर घालण्यास कोण समर्थ आहे असा विचार करीत असतां दोन कुशीलवांनीं तें काम पत्करलें. 'मुनिवेशौ कुशीलवौ' असें चौथ्या सर्गाच्या ४ थ्या श्लोकांत आहे. शास्त्रीबुवांनीं याचें भाषांतर कुश व लव असें केलें आहे. पण या दोन पदांचा द्वंद्व समास कुशलवौ असा होईल. कुशीलवौ होणार नाहीं. कुशलवौ असें घातल्यास छंदोभंग होतो अशी अडचण येते. कुशीलव या शब्दाचे कोषांत ५ अर्थ दिले आहेत. १ वाल्मीकि, २ नट, ३ भाट, ४ बातमीदार, व ५ याचक. यांतील पोवाडे किंवा काव्य गाणारे भाट असा अर्थ प्रस्तुत ठिकाणीं युक्त होईल. हे ते काव्य ठिकठिकाणीं गाऊं लागले. एकदां ऋषिसमुदायांत काव्यगायन झाल्यावर त्या निष्कांचन ऋषींनीं प्रसन्न होऊन कसें कसें बक्षीस दिलें, याचें सुंदर व मनोवेधक वर्णन २० ते २४ श्लोकांत सुरस केलें आहे.

### काव्यगायनाचें विशेष महत्त्व

कुशीलवांनीं तें अयोध्येंत रस्तोरस्तीं गायिलें व ते रामाच्या नजरेस

पडले. त्यांना घरीं आणवून व आपण सोन्याच्या सिंहासनावर बसून सर्व भाऊ व मित्रमंडळासह ऐकून सर्व संतुष्ट झाले. असें वर्णन चौथ्या सर्गांत असून पांचव्यापासून रामायणकथेस प्रारंभ झाला आहे. म्हणजे पहिले चार सर्ग प्रस्तावादाखल आहेत.

सिंहगडवरच्या तानाजी मालुसऱ्याच्या पराक्रमाचा पोवाडा शाहीर अगीनदासानें गाइला. तें वर्णन या वर्णनांशीं जुळतें आहे. उत्तम गायकांकडून गावविल्याशिवाय काव्याची वाहवा होत नाहीं. कवि आपल्या काव्यविषयासाठीं जी पार्श्वभूमि तयार करितो ती अक्षरशः खरी असतेच असें नाहीं. कोणा तरी राजाच्या राजधानींत हें काव्य प्रथम गाइलें गेलें व मग त्या राजानें आपल्या दरबारांत तें ऐकलें असें झालें असेल. पण वाल्मीकि व राम हे एकदेशी नव्हते, असें पहिल्याच सर्गावरून स्पष्ट होत असल्यानें काव्य ऐकणारा राजा भरताग्रज राम असणें शक्य नाहीं. कोणा तरी दुसऱ्या राजाचे दरबारांत प्रथम काव्यगायन झालें असेल. त्याचे जागीं रामाचें नांव घातलें असेल.

रामकथा गायनाची हकीकत उत्तरकांडांत ९३ व्या सर्गांत पुन्हां दिली आहे. रामानें गोमती तीरावर अश्वमेध केला. त्या वेळीं जमलेल्या जनसंमर्दांत रामायण गाण्यास वाल्मीकीनें आपले दोन शिष्य पाठविले. राजा राम यानें रामायण ऐकावें ही वाल्मीकीची इच्छा होती असें श्लोक ९ वरून दिसतें.

यदि शब्दा पयेद्रामः श्रवणाय महीपतिः ।
ऋषीणां उपविष्टानां यथायोगं प्रवर्तताम् ॥

असें तो सांगतो. त्याप्रमाणें रामापुढें तें गाइलें गेलें.

बालकांडाच्या तिसऱ्या चौथ्या सर्गांत हें काव्य अयोध्येंत व राजवाड्यांत गाइलें असें आहे व उत्तरकांडांत तें गोमती तीरीं यज्ञमंडपांत गाइलें गेलें असें वर्णन आहे. याप्रमाणें जागेसंबंधानें महत्त्वाचा फरक पडत आहे. यामुळें रामापुढें खरोखर गाइलें कीं नाहीं हाच संशय आहे. रामायणकाव्य बुद्धधर्माच्या ऱ्हासकालीं रचिलें गेलें असल्यानें तें रामकालीं गाणेंच शक्य नाहीं. या दृष्टीनें या कथेकडे पाहिल्यास सीतेच्या दोन पुत्रांनीं हें काव्य

गाइलें हें विधान विश्वासार्ह ठरत नाहीं. यावरून ज्या आश्रमांत सीता प्रसूत झाली तो आश्रम रामायणकार वाल्मीकीचा नसून दुसऱ्या कोणा वाल्मीकीचा असेल.

## मिसरमधील काव्याशीं विलक्षण साम्य

**मल्लादि व्यंकटरत्नम्** याच्या मतें वाल्मीकि हें नांवहि मिसरचेंच. बाल हें तेथील प्रमुख देवतेचें नांव. मिष्की हें विशेषण महा या अर्थी. महाबाल अशा अर्थाच्या नांवाचा कवि होता. त्यानें आपल्या भाषेंत आपल्या पराक्रमी राजाचें चरित्र काव्यांत गाइलें. त्या काव्याची प्रत हिंदुस्थानांतील कवीस मिळाल्यावर त्या आधारानें कोणी कवीनें मूळ मिसरी कवीच्याच नांवानें संस्कृत भाषेंत रूपांतर केलें असावें. ही कथा आर्यावर्तांत घडली असें दाखविण्यासाठीं इकडील नद्यांचीं, पर्वतांचीं, देशांचीं व भारत वगैरे पूर्वीच्या ग्रंथांत आलेलीं पुष्कळशा ऋषींचीं नांवें दडपून दिलीं आहेत. हिंदी वाल्मीकीस हिंदुस्थानच्या भूगोलीय स्थिती-चीहि चांगलीशी माहिती नसल्यानें सर्व घोटाळा उडाला आहे असें थोडेसें लक्ष देऊन चिकित्सक बुद्धीनें वाचणारास समजून येईल.

रामायणांत आर्य संस्कृतीशीं विसंगत अशा कांहीं चाली व असे विचार आले आहेत ते मूळ काव्यांतील असावेत असें अनुमान होतें.

— महाराष्ट्र-शारदा, एप्रिल १९३७

# रामाच्या एकपत्नित्वाचें थोतांड

रावणवध करून सीतेला घेऊन पुष्पक विमानानें राम अयोध्येकडे निघाला. बरोबर बिभीषण व सुग्रीव सपरिवार घेतले. अयोध्येजवळील नन्दिग्रामापासून मोठी मिरवणूक निघून रामानें अयोध्याप्रवेश केला व पुढें दुसरे दिवशीं रामाला वसिष्ठानें अभिषेक केला. "जो किरीट मस्तकीं असतांना पूर्वी मनूला अभिषेक झाला होता तो दैदीप्यमान तेजानें युक्त असलेला, ब्रह्मदेवानें पूर्वी निर्माण केलेला व रत्नांनीं शृंगारलेला किरीट वसिष्ठांनीं हातामध्यें घेतला. त्या मनूच्या वंशामध्यें क्रमाक्रमानें जे राजे होऊन गेले त्यांनाहि तोच किरीट असतांना अभिषेक झाला होता."

## आर्यांच्या पद्धतींत अभिषेक आहे. किरीट नाहीं

इजिप्तच्या पहिल्या वंशाचा राजा मेना यानें उत्तर व दक्षिण इजिप्तचीं राज्यें केलीं. म्हणून तो दोन्ही राज्याचे मुकुट घाली व पुढें त्यानें दोनींचा एकच मुकुट केला. रामेसिस हा १९ व्या वंशांतील पराक्रमी राजा होता. तोहि संयुक्त इजिप्तचा राजा असल्यानें मेनाचा संयुक्त मुकुट धारण करी.

यानंतरच्या दरबारांत सर्वांना त्यांच्या त्यांच्या कामगिरीबद्दल बक्षिसें देण्यांत आलीं व बिभीषण आणि सुग्रीव आपआपल्या परिवारासह आपल्या राज्यावर परत गेले. नंतर परमोदार रामानें मोठ्या आनंदानें सर्व राज्य चालविलें. भरताला युवराज नेमले. "राजकुमार रामानें पौंडरीक अश्वमेध आणि विशेषतः वाजिमेध वारंवार करून इतरहि नाना प्रकारचे यज्ञ केले. (वाजिमेध म्हणजेच अश्वमेध. पण येथें निराळें कथन आहे.) (यु. कां. सर्ग १२८ श्लो. ९४) रघुवंशज रामानें दहा हजार वर्षें राज्य करून उत्कृष्ट अश्व आणि विपुल दक्षिणा यांनीं युक्त असे दहा अश्वमेध केले. (९५). त्यानें नानाप्रकारचे यज्ञ केले असें पुन्हां ९७ वे श्लोकांत सांगितलें आहे. ९८ वे श्लोकापासून १०४ पर्यंत रामराज्यांतील सुख वर्णिलें आहे.

### भाविकांचें भाबडें वर्णन

"राम राज्य करीत असतां स्त्रियांना अकालीं वैधव्य येत नसे; सर्पजन्य व व्याधिजन्य भय नव्हतें; कोणी चोर नव्हता, कोणावरहि अनर्थ गुदरला नाहीं, व बालमृत्यू नव्हते. सर्व वृद्ध होऊन मरत. सर्व आनंदयुक्त, धर्मनिष्ठ व रामाकडे लक्ष देऊन परस्परांच्या हिंसेपासून पराङ्मुख होते. राम राज्य करीत असतांना प्रजाजन रोग व शोक यांनीं रहित आणि हजारों पुत्रांनीं युक्त असून हजारों वर्षें वांचत असत. पर्जन्य योग्य वेळीं पडून धान्य व फळें भरपूर असत. राम राज्य करीत असतांना प्रजाजन स्वकर्मांवर संतुष्ट असत; सर्व धर्मनिष्ठ होते, सद्‌गुणी होते." इत्यादि रामराज्याचें वर्णन आपण वाचतों व भाविक लोक मान डोलवितात. पुष्कळसे यज्ञ केले व ऋत्विजांना भरभक्कम दक्षिणा दिल्या, यामुळें तो वर्ग संतुष्ट झाला असेल. पण इतरांसाठीं रामानें काय केलें हें या ठिकाणीं सांगितलेलें नाहीं. उत्तरकांडांत शंबूकाची कथा आली आहे. त्यावरून सर्व वर्णांनीं आपआपलीं कामें करावीं, पण उच्चवर्णीयाचें कर्म इतरानें करणें योग्य नाहीं, या भिक्षुकी दंडकाचें पालन तो करीत होता म्हणून तो वर्ग रामाचे गोडवे गात होता असें म्हणावें लागतें.

ही स्तुति वाल्मीकीची नाहीं, मागाहून कोणी तरी घुसडली आहे असा पुरावा याच सर्गाच्या १०५ व्या श्लोकांतच आहे :

आदिकाव्यमिदं आर्षं पुरा वाल्मीकिना कृतम् ।
श्रृणोति यं इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥११०॥

पुढच्याच श्लोकांत

श्रृण्वंति ये इदं काव्यं पुरा वाल्मीकिना कृतम् ॥

असें आहे. वाल्मीकि मुनीनें पूर्वीं केलेलें हें काव्य असें तीन वेळ सांगितलें आहे. यावरून हे श्लोक तरी वाल्मीकीचे नाहींत हें स्पष्ट आहे. जसे हे श्लोक घुसडले गेले तसेच इतर घुसडले असतील. हा पुराव्याचा अर्थ रामजन्मापूर्वीं असा कांहीं भाविक करतात व वाल्मीकीनें पुढें होणारें अगोदर अंतर्ज्ञानानें जाणून लिहिलें असेंहि ठासून सांगतात.

पण बालकांडाच्या पहिल्याच सर्गावरून हा भाविकपणा निराधार आहे असें होतें. नारदानें रामाची कथा सांगण्यापूर्वी वाल्मीकीस त्याच्याविषयीं कांहींच माहीत नव्हतें. स्तुतिपाठकांच्या असल्या श्लोकांवरून रामराज्याची कल्पना करणें चुकीचें होईल.

राम कसा वागत होता; राज्यकारभाराकडे त्याचें कितीसें लक्ष होतें, त्याची राहणी कशी होती, या गोष्टींवर प्रकाश पडेल तर रामराज्याची कांहीं तरी कल्पना येईल. उत्तरकांडांत याविषयीं थोडेसें वर्णन आहे, त्याचा विचार करूं.

## सुधारणा नको असणारा राम

अगस्ति ऋषीकडून रावणपराक्रमाचा, पूर्वीचा वगैरे इतिहास ऐकल्यानंतर सुग्रीव–बिभीषण–हनुमानादि मित्रांचा रामानें निरोप घेतला व ते आपआपल्या घरीं गेले. राज्याभिषेकापासून एक महिन्याचा सबंध काळ पाहुण्यांच्या सरबराईत गेला. नंतर पुष्पक विमानास रजा दिली. व तें कुबेराकडे पाठविलें. तें बिभीषणास दिलें नाहीं हें लक्ष्यांत घेण्यासारखें आहे. विमानविद्या त्यावेळीं अवगत होती असें त्यावरून म्हणावयाचें असल्यास ती फक्त राक्षस व यक्ष यांच्यांत होती. रामाच्या राज्यांत विमान बांधणारे व चालविणारे कोणी नव्हते. व या विमानकलेची महति रामाजवळ मुळींच नव्हती, असें दिसतें. कलाकौशल्यास आश्रय व नवीन नवीन शोधांस उत्तेजन देण्याची आवश्यकता रामास भासली नाहीं. तशी भासली असती तर त्यानें पुष्पक विमानासारखीं आणखी विमानें बांधलीं असतीं. 'सुधारणा नको. आहे तें कायम राखावयाचें,' हें भिक्षुकी तत्त्व मान्य करणारा राम होता असें यावरून अनुमान होतें.

तें पवित्र पुष्पक विमान गुप्त झालें असतां भरत हात जोडून रघुनंदन रामास म्हणाला : ( उत्तरकांड सर्ग ४१ श्लोक १७ )

"हे वीरा, तूं राज्य करूं लागल्यापासून अमानुष प्राणीहि वारंवार वाचायुक्त असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें." (श्लोक १८)

या वेळीं रामराज्याभिषेक झाल्यापासून एक महिना गेला होता व राम पाहुण्यांच्या गडबडींत होता. म्हणजे त्याच्या राज्यकारभाराचें कार्य

म्हणून पशुपक्ष्यांना मनुष्यवाणी मिळाली असें नसून, केवळ राम राज्यावर आला त्याचाच हा प्रभाव आहे असें या कवीला भासवावयाचें आहे. रामायणांत असल्या भाकड कथांची रेलचेल आहे व त्या कथा सत्य आहेत असा अंधविश्वास ठेवणारे विद्वान म्हणविणारेहि या देशांत पुष्कळ आहेत. कै. भाऊशास्त्री लेले हे यांपैकीं एक होते. त्यांनीं या श्लोकाच्या भाषांतरावर एक टीप दिली आहे. " एकाद्या विशिष्ट राजाच्या पुण्यप्रभावामुळें अमानुष प्राण्यांना मनुष्यवाचा पुरातनकालींहि प्राप्त होती असें ह्यावरून दिसतें. " रामायण हें खरोखर एक काल्पनिक काव्य, त्यांत खऱ्या इतिहासाचा अंश फार थोडा, हें आमच्या लोकांच्या मनावर ठसल्याशिवाय आमच्यांतील भोळेपणा कमी होणार नाहीं. व यासाठींच रामायणादि ग्रंथांची छाननी करणें हें सत्यशोधकाचें काम आहे. भोळेपणाच्या धुंदींत आमच्या राष्ट्राची चिकित्सक बुद्धि मूर्च्छित झाली आहे. भोळेपणाचें विष उतरल्याशिवाय आम्ही शुद्धीवर येणार नाहीं.

उ. कां. स. ३९ श्लोक २९

एवं तेषां ययौ मासो द्वितीयः शिशिरः सुखम् ।
वानराणां प्रहृष्टानां राक्षसानां च सर्वशः ॥

याचें भाषांतर भाऊशास्त्री करतात– " ह्याप्रमाणें आनंदित झालेल्या त्या सर्व वानरांचा व राक्षसांचा थंडीचा दुसराहि महिना सुखाचा गेला." या भाषांतरांतील 'हि' या शब्दावरून हे पाहुणे दोन महिने राहिले होते असें भाऊशास्त्र्यांचें मत दिसतें. पण २७ वे श्लोकांत

मासः साग्रो ययौ तदा

संपूर्ण महिना लोटून गेला असें आहे. ४१ वे सर्गाच्या १९ व्या श्लोकांत भरत म्हणतो,

'अनामयश्च मर्त्यानां साग्रो मासो गतो ह्ययं' ॥

" हा पूर्ण महिना लोटून गेला तरी मर्त्यजनांना आरोग्य असून " इ.

रामाचा अभिषेक झाल्यापासून एक महिना गेला असें यावरून दिसतें. भरताचा हा 'रपोट' पुष्पक विमानाची रवानगी झाल्याबरोबर दिला गेला आहे. पहा–

एवमंतर्हिते तस्मिन्पुष्पके सुकृतात्मनि ।
भरतः प्रांजलिर्वाक्यमुवाच रघुनंदनम् ॥१७॥

त्याच दिवशीं सकाळीं सुग्रीवबिभीषणाची पाठवणी झाली. म्हणून ही पाहुणेमंडळी एकच महिना होती, असें होतें. यावरून शास्त्रीबुवांच्या 'हि' शब्दाला आधार नाहीं; व भाषांतरहि थोडें सुधारावें लागेल. शिशिरऋतूचा दुसरा महिना सुखावह गेला. यावरून त्याचा असा सरळ अर्थ केल्यास ऋतूच्या पहिल्या महिन्याच्या शेवटीं रामाला राज्याभिषेक झाला असें होतें.

भरतानें रामाच्या कारकीर्दीच्या पहिल्या महिन्याचें वर्णन मोठें भपकेदार केलें आहे. तो म्हणतोः

## अवास्तव स्तुतिपाठ

" हा पूर्ण महिना लोटून गेला तरी मर्त्य जनांना आरोग्य असून, हे राघवा, जीर्ण झालेल्या प्राण्यांनाहि मृत्यु येत नाहीं (१९). हे राजा, स्त्रियांना निरोगी मुलें होत आहेत, अमृततुल्य उदक पाडणारा पर्जन्य वेळेवर वृष्टि करीत आहे (२१). आणि त्याचप्रमाणें हे राजा, नगरांतील व देशांतील लोक ' अशा प्रकारचा राजा आम्हांला नेहमीं असो ' असें नगरांत बोलत आहेत. " (२२). याप्रमाणें भरतानें उच्चारलेले अत्यंत मधुर शब्द ऐकून नृपश्रेष्ठ राम आनंदित झाला. (२३).

भरताच्या म्हणण्याप्रमाणें एक महिन्याच्या मुदतींत राजाची कर्तबगारी कितीशी लोकांच्या लक्षांत येणार ? कितीशा स्त्रियांना निरोगी मुलें होणार? शिशिरऋतूचे ते दिवस होते. त्यांत अमृततुल्य उदक पाडणारा पर्जन्य वेळेवर किती वृष्टि करणार व नगरांतील लोक तरी काय म्हणून रामाची तारीफ करणार ? पण भरत रामास ही अविश्वास ठेवण्यासारखी गोष्ट सांगतो व राम ती खरी मानतो हें मोठें आश्चर्य आहे. भरतासारखे भरमसाट स्तुतिपाठक होते व ही स्तुति खरी नाहीं असें थोड्याशा विचाराअंतीं समजेल, असें असतांहि रामासारख्या सुज्ञ व पराक्रमी राजाला उघड उघड खोटी स्तुति मानवते. हा रामाचा पहिला महिना पाहुण्यांच्या गडबडींत गेल्या कारणानें त्याला राज्यकारभाराकडे लक्ष्य देण्यास न फावणें साहजिक आहे. पण त्यानंतर तरी त्याची दिनचर्या कशी होती तें पाहूं.

सर्ग ४२ श्लोक २७ यांत

पूर्वाह्णे धर्मकार्याणि कृत्वा धर्मेण धर्मवित् ।

शेषं दिवसभागार्धं अन्तःपुरगतोऽभवत् ॥

धर्मवेत्ता राम पूर्वाह्णसमयीं धर्मकार्यें यथाविधि उरकल्यानंतर दिवसाच्या अवशिष्ट राहिलेल्या अर्ध्या भागामध्यें अंतःपुरांत जात असे. सीतेचीहि दिनचर्या पुढच्याच श्लोकांत दिली आहे.

सीतापि देवकार्याणि कृत्वा पौर्वाण्हिकानि वै ॥

श्वश्रूणामकरोत्पूजां सर्वासामविशेषितः ।

अभ्यगच्छत्ततो रामं विचित्रा भरणांबरा ॥

सीताहि सकाळचीं देवकार्यें आटपून सर्व सासवांची एकसारखी पूजा केल्यानंतर विचित्र भूषणें व रत्नें धारण करून रामाकडे जात असे. येथें ३५० सासवांची ती पूजा करी कां मुख्य तिघींचीच करी हें मोघम आहे.

**अंतःपुरांतील रामाचा कार्यक्रम**

अंतःपुरांत गेल्यावर रामाचा व्यवसाय याच सर्गाच्या पहिल्या २६ श्लोकांत वर्णिला आहे. पुष्पक विमानास परत पाठविल्यावर राम अशोक वनांत शिरला. ( सर्ग ४२ श्लोक १ ). हें वन इंद्राच्या नंदनवनासारखें किंवा कुबेराच्या चैत्ररथासारखें रामाचें वन होतें. (१५). तेथें राम उत्तम आसनावर बसला आणि

सीतामादाय हस्तेन मधुमैरेयकं शुचि ।

पाययामास काकुत्स्थः शचीमिव पुरंदरः ॥८॥

शचीचा हात धरणाऱ्या इंद्राप्रमाणें सीतेचा हात धरून त्या ककुत्स्थ-कुलोत्पन्न रामानें मैरेय संज्ञक शुद्ध मद्य तिला पाजलें. (१८). यावरून इंद्रलोकांत व अयोध्येंत नवराबायकोंचा दारू पिण्याचा समारंभ चालत असे असें दिसतें.

मांसानि च सुमृष्टानि फलानि विविधानि च ।

रामस्याभ्यवहारार्थं किंकराः तूर्णमाहरन् ॥१९॥

उत्कृष्ट रीतीनें तयार केलेलीं मांसें आणि नाना प्रकारचीं फळें रामाच्या आहाराकरितां सेवक सत्वर घेऊन आले. (१९). राम स्वतः मांस खाणारा व मद्य पिणारा होता. यासाठीं त्याच्या भक्तांनीं त्यास मद्य-मांसाचा नैवेद्य दाखविणें व स्वतः सेवन करणें उचित होय. वैष्णवांनीं या दोन्ही पदार्थांची बंदी केली तें बुद्धाच्या शिकवणीमुळें. पण हें रामाच्या मूळच्या संप्रदायाला विरुद्ध आहे. यापुढें रामाच्या विलासाचें मजेदार वर्णन आहे.

उपानृत्यं च राजानं नृत्यगीतविशारदाः ।
अप्सरोरगसंघाश्च किन्नरी–परिवारिताः ॥ २० ॥
दक्षिणा रूपवत्यश्च स्त्रियः पानवशं गताः ।
उपानृत्यंत काकुत्स्थं नृत्यगीतविशारदाः ॥ २१ ॥
मनोभिरामा रामस्ताः रामो रमयतां वरः ।
रमयामास धर्मात्मा नित्यं परमभूषितः ॥ २२ ॥

अर्थः– नृत्य व गायन यांत निपुण असलेल्या अप्सरा, उरग व किन्नरी यांचे समुदाय रामासमीप येऊन नृत्य करूं लागले (२०). मद्यपानानें मस्त झालेल्या, परंतु नृत्यगायनांत निपुण असलेल्या कुशल व रूपवती स्त्रियाहि त्या काकुत्स्थ रामासमीप नृत्य करूं लागल्या (२१). आणि क्रीडा करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला तो धर्मात्मा रामहि उत्कृष्ट रीतीनें भूषित झालेल्या त्या मनोहर स्त्रियांना नेहमीं आनंद देऊं लागला (२२). भिन्न भिन्न देशाच्या सुंदरसुंदर गाननर्तनकुशल स्त्रियांचे घोळक्यांत राम असे. स्वतः उंची मद्य पीत असे, सीतेलाहि पाजी आणि या सुंदर तरुणीहि मद्यप्राशनानें उल्लू होत. या ठिकाणीं रामाला ' रमयतां वरः ' म्हणजे क्रीडा करणारांमध्यें श्रेष्ठ असें विशेषण योजिलें आहे. उत्तम नटलेल्या त्या रामांना राम रमवीत असे असें वर्णन केलें आहे. शास्त्रीबुवा सभ्यपणानें ' आनंद देऊं लागला ' असें भाषांतर करतात. २४ व्या श्लोकांत सीतेसंबंधानेंहि " रमयामास " याच क्रियापदाचा प्रयोग आहे. ३२ व्या श्लोकांत वर्णिलेल्या स्त्रिया रामाच्या विवाहित होत्या का सीतेच्या

सखीवर्गांतील म्हणजे दासीवर्गांतील होत्या हें स्पष्ट नाहीं. कसेंहि असलें तरी राम एकपत्नीव्रत कडकडीतपणें पाळत होता असें वाल्मीकि सांगत नाहीं.

हृष्टाः खलु भविष्यंति रामस्य परमाः स्त्रियः ॥

हा अयोध्या कांडांतील ८ व्या सर्गांतील १२ वा श्लोक येथें आठवतो. तेथें रामाच्या श्रेष्ठ स्त्रिया असें म्हटलें आहे. यावरून बापाप्रमाणेंच रामाला बहुत विवाहित स्त्रिया होत्या असें दिसतें. यावरून उत्तरकांडांत रामाच्या विलासगृहांतील स्त्रिया त्याच्या धर्मपत्न्या असाव्यात असें अनुमान निघेल. रामाला एकच पत्नी होती असा ज्यांचा आग्रह असेल त्यांना राम विवाह-बाह्य संबंध ठेवीत असे असें कबूल करणें भाग आहे. एकंदरींत **रामावर एकपत्नीव्रत लादणें हा एक त्याच्या भक्तांचा जुलूम आहे.**

बरें हा क्रम एखाद्या दिवशींचा नव्हता तर हा दररोजचा होता. पहाः

स तया सीतयासार्धमासीनो विरराज ह ।
अरुंधत्या इवासीनो वसिष्ठ इव तेजसा ॥ २३ ॥

एवं रामो मुदायुक्तः सीतां सुरसुतोपमाम् ।
रमयामास वैदेहीमहन्यहनि देववत् ॥ २४ ॥

तथा तयोर्विहरतोः सीताराघवयोश्चिरम् ।
अन्यक्रामच्छुभः कालः शैशिरो भोगदः सदा ॥ २५ ॥
प्राप्तयोर्विविधान्भोगान् अतीतः शिशिरागमः ॥ २६ ॥

अर्थः—त्या सीतेसहवर्तमान बसलेला तो राम तेजानें अरुंधतीसहवर्तमान बसलेल्या वसिष्ठाप्रमाणें दिसूं लागला ( २३ ). अशा रीतीनें आनंदयुक्त झालेला राम देवकन्यातुल्य असलेल्या त्या सीतेला देवाप्रमाणें प्रत्यहीं रमवूं लागला. ( २४ ). याप्रमाणें ते सीताराम पुष्कळ वेळपर्यंत क्रीडा करीत असतांना सर्वदा भोग देणारा शुभ शीतकाल निघून गेला ( २५ ). ते उभयता नानाप्रकारचे भोग भोगीत असतांना हिंवाळा निघून गेला ( २६ ). म्हणजे शिशिरऋतु संपला.

### खुषमस्कऱ्यांचा गराडा

हा रामाचा विलास बरीच रात्र होईपर्यंत चालत असला पाहिजे. यावरून दिवसाच्या पहिल्या भागांत धर्मकृत्यांत वेळ घालविल्यावर अपराण्हकाळीं तो अंतःपुरांत जाई व ख्यालीखुशालींत, मांस खाणें, दारू पिणें, पाजणें, नृत्यगायन वगैरेंत आपला काळ घालवी. राज्यकारभाराकडे लक्ष देण्यास त्यास वेळ मिळत असे, असें रामायणावरून दिसत नाहीं. तें काम युवराज भरत याजकडे सोपविलें होतें. व "सब अच्छा है, आपली स्तुति सर्व प्रजाजन करतात" असा रिपोर्ट त्याचेकडून वारंवार आल्यामें राम समाधानांत असावा.

याप्रमाणें बराच काल चैनींत घालविल्यावर

अपत्यलाभो वैदेहि त्वय्ययं समुपस्थितः ॥

असें त्याला दिसलें. तुझे डोहाळे काय आहेत असें त्यानें विचारिलें. यावर सीता हास्य करून रामास म्हणाली, "हे राघवा, पवित्र तपोवनें अवलोकन करण्याची आणि फळें व मुळें भक्षण करून गंगातीरीं वास्तव्य करीत असलेल्या महातेजस्वी ऋषींच्या चरणासमीप तपोवनामध्यें एक रात्र तरी वास्तव्य करावें ही माझी उत्कट इच्छा आहे." (३२, ३३, ३४). राम म्हणाला, "ठीक आहे. हे वैदेहि, स्वस्थ रहा; तूं उद्यां निःसंशय जाशील." नंतर तो मित्रांच्याबरोबर मधल्या चौकांत गेला.

राजे लोकांच्या भोंवतीं यज्ञयाग करणारे भिक्षुक व गाणेबजावणें, नाच वगैरे करणाऱ्या विलासवती स्त्रिया, आणि खुषमस्करे यांचा गराडा असतो असें आपण आजहि पाहतों. राम हा या नियमास अपवाद नव्हता. त्याचा पूर्वाण्हाचा सगळा वेळ धर्मकृत्यें करविण्यांत भिक्षुक व उपाध्याय वर्ग घेत असे. अपराण्हाचा सगळा वेळ अंतःपुरांत विलासवतींच्या घोळक्यांत आनंदांत जात असे. रामाभोंवतीं खुषमस्करेहि कमी नव्हते. दहांचीं नांवें वाल्मीकीनें ४३ वे सर्गांत दुसरे श्लोकांत दिलीं आहेत.

अंतःपुरांत बायकांच्या गराड्यांतून निघून मधल्या चौकांत आल्यावर—

तत्रोपविष्टं राजानं उपासंते विचक्षणाः ।
कथानां बहुरूपाणां हास्यकाराः समंततः ॥१॥

दुसऱ्या श्लोकांत १० चीं नांवें दिल्यावर

एते कथां बहुविधाः परिहाससमन्विताः ।
कथयंति स्म संहृष्टाः राघवस्य महात्मनः ॥३॥

अर्थः—समयसूचक असे खुषमस्करे लोक नानाप्रकारच्या गोष्टी राजा बसला असतांना सांगून त्याची सर्व प्रकारें सेवा करीत असत (१). हे खुषमस्करे लोक आनंदानें महात्म्या रामाला नाना प्रकारच्या गोष्टी सांगत असत (३). मुळांत या लोकांना हास्यकार असें म्हटलें आहे. त्यांचा धंदा राजाला हंसविणें, करमणूक करणें. खऱ्याखोट्याचा विचार त्यांनीं केलाच पाहिजे असें नाहीं. एकदां कांहीं गोष्ट निघाली असतां राम म्हणाला, "हे भद्रा, नगरामध्यें व देशामध्यें काय चाललें आहे? माझ्यासंबंधानें लोक काय बोलत आहेत? त्याचप्रमाणें सीता, भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न, माता कैकेयी यांच्यासंबंधानेंहि लोक काय बोलत असतात?" राजे वनामध्यें असोत अथवा राज्यावर असोत; लोक त्यांना कांहीं ना कांहीं तरी नांवें ठेवीतच असतात. ४।५।६ त भद्रानें रामाला पसंत पडेल असेंच स्तुतिपूर्ण सांगितलें. रामानें आग्रह केला "जें काय असेल तें सर्व तूं कांहीं एक शिल्लक न ठेवतां इत्थंभूत कथन कर. माझ्यासंबंधानें बरेंवाईट काय बोलतात तें ऐकल्यावर लोकदृष्टीनें शुभ असलेलीं कृत्यें मी करीन व अशुभ असलेलीं करणार नाहीं. तूं कांहीं भीति मनांत न बाळगतां कुटाळ लोक देशामध्यें माझ्यासंबंधानें काय बोलतात तें मला निर्भयपणें व निःशंकपणें कथन कर." (श्लो. ९।१०।११). भद्रानें उत्तर दिलें, "समुद्रामध्यें सेतुबंधन हें दुष्कर कृत्य रामानें केलें; हें कृत्य देवदानवांच्या हातून झालेलें वृद्धांच्यासुद्धां ऐकण्यांत नाहीं. अजिंक्य रावणाचा सैन्य व वाहनें यांसह वध करून व राक्षसांबरोबर वानर व ऋक्ष ताब्यांत आणले. संग्रामामध्यें रावणाचा वध करून सीता घेऊन, क्रोध मागें सारून त्यानें तिला पुन्हां घरीं आणलें. परंतु सीतेच्या संभोगापासून त्या रामाच्या मनाला काय बरें सुख वाटत असेल? जिला पूर्वी रावणानें बलात्कारानें अंकावर घेऊन हरण करून नेलें (१७). इतकेंच नव्हे, परंतु पूर्वी लंकेंत नेल्यानंतर अशोक वनामध्यें नेऊन ठेविलें असतां जी राक्षसांच्या आधीन

झालेली होती, तिला राम दूषण कसें देत नाहीं ! ( १८ ). आतां स्त्रियांसंबंधानें असला प्रकार आम्हांलाहि सहन होऊं लागेल. कारण, जसें राजा करूं लागतो तसें लोकहि त्याला अनुसरून वागूं लागतात ( १९ ). अशीं नानाप्रकारचीं भाषणें, हे राजा, नागरिक जन सर्व नगरामध्यें व देशामध्यें तुझ्यासंबंधानें करीत असतात. " ( २० ). हें ऐकून राम फार कष्टी झाला व आपल्या सुहृदांना म्हणाला, " हें काय आहे हें आपण मला सांगा. " ते म्हणाले, " भद्र सांगत आहे याप्रमाणें हें निःसंशय खरें आहे. "

## कीर्तीची हाव सुटली

मित्र निघून गेल्यावर रामानें आपले तीन भाऊ बोलावून आणले ( सर्ग ४४ ). ते येऊन रामाच्या चरणीं मस्तक ठेवून तिघेहि स्वस्थ उभे राहिल्यावर राम अश्रू ढाळूं लागला ( १८ ). नंतर बाहूंनीं त्यांना आलिंगून त्यांना आसनावर बसण्यास रामानें सांगितलें व तो म्हणाला, " तुम्ही माझें सर्वस्व व जीवित आहां; आणि हे राजपुत्रहो, तुम्हींच संपादन केलेलें राज्य मी प्रतिपालन करीत आहें ( २० ). तुमची बुद्धि परिपक्व झाली असून शास्त्रतात्पर्यहि तुम्हीं जाणलें आहे, व त्याप्रमाणें तुम्ही वागतहि आहां. यास्तव, हे राजपुत्रहो, तुम्ही सर्व मिळून मी काय म्हणत आहे याचा विचार करा. " ( २१ ).

पुढें सर्ग ४५ मध्यें राम आपला हुकूम लक्ष्मणास सांगतो. " सीतेविषयीं माझ्यासंबंधानें लोक काय बोलत आहेत हें तुम्ही ऐका (२). नगरांतील व देशांतील लोकांचा फारच मोठा अपवाद आहे. ते माझी निंदा करीत आहेत व ती निंदा माझ्या मर्मांचा भेद करीत आहे (३). हे सौम्य ( लक्ष्मण ), निर्जन अरण्यामध्यें रावणानें सीता कशी हरण करून नेली व त्याचा वध मीं कसा केला हें तूं जाणतच आहेस (५). त्या ठिकाणीं राहिलेली सीता अयोध्येला मला कशी नेतां येईल ही शंका मला तेथेंच आली होती. तेव्हां खात्रीकरितां सीता अग्नीमध्यें प्रविष्ट झाली (६). हे लक्ष्मणा, देवांच्या सन्निध हव्य नेणाऱ्या अग्नीनें व आकाशामध्यें संचार करणाऱ्या वायूनें मैथिली निष्पाप असल्याचें तुझ्या समक्षच सांगितलें

आहे (७). आणि सर्व ऋषि व देव यांचे संनिध सूर्यचंद्रांनींहि पूर्वी जनककन्या निष्पाप असल्याचें कथन केलें आहे (८). याप्रमाणें देव आणि गंधर्व यांचे संनिध आचरणानें शुद्ध झालेली सीता लंकाद्वीपामध्यें महेंद्रानें माझ्या हातीं दिली (९). आणि यशस्विनी सीता शुद्ध असल्याची माझ्या मनामध्यें खात्री आहे. तेव्हां सीतेला घेऊन मी अयोध्येस आलों." (१०).

लोकांत चाललेली निंदा रामाला असह्य झाली व कीर्ति मिळविण्याची हाव सुटली.

" अकीर्तिर्निंद्यते देवैः कीर्तिर्लोकेषु पूज्यते ।
कीर्त्यर्थं तु समारंभः सर्वेषां सुमहात्मनाम् " ॥१३॥

" देवहि अपकीर्तीची निंदा करीत असतात; कीर्तीची लोकांमध्यें प्रशंसा होत असते, आणि सर्वहि महात्मे कीर्ति संपादन करण्याकरितांच खटपट करीत असतात (१३). हे पुरुषश्रेष्ठहो, लोकापवादरूप भयाला भिऊन मी जीविताचा अथवा तुमचाहि त्याग करीन; मग जनककन्येची गोष्ट पाहिजे कशाला ! (१४). तस्मात् सांप्रत शोकसागरांत पडलेल्या मला तुम्ही अवलोकन करा. यापेक्षां अधिक दुःखदायक अशी कोणतीहि गोष्ट प्राप्त झाल्याचें दिसत नाहीं (१५). तस्मात् हे लक्ष्मणा, उद्यां सकाळीं सुमंत्र सारथि ज्याच्यावर आहे अशा रथावर आरूढ होऊन तूं सीतेला वर घे आणि या देशाच्या हद्दीपलीकडे सोडून दे (१६). गंगा सोडून गेल्यावर तमसा नदीचे तीरीं महात्म्या वाल्मीकि मुनींचा दिव्य आश्रम आहे (१७). तस्मात् हे रघुनंदना लक्ष्मणा, तेथें निर्जन प्रदेशामध्यें हिला सोडून देऊन तूं सत्वर परत ये. हें माझें म्हणणें अमलांत आण (१८). सीतेसंबंधानें याचे उलट तूं मला कांहींहि सांगूं नकोस. तस्मात् हे लक्ष्मणा, याविषयीं कांहीं एक विचार न करितां तूं चालता हो (१९). तूं याला आड येशील तर मला अतिशय दुःख होईल. यास्तव मी आपल्या पायांची व जीविताची तुम्हांला शपथ घातली आहे (२०). माझ्या भाषणाविरुद्ध जे कोणी माझी समजूत करण्याकरितां कसल्याहि प्रकारचें भाषण करतील त्यांच्या योगानें इष्ट असलेल्या गोष्टीचा विघात होत असल्यामुळें ते माझे सर्वदा शत्रू समजले जातील (२१). तुम्ही जर

माझ्या आज्ञेप्रमाणें वागत असाल तर मला मान द्या; सीतेला येथून घेऊन जा. हें माझें म्हणणें कर (२२). "गंगातीरीं असलेले आश्रम अवलोकन करण्याची माझी इच्छा आहे" असें तिनें मला पूर्वींच सांगितलें आहे. यास्तव ही तिची इच्छा परिपूर्ण होऊं दे" (२३). याप्रमाणें त्यांना सांगितल्यानंतर ककुत्स्थकुलोत्पन्न रामाचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि भ्रात्यांनीं परिवेष्टित असलेला तो धर्मात्मा गृहामध्यें प्रविष्ट झाला (२४).

## न्यायदानाची अजब पद्धत

पुढील ४६ वे सर्गांत लक्ष्मणानें सीतेला वनांत नेऊन सोडल्याची कथा आहे. सीतेचा त्याग रामानें केला अशी जी ही हकीकत आहे तिच्याविषयीं जरा जास्त विचार करणें योग्य आहे.

बायकांच्या गराड्यांतून बाहेर आल्यावर रामाचा वेळ खुषमस्कऱ्यांच्या संगतींत मजेनें जात असे. या लोकांना हास्यकार म्हटलें आहे. राजाला हंसविणें हा यांचा धंदा. यासाठींच यांची नेमणूक केलेली व हें काम जो जास्त करील त्याला जास्त बक्षीस. आजहि हे लोक आजच्या राजांभोंवतीं आहेतच. राजाची मर्जी राखून त्याला काय आवडेल व कसें बोललें असतां त्याची तब्येत खूष होईल हें यांना चांगलें अवगत असल्यानें त्यांच्यावर गैरमर्जी होण्याचे प्रसंग फार क्वचित्. त्याप्रमाणें रामाच्या आग्रहावरून भद्रानें त्याच्या सेतूचें व पराक्रमाचें वर्णन करून सीतेसंबंधीं लोकांचें बोलणें सांगितलें. रामाला दुःख झालें व "हें काय आहे हें आपण मला सांगा" असें तो आपल्या सुहृदांना म्हणाला. "भद्र सांगत आहे याप्रमाणें हें निःसंशय खरें आहे" असें त्यांनीं उत्तर दिलें.

रामानें आपल्या तीन भावांस तावडतोब बोलावून आणलें व त्यांची तारीफ करून "तुम्ही सर्व मिळून मी काय म्हणत आहे याचा विचार करा" असें राम त्यांस म्हणाला. पुढील सर्गांत राम त्यांस सर्व हकीकत सांगतो व सीतेला राज्याबाहेर वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सोडून देण्याचा हुकूम एकदम लक्ष्मणास देतो. भावांना विचार करण्यास वेळ देत नाहीं. भावांचें म्हणणें ऐकूनहि घेत नाहीं. आपल्या हुकमाच्या विरुद्ध बोलण्याची

बंदी करतो. आपल्या पायाची व गळ्याची शपथ घालतो. कोणी विरुद्ध बोलल्यास त्याला शत्रू समजलें जाईल अशी धमकीहि देतो. हा एक रामराज्याचा अजब नमुना आहे. कोणाकडून तरी बातमी ऐकावयाची, तसल्याच गप्पीदासाकडून तिची सत्यता पटवून घ्यावयाची. आरोपीस तर मुळींच विचारावयाचें नाहीं. त्याचा बचाव काय आहे याकडे पहावयाचें नाहीं. आरोपीच्यातर्फे कोणी बोलणार असेल त्याचें तोंड बंद करावयाचें. मुळींच कांहीं ऐकणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून फक्त शिक्षा अमलांत आणण्याचें काम त्यांना सांगावयाचें ही रामराज्याची न्यायदानपद्धति आहे ! लक्ष्मण व भरत यांची रामावरची बंधुप्रीति अवर्णनीय. पण राम त्यांना कसें वागवितो पहा. त्यांचा विचार मुळींच घेत नाहीं. त्यांना इतर शिपायांपेक्षांहि वाईट रीतीनें वागवितो. त्यांचें म्हणणेंहि त्याला ऐकण्यास नको. एकंदरींत 'मी करीन तो कायदा' हें रामराज्याचें मुख्य तत्त्व दिसतें. पुढें शंबूकाच्या कथेंतहि हेंच आहे.

रामानें सर्व भावांस बोलावून आणून "तुम्ही माझे सर्वस्व व जीवित आहां. तुम्हींच संपादिलेलें राज्य मी प्रतिपालन करीत आहे. तुमची बुद्धि परिपक्व झाली असून शास्त्रतात्पर्यहि तुम्हीं जाणलें आहे व त्याप्रमाणें तुम्ही वागतहि आहां. तुम्ही सर्व मिळून मी काय म्हणत आहे याचा विचार करा." असें म्हटल्यावर त्यांचा विचार ऐकावयाचाहि नाहीं हें वाल्मीकीचें वर्णन मोठें चमत्कारिक व रामास महत्त्व न आणतां लघुत्व आणणारेंच आहे.

लोकापवादाला आपण भितों, तो खरा असो खोटा असो, तो टाळण्याचीच पर्वा आपण करतो, दुसऱ्या कशाचीहि कदर आपण बाळगीत नाहीं, असें राम म्हणतो. (पहा उत्तरकांड सर्ग ४५ श्लोक १४)

"अप्यहं जीवितं जह्यां युष्मान्वा पुरुषर्षभाः ।
अपवादभयाद्भीतः किं पुनर्जनकात्मजाम्" ॥

"लोकापवादरूप भयाला भिऊन मी जीविताचा अथवा तुमचाहि त्याग करीन; मग जनककन्येची गोष्ट पाहिजे कशाला ?" यावरून रामाच्या

दृष्टीनें सीतेची किंमत भावांपेक्षां पुष्कळच कमी होती. जनकात्मजेची काय बिशाद; तुम्हांला देखील मी सोडीन, पण लोकापवाद मला सहन होणार नाहीं असें हा धीरपुरुष म्हणतो. रामाच्या दृष्टीनें स्त्रीची–विशेषतः जी अगदीं शुद्ध आहे अशी रामाची खात्री आहे अशा सीतेची–कांहीं किंमत नव्हती. हें रामायणांतलें वचन भवभूतीला पसंत पडलें नाहीं व त्यानें उत्तररामचरितम् नाटकांत

स्नेहं दयां च सौख्यं च यदि वा जानकीमपि ।
आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा ॥

हा श्लोक रामाच्या तोंडीं घातला आहे. त्यांत स्नेह, दया आणि सुख यापेक्षांहि जानकीची योग्यता जास्त आहे. स्नेह याचा संबंध भावांशीं किंवा मातेशीं लावला पाहिजे. यांचेपेक्षांहि सीता जास्त मानितों असें अपि पदानें भवभूति दाखवित आहे. पण उत्तरकांड लिहिणाऱ्या वाल्मीकीच्या दृष्टीनें भावापुढें सीतेची काय पर्वा !

## स्मृतीविरुद्ध आचरण

रामाला सत्याची बिलकुल पर्वा नव्हती. केवळ लोकांना खुष करण्याची इच्छा. सीता शुद्ध आहे ही मनाची खात्री. पण लोक तिला अपवित्र समजतात तर तिचा त्याग केलाच पाहिजे असें ठरवून, दुसऱ्या कोणाला बोलण्याची संधि न देतां, सीतेला तो आपल्या राज्याच्या बाहेर ती गर्भिणी असतांहि तिच्या संरक्षणाची किंवा योगक्षेमाची पर्वा न करितां घालवून देत आहे. स्वतःची स्त्री व्यभिचारिणी ठरली तरी तिच्या जन्मभर तिला केवळ अन्नवस्त्र तरी दिलेंच पाहिजे असा स्मृतींचा नियम राम धुडकावून लावीत आहे ( पहा मनु अ. ११ ).

विप्रदुष्टां स्त्रियं भर्ता निरुंध्यादेकवेश्मनि ।
यत्पुंसः परदारेषु तच्चैनां चारयेद्व्रतम् ॥ १७७ ॥
साचेत्पुनः प्रदुष्येत्तु सदृशेनोपयंत्रिता ।
कृच्छ्रं चांद्रायणं चैव तदस्याः पावनं स्मृतम् ॥ १७८ ॥

अर्थः– व्यभिचारिणी स्त्रीला एका घरांत प्रतिबंधांत ठेऊन परकीय

स्त्रीशीं गमन करणाऱ्या पुरुषाला जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें तिच्याकडून आचरवावें (१७७). ती आपल्या जातीच्या पुरुषाबरोबर पुन्हां व्यभिचार करील तर तिच्या शुद्धीसाठीं तिच्याकडून चांद्रायण व्रत करवावें (१७८).

सीता शुद्ध आहे अशी रामाची खात्री होती. यासाठीं तिला शिक्षा करणेंच गैर. लोकांच्या समजुतीप्रमाणें ती दोषी होती असें मानलें, तरी स्मृतीच्या शासनाप्रमाणें तिचा अशा गर्भावस्थेंत त्याग करणें असें अधर्म्य कृत्य रामासारख्यानें कां करावें कळत नाहीं. आमचे स्मृतिकार या व्यभिचारदोषाच्या बाबतींत बरेच उदार आहेत. याज्ञवल्क्य स्मृतीचें वचन या बाबतींत लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ( अध्याय १, श्लोक ७०।७१। ७२ पहा ).

हृताधिकारां मलिनां पिंडमात्रोपजीविनीम् ।
परिभूतामधःशय्यां वासयेद्व्यभिचारिणीम् ॥ ७० ॥

व्यभिचारिणी स्त्रीचे घरांतील सर्व अधिकार काढून घेऊन, मलीन, फाटकीं वस्त्रें देऊन, जीव जगण्याइतकें अन्न देऊन तिला आदर न दाखवितां जमिनीवर निजावयास लावावें (७०). पण ही शिक्षा कायमची नव्हती. स्त्री एकदां भ्रष्ट झाली कीं ती जन्मभर भ्रष्ट झाली असें पूर्वीचे ऋषि मानीत नसत. स्त्री ही स्वभावतः पवित्रच आहे असें त्यांचें मत होतें. पहा पुढचाच श्लोकः—

सोमः शौचं ददावासां गंधर्वाश्च शुभां गिरम् ।
पावकः सर्वमेध्यत्वं मेध्या वै योषितो ह्यतः ॥ ७१ ॥

चंद्रानें स्त्रियांना शौच, गंधर्वांनें मधुर वाणी आणि अग्नीनें सर्व प्रकारची पवित्रता दिली आहे. म्हणून स्त्रिया पवित्र आहेत (७१). यामुळें ७० वे श्लोकांत दिलेल्या शिक्षेचा अवधि ७२ वे श्लोकार्धात सांगितला आहे. पहाः

व्यभिचारादृतौ शुद्धिर्गर्भे त्यागो विधीयते ॥

अर्थः—व्यभिचारिणी स्त्री ऋतुकालानंतर व परपुरुषापासून गर्भवती झालेली स्त्री संतान उत्पन्न झाल्यावर शुद्ध होते (७२). सीता रावणापासून

गर्भार राहिली असती तरी तिला प्रसूतीपर्यंत दूर ठेवणें धर्मशास्त्राप्रमाणें योग्य झालें असतें. पण रामायणांत सांगितल्याप्रमाणें निष्ठुरपणें त्याग करणें आर्यसंस्कृतीच्या विरुद्ध आहे. यावरून राम हा आर्यावर्तांतील राजा नसावा असा संशय येतो. येथील असता तर त्यानें स्मृतीला प्रमाण मानून सीतेसंबंधानें अन्याय केलाच नसता. तो इजिप्तचा राजा होता असें मल्लादि व्यंकटरत्नम् म्हणतात तें खरें असावें असें या सीतात्यागावरून दिसूं लागतें.

Social Life in Ancient Egypt by **W. M. Flinders Petrie** p. 93:—for adultery the punishment was a thousand lashes to the man and loss of nose to the woman.

व्यभिचारी पुरुषास एक हजार फटके व व्यभिचारिणीस नाक कापणें ही शिक्षा पुराण इजिप्त देशांत असे. तेथील वहिवाटीप्रमाणें सीतेला हद्दपारीची सौम्य शिक्षा दिली असावी असें अनुमान होतें.

सीतात्यागाचे कामीं रामानें जें मनोदौर्बल्य दाखविलें आहे त्याचाहि विचार करणें जरूर आहे. राजा ही मोठी विभूति आहे. सर्व देवमय तो आहे. त्याचें मुख्य काम न्याय देणें हें आहे. **राजा कालस्य कारणम्** असें महाभारत सांगतें. पण रामायणांत राजा अगदीं दुर्बल दाखविला आहे. सीता निर्दोष आहे ही त्याची खात्री आहे. लक्ष्मणहि तसेंच जाणतो. पण राम आपल्या भावाचा सल्ला घेत नाहीं. तो घेण्याचा कांहीं उपयोग नाहीं असा त्याचा भाव दिसतो. तीन भावांनींहि त्यास कांहीं हरकत घेतली नाहीं. यावरून राम व त्याचे तीन भाऊ कोणत्या तरी श्रेष्ठ शक्तीनें मूढ झाले असावे. आमच्या आर्यांच्या स्मृतिशास्त्रांप्रमाणें राजा असहाय नाहीं. त्याचेकडे सर्व न्याय देण्याचे अधिकार असतात. धर्मशास्त्राप्रमाणें त्यानें न्याय दिला पाहिजे हें खरें, पण न्याय अन्याय पहाण्याची जबाबदारी त्याचेवर आहे. या चालू सीतात्याग प्रकरणीं राम फक्त लोकापवादाला भीत आहे. न्याय अन्याय तो पहात नाहीं. सीता निरपराध ही खात्री असतांहि केवळ लोकानुरंजनाकरितां तो पाप करीत आहे. यावरून राम हा आर्यवंशीय व मन्वादिधर्मशास्त्र आचरणारा दिसत नाहीं. या कामीं आपणांस

इजिप्तच्या प्राचीन चालीरीतींपासून कांहीं मदत होते काय हें पाहणें योग्य होईल:—

Social Life in Ancient Egypt by **W. M. Flinders Petrie**, page 37. " The powers of the king were strictly limited. He could not do any public business, condemn or punish any man to gratify his own humour or revenge, or for any other unjust cause; but was found to do according as the laws had ordered in every particular case......In the VIth dynasty a queen was tried by a judge, who wrote the report with another judge, the king taking no part, and not appearing to act in the case. He may probably have given judgment finally, in this case as in other serious cases, but the examination and condemnation of criminals was entirely a matter of legal procedure."

The theory of a divine kingship was thus greatly limited.

इजिप्तच्या राजाचे अधिकार पूर्णपणें मर्यादित होते. कोणताहि जानपद व्यवहार करणें, आपल्या लहरीखातर किंवा सूड उगविण्यासाठीं किंवा अन्यायानें कोणा इसमाला शिक्षा करणें त्याला शक्य नव्हतें. प्रत्येक कामीं कायदा काय आहे हें पाहून त्याप्रमाणें हुकूम देणें त्याला भाग होतें...... सहाव्या वंशांतील एका राणीची चौकशी एका न्यायाधिशापुढें झाली होती व त्याचा निकाल त्यानें दुसऱ्या एका न्यायाधिशाच्या मदतीनें लिहिला. या चौकशींत राजानें कोणताहि भाग घेतला नाहीं व या कामीं कांहींच केलें नाहीं. इतर कोणत्याहि महत्त्वाच्या खटल्याप्रमाणें या कामींहि अखेरचा हुकूम त्यालाच द्यावा लागला असेल. पण आरोपीची चौकशी करणें व निकाल देणें हीं कामें कायद्यांत सांगितल्या पद्धतीनेंच झालीं पाहिजेत.

स्मृतींत आज्ञा दिली असेल त्याप्रमाणें प्रजेला न्याय देणें हें आर्य राजाचें काम. ही जबाबदारी त्यावर. कायद्यांत सांगितल्याप्रमाणें न्यायाधिशांनीं निकाल द्यावा. अन्याय झाला तरी राजानें तिकडे पहावयाचें नाहीं अशी पद्धति

इजिप्शन राजांची. सीतेला राज्यांतून हाकून देण्याचे कामीं रामानें आर्य-राजासारखें वर्तन केलें नाहीं. इजिप्शन राजाच्या पद्धतीनें वर्तन केलें आहे. यावरूनहि राम इजिप्तचा राजा असावा असें दिसतें.

रामराज्याविषयीं लोकांच्या समजुतीला रामायणाचा फारसा आधार नाहीं असें दिसून येईल.

उत्तरकांडाच्या ५३ वे सर्गांत प्रजेचीं गाऱ्हाणीं राजानें ऐकलीं पाहिजेत अशाविषयीं ४, ५, ६ श्लोक आहेत. यांत राम म्हणतो, " हे विनय-संपन्न लक्ष्मणा, नागरिकजनांचीं कार्यें मी करीत नसल्याला आज चार दिवस झाले. परंतु त्याची माझ्या मनाला फार रुखरुख लागून राहिली आहे ( ४ ). हे पुरुषश्रेष्ठा, अमात्य, पुरोहित व मंत्री यांना निमंत्रण करा आणि कामकाज असलेल्या पुरुषांना व स्त्रियांना बोलवा ( ५ ). जो राजा प्रजेचें काम प्रत्यहीं पहात नाहीं तो वायुसंचाररहित घोर नरकामध्यें पडतो यांत संशय नाहीं ( ६ ). सातव्या श्लोकापासून नृग राजाची कथा राम हा लक्ष्मणास सांगत आहे. यावरून ही कथा घालतांना कवीनें कथेची प्रस्तावना म्हणून रामाच्या तोंडीं हे श्लोक घातले असावे. वास्तविक पाहतां राज्यकारभाराचें सर्व काम युवराज भरत याजकडे सोपविलें होतें व रामाकडे धर्मकृत्यें राहिलीं होतीं. असा हा श्रमविभाग उभयतां-मध्यें झालेला असावा.

नृगराजाची व तदनुषंगानें इतर कथा सांगण्यांत ६ सर्ग खर्च पडले आहेत व या कथेचा उपसंहार ५९ वे सर्गांत केला आहे. "हें सर्व मीं तुला कथन केलें. आतां नृगराजाप्रमाणें आपणाला दोष लागूं नये एतदर्थ सर्व कार्यार्थी जनांची आपण भेट घेऊं." हें राम बोलत असतांच उजाडलें ( श्लोक २३ ).

## सेवकांचा तुटवडा कां ?

लक्ष्मण हा दिवस मध्यावर आल्यावेळीं अयोध्येंत पोंचला व तो तावडतोब रामाकडे गेला असें ५२ व्या सर्गाच्या आरंभास सांगितलें आहे. लक्ष्मणाचें समाधान केल्यावर रामानें नृगराजाची व इतर कथा सांगितल्या व कथा संपल्याबरोबर उजाडलें. एकंदरींत ही रामलक्ष्मणाची बैठक सहा प्रहर चालली होती. रात्रीं निद्रा कोणीच घेतली नाहीं.

धर्मकृत्यें करून राम कचेरींत लोकांच्या तक्रारी ऐकण्यास बसला व लक्ष्मणास म्हणाला, "हे महापराक्रमी, हे सुमित्रेचा आनंद वाढवणाऱ्या लक्ष्मणा, तूं बाहेर जा आणि कार्यार्थी लोकांशीं बोलण्याचा उपक्रम कर." लक्ष्मण दरवाजावर गेला. अर्जदारांस पुकारलें. पण "आज माझें काम आहे" म्हणून कोणीहि तेथें लक्ष्मणाला कळविलें नाहीं. येथें अशी शंका येते, कीं अर्जदाराला पुकारण्यास रामाजवळ कोणीच नव्हतें म्हणून त्यानें आपल्या सावत्र भावाला तें काम सांगावें! रामराज्यांत सर्व गोष्टींची विपुलता असून सेवकांचाच तुडवडा पडावा हें आश्चर्य आहे. सीतेला पोचविण्यास लक्ष्मण गेला. सारथी सुमंत्र हा मंत्री. महाराणी सीतेला वाटेंत एक रात्र काढावयाची होती. तिच्याबरोबर एखादी दासीहि नाहीं. बरें, घोड्यांची नोकरी करावयास व त्यांस चंदीवैरण देण्यास एखादा मोतद्दारहि बरोबर नाहीं. तें काम प्रधान मंडळांतील एकानें तरी करावें किंवा राजपुत्र लक्ष्मणानें करावें. येथेंहि रामाच्या राजवाड्यांत अर्जदारांस बोलावण्याचें काम लक्ष्मणास करावें लागत आहे. ही हकीकत प्रक्षिप्त सर्ग ११तील आहे.

अर्जदार नसण्याचें कारण दिलें आहे तें असें, "राम राज्य करीत असतांना मानसिक व शारीरिक दुःखांचा अभाव असून पृथ्वी सर्व औषधींनीं संपन्न व पक्व धान्यांनीं युक्त होती (८). बाल, तरुण अथवा मध्यम वयांतील असा कोणीहि मरत नव्हता. सर्व कांहीं कारभार धर्मानें चालला होता; आणि कसल्याच प्रकारचा उपद्रव नव्हता. यामुळें रामाचे कारकीर्दींत कोणी अर्जदारच दृष्टोत्पत्तीस येत नसे."

### कुत्र्याचें प्रदीर्घ प्रवचन

लक्ष्मणानें हात जोडून रामाला तसें सांगितलें. राम प्रसन्न झाला आणि त्याला म्हणाला, "तूं पुनरपि जा आणि अर्जदारांची चौकशी कर." पुन्हां पाठवून लक्ष्मणावर बेभरंवसा करण्याचें कांहीं कारण नव्हतें. शिवाय राम म्हणतो, "उत्तम प्रकारें राजनीति चालविल्यामुळें कोठेंहि अधर्म होत नाहीं; आणि राजभीतीमुळें सर्व परस्परांचें रक्षण करीत आहेत (१२). तूंहि लक्षपूर्वक प्रजेचें रक्षण कर." मग लक्ष्मण गेला व त्यास एक कुत्रा आढळला. रामाचा हुकूम झाल्यावर कुत्रा राजसभेंत आला.

या प्रसंगीं कुऱ्यानें राजधर्मावर एक प्रवचन झोडलें आहे. हा पुढील सर्ग प्रक्षिप्त म्हणून प्रसिद्ध आहे व त्यावर तिलक नामक टीकाहि नाहीं. असे हे तीन सर्ग आहेत. रामाच्या राज्यव्यवस्थेविषयीं विचार करतांना यांना नजरेआड करणें बरें झालें नसतें.

६१ वे सर्गाचे प्रारंभास वसंतऋतूंतील रात्र प्राप्त झाली असें सांगितलें आहे. म्हणजे राम व लक्ष्मणाचा संवाद दुपारपासून संध्याकाळपर्यंत चालला होता व तेंच संभवनीय आहे. पण ५९ सर्गाचे शेवटीं उजाडलें असें आहे. हा मोठा विसंवाद आहे.

६१ वे सर्गांत ऋषींनीं लवणासुराच्या जुलमाविरुद्ध तक्रार केली आहे. त्याच्या पारिपत्याचें काम शत्रुघ्नाकडे देण्यांत आलें.

७३ वे सर्गांत शंबूकाची कथा आली आहे.

देशांतील एक वृद्ध द्विज आपला मेलेला मुलगा घेऊन राजाच्या द्वाराशीं आला. त्यानें बहुत शोक केला. "कधीं अनृत भाषण केल्याचें, कधीं हिंसा केल्याचें अथवा कोणत्याहि प्राण्याला मीं कधीं दुःख दिल्याचें स्मरत नाहीं. तेव्हां कोणाच्या बरें पातकामुळें हा माझा पुत्र अगदीं बाल असतांच पितृकार्य केल्याशिवाय आज यमसदनीं गेला आहे !" पुढें तो म्हणतो, "ज्या अर्थीं रामाच्या देशांत राहणाऱ्या बालकांना मृत्यु येत आहे त्याअर्थीं रामाच्याच हातून कांहीं तरी मोठें पातक घडलें आहे यांत संशय नाहीं (१०). कारण इतर राजांच्या देशांत राहणाऱ्या बालकांना मृत्यूचें भय नाहीं. तस्मात् हे राजा, मृत्यु पावलेल्या या बालकाला तूं जिवंत कर" (११). त्या ब्राह्मणानें रामाला अनेक दूषणें दिलीं आहेत. रामानें सभा भरविली ( सर्ग ७४ ). वसिष्ठासह आठ ब्राह्मण येऊन त्यांनीं रामाला आशीर्वाद दिले. मंत्री व पौरजन येऊन तेहि बसले. हा द्विज धरणें घेऊन बसला आहे वगैरे सर्व कांहीं रामानें निवेदन केलें. तेव्हां नारदानें भाषण केलें. तो म्हणाला, "पूर्वीं कृतयुगामध्यें ब्राह्मणच तपस्वी होते; त्यावेळीं कसाहि प्रसंग आला तरी ब्राह्मणेतर तपस्वी नसे. (१०). तदनंतर त्रेतायुग प्राप्त झालें व त्या युगामध्यें मानव कांहींसे देहाभिमानी झाले; पूर्वसंचित तपानें युक्त असे क्षत्रिय त्या युगांत उत्पन्न झाले. या त्रेतायुगांत ब्राह्मण व क्षत्रिय

तप करीत व वैश्य, शूद्र त्यांची सेवा करीत. पुढें द्वापारयुगांत वैश्यहि तप करूं लागले. कलियुगांत शूद्रहि तपश्चर्या करतील. पण रामराज्यांत एक शूद्र तप करीत आहे त्याचा नाश कर."

## विद्याप्रसार रामराज्यांत नको

रामानें पुष्पक विमानांत बसून त्याचा शोध केला. प्रथम पश्चिम, नंतर उत्तर व पूर्व दिशांना शोधल्यावर दक्षिण दिशेस शैवल पर्वताचे उत्तरेस मोठें सरोवर लागतें. त्याच्या तीरीं अधोमुख होऊन लोंबकळत असलेला एक तपस्वी आढळला. रामानें त्याला धन्यवाद दिला व तूं कोणत्या योनीमध्यें उत्पन्न झाला आहेस व तुझा उद्देश काय वगैरे विचारिलें. त्यानें उत्तर दिलें- "मी शूद्र योनींत जन्मलों व देवलोक संपादन करण्याच्या इच्छेनें मी तप करीत आहें." हें बोलतांच रामानें खड्गानें त्याचें शिर तोडलें. यावरून वर्णव्यवस्था जन्मावर येऊन बसली व गुणकर्मांची महति राहिली नाहीं, त्या काळीं ही शंबूकाची कथा लिहिली गेली असें अनुमान होतें.

तपासारखें चांगलें कृत्य शुद्ध भावानें देखील शूद्रानें करतां कामा नये. त्यायोगानें ब्राह्मणांचीं मुलें मरतात असा समज रामाचा झालेला होता व तो भिक्षुकी वृत्तीनें भारलेला असल्यानें त्याला स्वतःची विचारशक्ति राहिलेली नव्हती. जवळचे ब्राह्मण सल्लागार जसें समजावतील त्याप्रमाणें करावें एवढेंच रामाचें काम व म्हणूनच रामराज्याची भरभक्कम स्तुति. हिंदुस्थानांतील जे जे प्राचीन किंवा अर्वाचीन राजे झाले त्यांपैकीं जे ब्राह्मणास नमून राहिले व त्यांच्या आज्ञा ज्यांनीं पाळल्या त्यांची वाखाणणी पूर्वीं झाली व अजून होत आहे. जे स्वतःच्या बुद्धीनें वागले व वागतात त्यांची निंदाच ऐकूं येते. तप म्हणजे ज्ञान. या ज्ञानाचा प्रसार ब्राह्मणेतरांत न व्हावा अशी मुख्य खटपट आहे, व हेंच रामराज्याचें लक्षण आहे.

सर्व माणसांना विद्येचें दार खुलें पाहिजे, पण रामराज्यास हें वावडें आहे. स्वार्थी लोक रामराज्याचे गोडवे कां गातात हें यावरून उघड होत आहे.

— महाराष्ट्र-शारदा, मे १९३७

# सीताचरित्र

सीता ही जनक राजाची पाळलेली मुलगी. जनक विश्वामित्रास तिची हकीकत सांगतो, ती अशीः—

"अथ मे कृषतः क्षेत्रं लांगलादुत्थिता ततः ।
क्षेत्रं शोधयता लब्धा नाम्ना सीतेति विश्रुता ॥१३॥

बालकांड, सर्ग ६६.

भूतलादुत्थिता सा तु व्यवर्धत ममात्मजा ।
वीर्यशुल्केति मे कन्या स्थापितेयमयोनिजा" ॥१४॥

"मी जमीन नांगरीत असतां नांगरांतून एक कन्या प्राप्त झाली व ती नांगरापासून निघाली म्हणून सीता या नांवानें प्रसिद्ध झाली. (१३). भूतळांतून निघालेली माझी कन्या वाढूं लागली. तेव्हां वीर्यशुल्का ( हें त्र्यंबक चाप सज्ज करण्याला समर्थ असें ज्याचें वीर्य असेल त्यालाच ही द्यावयाची असें ) म्हणून मी ही अयोनिसंभव कन्या रक्षण केली. (१४). पुढें भूतलापासून उत्पन्न झालेली माझी कन्या मोठी होऊं लागली असतां हे मुनिश्रेष्ठ, राजांनीं येऊन तिला मागणी घातली (१५). परंतु नुसती मागणी घालणाऱ्या त्या सर्व राजांपैकीं मीं एकालाहि आपली वीर्यशुल्का कन्या दिली नाहीं. (१६). तदनंतर हे मुनिश्रेष्ठ, सर्व राजे आपआपल्या सामर्थ्याचा अदमास पाहण्याकरितां एकत्र जमून मिथिलेस आले. (१७). तेव्हां त्यांच्यासमोर त्र्यंबक चाप ठेवलें असतां तें उचलण्यास किंवा तोलण्यास ते समर्थ झाले नाहींत." (१८). जनकानें मुलगी देण्याचें नाकारल्यावर त्या राजांनीं मोठ्या रागानें मिथिला नगरीस वेढिलें व फार पीडा केली. "एक वर्ष वेढा पडल्यावर सर्व साधनें संपून गेल्यावर मी दुःखित झालों. मी तपश्चर्येनें देवगणांना प्रसन्न केल्यावर त्यांनीं चतुरंग सैन्य दिलें. त्यांच्या हल्ल्यापुढें ते अल्पवीर्य पापी राजे अमात्यांसह पळून गेले. रामानें धनु सज्ज केल्यास मी त्याला सीता देईन." (२६).

सर्ग ३१ श्लोक ९ यांत या धनुष्याचें सामर्थ्य सांगितलें आहे.

नास्य देवा न गंधर्वा नासुरा न च राक्षसाः ।
कर्तुमारोपणं शक्ताः न कथंचन मानुषाः ॥

देव, गंधर्व, दैत्य व राक्षस यांपैकीं कोणीहि त्या धनुष्याला प्रत्यंचा चढविण्यास समर्थ नाहींत. मग मानव तर सर्व प्रकारें नाहींतच नाहींत (९). मग असल्या धनुष्याला प्रत्यंचा लावण्याचा पण घालणें म्हणजे अशक्य पण लावणें हें जनकास समजावयास पाहिजे. याचा अर्थ आपली मुलगी कोणासच द्यावयाची नाहीं; कुंवार ठेवावयाची असा त्याचा हेतु होता काय, अशी शंका येते. रामाच्या शरीरशक्तीचें वर्णन करण्याच्या हेतूनें कवीनें जनकाच्या पदरीं मूर्खपणा बांधला आहे.

पांच हजार धिप्पाड व उंच पुरुषांनीं कशी तरी ती आठ चाकी धनुष्याची पेटी ओढून आणली. ती लोखंडी होती. पेटींतच धनुष्याची पूजा होत असे. यावरून ती पेटी उघड्या मैदानांत नसून वाड्याच्या एका भागांत असावी. जनक, विश्वामित्र, राम, लक्ष्मण व इतर राजवाड्यांतच बसले होते. तेथें पेटी आणली. या पांच हजारांना पेटी ओढण्याच्या कामीं जागा कशी मिळाली याची कल्पना होत नाहीं. हें वर्णन निव्वळ खोटें व बनावट आहे असें वरवर विचार करणारासहि पटेल. रामानें तें धनु सहज उचललें, सज्ज केलें व ओढलें, तेव्हां तें मोडलें. राजानें सीता रामास देण्याचें ठरविलें व दशरथास आणण्यास मंत्री रथांतून पाठविले.

वाटेंत तीन रात्रीं काढून चौथे दिवशीं दूत अयोध्येस पोचले. त्यांनीं दशरथ राजास जनकाचा संदेश सांगून मिथिलेस जाण्याविषयीं विनंति केली. राजा आपल्या ज्येष्ठ पुत्राच्या विवाहास दुसरेच दिवशीं निघाला; जणुं काय एखाद्या अरण्यांत राहणाऱ्या ऋषीसारखा कमंडलु व कृष्णाजिन घेऊन त्यास जायचें आहे ! येवढ्या मोठ्या राजाच्या घरचें लग्न; ह्यांत अगोदर वाटाघाट मुळींच नव्हती. अकस्मात् बोलावणें आलेलें. पण दुसरेच दिवशीं दशरथ निघाला. इतक्या घाईचें कारण दिसत नाहीं.

राम-लक्ष्मणाला आपल्या मुली देण्याचा निश्चय जनकानें केल्यावर दशरथाकडे दूत पाठविले. त्यांचेबरोबर दशरथ आला. यांत सात दिवस निघून गेले. दशरथाचें स्वागत झालें. यानंतर जनकास आपल्या भावाची आठवण होते हें आश्चर्य आहे.

या प्रसंगीं वसिष्ठानीं दशरथाची वंशावळ सांगितली आहे. अव्यक्त, ब्रह्मा, मरीचि, कश्यप, विवस्वान् व मनु प्रजापति असे क्रमानें एकमेकापासून झाले. मनूचा पुत्र इक्ष्वाकु. **इक्ष्वाकुश्च मनोः सुतः। तमिक्ष्वाकुमयोध्यायां राजानं विद्धि पूर्वकम्॥** ( बा. कां. सर्ग ७०-२१ ). तोच इक्ष्वाकु अयोध्येंतील पहिला राजा होय. यावरून मनु हा अयोध्येचा राजा नव्हता असें होतें. पण युद्धकांड सर्ग १२८ यांत

ब्रह्मणा निर्मितं पूर्वं किरीटं रत्नशोभितम्।
अभिषिक्तः पुरा येन मनुस्तं दीप्ततेजसम्॥

असें आहे. यावरून मनूलाच मुकुट घातला होता. म्हणजे तो पहिला राजा म्हणावा लागेल. अशा प्रकारचे गैरमेळ जागोजाग आढळतात. जनकाची वंशावळ शबल ब्रह्मापर्यंत सांपडली नाहीं. त्यानें निमि राजापासून वंश सांगण्यास आरंभ केला. जनक व दशरथ यांच्या वंशावळी इतर पुराणांतून आहेत. पण त्यांना व रामायणांतील वंशावळींना मेळ पडणें कठीण आहे.

सीता व शिवधनु हीं दोन जनकावर आपत्तीसारख्याच होत्या असें दिसतें. सांकाश्याचा राजा सुधन्वा हा मिथिला नगरीला वेढण्यास आला. 'अत्युत्कृष्ट त्र्यंबक चाप व कमलनयना सीता ही मला द्यावी' म्हणून त्यानें जनकाला निरोप पाठविला. ( बा. कां. सर्ग ७१ श्लो. १५, १६, १७ ) ती न दिल्यामुळें युद्ध झालें. त्यांत सुधन्वा मारला गेला. जनकानें आपला भाऊ कुशध्वज यास त्याचें सांकाश्य नगरीचें राज्य दिलें ( श्लोक १९ ). कुशध्वजाला राज्यावर बसवून किती वर्षें झालीं होतीं हें सांगितलेलें आढळत नाहीं. पण बरींच वर्षें झालीं असावींत असें वाटतें. म्हणजे सीता वयांत येऊन बरींच वर्षें लोटलीं होतीं.

लग्नाच्या समारंभांत सीतेचें वर्णन फक्त 'सर्वाभरणभूषिताम्' असें केलें आहे.

## विवाहप्रसंगीं सीता व राम यांचीं वयें

विश्वामित्राबरोबर राम गेला तेव्हां त्याचें वय साडेपंधरा वर्षांचें होतें. ऊनषोडश असें सांगितलें आहे. सोळाला कमी. म्हणजे विवाहाचे वेळीं त्याला सोळा वर्षें पुरीं झालीं नसावींत असें दिसतें. या वर्णनांत सीता केवढी होती तें सांगितलें नाहीं. पण अरण्यकांड सर्ग ४७ श्लोक १० मध्यें सीता रावणास आपली हकीकत सांगतांना म्हणते—

"मम भर्ता महातेजा वयसा पंचविंशकः ।
अष्टादशहि वर्षाणि मम जन्मनि गण्यते" ॥

रामाला वनांत जावें लागलें त्यावेळीं लग्नाला बारा वर्षें होऊन गेलीं होतीं व तेव्हां रामाचें वय २५ वर्षांचें व माझें १८ वर्षांचें होतें. यावरून विवाहाचे वेळीं सीता सहा वर्षांची व राम तेरा वर्षांचा होता असें तिचें म्हणणें आहे. तिच्या सांगण्याप्रमाणें रामाचें वय १३ वर्षांचें; पण इतरत्र तें सोळा वर्षांचें सांगितलें आहे.

सांकाश्य नगरीचा राजा सुधन्वा यानें सीतेला मागणी घातली, त्या वेळीं सीता प्रौढ असली पाहिजे. सहा वर्षांपेक्षां कमी वयाच्या मुलीकरितां लढाई करण्यास येणारा सुधन्वा व वर्षभर मिथिलेस वेढा घालून बसणाऱ्या राजांस वेड्यांत काढावें लागेल. जनक जी हकीकत सांगत आहे त्यावरून सीता यौवनदशेंत आल्याला पुष्कळच वर्षें झालीं पाहिजेत. कारण सुधन्व्याच्या स्वारीनंतर अनेक राजांनीं एकमतानें केलेली स्वारी व घातलेला वेढा या गोष्टी घडल्या आहेत. यावरून सीता सहा वर्षांची होती हें कथन अगदींच टाकाऊ आहे. बालकांड सर्ग ७७ यांत दशरथानें चारहि सुनांसह अयोध्येंत प्रवेश केल्याची हकीकत आहे. त्यांत

मंगलालापनैर्होमैः शोभिता क्षौम वाससः ।
देवतायतनान्याशु सर्वास्ताः प्रत्यपूजयत् ॥ १२ ॥
अभिवाद्याभिवाद्यांश्च सर्वाः राजसुतास्तदा ।
रेमिरे मुदिताः सर्वाः भर्तृभिः मुदिता रहः ॥ १३ ॥

आशीर्वाद प्राप्त झालेल्या व गृहप्रवेशनीय होम झाल्यामुळें कल्याण-संपन्न होऊन क्षौमवस्त्र परिधान केलेल्या सर्वहि राजकन्यांनीं देवस्थानांना सत्वर प्रणाम केले (१२). पूज्यांना अभिनंदन करून त्या सर्वहि राजकन्या आनंदित झाल्या आणि भर्त्यांसहवर्तमान त्या एकांतामध्यें आनंद पावूं लागल्या ( १३ ). यावरून त्या चांगल्या वयांत आलेल्या कमींत कमी सोळा वर्षांच्या तरी असाव्यात. सुधन्वा व राजांचें टोळकें सीतेच्या प्राप्तीकरितां लढाईस निरनिराळ्या प्रसंगीं आलें होतें. या गोष्टी विचारांत घेतल्यास सीतेचें वय पुष्कळच मोठें असावें असें वाटतें.

रामाच्या वनवासाची हकीकत सांगतांना त्या वेळीं आपलीं वयें किती होतीं हें सांगण्याची सीतेस आवश्यकताहि नव्हती. यावरून अरण्य-कांडांतील सर्ग ४७ यांतील वयाचा श्लोक व त्यापुढील निव्वळ रामाच्या स्तुतीचा श्लोक हे कोणींतरी घुसडून दिलेले असावेत. हे गाळून वाचल्यास कथेचा संदर्भहि चांगला लागतो. पहा :

> इति ब्रुवाणां कैकेयीं श्वशुरो मे स पार्थिवः ।
> अयाचतार्थैरन्वर्थैर्न च यांचा चकार सा ॥ ९ ॥
> कामार्तश्च महाराजाः पिता दशरथः स्वयम् ।
> कैकेय्याः प्रियकामार्थं तं रामं नाभ्यषेचयत् ॥ १२ ॥

विवाहानंतर पित्यानें दिलेली भार्या म्हणून रामाला सीता प्रिय झाली होती व तिच्या अंगच्या गुणानें आणि तिच्या ठिकाणीं असणाऱ्या सौंदर्यरूप गुणामुळें त्याचें प्रेम अधिकच वृद्धिंगत होत होतें ( बा. कां. सर्ग ७७, श्लोक २५ ). सीतेकडे रामाच्या मनाचा जितका ओढा असे त्यापेक्षां सीतेच्या मनाचा रामाकडे दुप्पट ओढा असे आणि देवतांची बरोबरी करणारी व मूर्तिमंत लक्ष्मीप्रमाणें असलेली ती जनककन्या मैथिली सीता रामाच्या अंतःकरणांतील अभिप्राय आपल्या अंतःकरणानें स्पष्टपणें फारच जाणत असे. ( परंतु, रामाला तिच्या अंतःकरणांतील अभिप्राय तितका स्पष्ट रीतीनें कळत नसे. कारण सीतेला जितका रामाचा ध्यास असे तितका रामास सीतेचा ध्यास नसे. ) ( २७।२८ ). कंसांतील स्वभावविश्लेषण भाऊशास्त्र्यांचें आहे. सीता अनन्यगतिक होती. राम

तसा नसावा. त्याला दुसऱ्या बायका असाव्यात असा ध्वनि वाल्मीकीच्या काव्यांत या ठिकाणीं निघत आहे. राम हा एकपत्नी असता तर सीतेवर त्याची जास्त प्रीति राहती.

पुढें रामाला यौवराज्याभिषेक करण्याची सर्व तयारी झाली असतां कैकेयीनें दशरथाला वचनाच्या कैचींत धरून त्याच्याकडून रामाला बोलावून आणिलें. राम बापापुढें उभा राहिला. दशरथाला कांहीं बोलवेना. कैकेयीनें सर्व हकीकत सांगून, 'राजाचें वचन तूं पुरें कर' असें बजाविलें. राम म्हणाला, " बापाची आज्ञा पाळण्यास मी तयार आहें. पण भरताला अभिषेक करण्याविषयीं राजानें स्वतः मला सांगितलें नाहीं हें एक दुःख माझ्या मनांत आहे. " तो पुढें कैकेयीस म्हणतो :

" अहं हि सीतां राज्यं च प्राणानिष्टान्धनानि च ।
हृष्टो भ्रात्रे स्वयं दद्यां भरताय प्रचोदितः " ॥

अ. कां. स. १९, ७

" किं पुनर्मनुजेंद्रेण स्वयं पित्रा प्रचोदितः " ॥

" फक्त तूं जरी मला सांगितलेंस तरी सीता, राज्य, प्रिय प्राण, व संपत्ति मी आनंदानें भ्रात्या भरताला देईन (७). मग बापानें आज्ञापिल्यावर तर करीनच करीन. " आपली धर्मपत्नी भरताला देण्याविषयींचा रामाचा उद्गार विचार करण्यासारखा आहे. तेथें राज्य, प्रिय प्राण व संपत्ति यांचा निर्देश करण्याअगोदर सीतेचें उदक भरताच्या हातावर सोडण्यास राम तयार आहे. या प्रकारचा उल्लेख हाच एक रामायणांत आहे असें नाहीं. दुसरे अनेक असे उल्लेख प्रसंगानें आले आहेत. त्या काळची एक सामाजिक चाल—सर्वमान्य चाल—या ठिकाणीं सूचित होते. रामानें सीता भरताला दिल्यास तिचा उपभोग त्यानें घेणें क्रमप्राप्तच आहे; व तसें करणें कोणाच्याहि दृष्टीनें गैर नाहीं, असेंहि यावरून होत आहे. इतकेंच नव्हे तर त्या काळच्या समजुतीप्रमाणें भावाची बायको पत्नीकल्प मानली जात होती.

दशरथाला कांहींच बोलवेना. तेव्हां राम म्हणाला,

"अनुक्तोऽप्यत्रभवता भवत्या वचनादहम् ।
वने वस्यामि विजने वर्षाणीह चतुर्दश" ॥ १९, २३ ॥

"येथें असलेल्या थोर पित्यानें जरी सांगितलें नाहीं तरी तुझ्या सांगण्यावरून निर्जन वनामध्यें चौदा वर्षेपर्यंत वास्तव्य करीन." पुढें तो म्हणाला, "मातेचा निरोप घेऊन सीतेची समजूत घालीपर्यंत तूं धीर धर. नंतर आजच्या आज भव्य दंडकारण्यांत चालता होईन."

राम वनवासाला निघाला ही बातमी राणीवशांत कळून मोठा हाहाकार झाल्याचें वर्णन वाल्मीकीनें केलें आहे. ही बातमी ३४७ राण्यांना कळली, पण कौसल्येला कळली नाहीं, असें वाल्मीकि ठासून सांगतो हेंच आश्चर्य! सर्ग २० त पहिल्या ६ श्लोकांत राजपत्न्यांच्या विलापाचें वर्णन आहे, व त्याच सर्गाच्या २४ व्या श्लोकांत कौसल्या रामास म्हणते :

"सत्यप्रतिज्ञं पितरं राजानं पश्य राघव ।
अद्यैव त्वां स धर्मात्मा यौवराज्येऽभिषेक्ष्यति" ॥२४॥

"हे राघवा, तुझा पिता भूपति कसा सत्यवचनी आहे तो पहा! तो धर्मात्मा आजच तुला यौवराज्याचा अभिषेक करील." आतां तूं येथेंच भोजन करून राजदर्शनाला जा, असेंहि ती म्हणाली. गेल्या सबंध रात्रींत कैकेयीच्या महालांत काय काय खलबतें झालीं याची या पट्टराणीला व ज्येष्ठ पुत्राच्या आईला दादहि नाहीं. यावरून तिला कडक कैदेंत ठेवलें होतें काय, असा संशय येतो. रामालादेखील तिच्या अज्ञानाचें आश्चर्य वाटलें. तो म्हणतो, "हे देवि, खरोखरीच तुला कांहीं माहीतच नाहीं काय? हें एक मोठें भय तूं, विदेहराजकन्या आणि लक्ष्मण यांच्या दुःखाकरितां उपस्थित झालें आहे. मी दंडकारण्यांत जाणार. महाराज भरताला यौवराज्य देत असून मला गरिबाला दंडकारण्यांत हांकून लावीत आहेत!" (२७).

कौसल्येला कांहींच बातमी लागली नव्हती यावरून ती कडक कैदेंत असावी असें जें अनुमान केलें त्यास पुढील हकीकतीनें बळकटी येत आहे.

श्लोक १२।१३. (हे पुत्राचे शब्द ऐकून) कुऱ्हाडीनें तोडलेली सालवृक्षाची फांदी जशी वनामध्यें पडते तशी स्वर्गातून च्युत झालेल्या

देवतेप्रमाणें ती राजपत्नी कौसल्या एकाएकीं भूमीवर पडली. रामानें तिला उठविलें.

उपावृत्योत्थितां दीनां वडवामिव वाहिताम्।
पांसुगुंठितसर्वांगीं विममर्श च पाणिना ॥३४॥

पूर्वी भार वाहून थकवा आल्यावर त्याचा परिहार करण्याकरितां भूमीवर लोळून उठलेल्या घोडीप्रमाणें सर्वांग धुळीनें भरलेल्या त्या दीन मातेला त्यानें हातानें स्पर्श केला. पट्टराणीला ज्या ठिकाणीं ठेवलें होतें, तेथें किती धुरळा होता, पहा. तिचें सर्वांग धुळीनें भरलें होतें. रामानें हातानें धूळ झाडली. त्या कामाला त्याला एकादा रुमाल किंवा अंगावरील उपरणेंहि मिळालें नाहीं. झाडलोट करून जागा स्वच्छ ठेवण्यास तिच्याकडे माणसेंहि नसावींत म्हणून तर इतकी धूळ तेथें साचली. गरीब बिचारी कौसल्या!

राजवाड्यांत इतकी धूळ साचली होती ही कल्पना खरी वाटत नाहीं. पण धुरळ्यांत लोळून उठून अंग झाडणाऱ्या घोडीची उपमा कवीस सुचल्यावर ती काव्यांत घालण्याचा मोह त्यास आवरला नसावा व म्हणून असलें नादान वर्णन त्यानें केलें आहे.

कौसल्येचा निरोप घेऊन राम आपल्या राहण्याच्या जागीं सीतेकडे गेला. अयोध्येच्या दरबारांत कोणास कोणी कसलीहि बातमी द्यावयाची नाहीं असाच दंडक दिसतो. कैकेयीच्या महालांत काय राजकारण चाललें आहे याची वार्ता कौसल्येस नाहीं, रामास नाहीं, मग सीतेस कोठून असणार! राजानें रामास बोलावून आणलें व कैकेयीनें त्याला चौदा वर्षें वनवासाला धाडलें तरी त्याची दाद कौसल्येस नाहीं व सीतेसहि नाहीं, राम तिला भेटेपर्यंत.

वैदेही चापि तत्सर्वं न शुश्राव तपस्विनी।
तदेव हृदि तस्याश्च यौवराज्याभिषेचनम् ॥–सर्ग २६।२॥

इकडे बिचाऱ्या सीतेनें यांतलें कांहींच ऐकलें नव्हतें. आणि रामाला यौवराज्याचा अभिषेक होणार हेंच तिच्या मनांत घोळत होतें. तिचें वर्णन करतांना मात्र वाल्मीकि तिला 'अभिज्ञा राजधर्माणाम्' असें शिफारसपत्र देतात. पण कोठें काय चाललें आहे याची बातमी काढणें हें

राजधर्मापैकीं एक महत्त्वाचा धर्म आहे, त्याकडे तिचें दुर्लक्ष झालें आहे. या ठिकाणीं रामाचें मुख शोकानें निस्तेज झालेलें पाहूनहि सीतेला या स्थितीचा अंदाज आला नाहीं, इतकी ती भाबडी दाखविली आहे. ती विचारते, " हे प्रभो, या प्रसंगीं हें काय ? हे रघुवंशज, आज चांगला गुरुपुष्ययोग आहे आणि या योगावर आपणाला राज्याभिषेक होणार असें विद्वान् ब्राह्मण सांगत आहेत. तेव्हां आपणाला खिन्न होण्याचें कारण काय ? शेंकडो शलाकांनीं युक्त असलेल्या व उदकाच्या फेसासारख्या शुभ्र छत्रानें आपलें मनोहर मुख झाकून गेलेलें आज कोठें दिसत नाहीं. चंद्र आणि हंस याप्रमाणें दिसणाऱ्या विंझोण्यांचा वारा आज आपल्या कमलासारख्या मुखावर घातला जात नाहीं. हे पुरुषश्रेष्ठ, बोलके भाट, वंशस्तावक व स्तुतिपाठक हेहि आनंदित होऊन मंगल शब्दांनीं आपली स्तुति करीत असल्याचें आज दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. वेदपारंगत ब्राह्मण राज्याभिषेक झालेल्या आपल्या मस्तकीं मध व दहीं यथाविधि घालीत नाहींत. आणि सर्व मंत्रिमंडळ, मुख्य मुख्य सभानायक व नगरवासी आणि देशांतील लोक आपल्या मागोमाग जाण्याची इच्छा करीत नाहींत ! " इत्यादि सीतेचा विलाप वाल्मीकि वर्णितात. या ठिकाणीं सीता फारच भाबडी, बावळट व भोळी दाखविली आहे. आदले रात्रीं-पासून तिला व रामाला समंत्रक उपवास करविला होता. पहा :

इत्युक्त्वा स तदा रामं उपवासं यतव्रतः ।
मंत्रवत्कारयामास वैदेह्याः सहितं शुचिः ॥ ५, २१.

अभिषेक उभयतांस व्हावयाचा असें असल्यास आपणास राजवाड्यांत कां नेलें नाहीं ही शंका तिला येण्यास पाहिजे होती. पण ती जे प्रश्न रामास करीत आहे त्यावरून ती फार भोळी व भाबडी दिसत आहे.

नंतर रामानें सीतेला कैकेयीच्या वराची हकीकत सांगितली. " निर्जन वनांत जाण्यास सिद्ध झालेला मी तुला भेटण्याकरितां आलों आहे. "

यापुढें सीतेनें भरताजवळ कसें वागावें याविषयीं रामाची शिकवण विचार करण्यासारखी आहे. माझी आई आहे तिच्या आज्ञेत वागून चौदा वर्षें काढ, असें सांगणें स्वाभाविक होतें व कोणीहि तशी अपेक्षा

करील. किंवा आपला बाप जनक याचेकडे माहेरीं रहा, असें सांगणेंहि योग्य होतें. पण राम हा अवतारी थोर पुरुष. त्याचा उपदेश कांहीं औरच होता. तो म्हणतो :

" भरतस्य समीपे ते नाहं कथ्यः कदाचन ।
ऋद्धियुक्ता हि पुरुषा न सहंते परस्तवम् ॥
तस्मान्न ते गुणाः कथ्या भरतस्याग्रतो मम ॥
अहं ते नानुवक्तव्यो विशेषेण कदाचन ।
अनुकूलतया शक्यं समीपे तस्य वर्तितुम् ॥
तस्मै दत्तं नृपतिना यौवराज्यं सनातनम् ।
स प्रसाद्यस्त्वया सीते नृपतिश्च विशेषतः " ॥

अयोध्याकांड सर्ग २६ श्लो. २४ ते २७.

अर्थः– " भरताजवळ तूं माझी कधींहि प्रशंसा करीत जाऊं नकोस. वैभवसंपन्न पुरुषांना दुसऱ्याची स्तुति सहन होत नाहीं. तस्मात् भरतापुढें तूं माझ्या गुणांची प्रशंसा करीत जाऊं नकोस. माझ्यासंबंधानें तूं विशेषसें कांहीं एक बोलत जाऊं नकोस. भरताच्या मर्जीप्रमाणें वागून त्याच्या समीप राहाणें तुला शक्य आहे. राजानें त्याला यौवराज्य अक्षय दिलें आहे ! हे सीते, त्याची व विशेषतः राजाची कृपा तुला संपादन केली पाहिजे. " या ठिकाणीं याच कांडाच्या १९ व्या सर्गाच्या ७ व्या श्लोकाची आठवण होते. तेथें भरताला राज्याबरोबर सीताहि देण्याची रामाची तयारी आहे असें दाखविलें आहे. येथें सीतेला राम भरताजवळ राहून त्याची मर्जी संभाळण्यास सांगत आहे. तरुण व सुंदर स्त्रीनें राजाजवळ राहून त्याची मर्जी संपादावयाची म्हणजे काय करावयाचें हें स्पष्ट सांगण्याची जरूर नाहीं.

याच्यापुढेंच रामाच्या तोंडीं पुढील श्लोक घातलेले आढळतात :

" हे कल्याणि, हे निष्पाप सीते, मी वनांत गेल्यानंतर तूं व्रतें व उपवास करीत रहात जा (२९). पहांटेस उठून देवांचें यथाविधि पूजन करीत जा आणि माझ्या पित्या दशरथाला वंदन करीत जा (३०). माझी

माता कौसल्या वृद्ध झाली असून दुःखानें कृश झाली आहे तेव्हां धर्म हीच गोष्ट मनामध्यें आणून तूं तिची मानमान्यता ठेवणें योग्य आहे." (३१). आपल्या बापाचा व आईचा सन्मान ठेवण्याचें सांगण्याची आवश्यकता रामाला कां वाटली ध्यानांत येत नाहीं. रामाला सीतेची खरी परीक्षाच झाली नसावी. पुढें ३३ व्या श्लोकांत 'प्राणापेक्षांहि मला प्रिय असे जे भ्राते भरत व शत्रुघ्न त्यांना विशेषतः तूं आपल्या भ्रात्याप्रमाणें अथवा पुत्राप्रमाणें समजून त्यांच्यावर लक्ष ठेवीत जा' असें सांगणें हें पूर्वीच्या सांगण्याला व या ३३ व्या श्लोकापुढील ३४ व्या श्लोकांत सांगितलें आहे त्याला विसंगत आहे. या श्लोकांत राम सीतेला सांगतो, "भरताच्या मर्जीबाहेर तूं कधींहि वागत जाऊं नकोस. कारण तो आपल्या देशाचा व कुलाचा राजा आहे." रावणवध झाल्यानंतर सीतेला रामानें आणविली, तेव्हांहि तूं मला नकोस, तुला पाहिजे तर भरताजवळ, शत्रुघ्नाजवळ, लक्ष्मणाजवळ, सुग्रीवाजवळ किंवा बिभीषणाजवळ रहा असें उदार मनानें सांगितलें आहे. एकंदरींत रामाजवळ सीतेची फारशी प्रतिष्ठा नाहीं.

रामानें कौसल्येचा निरोप घेतला, तेव्हां सीतेला बरोबर नेण्याचा त्याचा विचार नव्हता. ती अयोध्येंतच रहाणार अशी त्याची खात्री म्हणून तिचा चांगल्या प्रकारें संभाळ कर असें त्यानें आईला सांगावें अशी अपेक्षा करणें योग्य आहे. राम तसें करीत नाहीं. यामुळें कौसल्याहि सीतेचें नांव काढीत नाहीं. मागें बायकोची काय व्यवस्था हेंहि ती विचारीत नाहीं. यावरून त्या काळच्या आचाराप्रमाणें आपल्या नवऱ्याचे पश्चात् त्याच्यापेक्षां धाकट्या भावाजवळ त्याच नात्यानें रहावयाचें ही गोष्ट सर्वमान्य व विहित अशी होती; म्हणून राम सीतेला संभाळण्याविषयीं कौसल्येस कांहींच सांगत नाहीं व तीहि कांहीं बोलत नाहीं. राम मात्र आपण गेल्यावर भरताजवळ कसें वागावें हें सीतेला शिकवित आहे. त्या वेळच्या लोकांच्या समजुती व आचार हीं लक्षांत घेतलीं तर रामाचें, पूर्वी कैकेयीजवळचें 'सीता व राज्य भरताला देतों' हें भाषण, भरताची मर्जी संभाळून राहा हा सीतेला उपदेश, युद्धकांडांतील सीतेचा स्वीकार न करतां भरतादींजवळ राहाण्याची शिफारस, यांची संगति लागते. आजच्या कल्पनेप्रमाणेंच रामाचे विचार व आचार होते, अशी ज्यांची

समजूत, त्यांना मात्र या रामाच्या भाषणांतील संगति लागणें कठीण. अशापैकींच कोणा अलीकडच्या बनावट वाल्मीकीनें वर दिलेलें व्रत उपवास करून राहाण्याचें व भरतशत्रुघ्नाला भावाप्रमाणें व पुत्राप्रमाणें समजण्याचे श्लोक रचून मधोमध ठेवून दिलेले दिसतात. कारण त्यांतील विचाराची मागच्या पुढच्या शिकवणीशीं संगति लागत नाहीं.

रामाचा उपदेश सीतेला मुळींच पसंत पडला नाहीं. ती वनांत जाण्यास तयार झाली. हा २७ वा सर्ग फार वाचनीय व मननीय आहे. रामाच्या मनांत तिला नेण्याचें नव्हतें; म्हणून २८ व्या सर्गांत तो तिच्यापुढें वनवासांतील दुःखाचें भेसूर चित्र ठेवित आहे.

तरीहि सीता डगमगली नाहीं. तिनें आपला आग्रह कायम ठेवला व शेवटीं जीव देण्याची धमकी दिली. ती म्हणाली, " मला आपण वनांत नेलें नाहीं तर मी विष सेवीन, अग्नींत शिरेन किंवा पाण्यांत उडी घेईन. कसेंहि करून मी जीव देईन." तरीहि राम तिला नेण्याचें कबूल करीना, तेव्हां मग तिनें रामाची निंदा करण्याचें आरंभिलें. ती त्याला भ्याड ठरविते. पुरुषवेषांत तूं खरोखरी स्त्री आहेस असें बजाविते. ती म्हणते, " हे रामा, पुरुषरूप धारण करणारा आणि वस्तुतः स्त्री असलेला जांवई मिळविल्यानें माझ्या बापाला काय वाटलें असेल ! " ( ३०।३ ).

पुढें ती चिडून बोलते,

" स्वयं तु भार्यां कौमारीं चिरमध्युषितां सतीम् ।

शैलूष इव मां राम परेभ्यो दातुमिच्छसि " ॥ सर्ग ३०.८.

" तरुण, कुमारी, पुष्कळ दिवस सहवासास असलेली आणि सती अशी मी आपली भार्या असतांना, हे राम, स्त्रीवर उपजीविका करणाऱ्या ( भाडखाऊ ) प्रमाणें आपण मला परपुरुषाला देण्याची इच्छा करीत आहांत ! " पुढल्या श्लोकांत ती म्हणते, " ज्याच्या मर्जीप्रमाणें वाग म्हणून मला शिकवितां व ज्यामुळें आपला राज्याभिषेक बंद पडला त्याची मर्जी आपणच सांभाळा व त्याची आज्ञा पाळा. " इतकें झाल्यावर सीतेला बरोबर घेणें रामाला भाग पडलें. सीता आनंदानें निघाली. या प्रसंगीं सीतेनें आपलें तेज व पतिभक्ति फार उत्तम प्रकारें दाखविली

आहे. यांत ६ वे श्लोकांत सीतेनें आपली तुलना सावित्रीबरोबर केली आहे.

द्युमत्सेनसुतं वीरं सत्यवन्तमनुव्रता ।
सावित्रीमिव मां विद्धि त्वमात्मवशवर्तिनीम् ॥

सीतेनें वल्कलें नेसून रामाबरोबर जावें कां आपल्या नेहमींच्या वस्त्रभूषणांसह जावें याविषयीं बरीच चर्चा झाली आहे. सीतेनें वल्कल नेसून जावें ही कैकेयीची इच्छा. तिनें वल्कलें आणलीं, पण सीतेस तीं नेसतां येईनात. सीतेनें या कामीं कांहीं हरकत घेतली नाहीं. पण वसिष्ठ व दशरथ यावेळीं कैकेयीच्या विरुद्ध गेले; व सीतेबरोबर चौदा वर्षांला पुरतील अशीं वस्त्रें व दागिने देण्यांत आले.

सीता येईल ती आपत्ति सोसण्यास तयार झाली आहे. न्याय, अन्याय याचा विचार ती करीत नाहीं व त्यासंबंधीं प्रश्नहि कोणास विचारीत नाहीं. पांडव वनवासास जाण्याच्या वेळीं द्रौपदीनें आपलें तेज दाखविलें व कायद्याचे बिकट प्रश्न घालून आपणास अनुकूल असा निर्णय मिळविला. व्यासांची स्त्रीरत्नविषयींची कल्पना उदात्त होती. वाल्मीकीनें सीता नेभळट दाखविली आहे. तिची पतिभक्ति व पतिप्रेम उत्कट आहे. पण पति चुकत असल्यास त्यास बोध करून मार्गावर आणण्याचें चातुर्य व धीटपणा जो द्रौपदीच्या ठिकाणीं दिसतो तो सीतेंत नाहीं. नवरा वल्कलें नेसतो म्हणून आपणहि वल्कलेंच नेसलीं पाहिजेत असा सीतेचा निश्चयहि नाहीं. सासऱ्याचा वस्त्रासंबंधीं निकालहि ती मान्य करीत आहे. शृंगवेरपुराजवळ भागीरथी नावेनें उतरून जातांना आपण तिघांनीं सुखरूप परत यावें म्हणून सीता भागीरथी नदीस नवस करीत आहे. ब्राह्मणभोजनें, लक्ष गाईंचें दान, वस्त्रांचें दान वगैरे देऊन शिवाय

"सुराघटसहस्रेण मांसभूतौदनेन च ।
यक्ष्ये त्वां प्रीयतां देवि पुरीं पुनरुपागता" ॥

सर्ग ५२ श्लोक ८९.

"हे देवि, मी अयोध्यानगरीला परत आलें म्हणजे सहस्र घट मद्य आणि मांसमिश्र ओदन यांचा तुला बळी देईन; गंगे, तूं मला प्रसन्न हो," असा नवस करीत आहे. वाल्मीकीच्या मतानें हे सुरा व मांसपदार्थ

देवता व त्यांचे पुजारी यांस फार आवडते होते व त्यांस प्रसन्न करून घ्यावयाचें झाल्यास सुरा व मांस देण्याच्या कामीं हात आखडता घेण्यांत येऊं नये. महाभारतांतील वीर, मद्य पीत व मांस सेवन करीत. पण त्यांचीं दैवतें सहस्र घट मद्याचा फन्ना पाडणारीं नव्हतीं. त्यांच्या ठिकाणीं नेमस्तपणा होता. महाभारत व रामायण या संस्कृती एक नसून बऱ्याच बाबींत भिन्न आहेत.

सीता, राम, लक्ष्मण यांचा आहारहि बराच जबर दिसतो. वनवासाच्या तिसरे दिवशीं भागीरथी उतरल्यावर वत्स देशांत जाऊन संध्याकाळच्या भोजनासाठीं रामलक्ष्मणानें चार मृगांची शिकार केली. त्यांत तीन हरणें, ऋष्य, पृषत व महारुरु नांवाचीं व चवथा डुक्कर होता. इतकें मांस तिघांत खपलें कसें असें कोणास वाटेल. पण वाल्मीकि सांगतो त्यावर विश्वास ठेवतां येईल, त्यांनीं ठेवावा. महारुरु एकटाच तिघांना खपण्यासारखा नाहीं असें थोड्या विचारांतीं दिसून येईल.

चौदा वर्षें पुरेल इतक्या वस्त्रांचा गठ्ठा रथांत अलंकारांसह दिला होता. शृंगवेरपुरावर तो नावेंत घातला असेल. पण नावेंतून उतरल्यावर त्या वस्त्रांचें काय झालें? तो बोजा लक्ष्मणानें कां रामानें वाहिला, कां तो सीतेलाच उचलावा लागला, हें वाल्मीकीनें सांगितल्याचें आढळत नाहीं. पण यमुना उतरतेवेळीं तयार केलेल्या तराफ्यावर 'सीतेचीं वस्त्रें व भूषणें व कुदळ व पेटी' चढविल्याचा उल्लेख आहे. हा तराफा दोघांनीं पलीकडे ओढून नेला असावा. कारण यमुनेपार पाण्याचा ओघ तोडीत जावयाचें आहे. प्रयाग येथें भरद्वाजाश्रमासंनिध एखादी नावहि नसावी हें चमत्कारिक आहे. यमुनेलाहि सीता नवस करते. पण यमुनेची किंमत गंगेच्या मानानें शेंकडा दहा टक्केपेक्षांहि कमीच आहे. भागीरथीवर लक्ष गाईंच्या दानाचें उदक सोडलें तर येथें यमुनेवर फक्त एक हजार गाईंच्या दानाचें. तेथें १००० घट मद्य तर येथें फक्त १०० घटच.

राम चित्रकूटावर पोंचल्याचें ऐकल्यावर सुमंत्र अयोध्येस परत गेला. तेथें त्यानें रामाचा निरोप राजास सांगितला. लक्ष्मणाचा निरोप बराच तेजस्वी आहे. तो बापावर बराच चिडलेला दिसतो. 'हे महाराजा, बिचारी जनककन्या तर भुतानें झपाटल्याप्रमाणें निरोप वगैरे सांगण्याचें सर्व कांहीं

विसरून दुःखाचे सुस्कारे टाकीत टाकीत उभी राहिली होती (सर्ग ५८।३४) व पूर्वी कधींच अशा संकटांचा अनुभव नसल्यामुळें त्या दुःखानें रडत असलेली ती यशस्विनी राजकन्या मला कांहींच बोलली नाहीं.'

३६।३७ व्या श्लोकांतहि सीतेचें रडेंच आहे. सीता स्वभावानें मऊच आहे. कडकपणा तिच्या ठिकाणीं नाहीं. पण ६० वे सर्गांत श्लोक १४।१५ हें (ग्राम, नगर, वृक्ष वगैरेबद्दल विचारण्यासंबंधानें) 'तिनें (सीतेनें) केलेलें भाषण येवढेंच काय तें मला स्मरत आहे. कैकेयी-संबंधानें ती काय बोलली हें मला आठवत नाहीं.' असें सुमंत्र म्हणाला (१४): याप्रमाणें सारथि कौसल्येला सांगत असतांना कैकेयीसंबंधाचें सीतेचें बोलणें अवधान न राहिल्यामुळें एकाएकीं त्याच्या तोंडांत आलें होतें; तोंडापुढें आलेले शब्द एकाएकीं नाहींसे करून कौसल्यादेवीला आल्हादकारक असें मधुर भाषण तो तिच्याशीं करूं लागला (१५) असें दिलें आहे. यावरून सीता कांहीं कठोर बोलली असावी असें अनुमान होतें. पण ५२ व्या सर्गांत शृंगवेरपुरांत नावेवर चढतांना रामानें त्याचेबरोबर अयोध्येस निरोप पाठविला आहे. त्या प्रसंगीं लक्ष्मण किंवा सीता कांहींच बोललीं नाहींत. रामानेंच सुमंत्रास सांगितलें, 'कौसल्येला सीतेचा, माझा व आर्य लक्ष्मणाचा माझ्या वचनावरून प्रणिपात कळीव' असें ३१ वे श्लोकांत दिलें आहे. इंगुदी वृक्षाखालीं वस्ती केल्यावेळींहि लक्ष्मणानें सुमंत्राबरोबर कांहीं निरोप पाठविला नाहीं. ५२ व्या सर्गांतील रामानें सांगितलेला निरोप व रामाचा म्हणून सुमंत्रानें कळविलेला निरोप यांत शब्दाचा फरक आहे, पण आशय बहुतेक तोच आहे. सुमंत्र दरबारी माणूस. तो रामाच्या निरोपाची सुनावणी बरोबर करतो. लक्ष्मणानें व सीतेनें त्याचे-बरोबर निरोप दिलेलाच नव्हता, पण आपल्या मनांतील डाचत असलेले विचार सुमंत्रानें लक्ष्मणाचा निरोप म्हणून सांगितले असावेत.

११८ वे सर्गांत सीता व अनसूया यांचा संवाद आहे. यांत आरंभीं पातिव्रत्यावर प्रवचन आहे. पुढें श्लोक २७ पासून सर्ग अखेरपर्यंत सीता आपला इतिहास सांगते. यांत ३२ व्या श्लोकांत

अवाप्तो विपुलामृद्धिं मामवाप्य नराधिपः ।

म्हणजे मी त्याला प्राप्त झाल्यावर त्याची मोठी अभिवृद्धि झाली; अशी

पायगुणाची असतां रामाकडे आल्यावर त्याला वनवास, रावणानें नेल्यावर त्याचा कुळक्षय व पुन्हां अयोध्येस आल्यावर तिला व दुसऱ्यास सुख नाहीं अशी अवस्था व्हावी हें आश्चर्य आहे.

पतिसंयोगसुलभं वयो दृष्ट्वा तु मे पिता ।
चिंतामभ्यगमद्दीनो वित्तनाशादिवाधनः ॥ ३४ ॥

पतीबरोबर संसार करण्याला योग्य वयाची झाल्यावर माझा बाप चिंताक्रांत झाला. नंतर त्यानें स्वयंवर करण्याचें ठरवून राजांना आमंत्रण करून आणलें ( ११८, ४१ ). तेव्हां जडपणामुळें पर्वतप्राय असलेलें तें श्रेष्ठ धनुष्य अवलोकन करतांक्षणीं तें तोलण्याविषयीं असमर्थ असलेले राजे त्याला नमस्कार करून जाऊं लागले ( श्लो. ४३ ). पण राजा जनक म्हणतो, " त्या राजांनीं संगनमत करून माझ्या नगरीला एक वर्ष वेढा दिला. " सीता त्या वेळीं सोळा वर्षांची तरी असावी. तेव्हां वर्षभर वेढा आपल्याकरितां म्हणून पडल्याची गोष्ट घडली असल्यास ती विसरणें संभवनीय दिसत नाहीं. राजे नमस्कार करून जाणें व त्यांनीं वेढा देऊन लढाई करणें या गोष्टी परस्परविरुद्ध आहेत. आतां प्रश्न येतो तो हा. राजा जनक विश्वामित्र वगैरेंच्या पुढें एक दांडगी थाप देतो, का सीता अनसूयेला एक कल्पित कथा सांगते, का या वरुणाच्या चापाची गोष्टच कपोलकल्पित आहे ? सीता म्हणते,

महायज्ञे तदा तस्य वरुणेन महात्मना ।
दत्तं धनुर्वरं प्रीत्या तूणी चाक्षय्यसायकौ ॥११८।३९॥

या ठिकाणीं तस्य हें पद जनकाला उद्देशून आहे. कारण पूर्वींच्याच श्लोकांत ' तस्य बुद्धिरिय जाता ' या ठिकाणीं जनकाला उद्देशून निःसंशय आहे. पण ३९ व्या श्लोकाच्या भाषांतरांत भाऊशास्त्री लेले यांस विसंगति दिसल्यानें समन्वय लावण्याच्या बुद्धीनें त्यांनीं माझ्या पित्याचा पूर्वज जो देवराज त्याला असें पदरचें दडपून दिलें. येथें या चापासंबंधानें गैरमेळ आहेत. तें चाप कोणाला दिलें ? देवराजाला का सीतेचा बाप जो जनक त्याला ? दोन अक्षय्य भात्यांची गोष्ट जनक बोलतच नाहीं. सीता तेवढी तें दिलें असें सांगते.

नमस्कार करून राजे गेले. याला बराच काळ लोटल्यावर ( सुदीर्घस्य तु कालस्य – अयो. कां. ११९।४४ ) राम आला व त्यानें धनुष्य मोडलें. सुदीर्घ काळ म्हणजे १०।१५ वर्षें तरी गेलीं पाहिजेत. वर्षें दहा धरलीं तरी त्या वेळीं सीता कमींत कमी २६ वर्षांची होती असें होतें. राम तर ऊनषोडशवर्षी म्हणजे १६ वर्षांपेक्षां कमी. सीतेच्या हिशेबानें तर १३ वर्षांचाच होता. राजेलोकांमध्यें अशा विषम वयाच्या वधूवरांचीं लग्नें होतात. त्यांत आश्चर्य मानण्यासारखें कांहीं नाहीं.

या प्रसंगीं अनसूयेनें सीतेला दिव्य, श्रेष्ठ माला, वस्त्र, भूषणें, उटी आणि मूल्यवान् अनुलेपन हीं दिलीं. माला, उटी व अनुलेपन, भूषणें व वस्त्रें नेहमीं ताजीं राहाणारीं होतीं.

येथपर्यंत सीतेची बाल-अयोध्याकांडांतील हकीकत आली आहे.

रामाला १४ वर्षें दंडकारण्यांत पाठवावें अशी कैकेयीची मागणी होती. ( अयोध्याकांड सर्ग ११ श्लो. २६ ). वत्स देश सोडल्यावर त्यांस घोर अरण्यांतून जावें लागलें व प्रयाग येथें गंगा-यमुना संगमासंनिध भरद्वाजाश्रमास राम गेला तेव्हां भरद्वाज त्या प्रदेशाचें

अवकाशो विविक्तोयं महानद्योः समागमे ॥

( अयो. कां. ५४।२२ )

‘ महानद्यांच्या संगमावर असलेला हा प्रदेश जनशून्य आहे ’ असें वर्णन करतात. यावरून त्या अरण्यास दंडका म्हणत असावे. याप्रमाणें दंडकारण्याची उत्तर सीमा गंगायमुना ही होती. दक्षिण सीमा वाटेल तितकी खालीं खेचावी.

चित्रकूटहि याच अरण्यांत होता. तेथून राम दक्षिणेकडे निघाला. हे तिघे विराध राक्षसाच्या वनांत आले ( अरण्यकांड २।४ ). लक्ष्मण पुढें, सीता मध्यें व राम मागें याप्रमाणें त्यांचा चालण्याचा क्रम असे. तिघांना पाहून राक्षस त्यांच्याकडे धावला. सीतेला कमरेशीं धरून व उचलून घेऊन तो तेथून पलीकडे गेला. ‘ अंगेनादाय वैदेहीमपक्रम्य ’ ( २।१० ). दोघांच्या मध्यें असलेल्या सीतेला त्यानें उचलून नेलें. हा सीतेवर पहिला अत्याचार होय. रामलक्ष्मणांस या प्रसंगीं कांहीं करतां आलें नाहीं. सीता

भयभीत होऊन वाऱ्यानें हालणाऱ्या केळीप्रमाणें थरथर कांपूं लागली. ‘सीता प्रवेपितोद्वेगात् प्रवाते कदली यथा’ (२।१५). इतक्यांत ती शुभ जानकी विराधाच्या अंकावर बसलेली पाहून शोकानें म्लानवदन झालेला राम लक्ष्मणाला म्हणाला :

तां दृष्ट्वा राघवः सीतां विराधांकगतां शुभाम् ।
अब्रवील्लक्ष्मणं वाक्यं मुखेन परिशुष्यता ॥ २।१६ ॥

यावेळीं राम घाबरून गेला होता व त्याचें तोंडहि कोरडें पडलें होतें. “बा सौम्य लक्ष्मणा, जनककन्या लहानपणापासून सुखांत वाढलेली व सद्वर्तनी असलेली अशी माझी भार्या सीता विराधाच्या अंकावर असलेली तूं अवलोकन कर” (२,१७). रामाच्या मनांत भरतमातेसंबंधानें जें किल्मिष डाचत होतें तें या प्रसंगानें बाहेर येत आहे :

“यदभिप्रेतमस्मासु प्रियंवरवृतं च यत् ।
कैकेय्यास्तु सुसंवृत्तं क्षिप्रमद्यैव लक्ष्मण ॥
या न तुष्यति राज्येन पुत्रार्थे दीर्घदर्शिनी ॥ १९ ॥
यथाहं सर्वभूतानां प्रियः प्रस्थापितो वनम् ।
अद्येदानीं सकामा सा या माता मध्यमा मम” ॥ २० ॥

“हे लक्ष्मणा, वनामध्यें आम्हांला जें दुःख व्हावें म्हणून कैकेयीला वाटत होतें तें व वर प्राप्त करून जें प्रिय करून घ्यावयाचें होतें तें, हें सर्व तिचें अभिलाषित आजच तिला मिळालें! ती मोठी दूरदर्शी असल्यामुळें आपल्या पुत्राला राज्य प्राप्त झालें, येवढ्यानेंच तृप्त होत नसून तें त्याला चिरकाल मिळण्याकरितां आमच्या नाशाची इच्छा करीत आहे. आज सर्वांना प्रिय अशा मला वनांत पाठवून देऊन ती माझी मधली आई कृतकृत्य झाली.” (१८, १९, २०). आणखी राम म्हणतो :

“परस्पर्शात्तु वैदेह्याः न दुःखतरमस्ति मे ।
पितुर्विनाशात्सौमित्रे स्वराज्यहरणात्तथा” ॥२१॥

“बा लक्ष्मणा, जरी माझ्या पित्याचा नाश झाला आहे, व मी आपल्या राज्यापासून भ्रष्ट झालों आहे, तरीसुद्धां विदेह राजकन्या सीतेला

दुसऱ्यानें स्पर्श केलेला पाहून जें दुःख होतें त्यापेक्षां जास्त दुसरें कसलेंहि दुःख मला होत नाहीं." रामाचें असें दीनवाणें भाषण ऐकून लक्ष्मण रागावून चार श्लोकाचें भाषण करिता झाला. पण विराधाच्या अंगावर जाऊन सीतेस सोडविण्याची बुद्धि एकासहि होत नाहीं हें आश्चर्य ! विराधच ओरडून त्याला म्हणाला, " अरे, तुम्ही कोण आहांत व कोणीकडे जाणार हें मला सांगा." तेव्हां रामजी म्हणाले, " आम्ही इक्ष्वाकु कुलामध्यें उत्पन्न झालों असून क्षत्रिय असतां कांहीं कारणामुळें वनामध्यें संचार करीत आहोंत. आतां तूं कोण आहेस व या दंडकारण्यांत संचार कां करीत आहेस हें जाणण्याची आमची इच्छा आहे." ( अरण्य. ३, श्लोक १-३ ). विराधानें आपलें व आपल्या आईबापाचें नांव सांगून तपानें ब्रह्मदेवाला प्रसन्न करून आपण अवेध्य, अच्छेद्य व अभेद्य झालों आहों असेंहि तो म्हणाला. इतकें होईपर्यंत राम स्वस्थ होता. त्यानें क्रुद्ध होऊन त्याच्यावर सात बाण सोडले. सीतेला खालीं ठेवून तो शूल घेऊन रामलक्ष्मणावर धांवला. ते त्याच्यावर शरवृष्टि करीतच होते. तो अवेध्य असल्यानें ते बाण आपोआप गळून पडूं लागले. आपण अवध्य आहों असें त्यानें पूर्वीच बजावलें असतां राम व लक्ष्मण त्याला शरानें विद्ध करण्याचाच मार्ग अवलंबीत होते हें आश्चर्य आहे. मी अच्छेद्य आहे असें त्यानें सांगितलें असतांहि दोघेजण तरवारींनीं वार करूं लागले ( अरण्य. ३।२० ). नंतर त्या दोघांना उचलून घेऊन विराध पळूं लागला तेव्हां राम लक्ष्मणाला म्हणाला, " या मार्गानें हा राक्षस आपणाला पाहिजे तितके दूर घेऊन जावो. ज्या मार्गानें हा राक्षस चालला आहे तोच आपला मार्ग आहे." (२२, २३). रामलक्ष्मणाला खांद्यावर घेऊन तो दंडकारण्याकडे तोंड करून निघाला. तो घोर वनांत प्रविष्ट झाला (२६).

विराधासारखें वाहन मिळाल्यामुळें रामलक्ष्मणांस मौज वाटली असेल. पण बिचारी सीता एकटीच तेथें राहिली. रामानें सात बाण सोडल्यावेळीं विराधानें तिला खालीं जमिनीवर ठेविली होती. पहाः– विद्धोन्यस्य वैदेहीम् ( श्लो. १३ ). ती उच्च स्वरानें आक्रोश करूं लागली. " सत्वनिष्ठ, सुशील व पवित्र असलेल्या या दाशरथि रामाला लक्ष्मणासह

विराध नेत आहे. आतां मला अरवलें, वाघ व चित्ते खाऊन टाकतील. हे राक्षसश्रेष्ठा, तूं मला ने आणि या काकुत्स्थांना सोड." (अरण्य. सर्ग ४, १ ते ३)

तस्यास्तद्वचनं श्रुत्वा वैदेह्या रामलक्ष्मणौ ।
वेगं प्रचक्रतुर्वीरौ वधे तस्य दुरात्मनः ॥ ४ ॥

हा सीतेचा आक्रोश ऐकल्यावर रामलक्ष्मण जागे झाले व विराधाला मारण्याचा विचार त्यांच्या डोक्यांत आला. तेव्हां रामानें उजवा व लक्ष्मणानें डावा असे विराधाचे दोन्ही हात फोडले (५). मग तो खालीं पडला. त्याला खळग्यांत पुरलें.

## सीतेचा रामाला सुंदर उपदेश

नववे सर्गांत सीतेचें रामाशीं भाषण विचार करण्यासारखें आहे. ती म्हणते, "कामापासून तीन व्यसनें उत्पन्न होतात. १ खोटें बोलणें. २ परस्त्रीसेवन. ३ वैर नसतांहि क्रूरपणा धरणें. यांतील पहिलीं दोन आपणाठायीं नाहींत. तिसरें मात्र संभवत आहे. यासाठीं आपण आतां दंडकारण्यांत निघाला आहां तें बंद ठेवावें." (पण चित्रकूट सुटल्यापासूनच दंडकारण्याचा आरंभ झाला आहे असें पूर्वीं आलें आहे. एकंदरींत दंडकारण्य निश्चित नाहीं. तें दक्षिणेस खालीं खालीं घसरत आहे.) ती म्हणते, "दंडकारण्यांत जाणें मला पसंत नाहीं (सर्ग ९ श्लोक १३). वनचर राक्षसांना पाहून त्यांचेवर आपण बाण सोडणारच." शस्त्र हातांत असेल तर क्रूर बुद्धि उत्पन्न होते, अशाविषयीं सीता एक पुराणकथा सांगते. "काष्ठाला अग्नि लागला कीं काष्ठ जळावयाचेंच, त्याचप्रमाणें शस्त्रधाऱ्याच्या मनाला विकार होणारच. वैरावांचून राक्षसांचा वध करण्याची बुद्धि आपणास न होवो. अपराधावांचून राक्षसांचा वध लोकांना संमत होणार नाहीं (श्लोक २५). वनांत राहणाऱ्या जितेंद्रिय आर्तजनांचें रक्षण हें वीर क्षत्रियांच्या धनुष्याचें काम आहे. आपण येथें देशधर्म पाळावा. क्षात्रधर्म अयोध्येस परत गेल्यावर आचरावा. राज्य टाकल्यावर वनांत मुनिवृत्तीनें आपण राहाल तर माझ्या सासूसासऱ्याला आनंद होईल."

अक्षया तु भवेत्प्रीतिः श्वश्रूश्वशुरयोर्मम ।

यदि राज्यं हि संन्यस्य भवेस्त्वं निरतो मुनिः ॥२९॥

( पण सीतेचा सासरा अगोदरच मेलेला होता याचा विसर कसा पडला ? ) ती पुढें सांगते, "नित्यं शुचिमतिः सौम्य चर धर्मं तपोवने" (३२). "आपण आपली मति नेहमीं शुद्ध ठेवून तपोवनांत धर्माचरण करा." सीतेचें सांगणें आपण मुनिधर्मानें कोणाशींहि वैर न धरतां राहूं; म्हणजे आपणास कसलाहि त्रास होणार नाहीं.

## रामाचा कुरापती स्वभाव

यावरून राम हा राक्षसांबरोबर कांहींतरी कुरापत काढीत असे, असें दिसतें. कोणाचीहि निष्कारण कुरापत काढल्यास तो भांडणास येणारच. चित्रकूटावरील मुनींचीहि रामासंबंधानें अशीच तक्रार होती. पहा अयोध्याकांड सर्ग ११६ श्लोक १.

प्रतियाते तु भरते वसन्रामस्तदा वने ।

लक्षयामास सोद्वेगं अथौत्सुक्यं तपस्विनाम् ॥

भरत परत गेल्यावर राम वनामध्यें वास्तव्य करूं लागला असतां तपस्वी लोक दुसरीकडे जाण्याकरितां भयभीत होऊन उत्सुक झाले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. ते आपसांत कुजबुजत. तेव्हां रामानें त्यांस विचारलें, "माझ्याकडून किंवा लक्ष्मण किंवा सीता यामुळें आपणांस कांहीं त्रास होत आहे काय?" त्यांनीं 'नाहीं' म्हणून उत्तर दिलें. पण ते आणखी म्हणाले :

"त्वन्निमित्तमिदं तावत्तापसान्प्रतिवर्तते

रक्षोभ्यस्तेन संविग्नाः कथयंति मिथः कथाः" ॥ १० ॥

"तुझ्यामुळें राक्षसांपासून हें भय तपस्वी लोकांना प्राप्त झालेलें आहे; आणि यामुळें ते तपस्वी उद्विग्न होऊन आपआपसांत बोलत आहेत." रावणाचा कनिष्ठ भ्राता खर, त्याला तुझें येथें राहणें सहन होईनासें झालें आहे ( श्लोक १२ ).

" त्वं यदाप्रभृति ह्यस्मिन्नाश्रमे तात वर्तसे ।
तदाप्रभृति रक्षांसि विप्रकुर्वंति तापसान् " ॥ १३ ॥

" बा रामा, तूं जेव्हांपासून या आश्रमांत राहात आहेस, तेव्हांपासून या राक्षस तापसांना त्रास देत आहेस." बरेचसे ऋषि आश्रम सोडून गेले यावरून रामच राक्षसांची कांहीं खोडी काढीत असावा. चित्रकूटापर्यंत दंडकारण्य असून खर तेथील अधिकारी होता. पण रामानें, रावणाची बहीण खराची बायको तिला नाककान कापून विद्रूप करीपर्यंत खरानें रामाबरोबर तंटा काढला नव्हता. रामानेंच याप्रमाणें तंटा उकरून काढला. सीतेला हें रामाचें वर्तन पसंत नव्हतें म्हणूनच ती सांगते, 'तपोवनांत तपस्व्याप्रमाणें राहा.' पण रामाला हा उपदेश पसंत पडला नाहीं. राक्षसांपासून मुनींना त्रास होत आहे व ते माझ्यापासून रक्षण याचीत आहेत, तेव्हां माझें कर्तव्य केलें पाहिजे असें बोलून रामानें तिच्या भाषणाबद्दल तारीफ केली. पण आपण तिची काय किंमत करतों हें बजावण्यास रामजी डरले नाहींत :

" अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम् ।
न तु प्रतिज्ञा संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः " ॥

( अरण्य. १०।१८ )

" हे सीते, मी आपल्या जीविताचा अथवा लक्ष्मणासह तुझा त्याग करीन परंतु केलेली प्रतिज्ञा आणि त्यांतून ब्राह्मणांशीं केलेली प्रतिज्ञा मी फिरविणार नाहीं." सीतेला सोडण्यास तयार असलेल्या रामानें तिचा अपराध नाहीं अशी खात्री असतांना अखेर तिला टाकलीच. पण त्यावेळीं प्रतिज्ञापालनाचा प्रश्नहि नव्हता.

ठिकठिकाणच्या आश्रमांत कोठें तीन, कोठें चार, पांच, सहा, सात, आठ, दहा, बारा महिने व कोठें दीड वर्ष असा मुक्काम करून रामानें दहा वर्षें काढिलीं. यानंतर रामाला अगस्तिदर्शनाची इच्छा होऊन राम तिकडे गेला. अगस्तीचें स्त्रियांविषयीं मत बरेंच हीन आहे. तो प्रथमतः सीतेची तारीफ करितो व तिचें वर्तन खुलून दिसावें म्हणून एकंदर स्त्रीजातीची निंदा करीत आहे. तो म्हणतो :

" एषा हि प्रकृतिः स्त्रीणामासृष्टे रघुनंदन ।
समस्थमनुरज्यंते विषमस्थं त्यजंति च ॥ ५ ॥
शतहृदानां लोलत्वं शस्त्राणां तीक्ष्णता यथा ।
गरुडानिलयोः शैघ्र्यमनुगच्छंति योषितः " ॥ ६ ॥

" हे रघुनंदना, पतीचें यथास्थित असलें म्हणजे त्याचें मनरंजन करावयाचें आणि त्याला विपन्नावस्था आली असतां त्याची पर्वा करावयाची नाहीं हा सृष्टीच्या आरंभापासून स्त्रियांचा स्वभाव आहे ( ५ ). विद्युल्लतेचें चांचल्य, शस्त्रांचा तीक्ष्णपणा, आणि गरुड व वायु यांची त्वरा ( अनुक्रमें एके ठिकाणीं न राहण्यांत, फार दिवसांचें प्रेमबंधन तोडून टाकण्यांत आणि निंद्य कार्य करण्याला प्रवृत्त होण्यांत ) स्त्रिया स्वीकारीत असतात. " ( अरण्यकांड सर्ग १३।५–६ ). नंतर त्या आश्रमापासून दोन योजनांवर असलेला पंचवटीचा प्रदेश राहण्यास योग्य आहे असें त्यांस अगस्तीनें सांगितलें.

## जटायूची वंशावळ कशासाठीं ?

पंचवटीस जातांना वाटेंत त्यांना जटायु भेटला. तो आपली वंशावळ सांगत आहे. याचा बाप अरुण. कश्यपाला ताम्रेच्या पोटीं पांच कन्या झाल्या. त्यांतील सर्वांत धाकटी शुकी. तिची नात विनता. विनतेचा अरुण. अरुणापासून श्येनीला झालेला पुत्र जटायु. अरुण हा शुकीचा पणतु. श्येनी ही शुकीची थोरली बहीण. पक्ष्यांमध्यें हीं नातीं पाहण्याचें कारण नाहीं. पण सृष्ट्युत्पत्तीसंबंधानें थापा कशा मारल्या जातात याचा हा मासला आहे.

जटायु रामास म्हणतो :

" सोहं वाससहायस्ते भविष्यामि यदीच्छसि ।
सीतां च तात रक्षिष्ये त्वयि याते सलक्ष्मणे " ॥१४।३४॥

" तुझी इच्छा असल्यास निवासस्थानामध्यें मी तुला सहाय्य करणारा होईन आणि बा रामा, लक्ष्मणासह तूं बाहेर गेल्यावर मी सीतेचें रक्षण करीत जाईन." ही जटायूची मदत रामानें स्वीकारिली. पहा :

स तत्र सीतां परिदाय मैथिलीं सहैव तेनातिबलेन पक्षिणा ।
जगाम तां पंचवटी सलक्ष्मणो रिपून्दिधक्ष्यन् स वनानि पालयन् ॥३६॥

मिथिल राजकन्या सीता रक्षणाकरितां जटायूच्या स्वाधीन करून तपोवनाचें रक्षण करण्याकरितां राक्षसशत्रूंचा वध करण्याच्या उद्देशानें त्या अतिबलाढ्य पक्ष्याला बरोबर घेऊनच तो राम लक्ष्मणासह त्या पंचवटीकडे गेला (३६).

रामानें दाखविलेल्या जागीं लक्ष्मणानें आश्रम बांधला. नंतर त्यानें पुष्पपूजा व वास्तुशांति यथाविधि केल्यावर रामाला त्यानें तें आश्रमस्थान दाखविलें ( सर्ग १५, २५ ). वडील बंधूबरोबर लक्ष्मण आला तो दास म्हणून आला का बंधु म्हणून आला अशी शंका येते. आश्रमासारखें मोठें काम करतांनाहि राम त्याला कोणतीहि मदत देत नाहीं. भिंती त्यानेंच घालाव्या, छप्पर त्यानेंच तयार करावयाचें, जमीनहि त्यानेंच करावयाची, पूजेला लागणारीं फुलें आणण्याचें व वास्तुशांत करण्याचेहि श्रम राम घेत नाहीं ( अयोध्याकांड सर्ग ५७ ). यांत चित्रकूट पर्वतावर वास करण्याच्या वेळींहि रामाच्या आज्ञेनें लक्ष्मणानें पर्णकुटि तयार केली व पुन्हां हुकूम झाल्यावर वास्तुशांति करण्याकरितां हरण मारून आणून तो भाजून तयार केला. तेथेंहि राम त्याला कांहींच मदत देत नाहीं. यावरून लक्ष्मण हा रामाचा दास म्हणून बरोबर आला असावा असें वाटतें. रामाला तरी त्याच्या कष्टाबद्दल त्याची कींव आल्याचें दिसत नाहीं. पंचवटीची पर्णकुटि पाहून रामाला पराकाष्ठेचा हर्ष झाला, त्यानें लक्ष्मणाला दृढ आलिंगन दिलें; त्याची पाठ थोपटली व त्याची तारीफ केली. तेथें राहात असतां शरदृतु संपून हेमंत सुरू झाला. तेथें नदीवरून स्नान करून येऊन बसला असतां शूर्पणखा आली. तिची चेष्टा करून अखेर तिचें नाक व कान हीं कापून टाकलीं. तिनें आपली फिर्याद प्रथमतः खराकडे नेली. त्यानें चौदा राक्षस पाठविले. रामानें त्यांचा वध केला. पुढें रामानें १४००० राक्षसांसह खर व दूषण यांचाहि वध केला.

नंतर अकंपनानें ती बातमी रावणास कळवली. रावण स्वतः रामाबरोबर लढण्यास तयार झाला. परंतु अकंपनानें त्यास सांगितलें कीं,

" न हि रामो दशग्रीव शक्यो जेतुं रणे त्वया ।
रक्षसां वापि लोकेन स्वर्गः पापजनैरिव " ॥
अरण्यकांड ३१।२७.

" रामाला जिंकणें हें तुझ्याकडून शक्य नाहीं. पण मी रामवधाचा उपाय सांगतों तो ऐक. सीता म्हणून त्याची एक अतिसुंदर व जगतामध्यें उत्कृष्ट भार्या आहे. ती नेहमीं तरुण राहणारी आहे. तिच्या अवयवांची ठेवण सारखी व रेखलेली आहे, आणि रत्नांनीं ती भूषित झालेली असून सर्व स्त्रियांमध्यें उत्कृष्ट आहे (२९). देवांगना, गंधर्वस्त्री, अप्सरा अथवा नागकन्या यांतहि तिच्यासारखी कोणी नाहीं; मग मनुष्य-जातीची स्त्री तिच्यासारखी कोठून असणार ?" (३०).

" तस्यापहर भार्यां त्वं तं प्रमथ्य महावने ।
सीतया रहितो रामो न चैवहि भविष्यति " ॥३१॥

" तेव्हां कोणत्या तरी उपायानें महावनांत त्याचें उच्चाटन करून तूं त्याची भार्या हरण कर. सीतेचा विरह झाला असतां राम जिवंत राहाणार नाहीं" (३१). रावणाला ही गोष्ट पसंत पडली. तो मारीचाकडे गेला. मारीचानें बोध करून सीतेला पळवून नेण्याचा विचार सोडून दे व आपल्या भार्येच्या ठिकाणीं रममाण हो असें सांगितलें ( ३१-४९ ). रावण हें ऐकून लंकेस परत गेला.

शूर्पणखेनें लंकेस जाऊन रावणाशीं चिडून कठोर भाषण केलें. व शेवटीं रामलक्ष्मणांचें वर्णन करून सीता कशी सुंदर आहे हें सांगितलें. " ती सीता तुला भार्या योग्य असून तूंहि तिला पति उत्कृष्ट आहेस. (३४।१९). सीता तुझी भार्या व्हावी म्हणून मी तिला आणण्यास उद्युक्त झालें असतां क्रूर लक्ष्मणानें मला विरूप करून टाकिलें." (३४।२१). याप्रमाणें शूर्पणखेनें रावणाची उठावणी केली.

रावणानें आपला विचार सचिवांपुढें मांडून त्यांची संमति मिळविली. अशी संमति मिळवितांना शूर्पणखेवर जो अत्याचार रामलक्ष्मणांनीं केला होता त्यावर बराच जोर दिलेला दिसतो. नंतर रावणानें चार गर्दभांचा

रथ या वेळीं पसंत केला व त्यावर आरूढ होऊन तो समुद्र तरून गेला. पुढें तो मारीच-आश्रमास पोंचला. तेथें मारीचानें पुन्हां येण्याचें कारण विचारिलें. रामानें काय काय केलें हें सांगून रामाविषयीं तो म्हणाला, " त्या सैन्याचा वध करणारा तो राम क्षत्रियांना कलंक लावणारा, दुःशील, कर्कश, तीक्ष्ण, मूर्ख, लुब्ध, अजितेंद्रिय, (११) धर्माचा त्याग केलेला व अधर्मनिष्ठ असून प्राण्यांच्या अहिताविषयीं तत्पर आहे व त्यानेंच अरण्यामध्यें वैरावांचून केवळ शक्तीच्या जोरावर, (१२). कर्ण व नासिका यांचा अपहार करून माझी भगिनी विरूप केली आहे. तेव्हां देवकन्ये-समान असलेल्या त्याच्या सीतानामक भार्येला जनस्थानांतून (१३) मी पराक्रमानें घेऊन येणार आहे. त्याविषयीं तूं मला सहाय्य हो " (१४). मारीचानें त्याला कसलें साहाय्य द्यावें हेंहि रावण येथेंच सांगून टाकत आहे.

## सुवर्णमृगाची बनावट कल्पना

" रौप्यबिंदूंनीं युक्त असा तूं एक सोन्याचा अद्‌भुत मृग हो आणि त्या रामाच्या आश्रमामध्यें सीतेच्या पुढें चालूं लाग (१८) म्हणजे मृगरूप धारण केलेल्या तुला अवलोकन करितांक्षणीं सीता ' हा मृग धरा ' म्हणून भर्त्याला आणि लक्ष्मणाला निःसंशय सांगेल (१९). असें तिनें सांगितल्या-नंतर ते तुझ्यामागोमाग गेले म्हणजे शून्य झालेल्या त्या आश्रमामध्यें जाऊन चंद्रप्रभा हरण करणाऱ्या राहूप्रमाणें कांहीं एक अडथळा न येतां सीतेला मी सुखानें हरण करून नेईन (२०). तदनंतर भार्येचा अपहार झाल्यामुळें राम कृश झाला असतां मी अंतःकरणामध्यें कृतकृत्य होऊन अनायासानें गुप्तपणें रामावर प्रहार करीन. " (२१).

मारीच रामाला फार भीत होता. त्यानें रामाच्या पराक्रमाचें वर्णन करून रावणाला अविचार न करण्याचा बोध केला. रावणाला हा उपदेश पसंत पडला नाहीं. त्यानें मारीचाला तेंच सुवर्णमृग होण्याचें काम सांगितलें. पण यावेळीं ' हा सीते, हा लक्ष्मण, ' असा ध्वनि काढण्यास सांगितलें. सीता एकट्या रामाला मृगासाठीं पाठवील; व लक्ष्मणास बाहेर काढण्यासाठीं ' हा सीते, हा लक्ष्मण ' अशी आरोळी द्यावयाची होती

( सर्ग ४०।२१ ). हें काम केल्यास अर्धें राज्य तुला देतों अशी रावणानें लालूच दाखविली व काम करण्याचें नाकबूल केल्यास त्याला तात्काळ ठार मारण्याची भीति घातली ( सर्ग ४०।२६ ). मारीच भीतीनें निघाला व रावणाच्या सांगण्याप्रमाणें त्यानें केलें. सुवर्णमृगासाठीं सीतेनें रामास पाठविलें. "हा सीते, हा लक्ष्मण" अशी आर्तवाणी ऐकून लक्ष्मणाची जाण्याची इच्छा नसतांहि दुरुत्तरें बोलून त्यास रामाच्या साह्यास पाठविलें व आश्रमांत एकटी राहिली. तिचें रावणानें जबरदस्तीनें हरण केलें. रावण पराक्रमानें सीतेस घेऊन येणार होता; पण सुवर्णमृगाच्या कथेंत त्याचा पराक्रम मुळींच नाहीं.

ही सुवर्णमृगकथा हरदासी थाटावर मनोरंजक असली तरी ती अगदींच बनावट व काल्पनिक आहे. या कथेसाठींच मारीचास आणलें आहे. रामलक्ष्मण नेहमींच शिकारीस जात. ते गैरहजर आहेत अशी संधि साधून रावणानें जबरदस्तीनें सीतेला नेलें आहे. कथानकांत वैचित्र्य आणण्यासाठीं ही चित्रमृगाची कथा रचून सीतेच्या पदरीं पोरकटपणा, उतावीळपणा वगैरे दोष बांधले आहेत. सीताहरणापर्यंत कथाभाग वर्णिल्यावर ही कथा काल्पनिक मानण्यासाठीं उपलब्ध असलेला पुरावा मांडण्यांत येईल.

—महाराष्ट्र-शारदा, जून व जुलै १९३७

# वाल्मीकि रामायणांतील विमानविहार

"वाल्मीकि रामायणांतील विमान–विहार" या मथळ्याचा श्री. गजानन गणेश भावे यांचा लेख सह्याद्रि मासिकाच्या जुलै १९३६ च्या अंकांत प्रसिद्ध झाला, त्यावर पुढील दोन अंकांत कांहीं पत्रव्यवहारहि झाला. सदरचे लेख अलिकडेच माझ्या नजरेस पडले.

आमच्या देशांत विमानविद्या पूर्वी होती काय, हा एक प्रश्न आहे. याचें ठाम उत्तर देणें कठीणच असलें तरी त्यासंबंधीं उपलब्ध असलेला पुरावा निर्विकार व निःपक्षपाती बुद्धीनें तपासून काय तो निर्णय देणें युक्त होईल.

"संस्कृत भाषेंत विमान शब्दाचें अनन्यसाधारण अस्तित्व" आहे याचा भावे यांस अभिमान वाटत आहे, तें योग्यच आहे. जुन्या ग्रीक, रोमन अथवा स्कांडिनेवियन वाङ्मयांतील देवदूत आकाशमार्गानें संचार करीत. पण त्यांचें साधन एखादें यान नसून त्यांस पक्ष्याप्रमाणें उडण्यास पंख असत हें आहे.

आकाशमार्गानें पक्षी फार जलद व अगदीं कमी श्रमांत प्रवास करतात; माणसास तसें करतां येत नाहीं ही गोष्ट सर्वांच्या अनुभवाचीच होती. पक्ष्याप्रमाणें उडतां आलें पाहिजे ही मनुष्याची आकांक्षा असल्यामुळें व देव हे मानवांपेक्षां श्रेष्ठ व सामर्थ्यवान् मानले गेल्यानें त्यांना आकाशांतून संचार करतां येतो, अशा कल्पना सर्वत्र आढळतात. ग्रीक, रोमन वगैरेंनीं देवांना पंख आहेत व त्यांच्या साह्यानें ते आकाशांतून संचार करीत अशी कल्पना केली. हिंदी आर्यांनीं आपल्या दोन मुख्य देवांस म्हणजे ब्रह्मदेव व विष्णु यांस हंस व गरुड असे दोन पक्षीच वाहनासाठीं कल्पिले. या वाहनांवर बसून हे देव आकाशभ्रमण करतात अशी हिंदूंची समजूत आहे. यापेक्षां कमी दर्जाचे देव व गंधर्व यांस आकाशांतून संचार करणारीं वाहनें म्हणजे विमानें पुरविण्यांत आलीं असें दिसतें. यहुदी, ख्रिस्ती व इस्लाम मतांप्रमाणें देवदूत (Angels) यांना चित्रांत पंख दाखविले जातात.

**कल्पनेच्या भराऱ्या**

यासंबंधीं विचार करतां पहिली कल्पना पंख आहेत अशी. त्यांत हंस, गरुड हे पक्षी प्रत्यक्ष वाहन होते अशी सुधारणा झाली. त्यापुढचा पल्ला म्हणजे वाटेल तिकडे फिरणारें विमान. कल्पनेच्या भरारींत हिंदी आर्यांनीं या कामीं इतरांवर सरशी केली यांत संशय नाहीं. रामायणांत मात्र शंकर व ब्रह्मदेव यांनाहि विमानांतून आणलें आहे. इंद्र याचें आवडतें वाहन म्हणजे ऐरावत व उच्चैःश्रवा घोडा. पण सीतेच्या अग्नि-दिव्याच्या वेळीं इंद्रालाहि विमानांतून यावें लागलें आहे. फार तर काय, दशरथासारखा माणूस मेल्यावर चौदा वर्षांनीं पूर्वीचा देह घेऊन सदर प्रसंगीं विमानांतून आला आहे. एकंदरींत त्यावेळीं विमानांची खूप गर्दीच गर्दी कल्पिली आहे.

विमान या शब्दाची उत्पत्ति उघड आणि स्पष्ट आहे. वि म्हणजे पक्षी. त्याच्या गतीसारख्या गतीचें. पाखरांच्या गतीकडे लोकांचें लक्ष पूर्वीपासूनच आहे. ज्या पोकळींत पक्षी उडतात तिला 'वियत्' असें नांव वि = पक्षी यावरूनच पडलेलें आहे.

विमान शब्दाचे ओकांच्या कोषांत सात अर्थ दिलेले आहेत :

(१) अपमान, (२) परिमाण, (३) विमान, आकाशयान, (४) रथ इत्यादि वाहन, (५) घोडा, (६) सात मजली वाडा, (७) राजवाडा. यांतील पहिल्या दोन अर्थांचा विचार करण्याचें कारण नाहीं.

विमान हा शब्द रामायणांत जेथें जेथें आला आहे त्यांतील बहुतेक स्थळें श्रीयुत भावे यांनीं आपल्या लेखांत संग्रहित केलीं आहेत. विमान शब्दाचा अर्थ सात मजली वाडा असा कोषकार देतात. पण श्री. भावे हे त्याचा अर्थ गच्ची असा करतात व या गच्च्या आकाशयानांच्या 'लॅंडिंग प्लेसीस' असतील अशी कल्पना करतात. सात मजली वाडा या अर्थानें विमान शब्दाचा प्रयोग मेघदूत व भागवत या ग्रंथांत रा. ओक यांस आढळला आहे व तो त्यांनीं आपल्या कोषांत दिला आहे.

गच्ची या अर्थी विमान शब्दाचा प्रयोग कोणत्याहि कोषांत किंवा पुराणग्रंथांत श्री. भावे यांस आढळला नाहीं. 'परंतु रामायणांत मात्र

अयोध्या, लंका इत्यादि नगरींच्या वर्णनांत ‘ विमानगृहशोभिताम् ’ अशीं वाक्यें आलीं आहेत व तीं गच्च्यांना अनुलक्षूनच असावींत असें वाटतें ’ असा तर्क श्री. भावे हे करतात. कारण या गच्च्यांचा उपयोग विमानें उतरण्याचा जागा म्हणून श्री. भावे यांस करावयाचा आहे व त्यासाठीं विमान शब्दाचा गच्ची हा अर्थ त्यांना ओढून ताणून लावण्याची स्फूर्ति झाली आहे.

‘ पुष्पकेतर विमानें ’ या मथळ्याखालीं श्री. भावे लिहितात, ‘ लंकेंत पुष्पक विमानाव्यतिरिक्त आणखीहि विमानें होतीं; परंतु तीं विमानें सर्वगामी नसून मर्यादित शक्तीचीं असल्यामुळें त्यांचा ग्रंथांत प्रामुख्यानें उल्लेख नाहीं. ’ या म्हणण्याला आधार त्यांना देतां येत नाहीं.

राक्षसांना आकाशसंचाराचें सामर्थ्य होतें व याचा उपयोग रामायणांत अनेक वेळां केलेला आढळतो. पण एवढ्यावरून हे राक्षस लहान लहान विमानांच्या सहाय्यानें आकाशांतून उडून जात, असें म्हणणें कल्पनाशक्तीला मोठा ताण आहे. सबंध रामायणांत पुष्पक विमानाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि विमानाचा प्रत्यक्ष उल्लेख तर नाहींच, पण अप्रत्यक्षहि आढळला नाहीं.

### एक दाणा म्हणजे रास नव्हे

एक घर म्हणजे गांव नव्हे, एक झाड म्हणजे अरण्य नव्हे व एक दाणा म्हणजे रास नव्हे असें श्रेष्ठ म्हणतात. म्हणूनच एका विमानाचा उल्लेख आहे म्हणून तो, त्या कालीं विमानविद्या माहीत होती, विमानें सर्वत्र फिरत होतीं, असें अनुमान करण्यास आधार आहे असें म्हणतां येत नाहीं.

पुष्पक विमान कोणीं, कसें तयार केलें व तें रावणाकडे कसें आलें याची कथा पाहिली म्हणजे त्या कालीं दुसरीं लहानमोठीं विमानें असणें किती अशक्य आहे हें दिसून येतें. ही कथा श्री. भावे यांनींच आपल्या लेखांत उद्धृत केली आहे. “ स्वर्गांत विश्वकर्म्यानें तें ब्रह्मदेवाकरितां तयार केलें, ब्रह्मदेवाकडून कुबेरानें तें तपःसामर्थ्यानें संपादिलें, व कुबेराला जिंकून तें राक्षसेश्वर रावणानें लंकेंत हरण करून नेलें. ” असलें विमान करण्याचें सामर्थ्य फक्त विश्वकर्म्यालाच होतें; असा रामायणकाराचा स्पष्ट

उल्लेखच आहे. मानवी शक्तीला व बुद्धीला तें सामर्थ्य नसल्यामुळेंच रावणाला तें आपल्या थोरल्या भावाकडून दंडेली करून मिळवावें लागलें. त्याला तें आपल्या कारागिराकडून तयार करतां येण्यासारखें नव्हतें. तसें करतां आलें असतें तर त्यानें पुष्पकाच्या तोडीचीं अनेक विमानें बांधविलीं असतीं. कुबेरासारख्या धनाढ्यालाहि आपल्या धनसामर्थ्यानें तें तयार करवतां आलें नाहीं. त्याला तें ब्रह्मदेवाकडून तपःसामर्थ्यानें मिळवावें लागलें. रामासारख्या सुसंस्कृत व संपत्तिमान आर्यदेशाच्या राजाला पुष्पक विमानाच्या कामगिरीचा अनुभव आला असतांहि तसलीं विमानें बांधण्याची इच्छा झाली नाहीं. यावरून असलें विमान बांधणें व चालवणें, हें मानवी बुद्धीच्या व शक्तीच्या आटोक्याबाहेरचें आहे, अशक्य कोटींतील आहे, अशीच समजूत त्या कालीं असली पाहिजे.

विश्वकर्म्याशिवाय इतरांना विमान तयार करतां येत नसल्यानें दुसरीं लहान विमानें लंकेंत किंवा अयोध्येंत असण्याचा संभवच नाहीं. कारण त्यांचा उल्लेख कोठेंच आलेला नाहीं. अशीं विमानें खरोखरच उपयोगांत असतीं तर त्यांचा उल्लेख येणें अनिवार्य होतें. दशरथ राजा मरण पावला व पुत्रांपैकीं कोणीहि जवळ नव्हता. अशा प्रसंगीं भरत-शत्रुघ्नाला तांतडीनें आणविणें जरूर होतें. या वेळीं अयोध्येंत विमानें असतीं तर भरतास आणण्यास पाठवलेले दूत घोड्यावर बसून कंटाळवाणा ३–४ दिवसांचा प्रवास न करतां एक दिवसांतच गिरिव्रज नगरास पोंचले असते व भरतहि तांतडीनें एकाच दिवसांत अयोध्येस पोंचला असता. त्याचा लवाजमा मागाहून आला असता. पण तसें न करतां इतरांबरोबर भरतहि जमिनीवरून चालतच आला आहे. वाटेंत त्यास सात रात्रीं घालवाव्या लागल्या असें वर्णन आहे. यावरून त्या वेळीं अयोध्येंत तरी विमानें मुळींच नव्हतीं, असें अनुमान निर्विवाद निघतें.

लंकेंतहि पुष्पकाशिवाय दुसऱ्या विमानाचा उल्लेख नाहीं. यामुळें त्या काळीं आर्यावर्तांत किंवा कोठेंहि विमानांची वाहतूक सरसहा होत होती असें म्हणण्यास आधार नाहीं.

### वस्तुस्थिति का कविकल्पना ?

रामायणांतील विमानाचे उल्लेख वस्तुस्थिति दाखविणारे आहेत का

ती कवीची निव्वळ कल्पना आहे याचाहि विचार करणें अप्रस्तुत नाहीं.

कल्पनाशक्तीला स्वैर सोडून कळसूत्री लाकडी घोड्याची गोष्ट 'अरेबियन नाइट'मध्यें आलेली आहे. पंचतंत्रांतहि तसल्या वाहनाचा उपयोग केल्याचा उल्लेख एका कथेंत आहे. जूल्स व्हर्न या कादंबरीकारानें विमानोड्डाण–साधनानें पृथ्वीप्रदक्षिणा करून पैज जिंकल्याची कथा लिहिली आहे. त्या वेळेस विमानविद्येस नुकतीच सुरवात झालेली होती. कविकल्पनेला मर्यादा नसते. कवीनें निर्माण केलेल्या सृष्टींत सत्यावर आधारलेलें वर्णन किती आहे, याची छाननी केल्याशिवाय ग्रंथांत वर्णिलेलें सर्वच खरें मानणें म्हणजे निव्वळ भोळेपणा आहे.

रावणाच्या संग्रहास असलेल्या पुष्पक विमानाखेरीज सीतेच्या अग्नि-दिव्याच्या वेळीं आलेले देव विमानांतून आल्याचा उल्लेख आहे.

राजा कुबेर, पितरांसहवर्तमान यम, देवराज सहस्रनयन इंद्र, जलाधिपति वरुण, तीन नेत्रांनीं युक्त असलेला श्रीमान् वृषध्वज महादेव आणि सर्व जगताचा उत्पादक व ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ ब्रह्मदेव हे सर्वहि सूर्यतुल्य तेजस्वी विमानांमध्यें आरूढ होऊन व एकत्र जुळून लंकेमध्यें आल्यानंतर रामाजवळ आले. ( युद्धकांड सर्ग ११०, श्लोक २, ३, ४ ). या वेळीं या देवांची सहा व दशरथ बसून आलेलें सातवें अशीं सात विमानें तेथें आलीं होतीं असें लिहिलें आहे. यांतील इंद्र व कुबेर यांना विमानें होतीं, असें अमरकोषावरून म्हणतां येतें. पण यम, वरुण, महादेव व ब्रह्मदेव यांना आकाशगमन करण्यास विमानें होतीं, असा उल्लेख इतरत्र कोठेंहि आढळला नाहीं. कुबेराच्या विमानाचें नांव पुष्पक होतें, असें अमर-कोषांत आहे. पण सीतादिव्याच्या वेळीं व पूर्वीहि पुष्कळ वर्षें तें विमान कुबेराच्या वहिवाटीस नसून रावणानें बळकाविलें होतें. मग या वेळीं कुबेराला दुसरें विमान कोठून मिळालें, ही शंका रहातेच. त्याप्रमाणें इतर देवांना मिळालेलीं विमानें कोठून आलीं व कोणीं तयार केलीं याचाहि उलगडा होत नाहीं.

सृष्टीचा उत्पन्नकर्ता, पालनकर्ता व संहारकर्ता सर्वशक्तिमान, सर्वज्ञ असा अनादि एक ईश्वर आहे, हें मान्य केलें तरी ब्रह्मदेव, विष्णु व

शंकर हे तीन देव स्वतंत्र आहेत, त्यांचे लोक निराळे आहेत, त्यांचीं पृथक् वाहनें आहेत, त्यांना बायका व मुलें आहेत, वगैरे गोष्टी काल्पनिक आहेत, म्हणून हे देव काल्पनिक विमानांतून आले, असेंच म्हणावें लागतें. पुराणकालीं विमानविद्या अस्तित्वांत होती, या गोष्टीच्या शाबिती-करितां असल्या काल्पनिक विमानांचा पुरावा उपयोगीं पडण्यासारखा नाहीं. दशरथाच्या विमानाचीहि तीच गोष्ट आहे. चौदा वर्षांपूर्वी मेलेला माणूस मर्त्य देहानें पुन्हां मृत्युलोकांत आला व त्यानें राम लक्ष्मणाला आपल्या मांडीवर घेऊन सीतेच्या पावित्र्याचा निर्वाळा दिला, ही गोष्ट आजच्या ज्या विद्वानांना खरी वाटते ते धन्य आहेत! सीतेनें अग्निदिव्य केलें व त्या प्रसंगीं हजर असलेल्या देवांनीं व दशरथानें ती पवित्र आहे, अशी खात्री केली वगैरे गोष्टी राम, लक्ष्मण, बिभीषण व त्याचे मंत्री आणि सुग्रीव व त्याचे नोकर यांनीं आपल्या डोळ्यानें पाहिलेल्या होत्या हें खरें असेल तर त्या त्यांनीं अयोध्यावासी जनांस सांगित-लेल्या असल्या पाहिजेत. परंतु हा प्रत्यक्ष पाहिलेला साक्षीपुरावा त्यांस बिलकुल पटला नाहीं व त्यांनीं काहूर उठविल्यामुळें सीतेचा त्याग करणें रामास भाग पडलें. यावरून देवांचें आगमन, दशरथाची साक्ष व त्यांचीं विमानें या सगळ्या गोष्टी त्या काळीं विश्वसनीय वाटत नव्हत्या असेंच दिसतें.

### पुष्पक विमान

आतां, राहतां राहिलें एकच पुष्पक विमान. हें तरी खरें होतें, का ही कविकल्पनाच आहे याची छाननी करणें जरूर आहे. हें विमान स्वर्गांत विश्वकर्म्यानें ब्रह्मदेवाकरितां तयार केलें. ब्रह्मदेवाकडून कुबेरानें तें तपःसामर्थ्यानें संपादलें. कुबेराल ि ून राक्षसेश्वर रावणानें तें लंकेंत हरण करून नेलें.

रामायणांत ब्रह्मदेव वारंवार येत आहे. त्या मानानें वाल्मीकीच्या मतें विष्णु व शंकर हे कमी दर्जाचे दिसतात. पुढील काळच्या पुराणांत ब्रह्मदेवाचा भाव पुष्कळच उतरला आहे व तो पूजार्हहि राहिला नाहीं. पण ब्रह्मदेव वगैरे देव काल्पनिक असल्यामुळें त्यांच्याकरितां बनविलेलें पुष्पक विमान हीहि कल्पना दिसते. पण हे देव खरे मानले तरी पुष्पक

विमानाचें अस्तित्व पटणें कठीण आहे. या विमानाचें वर्णन उत्तरकांड सर्ग १५ श्लोक ३६।४० यांत दिलेलें आहे.

त्या कुबेराला जिंकल्यानंतर त्या राक्षसाधिपतीनें त्याचें जयप्रद पुष्पक विमान घेतलें (३६). तें विमान सुवर्णस्तंभांनीं परिवेष्टित होतें. त्याच्या द्वारांना वैदूर्य रत्नें व हिरे लावलेले होते; सर्वदा सफल असलेले वृक्ष त्या ठिकाणीं होते (३७). मनाप्रमाणें वेग व इच्छेप्रमाणें गति व रूप धारण करणाऱ्या त्या आकाशगामी विमानाला रत्नजडित सुवर्णाचे जिने होते; त्यांतील बसावयाच्या जागा उत्कृष्ट सुवर्णाच्या केलेल्या होत्या (३८). कधींहि नाश न पावणारें व सर्वदा मनाला व दृष्टीला सुखावह होणारें तें विमान देवांनाच बसण्यास योग्य होतें; अनेक आश्चर्यकारक गोष्टी यामध्यें होत्या; अनेकप्रकारच्या चितारी कामामुळें तें सुंदर झालें होतें. ब्रह्मदेवानें सर्व प्रकारच्या भोग्य वस्तूंसह तें मनोहर व अनुपम विमान निर्माण केलें होतें. त्यांत शैत्य नव्हतें; उष्णहि नव्हतें आणि सर्व ऋतूंमध्यें तें शुभ विमान सुखावह होतें (३९।४०). बसणाऱ्याच्या इच्छेप्रमाणें गमन करणारें होतें (कामगम्) (४१).

हें वर्णन वाचून थोडा विचार केल्यास हें विमान निव्वळ काल्पनिक असलें पाहिजे असें दिसून येईल. एखाद्या महाराजाच्या खास महालाची सजावट जशी करण्यांत येते, त्याप्रमाणेंच या आकाशयानाचीहि आहे. सोन्याचे खांब, दारांना वैदूर्य रत्नें व हिरे यांचें जडावाचें काम, मोत्यांच्या सरांचें आच्छादन हे अलंकार तर होतेच. पण सर्वदा सफल असलेले वृक्ष त्या विमानांत होते असें म्हणणें म्हणजे तें विमान एखाद्या बागेंतील सात मजली इमारतच कवि समजला कीं काय अशी शंका येते. कारण आकाशयानांत अशी बागेची सोय करणें मोठें चमत्कारिक दिसतें. विमान शक्य तितकें जड करण्याकडे विशेष लक्ष दिलें आहे. रत्नजडित सुवर्णाचे जिने व बसावयाच्या जागा उत्कृष्ट सुवर्णाच्या होत्या असें सांगितलें आहे. एकंदरींत मुख्य गोष्ट विमानाची प्रेरक शक्ति व तें चालविण्याचें ज्ञान त्यावरूनच अशा विमानांची वस्तुस्थिति ठरवावयाची. या प्रेरक शक्तीचें वर्णन इतर वर्णनाबरोबर सुंदरकांडाच्या आठव्या सर्गांत आहे. तेथेंहि त्या विमानाला सुवर्णाच्या खिडक्या व उत्कृष्ट रत्नांचें जडावकाम यांचा उल्लेख

आहेच. या सर्गाच्या सातव्या श्लोकांत प्रेरकशक्ति सांगितलेली आहे. ' कुंडलाच्या योगानें ज्यांचीं मुखें सुशोभित झालेलीं आहेत आणि पापणीहि न हालणारे असे विशाल व तारवटलेले डोळे सांगितले नसते तर मोठ्या शक्तीचें ऍंजिन हें त्याची प्रेरकशक्ति म्हणतां आली असती. परंतु या दागिन्यांनीं व तारवटलेल्या डोळयांमुळें खरोखरीचे राक्षस तें विमान उचलून नेत होते, असाच कवीच्या सांगण्याचा आशय दिसतो. पुढल्या म्हणजे ९ व्या सर्गांतहि या पुष्पकाचें वर्णन आलें आहे. त्यांतहि सोनें व रत्नें यांच्या कामाच्या वर्णनाची पुनरुक्ति आहे. या सर्व गोष्टींवरून तें विमान केवळ कविकल्पनाच होती असें दिसतें.

## काल्पनिक विमानाची काल्पनिक वासलात

ब्रह्मदेवाकरितां विश्वकर्म्यानें तयार केलेलें विमान पराकाष्ठेच्या तपश्चर्येनें कुबेराला मिळालें होतें, तर कुबेराला जिंकणाऱ्या रावणाच्या ताब्यांत तें कां जावें कळत नाहीं. त्याला वाहून नेणाऱ्या राक्षसांनीं जबरदस्तीनें घेऊन जाणारांची आज्ञा कां पाळावी हेंहि कळत नाहीं. शिवाय रावणाबरोबर झालेल्या युद्धांत कुबेरानें या विमानाचा उपयोग केल्याचें वर्णन नाहीं. निदान पराजय झाल्यावर या विमानांतून दूर जाण्याचें त्यास सुचलें नाहीं हेंहि आश्चर्यच आहे. यावरून त्या विमानाच्या अस्तित्वाबद्दलच शंका येते. हें विमान रावणाजवळ खरोखर असतें तर सीतेला जबरदस्तीनें घेऊन जाण्याच्या वेळीं गाढवांनीं ओढण्याच्या रथांत बसून न नेतां रावण या विमानांतून आला असता व मग जटायूबरोबरची झटापट टळली असती. सुग्रीवाच्या मोठ्या सैन्यासह राम लंकेवर येत असतां त्याचेवर टेहेळणी करण्यास किंवा त्यांच्यावर हल्ला करण्यास या विमानाचा केव्हांहि उपयोग केलेला नाहीं. असल्या अमोघ वाहनाचा युद्धांत अनेक प्रकारें उपयोग करतां येण्यासारखा होता तरीहि रावणानें एक वेळहि त्याचा उपयोग केलेला नाहीं. यावरून असलें वाहन केवळ कविकल्पनाच दिसत आहे. रामासारख्या सुसंपन्न व सुधारलेल्या राजाला तसलें विमान आपल्या संग्रहीं ठेवण्याची इच्छा झाली नाहीं. हीहि गोष्ट लक्षांत

घेणें जरूर आहे. तें कुबेराकडे परत पाठविण्याची कल्पना तर और आहे. कुबेराला जिंकून रावणानें तें आपल्या मालकीचें केलें असल्यानें व त्याचा उपभोग बहुत वर्षें घेतला असल्यानें कुबेराची मालकी त्या विमानावर राहिली नव्हती. तें विमान रावणाच्या सर्व संपत्तीबरोबर व पत्नी परिवाराबरोबर बिभीषणाच्या मालकीचें झालें होतें. वास्तविक पाहतां तें बिभीषणाकडे परत करावयास पाहिजे. पण काल्पनिक विमानाची वासलात काल्पनिक रीतीनें व्हावयाची यांत आश्चर्य कसलें!

विमानविद्या आर्यावर्तांत केव्हां तरी खरोखर होती असें म्हणण्यास रामायणांत तरी विश्वसनीय पुरावा नाहीं. सीतेच्या अग्निदिव्याच्या वेळीं देव विमानांतून आले व त्यांनीं सीता शुद्ध असल्याची ग्वाही दिली, ही गोष्ट त्यावेळच्या अयोध्यावासी जनांसच विश्वसनीय वाटली नाहीं. म्हणून त्या वेळीं विमानें नव्हतीं असेंच सिद्ध होतें. राम पुष्पक विमानानें लंकेहून अयोध्येस आल्याचा उल्लेख आहे. पण तें विमान मनुष्यकृत नव्हतें. विश्वकर्म्यानें केलेलें होतें असें वर्णन असल्यानें या एका विमानाच्या गोष्टीनें विमानविद्येचें अस्तित्व विश्वसनीय दिसत नाहीं.

पूर्वजांच्या योग्यतेविषयीं अभिमान असावा; पण तो अभिमान साधार असावा. केवळ कवि–कल्पनेवरच आधारलेला असल्यास पूर्वजांचा सन्मान होत नाहीं व वंशजांच्या अकलेची किंमत होते. विचाराला पटेल त्यावर विश्वास ठेवावा. विचाराला न पटेल त्याचा त्याग करणें हेंच उचित.

—सह्याद्रि, ऑक्टोबर १९४०

# वाल्मीकि आणि होमर

वाल्मीकि हा हिंदु आर्यांचा आद्य महाकवि आहे. याचें एकच महाकाव्य रामायण. हें सुविख्यात आहे. या काव्यांत अयोध्येच्या दरबारांतील खटपटी, रामाचा वनवास, सीतेचें त्याच्याबरोबर जाणें, सीतेला रावणानें जबरीनें नेणें, सुग्रीवाची मैत्री संपादणें, लंकेवर स्वारी, रामरावण युद्ध, रावणवध, सीतेचें अग्निदिव्य, अयोध्येंत राज्याभिषेक, सीतेचा त्याग व तिचा वाल्मीकीच्या आश्रमांत वास इत्यादि प्रसंगांचें रसभरित वर्णन आहे.

होमर हा यवन (ग्रीक) देशीय आर्यांचा महाकवि होता. याचीं दोन काव्यें प्रसिद्ध व सर्वमान्य आहेत, एक इलीयड व दुसरें ओडेसी. यांतील पहिलें फार प्रसिद्ध आहे नि त्याचीं निरनिराळ्या भाषांतून गद्य व पद्य अशीं भाषांतरें झालीं आहेत. फार प्राचीन काळीं ट्रॉय या शहरास पडलेल्या वेढयाचें व त्यांतील उभय पक्षींच्या वीरांचें वर्णन करणारें इलीयड हें काव्य आहे. पण त्याचा आरंभ वेढ्याच्या तिसऱ्या वर्षापासून होतो. नायक, नायिका व खलनायक यांच्या संबंधावर आधारलेली या काव्याची कथा नाहीं. पण युद्धाचें कारण मात्र त्यामुळें उद्भवलें आहे.

स्पार्टाचा राजा मेनेलेअस याच्याकडे ट्रॉयचा राजपुत्र पारीस हा पाहुणा म्हणून बरेच दिवस राहिला. तेथें त्याची व मेनेलेअसची पत्नी हेलन इची ओळख होऊन प्रेम जडलें आणि अखेर हीं आपुकमापुकें फरारी झालीं व ट्रॉयला पोंचलीं. सर्व यवन राष्ट्राला या प्रकाराची मोठी चीड आली व त्यांनीं फौजा जमवून ट्रॉयला वेढा घातला. ट्रॉयचा राजा व पारीस यांनींहि आपले मित्र व सगेसोयरे यांचें सैन्य जमवलें व उभय लष्करांत मोठें तुंबळ युद्ध बारा वर्षें चाललें होतें. अखेर ट्रॉयचा पाडाव होत नाहीं असें दिसल्यामुळें एक कपटयुक्ति योजिली गेली. वेढा उठवून ग्रीक सैन्य निघून चाललें. त्यांनीं एक लाकडाचा केलेला मोठा घोडा मागें ठेवला होता व एक इसम जखमा झालेला तेथें पडला होता. त्याच्या सांगण्यावरून तो घोडा शहरांत नेला. पुढें रात्रीं सर्व ट्रॉयवासी विजयोन्मादांत बेहोष असतां

घोड्याच्या पोटांत दडलेल्या सैनिकांनीं बाहेर येऊन ट्रॉयचे दरवाजे उघडले आणि ग्रीक सैन्य आंत घेतलें. या प्रकारें ट्रॉयचा पाडाव झाला. पण आज आपणांस या महाकाव्याचा विचार करायचा नाहीं.

होमर कवीचें दुसरें काव्य ओडेसी हें आहे. ओडेसिअस म्हणून एक नामांकित वीर ट्रॉयच्या युद्धांत लढत होता; त्याचे पराक्रम इलीयड या काव्यांत वर्णिले आहेत. तें युद्ध संपल्यावर सर्व योद्धे आपापल्या देशांस परत निघाले, तसा ओडेसिअसहि निघाला. पण एका देवतेच्या कोपामुळें त्याच्या मार्गांत अनेक विघ्नें आलीं. त्याला पुष्कळ ठिकाणीं लढावें लागलें. अशा रीतीनें बारा वर्षें झगडून अखेर तो आपल्या घरीं पोंचला.

ट्रॉयचें युद्ध संपल्यावर योग्य वेळीं तो घरीं पोंचला नाहीं व त्याची खुशालीहि कळेना. यामुळें त्याची पतिव्रता स्त्री पेनेलोपी ही फार काळजींत पडली. ओडेसिअस मरण पावला अशीहि बातमी पसरली व ती बहुतेकांस खरी वाटली. पेनेलोपी सुंदर व सद्गुणी असल्यानें तिची प्राप्ति व्हावी म्हणून ठिकठिकाणचे राजपुत्र तिच्या गांवांत तळ देऊन बसले व 'मला वर, मला वर!' अशी याचना प्रत्येकजण करूं लागला. सर्वांनीं भीड घातली म्हणून पेनेलोपी कंटाळली. एका देवीच्या स्फूर्तीनें तिनें त्या सर्व वीरांना एक अट घातली व ती पुरी करणारास आपण वरूं असें सांगितलें. तिच्या नवऱ्याचें म्हणजे ओडेसिअसचें एक धनुष्य शस्त्रागारांत होतें, तें तिनें आणून त्यांच्यापुढें ठेवलें व सांगितलें कीं, 'याला जो कोण दोरी चढवील व बाण सोडील त्याला आपण नवरा म्हणून पसंत करूं.'

त्याप्रमाणें एका नेमल्या दिवशीं त्या सर्वांनीं आपापल्या पाळीप्रमाणें धनुष्यावर प्रत्यंचा चढविण्याचा प्रयत्न केला. पण कोणासहि धनुष्य सज्ज करतां आलें नाहीं. कर्मधर्मसंयोगानें ओडेसिअस त्याच वेळीं भिकाऱ्याच्या वेषांत त्या ठिकाणीं येतो. तो धनुष्यास चटदिशीं दोरी चढवून तें सज्ज करतो व पेनेलोपीच्या हातचे बाण घेऊन त्या खजील झालेल्या उर्मट राजांना मारून टाकतो.

रामायण आणि ओडेसी या दोन्ही काव्यांत एका प्रसिद्ध धनुष्यावर दोरी चढवण्याचा पण लावण्यांत आला असें वर्णिलें आहे. तो पण जो

जिंकील त्याला एक सुंदर स्त्री आपला पति म्हणून वरणार असा संकेत केला आहे. ही एकच गोष्ट दोन महाकवींनीं कसकशी रंगवली आहे हें पाहाणें पुष्कळ उद्बोधक होईल.

ओडेसीमधील कथा अगदीं साधी व सहजसुंदर आहे. दुसरा नवरा करायचाच तर तो पहिल्या नवऱ्याइतका तरी बलवान पाहिजे. त्याचें सामर्थ्य ओडेसिअसइतकें तरी पाहिजे. तें अजमावण्याचें साधन म्हणून त्याच्या धनुष्यास दोरी चढवणें ही कसोटी तिला सुचते व घरांत असलेलें त्याचें धनुष्य ती पुढें करते. आलेल्या वरांना दोरी चढवण्याचें सामर्थ्य असत नाहीं. ते पराभूत होऊन शरमिंदे होतात. ओडेसिअस धनुष्य सज्ज करून त्यांना मारतो.

आतां रामायणांतील दोरी चढवण्याचा प्रसंग कसा वर्णिला आहे तें पाहूं. विदेह देशाचा जनक राजा यज्ञाकरितां जमीन नांगरीत असतां त्याला एक नुकतीच उपजलेली बालिका सांपडते. तिला तो आपली मुलगी म्हणून वाढवितो. ती मोठी झाल्यावर ती ‘ वीर्यशुल्का ’ आहे असें जाहीर करतो. आपल्या बलाची खात्री करून देणें हेंच शुल्क जिचें ती वीर्यशुल्का. त्याप्रमाणें बलाची परीक्षा करण्यासाठीं त्यानें संग्रहीं असलेल्या शिवधनुष्याची योजना केली. अनेक देशचे राजे येऊन त्यांनीं त्या धनुष्यावर दोरी चढवण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत कोणासहि यश आलें नाहीं. पुढें जनकानें यज्ञ आरंभिला. त्या निमित्तानें विश्वामित्रानें रामलक्ष्मणांस विदेह नगरीस नेलें. तेथें धनुष्य पाहण्याची इच्छा रामानें दर्शविली. त्या निमित्तानें रें आपल्यावर रामानें धनुष्य उचलून त्यावर दोरी चढवली. याप्रमाणें पण जिंकल्यामुळें रामास सीतेची प्राप्ति झाली. रामानें धनुष्याची दोरी जास्त खेंचल्यानें अखेर तें शिवधनुष्य मोडून गेलें !

पेनेलोपेचा पण अगदीं स्वाभाविक असल्यानें चांगला वठला आहे. तिच्या नवऱ्याचें धनुष्य घरांतच होतें. रामायणांतील धनुष्य हें जनकाचें नेहमीं वापरण्याचें नव्हतें. तें वंशपरंपरेनें त्याच्याकडे असलेलें शिवधनुष्य होतें.

या कथेंतील जनकाच्या वर्तनाविषयीं विचार करूं. जनक हा सीतेचा जनक बाप नव्हे; तर तो केवळ पालनकर्ता आहे. जनकाला औरस

मुलगीहि आहे. तसेंच त्याच्या भावाच्याहि दोन मुली आहेत. या तीन व पालक मुलगी सीता या चौघींचीं लग्नें दशरथाच्या चौघा मुलांबरोबर झालीं. पण जनक आपल्या औरस मुलीस 'वीर्यशुल्का' ठरवून तिच्या-साठीं पण ठेवीत नाहीं; तें महत्त्व पालक मुलगी सीता हिला देतो व पुढें तिचा विवाह दशरथाचा ज्येष्ठ पुत्र व राज्याचा भावी अधिकारी असा जो राम त्याच्याशीं होऊं देतो; व आपल्या पोटच्या मुलीस रामाचा धाकटा भाऊ व त्याचा सेवक असा जो लक्ष्मण त्याची भार्या करतो. कोणता बाप असें होऊं देईल? पोटच्या मुलीला उत्तम स्थळ मिळावें असें कोणताहि बाप इच्छील. पाळलेल्या मुलीस दुय्यम स्थान मिळायचें.

पण रामायणांत हा क्रम व्यवहारास सुटून दाखवला आहे. यावरून अविश्वसनीय वाटतो.

आतां आपण विचार करूं.

"यज्ञभूमीपासून उत्पन्न झालेली माझी कन्या वाढीला लागली. तेव्हां वीर्यशुल्का ( म्हणजे हें त्र्यंबक—चाप सज्ज करण्याला समर्थ असें ज्याचें वीर्य असेल त्यालाच ही द्यायची ) म्हणून मी ही अयोनिसंभव कन्या रक्षण करून ठेविली." ( बालकांड ६६।१४ ).

हा पण जनकानें केव्हां केला हें सांगितलेलें नाहीं. सीता लहान असतांनाच हा पण केलेला दिसतो. पुढें ही कन्या मोठी झाल्यावर पुष्कळ राजांनीं तिला मागणी घातली; ती वीर्यशुल्का असल्यामुळें कोणाचीहि मागणी जनकानें मान्य केली नाहीं. तेव्हां ते सर्व राजे मिथिला नगरीस आपल्या सामर्थ्याचा अदमास पाहण्यासाठीं आले. त्यांच्यापुढें शिवधनुष्य आणून ठेवलें असतां त्यांपैकीं कोणीहि तें उचलण्यास किंवा तोलण्यास समर्थ झाला नाहीं. "राम जर हें धनुष्य सज्ज करील तर अयोनिसंभव सीता मी त्याला देईन." (६६।२६).

परंतु असा पण करण्याचें योग्यसें कारण दिसत नाहीं. जनकाकडे धनुष्य होतें तें कोणालाहि उचलतां येण्यासारखें नव्हतें व ही सांपडलेली कन्या होती; म्हणून कसा तरी हा पण जुळवून दिला आहे असें दिसतें. ६७ व्या सर्गातील ९ व्या श्लोकांत, हें धनुष्य कोणालाहि उचलण्यासारखें

नव्हतें असें म्हटलें आहे. "सर्व देवगण, असुरांसहवर्तमान राक्षस, मोठमोठे योद्धे आणि यक्ष व किन्नर आणि महोरग यांपैकीं कोणीहि हें धनु सज्ज करण्यास समर्थ नाहींत." "कानापर्यंत हें धनुष्य ओढण्याचें, तें सज्ज करण्याचें, त्याला बाण लावण्याचें, प्रत्यंचा ओढण्याचें सामर्थ्य मानवाच्या ठिकाणीं कोठून असणार ?" (१०).

मोठमोठ्या देवांना व राक्षसांना जें काम होण्यासारखें नव्हतें, तें माणसाकडून अपेक्षिणें शहाणपणाचें नाहीं; म्हणून शिवधनुष्य सज्ज करण्याचा पण लावण्यांत जनकाचा उद्देश या मुलीला नवराच मिळूं नये व ती आपलेकडे जन्मभर राहावी असा असावा असेंहि म्हणतां येईल. याप्रमाणें हा पण सुसंगत नाहीं. कोणालाहि अशक्य असा पण लावणारा जनक मूर्ख तरी असावा किंवा मुलीला जन्मभर कुमारी ठेवूं इच्छिणारा निर्दय बाप तरी असावा, असें म्हणणें भाग पडतें.

हें धनुष्य जनकाच्या ताब्यांत कसें आलें याचा विचार करूं.

पूर्वी दक्षयज्ञनाशाच्या समयीं वीर्यवान रुद्र सहज तें धनुष्य वाकवून रागारागानें देवांची धूळदाण उडवून म्हणाला, (६६–९) 'हे देवहो, मी आतां तुमचीं मस्तकें तोडून टाकतों.' तेव्हां ते सर्व देव अगदीं दीन झाले व शंकराला प्रसन्न करून घेऊं लागले. शंकरहि त्यांच्यावर प्रसन्न झाले आणि त्या सर्व महात्म्यांना तें धनुष्य त्यांनीं देऊन टाकलें (१०-११). तें महात्मा देवाधिदेवाचें—शंकराचें श्रेष्ठ धनुष्य आमच्या समर्थ पूर्वजांपाशीं ठेव म्हणून त्यावेळीं ठेवलें आहे (१२).

मोठ्या प्रयत्नांनीं व प्रयासानें मिळविलेली धनुष्यरूपी मोठ्या योग्यतेची वस्तु देवांनीं आपल्याजवळ कां ठेविली नाहीं असा पहिला प्रश्न उभा रहातो. तें ठेवण्यास लायक अशी जागा स्वर्गांत नव्हती काय ? कां दक्षाच्या घरापासून स्वर्गांत त्या धनुष्याला नेण्याचें सामर्थ्य देवांना नव्हतें ? देवरात नामक निमीच्या ज्येष्ठ पुत्राला तरी तें आपल्या राज्यांत आणण्यास कसें शक्य झालें ? थोरांनीं दिलेली वस्तु थोडे दिवस तरी चांगल्या प्रकारें संभाळावी लागते. तशी ती संभाळली गेली नाहीं तर थोर आपला अपमान समजतात. येथें तर देवांनीं तें धनुष्य मिळाल्याबरोबर देवराताकडे

ठेवण्यास दिलें आहे हें चमत्कारिक दिसतें! असे अनेक प्रश्न उत्पन्न होतात. त्यांचें समाधानकारक उत्तर मिळणें कठीण आहे.

बरें, हा दक्ष कोण? दक्षप्रजापतीच्या कन्यांपासून सृष्टीची उत्पत्ति पुराणांत सांगितली आहे. हें खरें मानलें तर दक्ष-यज्ञाच्या वेळीं गजबजलेलीं राज्यें अस्तित्वांत कोठून येणार? मग हा देवरात राजा—जनकाचा पूर्वज—त्यावेळीं हजर होता हें कसें संभवनीय आहे?

दक्षाची कन्या सती ही शंकराची भार्या होती. दक्ष व त्याचा जांवई शंकर यांचें वांकडें आलें. दक्षानें यज्ञ आरंभिला. जांवई शंकर याला बोलाविलें नव्हतें. पण सती आमंत्रणाशिवाय नवरा 'नको नको' म्हणत असतां, बापाच्या घरीं गेली. बापानें तिचा अपमान केला. तिनें रागानें यज्ञकुंडांत उडी घेऊन प्राण दिला. हें वर्तमान शंकराला समजल्यावर तो क्रुद्ध झाला व त्यानें येऊन यज्ञाचा विध्वंस केला. सती पुढें हिमालय कन्या झाली व तिनें पुन्हां शंकराला वरिलें. यावरून दक्षयज्ञविध्वंसनाची कथा फार पुरातन आहे. त्या काळीं पृथ्वीवर मनुष्यवस्ती झाली होती कीं नाहीं याचीच शंका आहे!

हा देवरात तरी कोण? निमीचा ज्येष्ठ पुत्र देवरात म्हणून ख्यात राजा होता असें (६६—८) श्लोकांत आहे. पुढें ७१ व्या सर्गांत जनकानें आपले पूर्वज वर्णिले आहेत. त्यांत पहिलें नांव निमीचें दिलें आहे. निमी हा कोणाचा पुत्र हें सांगितलें नाहीं. यावरून निमी हा राज्यसंस्थापक असावा. त्याचा पुत्र मिथि व त्याचा पुत्र जनक, त्याचा उदावसु, त्याचा नंदिवर्धन, त्याचा सुकेतु त्याचा देवरात. हा देवरात निमीपासून सहावा होतो व ६६ व्या सर्गांत तो निमीचाच ज्येष्ठ पुत्र सांगितला जातो, असा गैरमेळ आहे.

याप्रमाणें ज्या धनुष्यास सज्ज करण्याचा पण ठरविला होता तें धनुष्यच अगोदर संशयित. तें देवरात याजजवळ ठेवल्याची गोष्टहि संशयितच. ही अव्यवहार्यहि आहे. अशी स्थिति असल्यानें धनुर्भंगाचा पण ही गोष्ट सत्यसृष्टींतील नसून काल्पनिकच आहे असें दिसतें.

होमर कवीची कथा तशी नाहीं. तेथील पणास कारण आहे. मृत नवऱ्याइतका तरी बलवान घर हुडकण्यासाठीं तो पण आहे. जनकाचा

पण तसा नाहीं. त्याला अशक्य काम करणारा जांवई पाहिजे आहे. होमरच्या काव्यांतील धनुष्य पेनेलोपीच्या नवऱ्याचेंच होतें. येथें धनुष्य आहे तें शंकराचें आहे नि तें जनकाच्या हातीं कसें आलें ही गोष्ट उघड उघड कल्पित आहे. धनुष्याची दोरी चढवून बाण मारण्याचा पण होमर कवीनें वर्णिला आहे. पण दोघांच्या वर्णनांत विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा फरक आहे. एकाची गोष्ट साहजिक, साधी व व्यवहार्य आहे. दुसऱ्याची गोष्ट अस्वाभाविक, अव्यवहार्य व गुंतागुंतीची आहे असें वाटतें. या अव्यवहार्यतेवरून सीता ही जनकानें पाळलेली मुलगी होती कीं ती निव्वळ काल्पनिकच आहे असाहि संशय उत्पन्न होणें साहजिक आहे.

प्राचीन काळीं हिंदी व युनानी आर्यांतील विद्वानांमध्यें फार अगत्याचे संबंध होते. म्हणून रामायणांतील धनुर्भंगाची कथा वाचल्यावर होमरनें ओडेसींत तशा प्रकारचा प्रसंग वर्णिला, का ओडेसींतील धनुष्याला दोरी लावण्याच्या पणाची कथा लिहिली असा संशय उत्पन्न होत आहे.

तया गृहीतं च मृगांगनाभ्यः ॥

ततो गृहीतं च मृगांगनाभिः ॥

—मनोहर, डिसेंबर १९४५

## करूं नये थट्टा, भल्याभल्यांसि लागला बट्टा !

कोणी विद्वान शास्त्री ताक मागण्यास गेला असतां सर्व रामायणाचें सार एका श्लोकांत त्यानें सांगितलें. त्याला एकश्लोकी रामायण म्हणतात. तो श्लोक–

आदौ रामतपोवनाभिगमनं हत्वा मृगं कांचनम् ।
वैदेहीहरणं जटायुमरणं सुग्रीव संभाषणम् ॥
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लंकापुरीदाहनम् ।
पश्चाद्रावणकुंभकर्णहननं एतद्धि रामायणम् ॥

राम वनवासाला गेला व चौदा वर्षांनीं परत येऊन राज्यावर बसला. या श्लोकामध्यें कांचनमृगाचा वध व वैदेहीचें हरण व त्यामुळें घडून आलेल्या रावण-कुंभकर्णमरणापर्यंतच्या गोष्टी घालून रामायण महाकाव्य वाल्मीकीनें रचिलें. वैदेहीहरण झालें नसतें तर पुढील सर्व हकीगत घडली नसती. वैदेहीहरणाच्या पूर्वीं दिलेली कांचनमृगाला मारणें ही बाब अगदींच क्षुल्लक आहे. वैदेहीहरणाला सोपें जावें म्हणून रामलक्ष्मणाला बाजूस काढण्यासाठींच कांचनमृगाची युक्ति योजलेली होती. सीताहरणाची कल्पना रावणाला सुचवून त्याची त्या कामीं उठावणी त्याची बहीण शूर्पणखा हिनें केली होती व त्याचें कारण तिचे नाककान कापून केलेली विटंबना हें आहे. म्हणून ही गोष्ट पुढील सर्व तंट्याचें मूळ आहे.

शूर्पणखा दण्डकारण्यांत रहात असतां राम तिच्या नजरेस पडला. त्याचें सुंदर रूप पाहून ती मोहित झाली व असला नवरा आपणास असावा अशी इच्छा तिला झाली. ती रामाकडे येऊन ‘ माझा पति हो ’ असें म्हणाली. येथपर्यंत तिच्याकडून कांहीं अपराध झालेला नाहीं. तिची मागणी रामाला अयोग्य वाटली. त्याच वेळीं तिला स्पष्ट तसें सांगून वाटेस लावणें योग्य होतें. तसें न करतां तिच्याशीं थट्टा करण्याची हुक्की श्रीरामचंद्रास आली. तो म्हणाला, “ मला बायको असल्यानें मी तुला

पतकरली तर तुला सवतीच्या जाचांत रहावें लागेल. यासाठीं मला नवरा करण्याचा विचार सोडून दे. हा माझा भाऊ लक्ष्मण अविवाहित आहे, याची बायको हो."

लक्ष्मणाला अनेक बायका होत्या, असें असतांहि रामानें तो अविवाहित आहे असें निव्वळ खोटें सांगितलें. एकवचनी रामाच्या तोंडून असत्य भाषण निघणें त्याच्या कीर्तीस हानिकारक असल्यानें कै. लेलेशास्त्र्यांना कसेंसेंच वाटलें व रामाची तरफदारी करण्याच्या हेतूनें त्यांनीं पुढील टीप दिली—

'लक्ष्मणाचा विवाह झालेला असूनहि तो अविवाहित आहे असें रामानें शूर्पणखेला सांगितलें आहे; परंतु राम तिच्याशीं थट्टेनें बोलूं लागले असें आरंभींच सांगितलें आहे व थट्टेमध्यें केलेलें असत्य भाषण दोषास्पद होत नाहीं.' कारण

'न नर्मयुक्तं वचनं, हिनस्ति न स्त्रीषु राजन्न विवाहकाले ।
प्राणात्यये सर्वधनापहारे पंचानृतान्याहुरपातकानि' ॥

असें वचन आहे.

ती बिचारी भाबडी लक्ष्मणाकडे जाऊन "मी श्रेष्ठ स्त्री तुझ्या रूपाला योग्य भार्या आहे. तूं माझ्यासहवर्तमान सर्व दंडकारण्यामध्यें सुखानें संचार करशील" असें म्हणाली. (अरण्यकांड, सर्ग १८, श्लोक ७). लक्ष्मणानें दादाचेंच अनुकरण करून थट्टा आणखी पुढें चालविली. तो म्हणाला, "रक्तकमलासारख्या वर्णानें युक्त तूं, मज दासाची भार्या होऊन दासी बनण्याची कां बरें इच्छा करीत आहेस? कारण मी आपल्या भ्रात्याच्या तंत्रानें राबणारा परतंत्र आहे. तेव्हां, हे विशालनयने, निर्मल कांतीनें युक्त असलेली तूं, उत्कृष्ट विषयवासनेनें युक्त असलेल्या आर्य रामाची कनिष्ठ भार्या होऊन कृतकृत्य व आनंदित हो. कुरूप, ओबडधोबड, कृशोदरी, दुराचरणी आणि वृद्ध अशा ह्या भार्येचा त्याग करून हा तुझाच उपभोग घेईल. कारण, हे श्रेष्ठ स्त्रिये, हे सुंदरी, हें श्रेष्ठ रूप टाकून देऊन कोण बरें विचक्षण पुरुष मनुष्यजातींतील स्त्रियांवर मन ठेवील?" (श्लोक ९–१२).

ही थट्टा आहे असें समजण्याचें चातुर्य तिच्या ठिकाणीं नव्हतें. तिला हें लक्ष्मणाचें बोलणें खरेंच वाटलें. तेव्हां ती सीता आणि राम पर्णशालेंत बसलीं होतीं तेथें जाऊन म्हणाली, "विरूप, दुराचारिणी, ओबडधोबड, पोट खबदाडीला गेलेली आणि वृद्ध अशी जी ही भार्या तिचा स्वीकार करून तूं मला बहुमान देत नाहींस. तेव्हां मी आज या मनुष्यजातीच्या स्त्रीला तुझ्यासमक्ष भक्षण करून टाकीन. आणि याप्रमाणें सवत नाहींशी झालेली मी तुझ्याबरोबर सुखास येईल त्याप्रमाणें संचार करीन." (श्लोक १५,१६) शूर्पणखा अगदींच भाबडी व मूर्ख. लक्ष्मणानें सीतेसंबंधानें उच्चारलेलेच शब्द तीहि उच्चारते.

एतां विरूपामसतीं करालां निर्णतोदरीम् ।
भार्यां वृद्धां परित्यज्य त्वामेवैष भजिष्यति ॥

(श्लोक ११). तिच्या भाषणांत या श्लोकांतील पहिला अर्ध व भार्यां वृद्धां हीं पदें कायम आहेत. परित्यज्य याबदला 'अवष्टभ्य' असा शब्द असून "न मां त्वं बहुमन्यसे" हा चौथा चरण आहे. पढवलेल्या पोपटासारखी ती बोलत आहे. रामाला सीता नकोशीच आहे अशी तिची समजूत करून दिलेली आहे.

शूर्पणखा सीतेच्या अंगावर धांवून येऊं लागली असतां क्रुद्ध झालेला राम लक्ष्मणाला दटावून म्हणाला, 'हे लक्ष्मणा, क्रूर आणि दुष्ट लोकांबरोबर कधींहि थट्टा करूं नये. हे सत्त्वस्थ लक्ष्मणा, (आपल्या थट्टेमुळें) ही राक्षसी कशीतरी जीव धरून असलेल्या सीतेला भक्षण करण्यास प्रवृत्त झाली आहे. आधींच कुरुप, दुराचारिणी, अतिशय मत्त आणि तुंदिल असलेल्या ह्या राक्षसीला हे पुरुषश्रेष्ठा लक्ष्मणा, तूं विरूप करून टाक." (श्लोक १९।२०) याप्रमाणें रामानें सांगितलें असतां क्रुद्ध झालेल्या महाबलाढ्य लक्ष्मणानें रामासमक्षच खड्‌ग उपसून तिचे कान व नाक हीं छेदून टाकलीं. (श्लोक २१).

थट्टेला सुरवात श्रीरामचंद्रांनींच केली व त्या निमित्तानें लक्ष्मण अविवाहित आहे असें खोटेंच सांगितलें. लक्ष्मणानें ती थट्टा पुढें चालविली. ही थट्टा इतकी वाहावली कीं, पतिव्रता म्हणून नांवाजलेली

ती 'असती' म्हणजे दुराचरणी आहे असें बोलण्याचें धैर्य लक्ष्मण करीत आहे. ही थट्टा तिला खरीच वाटली. ती सीतेच्या अंगावर धांवली. हा परिणाम आपल्या थट्टेचा आहे हें रामानें ओळखून तिला हांकून देण्यास लक्ष्मणास आज्ञा करणें योग्य झालें असतें; पण तसें न करतां त्या एकट्या असहाय्य स्त्रीला विरूप करण्याचा हुकूम केला. लक्ष्मण काय! दादाच्या हुकमाचा चाकर. त्या बहाद्दरानें तरवारीनें तिचे कान व नाक छाटून तिला विरूप केलें. (श्लोक २१). या रामलक्ष्मणाच्या कृत्याचा तीव्र निषेध करणेंच योग्य आहे. स्त्रीवर हत्यार चालवून या दशरथपुत्रांनीं आपल्या श्रेष्ठ आर्यसंस्कृतीला व नीतिमत्तेला काळिमा लावलेला आहे.

शूर्पणखा ही रावणाची म्हणजे थोर मानधन राजाची बहीण होती. तिची थट्टा करणें हें गैरच, पण तिचे कान व नाक कापून तिला विरूप करणें अगदीं निंद्य आहे.

तिनें आपली झालेली अप्रतिष्ठा आपल्या भावास कळवून सीतेला जबरीनें आणण्याचें काम त्यानें हातीं घ्यावें म्हणून त्याची उठावणी केली. रावणाला ही कल्पना पटली. पण तो सनदशीर वागणारा राजा, त्यानें त्या कार्याविषयीं सचिवांचें अनुमोदन घेतलें आणि कार्य करण्याचा निश्चय करून मारीच आश्रमाला निघाला. मारीचास रावण आपला बेत सांगतो, "त्या सैन्याचा वध करणारा तो राम क्षत्रियांना कलंक लावणारा, दुःशील, कर्कश, तीक्ष्ण, मूर्ख, लुब्ध, अजितेंद्रिय, धर्माचा त्याग केलेला व अधर्मनिष्ठ असून प्राण्यांच्या अहिताविषयीं तत्पर आहे व त्यानेंच अरण्यामध्यें वैरावांचून केवळ शक्तीच्या जोरावर कर्ण व नासिका यांचा अपहार करून माझी भगिनी विरूप केली आहे. तेव्हां देवकन्येसमान असलेल्या त्याच्या सीतानामक भार्येला जनस्थानांतून मी पराक्रमानें घेऊन येणार आहें त्याविषयीं मला तूं सहाय्य हो."

(अरण्यकाण्ड, सर्ग ३६, श्लोक ११–१४).

प्रथमतः रामानें शूर्पणखेची थट्टा केली, व या मस्करीची कुस्करी होऊन तिचे कान व नाक कापून आर्यसंस्कृतीस काळिमा लावला. कसलेंहि वैर नसतांना केलेल्या बहिणीवरील अत्याचारानें चिडून रावणानें सीतेला जबरीनें उचलून नेलें. तिला सोडविण्याच्या प्रयत्नांत जटायूला मरण

आलें. तिचा शोध लावण्यासाठीं व लंकेवर स्वारी करण्याच्या कामीं वानरसैन्याची मदत जरूर होती. वानरांचा बलवान राजा वाली हा रावणाचा मित्र होता. त्याच्याकडून मदत मिळणें अशक्य होतें. या लढाईत राक्षसांबरोबरील युद्धांत वानरसैन्याचा मोठा संहार होणार. तो करूं देणारा राजा आपल्याशीं उपकारबद्ध पाहिजे. म्हणून सुग्रीवाबरोबर संभाषण म्हणजे वाटाघाट करावी लागली. परिणामीं वालीला मारून, सुग्रीवाला राज्य देऊन पुढील सर्व प्रकार रावण कुंभकर्णवधापर्यंत करावे लागले. या कामीं वालीचा वध अन्यायानें केल्यानें रामाच्या कीर्तीस कलंक लागला. सुग्रीवाचें उदाहरण बिभीषणानें गिरविलें व आपल्या भावाविरुद्ध लढाईत साह्य केलें. इत्यादि सर्व प्रकार रामानें केलेल्या शूर्पणखेच्या थट्टेचे परिणाम होत.

एका कवीनें म्हटलें आहे—

"करूं नये थट्टा । भल्याभल्यांसि लागला बट्टा ।।
थट्टा रावणानें केली । लंका सोन्याची जाळली ।।"

सदरचा कवि रावणाच्या थट्टेची नोंद करून तिच्यामुळें लंका जळून गेली असें वर्णितो. पण राम हा विष्णूचा अवतार ठरल्यावर त्याच्या थट्टेचा उल्लेख करण्याचें धैर्य सदर कवीस झालें नाहीं. शूर्पणखेची जी थट्टा केली तिचा परिणाम किष्किंधा व लंका या दोन्ही बलाढ्य राज्यांची नासाडी उडण्यांत झाला. त्यांचे पराक्रमी राजे व वीर नाहींसे झाले व त्या राज्यावर बसविलेलीं बाहुलीं परतंत्र झालीं. रामालाहि याचा परिणाम भोगावा लागला. सीतेनें अग्निदिव्य केलें तरी तिच्यावरचा लोकप्रवाद कमी झाला नाहीं व रामाला तिचा त्याग करणें भाग पडलें व उभयतांचें आयुष्य दुःखांतच गेलें. म्हणून कवि म्हणतात,

करूं नये थट्टा । भल्याभल्यांसि लागला बट्टा ।।

— स्त्री, जून १९३५

## दिवेकरशास्त्री × भास्करराव जाधव

फेब्रुवारी १९३८ च्या पुरुषार्थांतील अंकांत “ ब्रह्मचारी हनुमान ” या मथळ्याचा व एप्रिल १९३८ च्या अंकांत ‘ रामायणाचें महत्त्व ’ या मथळ्याचा असे दोन लेख आले आहेत. पंडित सातवळेकरांनीं वाटेल तसे भरमसाट हल्ले दुसऱ्यावर करावे व करघावे; पण त्यावर उत्तर पाठविल्यास तें छापण्यास मासिकांत जागा नाहीं असें बिनदिक्कत सांगावें हाच पंडितजींस ‘ पुरुषार्थ ’ वाटतो.

सत्यवादी पत्रांतील चर्चा मुद्यांस धरून दिवेकरशास्त्रीनीं सुरू केलीच नव्हती. कोठले तरी उतारे देऊन त्या आधारें रामायण ग्रंथाचें व आर्य संस्कृतीचें महत्त्व त्यांनीं प्रतिपादिलें. ‘ मुद्दे काढा ’ असें त्यांनीं मला आव्हान दिलें. माझ्या लेखांत मुद्दे काढूनच विवेचन केलें असल्यानें शास्त्रीबुवांच्या मुद्दे काढण्याच्या आरोळीस मूकत्वानें उत्तर देणें हेंच बरोबर होतें. आतां शास्त्रीबुवा “ ब्रह्मचारी हनुमान ” असा मुद्दा काढून वाद करीत आहेत हें अभिनंदनीय आहे.

“ दोन भिन्न भूमिका ” या मथळ्यानें शास्त्रीबुवा लिहितात, “ वाल्मीकि कवीनें रामायण हें आदिकाव्य, एक पवित्र पावनी कथा जगामध्यें सदैव असावी, उत्कृष्ट आदर्श लोकांपुढें रहावा या दृष्टीनें लिहिली आहे. रामायणांतील वाल्मीकीनें रेखाटलेलीं सर्व पात्रें एकापेक्षां एकेक सरस, उच्च, पवित्र आणि थोर अशीं दाखविलीं आहेत—तत्कालीन समाजांत जीं उत्कृष्ट ध्येयें व जे आदर्श असावेत असें लोकांना वाटे, ते सर्व वाल्मीकीनें रामायणामध्यें दाखविले आहेत. ”

### एकपत्नीव्रताचा उल्लेख रामायणांत नाहीं

मारुतीचें ब्रह्मचर्य व रामाचें एकपत्नीव्रत हीं ध्येयें व आदर्श लोकांपुढें ठेवावे असा वाल्मीकीचा रामायण लिहिण्यांत हेतु होता असें शास्त्रीबुवांच्या लिहिण्यावरून दिसतें. रामायणांत भावाभावांच्या तीन जोड्यांचें बंधुप्रेम

आदर्श म्हणून मांडलें आहे. पहा, रामलक्ष्मण, रामभरत, भरतशत्रुघ्न; तसेंच राक्षसांतहि रावणकुंभकर्ण यांचें बंधुप्रेम आहे. वालीसुग्रीव, बिभीषण, रावण व कुबेर या बंधूंच्या जोडींतील वैरहि दाखविलें आहे. रामाच्या पितृभक्तीचेंहि उज्ज्वल वर्णन आहे. इत्यादि गोष्टी आदर्श म्हणून दाखविण्याचा वाल्मीकीचा उद्देश स्पष्ट आहे. सीतेचें पातिव्रत्यहि नांवाजण्यासारखें वर्णिलें असल्यानें सीतेविषयींची पूज्यबुद्धि वाढतच जाते. म्हणून तोहि एक आदर्श म्हणून मांडला आहे असें म्हणतां येईल. परंतु दीर्घ ब्रह्मचर्य व एकपत्नीव्रत हीं आदर्श म्हणून मांडल्याची कल्पना दिवेकर शास्त्र्यांसारख्यांनीं केली आहे; पण तिला आधार दाखविणें त्यांना कठीण पडत आहे. रामायणाच्या पहिल्याच सर्गांत श्लोक ८ ते २० पर्यंत तेरा श्लोकांनीं रामाच्या झाडून साऱ्या गुणांचें वर्णन केलें आहे व हे सर्व गुण स्पृहणीय असेच आहेत. पण **त्यांत रामाच्या एकपत्नीव्रताचा स्पष्ट उल्लेख तर कोठेंहि आढळत नाहीं, पण ज्या वाक्यावरून तसें अनुमान काढतां येईल असा अप्रत्यक्ष उल्लेखहि नाहीं.**

तत्कालीन समाजांत जीं उत्कृष्ट ध्येयें व जे आदर्श असावेत असें लोकांना वाटे, ते सर्व रामायणामध्यें वाल्मीकीनें दाखविले आहेत असें शास्त्रीबुवा म्हणतात. **पण स्त्रीसुखपराङ्मुख ब्रह्मचर्याची महति रामायणांत आढळत नाहीं. रामायणांत दाखविलेले सर्व पुरुष-ऋषीसुद्धां सपत्नीक आहेत.** म्हणजे पत्नीविरहित कोणी असेल तर तो अपवाद. असा अपवाद कोणी असल्यास त्याबद्दल स्पष्ट कथन केलेंच पाहिजे अशीच अपेक्षा कोणीहि करील. तसा स्पष्ट उल्लेख नसल्यास **इतरासारखाच मारुतीहि सपत्नीक असावा असें अनुमान कोणीहि काढील.**

**हनुमानाच्या ब्रह्मचर्याचा अर्थ काय ?**

दशरथाच्या ३५० राण्या होत्या असें स्पष्ट सांगितलें आहे. भरतास अनेक भार्या होत्या व लक्ष्मणासहि होत्या असे स्पष्ट उल्लेख रामायणांत आहेत. **रामाला एकच बायको असती तर तसें स्पष्ट कथन रामायणांत केलें गेलें असतें. तद्‌भावी रामहि इतरांसारखाच म्हणजे**

बहुपत्नीक असावा असें अनुमान काढणेंच सरळपणाचें होईल. पण रामभक्त शास्त्रीबुवांना हा सरळपणा मान्य नाहीं, त्याला इलाज नाहीं. अनेक बायका करणें हा त्या काळचा सदाचार होता.

हीच गोष्ट हनुमानाच्या स्त्रीसुखपराङ्मुखत्वाची. हनुमान वेदवेत्ता या यौगिक अर्थानें ब्रह्मचारी होता ही गोष्ट मी प्रथमपासून कंठरवानें सांगत आहें. पण स्त्रीसुखपराङ्मुख रूढार्थानें तो ब्रह्मचारी असता व हा गुण आदर्श म्हणून लोकांपुढें मांडण्याचा वाल्मीकीचा इरादा असता तर त्यानें स्पष्ट सांगावयास पाहिजे होतें. तसें सांगितलें नसल्यानें प्रथमदर्शनींच हनुमान हा स्त्रीसुखपराङ्मुख नव्हता, म्हणून तो इतरांसारखाच सपत्नीक होता असें अनुमान निघतें. याच्या उलट ज्यांचें मत असेल त्यांच्यावर शाबितीचा बोजा आहे हें उघड आहे. सर्व पुरुष स्त्रीसुखलोलुप असतात. हनुमान पुरुष होता म्हणूनच तो स्त्रीसुखलोलुप असावा असें अनुमान निघतें. आतां 'सर्व पुरुष स्त्रीसुखलोलुप असतात' या विधानास शास्त्रीबुवा हरकत घेतील असें वाटतें. पण पुरुष शब्द त्यांचें समाधान करील अशी आशा आहे. यावरून इतर पुरुषांसारखाच हनुमान होता असें वाल्मीकीस मान्य होतें असें दिसतें. कारण तसें वाल्मीकीस मान्य नसतें तर तसें स्पष्ट कथन करणें भाग होतें.

### अपवादाचें स्पष्ट कथन कां नाहीं ?

हनुमान स्त्रीसुखपराङ्मुख ब्रह्मचारी होता हें शाबीद करण्याचा बोजा शास्त्रीबुवांवर असून ते त्याबद्दल पुरावा मुळींच आणीत नाहींत. हनुमान हा कोणत्या अर्थानें ब्रह्मचारी होता हें मीं दाखविल्यावर तो रूढार्थानें म्हणजे स्त्रीसुखपराङ्मुख ब्रह्मचारी नव्हता असें अनुमान काढण्यास अनुकूल अशीं जीं जीं स्थळें मला आढळलीं तींहि मीं मांडलीं आहेत. या स्थळांवर कांहींतरी टीका करून 'खोडून काढलीं' असा वितंडवाद केल्यानें जें विधान सिद्ध करण्याचा बोजा शास्त्रीबुवांच्या शिरावर आहे तें विधान शाबीत होत नाहीं, हें स्पष्टपणें शास्त्रीबुवांच्या नजरेस आणण्याची परवानगी घेतों.

वयांत येऊन विद्याभ्यास पुरा झाल्यावर गृहस्थाश्रम स्वीकारणें स्वाभाविक असल्यानें तसा स्वीकार कुणीं विशेष कारणाकरतां केला नसल्यास तसें

स्पष्ट कथन केलें पाहिजे. अशा स्पष्ट कथनाच्या अभावीं गृहस्थाश्रमस्वीकार कवीस मान्यच आहे असें गृहीतच आहे. रामायणांत वाल्मीकींनीं हनुमान यानें स्त्रीसंग्रह केला नाहीं असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. लोकांत मात्र तसा प्रवाद आहे. पण त्यास वाल्मीकि रामायणांत आधार नाहीं. दिवेकर-शास्त्री यांसहि तो दाखवितां येत नाहीं.

रामायणाचा अभ्यास करतांना अशा प्रकारचा उल्लेख कोठेंच आढळला नाहीं, तेव्हां या उलट म्हणजे मारुतीस स्त्रिया होत्या अशाविषयीं उल्लेख सापडतो काय याचा शोध केला. आजच्या लोकसमजुतींत राम व हनुमान यांचा संबंध कितीहि जिव्हाळ्याचा असला तरी खुद्द वाल्मीकीच्या मतें हनुमान हा सुग्रीवाचा सेवक प्रथमपासून अखेरपर्यंत आहे. रामाच्या हातून वालीचा खून करवून सुग्रीवास राज्य मिळवून देण्याच्या कामीं हनुमानानें मोठीच कामगिरी बजाविली आहे. रामाचें काम सीता परत आणण्याचें. तेथेंहि हनुमानानें फार पराक्रम दाखविला आहे. रामाला अभिषेक झाल्यावर व बक्षिसें वाटल्यावर हनुमान सुग्रीवाबरोबर परत गेला आहे. यामुळें हनुमानाच्या स्त्रियांचा उल्लेख स्पष्टपणानें येण्याची आवश्य-कताच भासली नाहीं. अनुमान काढण्यास सबळ असे अप्रत्यक्ष उल्लेख मिळतात काय याचा शोध केला. तेव्हां तसे तीन उल्लेख आढळले, ते मीं माझ्या मूळच्या लेखांत दिले आहेत. यावरच शास्त्रीबुवांनीं आपली लेखणी चालविली आहे व त्यांच्या समजुतीप्रमाणें या तीन उल्लेखांचा धुव्वा उडविला आहे. शास्त्रीबुवांची टीका पोंचट आहे हें मी पुढें दाखविणार आहें; पण या तिन्ही उल्लेखांतून जाधव म्हणतात त्याप्रमाणें निःसंशय अनुमान निघत नाहीं असें सिद्ध झालें तरी त्यावरून हनुमान स्त्रीसुखपराङ्मुख ब्रह्मचारी होता हें सिद्ध होत नाहीं हें कोणीहि कबूल करील. स्पष्ट कथनाअभावीं माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति जी स्त्रीसंग्रह ती हनुमानाच्या ठायीं होती, हें अनुमान कायमच राहाणार.

## शास्त्रीबुवांजवळ पुरावा नाहीं

आतां शास्त्रीबुवांच्या खंडनाचा विचार करूं. लक्ष्मण किष्किंधेंत गेला. तेव्हां अंगदानें त्याचें स्वागत करून त्यास राजमार्गानें नेलें. त्या राजमार्गावर

दहा अमात्यांचीं घरें होतीं. त्या दहांचीं नांवें सांगितलीं आहेत. त्यांत हनुमानाचा उल्लेख आहे. त्या घराच्या वर्णनांत "स्त्रीरत्नैः शोभितानि च" असें म्हटलें आहे. यावरून मारुतीच्याहि घरांत स्त्रीरत्नें होतीं असें अनुमान होतें. कारण 'मारुतीच्या घराखेरीज' असा अपवाद सांगितलेला नाहीं. शास्त्रीबुवा म्हणतात, "पूर्वसंदर्भ बघितला तर असें दिसतें कीं हें मध्येंच आलेलें वर्णन अप्रस्तुत आहे. हा सर्गच प्रक्षिप्त असावा असें दिसतें." प्रतिपक्षाचा पुरावा खोटा पाडण्याची शास्त्रीबुवांची कल्पना अजब आहे. हा सर्ग प्रक्षिप्त म्हटल्यास मागचे पुढचे बरेच सर्ग प्रक्षिप्त म्हणावे लागतील याची जाणीव शास्त्रीबुवांस आहे. म्हणून प्रक्षिप्तपणावर जोर देण्याचा विक्षिप्तपणा त्यांनीं केला नाहीं. ते म्हणतात, "पण प्रक्षिप्त न मानला तरी त्यांवर मारुतीच्या वाड्यांत लक्ष्मणाला ज्या स्त्रिया दिसल्या त्या त्याच्या बायकाच होत्या हें कशावरून ? ब्रह्मचर्य पाळणाऱ्या मनुष्याचा मठच असतो व तेथें कोणतीहि स्त्री दृष्टीस पडत नसते अशी समजूत असल्यास ती चुकीची आहे...आत्या, काक्या, माम्या, मावशा, वडील बहिणी अशा अनेक नात्यांनीं घरांमध्यें स्त्रिया असूं शकतात, वगैरे..." इतर नवांच्या घरांत स्त्रीरत्नें होतीं, त्यांतील कांहींतरी त्यांच्या त्यांच्या उपभोग्य स्त्रिया होत्या हें शास्त्रीबुवांस नाकारतां येणार नाहीं. मारुतीच्या घरच्या स्त्रियांविषयीं अपवाद म्हणून स्पष्ट कथन नसल्यानें या स्त्रीरत्नांतील कांहींतरी त्याच्या उपभोग्य स्त्रिया असाव्या असें अनुमान निघणारच. आत्या, काक्या, माम्या असाव्या असा संशय काढतांना मारुतीच्या घरांत स्त्रीरत्नें होतीं ही गोष्ट शास्त्रीबुवांस मान्य करावी लागली आहे. इतर नऊ वाड्यांत जर कांहीं भोग्य स्त्रिया असल्या तर याहि वाड्यांत त्या कां नसाव्यात, हें शास्त्रीबुवांनीं दाखविलें पाहिजे. इतर नऊ वाड्यांतील सर्वच स्त्रीरत्नें त्या त्या सरदारांच्या उपभोग्य होत्या असें विधान करणें धाडसाचें व चुकीचें होईल. गंमत पाहण्यास घरांतील मोलकरणी दासीपासून सर्वच येणार. त्यांत नात्यांतील बायकाहि असणें साहजिक आहे. पण मारुतीच्या वाड्यांत मात्र सारींच स्त्रीरत्नें नात्यांतील स्त्रिया होत्या व त्यांत त्याच्या भोग्य कोणी नव्हत्या हें शाबीद करण्याचा बोजा शास्त्रीबुवांवर आहे. पण तसा त्यांच्याजवळ पुरावा नाहीं.

## तर्कट व निराधार विधान

शास्त्रीबुवांची वाद करण्याची पद्धति और आहे. शास्त्रीबुवांना मारुतीचें स्त्रीमुखपराङ्मुख ब्रह्मचर्य शाबीत करावयाचें आहे. त्याच्या वाड्यांत स्त्रीरत्नें होतीं हें त्यांना कबूल आहे. तेव्हां मारुती ब्रह्मचारी असल्यानें त्याच्या मठांतील स्त्रिया आत्या, काक्या वगैरे होत्या असें विधान ते करतात. पण या ठिकाणीं मारुतीचें ब्रह्मचर्य शाबीत धरून आपण आपलें म्हणणें पुढें करतों ही गोष्ट शास्त्रीबुवा नजरेआड करीत आहेत. शास्त्रीबुवांचें तर्कट पुढीलप्रमाणें आहे : " मारुतीच्या घरांत स्त्रीरत्नें होतीं. मारुती ब्रह्मचारी होता. म्हणून त्या स्त्रीरत्नांतील कोणीहि त्याची भोग्यस्त्री नव्हती. यामुळें असलेल्या स्त्रिया त्याच्या नात्यांतील आत्या, काक्या, माम्या असल्या पाहिजेत. म्हणून भोग्य स्त्रियांच्या अभावीं मारुती ब्रह्मचारी होता हें सिद्ध आहे. " हा तर्क नसून तर्कट आहे, कारण यांत प्रमेय हेंच प्रमाण केलें आहे.

आणखी एक निराधार विधान शास्त्रीबुवा करतात तें पाहूं. " मारुती ही रामायणांतील एक प्रधान विभूति आहे. या विभूतीचें वर्णन पुष्कळ ठिकाणीं आलेलें आहे. मारुती जर खरोखरीच गृहस्थाश्रमी असता तर तसें वर्णन कोठें तरी अन्यत्र येणें संभवनीय होतें. पण तो ब्रह्मचारीच होता म्हणून मारुतीच्या स्त्रिया, त्याचीं मुलें यांचा कोठेंच उल्लेख आलेला नाहीं."

मारुतीचें वर्णन बालकांडांत जन्म झाल्यावेळीं आलेलें आहे. नंतर किष्किंधा कांडांत ऋष्यमूक पर्वतावर त्याची गांठ पडते. तेथें मारुतीच्या बायकामुलांचा उल्लेख येण्याचा संभवच नाहीं, कारण सुग्रीवाबरोबर तो हद्दपारींत असतो. पुढें किष्किंधेस गेल्यावरहि राजस्त्रियांचा जसा उल्लेख आला तसा त्याच्या स्त्रियांचा येणें संभवनीय नाहीं. पुढें सुंदरकांडांत सीताशोध आहे. तेथें किंवा युद्धकांडांतहि घरच्या बायकामुलांचें नांव निघणें संभवनीय नाहीं. फक्त अयोध्येस परत जातेवेळीं किष्किंधेस उतरून ताराप्रभृति सुग्रीवाला प्रिय असलेल्या भार्या आणि इतर वानराधिपतींच्या स्त्रिया विमानांत घेतल्या आहेत; त्यांत मारुतीच्या कबिल्याचें नांव येण्याचें कारण नव्हतें. इतर वानराधिपतींच्या स्त्रियांत त्यांचा अंतर्भाव होत आहेच. यावरून पाहतां शास्त्रीबुवांचा " मारुती जर खरोखरीच

गृहस्थाश्रमी असता तर तसें वर्णन कोठें तरी अन्यत्र येणें संभवनीय होतें" या विधानास आधारच नाहीं. अमुक प्रसंगानें हा उल्लेख यावयास पाहिजे होता असें शास्त्रीबुवास सांगतां येत नाहीं. म्हणून मारुतीच्या स्त्रियांचा उल्लेख नाहीं म्हणून तो ब्रह्मचारी असें म्हणणें शुद्ध तर्कटच आहे. सुग्रीवाचे दुसरे नऊ प्रधान होते त्यांच्याहि बायकांचा व मुलांचा उल्लेख नाहीं, म्हणून तेहि ब्रह्मचारी असें शास्त्रीबुवा प्रतिपादणार काय ?

**पहातें कोण ? मारुती कीं वाल्मीकि ?**

रावणाच्या निजलेल्या स्त्रियांत सुरतक्रीडानिपुण कोण हें त्यानें ओळखलें म्हणून तो स्त्रीसुखज्ञाता होता असें मीं काढलेलें अनुमान चुकीचें आहे असें दाखविण्यासाठीं शास्त्रीबुवा पुढील चलाखी करतात. "रावणाच्या अंतःपुरांत मारुतीला काय दिसलें हें वाल्मीकि सांगत आहे. मीं काय पाहिलें हें मारुती सांगत नाहीं, हें प्रथम लक्ष्यांत घेतलें पाहिजे." कवि आपणांस योग्य दिसेल त्याप्रमाणें वर्णन करितो. येथें मारुतीच्या जें दृष्टीस पडलें त्याचा अर्थ त्याला कळला कीं नाहीं हा मुद्दा आहे.

"रताविरतसंसुप्तं" अशा स्थितींतल्या स्त्रिया त्यानें पाहिल्या. त्या तशा आहेत कीं नाहीं हें त्याला समजलें असल्यास रतिक्रियेंत तो अनुभवी असला पाहिजे हें उघड आहे. नूपुरांचा आवाज प्रशांत होऊन मेखला ध्वनि मारुतीच्या कानीं आला, यांतील रहस्य त्याला कळलें कीं नाहीं ही महत्त्वाची गोष्ट आहे. मारुतीनें काय पाहिलें व ऐकिलें हें वाल्मीकीनें सांगितलें आहे. या ठिकाणीं या गोष्टीचें रहस्य मारुतीला समजलें असा ध्वनि स्पष्ट आहे. थोर कवींच्या काव्यांत ध्वनीचें महत्त्व फार आहे.

साहित्यशास्त्रांत ध्वनीची योग्यता वर्णिलेली आहे. स्पष्ट तर सांगावयाचें नाहीं, पण सहृदय वाचकाला तर समजावें अशी महाकवीची कोठें कोठें शैली आढळते. हे जे प्रकार मारुतीच्या पाहण्यांत व ऐकण्यांत आले त्यांचें मर्म त्याला कळलें नाहीं असें वाल्मीकि सांगत नाहींत. त्यावरून त्याला सर्व कळलें असा ध्वनि त्यांना इष्ट होता हें उघड आहे. भरतानें हनुमानाला सोळा कन्या दिल्या त्या त्यानें नाकारल्या नाहींत. यावर शास्त्रीबुवांचा तर्क तो वानर होता म्हणून त्याला मानुषी कन्या देणें गैर.

पण भरतास तो वानर हें मागाहून कळलें म्हणून त्या कन्या देण्याचें व्यर्थ झालें वगैरे प्रतिपादन हास्यास्पद आहे. रामायणांत वानरांना कितीहि लांब शेपट्या लावल्या तरी त्यांना मानवरूप धारण करतां येत होतें असें स्पष्ट आहे. याचा अर्थ ते मानव होते हाच होतो. म्हणून शास्त्रीबुवांच्या विवरणाची जास्त चर्चा करण्यास नको. कृष्णानें अस्वलाच्या कन्येशीं विवाह केल्याचें ज्यांच्या मनास पटतें त्यांना वानरानें १६ मानुषी कन्या स्वीकारणें अशक्य कां वाटावें समजत नाहीं.

"वाल्मीकीचे काळीं ब्रह्मचर्याला महत्त्व अतिशय होतें. मारुतीचें चित्र तो ब्रह्मचर्याचा आदर्श म्हणूनच त्यानें रंगविलेलें आहे." असें शास्त्रीबुवा अगदीं निव्वळ खोटें सांगतात. असें चित्र वाल्मीकीनें कोठेंच रंगविलेलें नाहीं. ब्रह्मचर्याला अतिशय महत्त्व होतें हेंहि विधान खोटें आहे. तसें महत्त्व वाल्मीकीनें मुळींच दाखविलेलें नाहीं. शास्त्रीबुवांचें खोटें लिहिण्याचें धाष्टर्य अजब आहे.

## एकपत्नीव्रताचा विचार

आतां रामचंद्राच्या एकपत्नीव्रताविषयीं विचार करूं.

रामाचा बाप दशरथ व रामाचे भाऊ भरत आणि लक्ष्मण यांना बहुत बायका होत्या असें स्पष्ट कथन रामायणांतच असल्यानें कुलाचाराप्रमाणें रामहि बहुपत्नीक असावा असा सकृद्दर्शनी तर्क होतो. याउलट राम हा एकपत्नीक असता तर ती गोष्ट त्या काळीं क्वचितच नजरेस येणारी असल्यानें त्याचा उल्लेख स्पष्टपणें करणें वाल्मीकीस योग्य वाटलें असतें व तसा त्यानें करणें जरूर होतें. बहुपत्नीकत्व वाईट, एकपत्नीव्रत चांगलें असा आदर्श बहुजनापुढें ठेवण्याची इच्छा वाल्मीकीस असती तर त्या महाकवीनें कोणत्या तरी मिषानें हा उपदेश स्पष्ट मांडला असता. पण तशाप्रकारें एकपत्नीव्रताचे गोडवे कोठेंहि आढळत नाहींत. यावरून राम एक-पत्नीक होता असें मानण्यास वास्तविक आधार नाहीं. पण पुष्कळ लोकांचा तसा समज आहे. रामायणांत शोध करितांना रामाच्या बहुपत्नीकत्वाबद्दल एक स्पष्ट व कांहीं अस्पष्ट पुरावे मिळाले. त्यांचा उल्लेख मीं माझ्या लेखांत केलेला आहे.

रामाची सीतेवर जितकी प्रीति होती तिच्या दुप्पट सीतेची रामावर होती. सीतेला राम हा एकच पति असल्यानें सीतेची प्रीति रामावर जास्त असणें स्वाभाविक आहे. पण तिच्या निमपटीनें रामाचें सीतेवर प्रेम असल्यानें रामाच्या प्रीतींत कोणी तरी स्त्रिया वाटणीदार होत्या अशा अनुमानास जागा राहते.

शास्त्रीबुवा म्हणतात, "रामाला जर अनेक स्त्रिया असत्या, तर त्यांचा उल्लेख वाल्मीकीनें केलाच असता." हें विधान मान्य करण्यासारखें नाहीं. भरत व लक्ष्मण यांच्या एकेक स्त्रीशिवाय बाकीच्यांचा तरी उल्लेख कोठें केला आहे ? कथेच्या ओघांत ज्यांचें नांव सांगणें जरूर पडतें त्यांचेंच नांव देण्याची वहिवाट आहे, इतरांचीं नांवें सांगण्यांत येत नाहींत. याच कारणानें शास्त्रीबुवांचें असलेंच एक विधान असमंजस आहे. ते विचारतात, "सीतास्वयंवराचें वर्णन जसें आलेलें आहे तसें रामाच्या इतर विवाहांचें वर्णन कोठें आलेलें नाहीं. विस्तृत राहिलें पण अतिसंक्षिप्त तरी उल्लेख हवा होता. पण तसा उल्लेख कोठेंहि नाहीं."

## आडमुठेपणाचा वाद

भरत व लक्ष्मण यांसहि अनेक बायका होत्या. पण रामाच्या विवाहाबरोबर झालेल्या त्यांच्या विवाहाचें वर्णन आहे. पण त्यांतल्या अनेक पत्नींच्या विवाहाचा अतिसंक्षिप्तहि उल्लेख कोठेंहि नाहीं, हेंहि शास्त्रीबुवास कबूल करावें लागेल. मग रामाच्याच इतर विवाहांचा उल्लेख नाहीं यांत आश्चर्य कसलें ? भरत–लक्ष्मणाच्या इतर विवाहांचा उल्लेख नाहीं म्हणून शास्त्रीबुवा त्यांस एकपत्नीकच ठरविणार काय ?

रामाबरोबर जाण्याचा हट्ट सीतेप्रमाणें इतर स्त्रियांनीं घेतला असेंहि उल्लेख नाहींत म्हणून दुसऱ्या बायका नाहींत असें अनुमान शास्त्रीबुवा वाचकवर्गावर लादीत आहेत. पण सीतेची बहीण उर्मिला ही लक्ष्मणाची बायकोहि नवऱ्याबरोबर गेली नाहीं. लक्ष्मणाच्या इतर स्त्रियाहि गेल्या नाहींत. मग रामाच्या इतर स्त्रिया गेल्या नसल्या तर त्यांत आश्चर्य कसलें ? सीतेनें बरोबर जाण्याचें तसें कारण नव्हतें. तिला नेण्याची रामाची इच्छाहि नव्हती. ती आपण होऊन हट्टानें गेली. इतर स्त्रिया गेल्या नाहींत म्हणून

त्यांच्याविषयीं आदर कमी होण्याचें कारण नाहीं. उर्मिलेविषयींचा आदर कमी झाला असें शास्त्रीबुवा म्हणतील असें वाटत नाहीं. यापुढें

हृष्टाः खलु भविष्यंति रामस्य परमाः स्त्रियः ।

या श्लोकाचा विचार शास्त्रीबुवांनीं केला आहे. या श्लोकांतील "**रामस्य परमाः स्त्रियः**" या पदांवरून रामाला अनेक स्त्रिया होत्या असा संशय भारताचार्य कै. चिंतामण वैद्य यांसहि आला होता असें कबूल करितात. पण दिवेकर शास्त्र्यांचें मत त्यांच्या विरुद्धच आहे. शास्त्रीबुवांच्या अंगीं विनोदबुद्धि नकळत आहे. **न देखे रवि तें देखे कवि** अशी म्हण आहे. पण जें कवीच्या मनांतहि नाहीं तें शास्त्रीबुवांस कळतें. ते म्हणतात, "परंतु हा श्लोक मंथरेच्या तोंडचा आहे. तो भविष्यकालाला उद्देशून आहे. वर्तमानकालाला उद्देशून नाहीं." शास्त्रीबुवा, कमाल केलीत ! हा आपला तर्क अगदीं नवीन व अजब आहे ! तिलक टीकाकारासहि हा सुचला नाहीं. त्यांनीं परमाः या विशेषणावर कसरत करून **परमाः स्त्रियः** याचा अर्थ **सीतासख्या** असा केला. आपणास साधा अर्थ विवाहित स्त्रिया हा मान्य आहे. पण आपलें म्हणणें हें वर्तमानकालास उद्देशून नाहीं, भविष्यकालास अनुसरून आहे. शास्त्रीबुवांचा हा शोध अपूर्व आहे.

## कमाल केलीत शास्त्रीबुवा !

पण या अजब शोधाविषयींहि शास्त्रीबुवांना खात्री वाटत नाहीं म्हणून त्यांचा हनुमानाच्या वाडयांतील आत्या, काक्या, माम्या इत्यादि नात्या-गोत्यांतील स्त्रिया हा अर्थ येथेंहि घ्यावा अशी ते शिफारस करतात. ते म्हणतात, "**परमाः स्त्रियः**" यांतील परमाः याचा अर्थ श्रेष्ठ, वैभवसंपन्न असाहि होऊं शकेल आणि रामपक्षाच्या श्रेष्ठ स्त्रियांना म्हणजे नात्यागोत्यांतील स्त्रियांना आनंद होईल असा अर्थ त्यांतून निघतो." शास्त्रीबुवांना वाटेल तो अर्थ त्यांतून काढतां येईल. इतके दिवस कवि निरंकुश होते, आतां त्यांच्या लिखाणाचा अर्थ आपल्या सोयीसाठीं करणारे शास्त्रीबुवां-सारखे वाचक निरंकुश होऊं पहात आहेत !

अरण्यकांड सर्ग ९ यांतील ५।६ या श्लोकांतून आपणाला अभिप्रेत

असा अर्थ मूळ श्लोकांवर जबरदस्ती करून शास्त्रीबुवा काढूं पहात आहेत.

रामाची पट्टराणी सीता. ती म्हणते कीं, "परस्त्रीचा अभिलाष हा धर्मनाशक असल्यामुळें तुला कसा होणार ? फार काय पण तुझ्या मनांतसुद्धां ही गोष्ट येणें शक्य नाहीं." रामाला अनेक उपपत्न्या असत्या तर सीता असें म्हणाली नसती. शास्त्रीबुवांचा हा तर्क खरोखरीच तर्कट आहे. दुसऱ्यांच्या स्त्रियांचा अभिलाष न करणारा एकपत्नीकच असला पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. अनेक धर्मपत्न्या व उपपत्न्या असूनहि तो सद्वर्तनी असणें शक्य आहे. स्वदारानिरत तूं आहेस असें पुढच्याच श्लोकांत आहे. या ठिकाणींहि दारा म्हणजे एकच असा अर्थ काढतां येणार नाहीं. सीता रामाची पट्टराणी होती हें शास्त्रीबुवांस कबूल आहे. पण सीतेस पट्टराणी म्हटल्यानें दुसऱ्या हलक्या दर्जाच्या राण्या आहेत असें सुचविलें जातें, ही गोष्ट शास्त्रीबुवा नजरेआड करीत आहेत.

सीतेला रावणानें नेल्यावर तिच्याकरितां त्यानें शोक केला. यावर शास्त्रीबुवा म्हणतात, "रामाला जर अनेक बायका असत्या तर सीतेकरितां इतकें ढळढळा रडण्याचें कारण नव्हतें." हाहि तर्क अजब आहे. सीता ही विशेष आवडती बायको असून तीच एकटी रामाबरोबर वनांतील कष्ट सोसण्यास तयार झाली व अशा रीतीनें तिचा एकटीचा सहवास रामाला तेरा वर्षें घडला. यामुळें तिच्याकरतां रडणें व शोक करणें साहजिक आहे. ही गोष्ट शास्त्रीबुवांस कळत नाहीं असें नाहीं; पण कोठूनतरी अट्टाहासानें रामाला अनेक बायका नव्हत्या हें त्यांना सिद्ध करावयाचें आहे. शहाजहान बादशहाला अनेक राण्या होत्या. तथापि अर्जमंदबानूवर त्याचें अतिशय प्रेम होतें; तिच्या मरणामुळें त्यानें फार शोक केला व तिच्याचकरितां ताजमहालसारखी कबर बांधली. या तीव्र शोकाच्या पुराव्यावर शास्त्रीबुवा एकपत्नीव्रताचें सर्टिफिकेट त्याच्या पदरीं बांधणार काय ?

माझें अंतःपुर शून्य झालें असा शोक करणें व

ममापिभावः सीतायां सर्वथा विनिवेशितः ।

यांतील अपि व सर्वथा हीं पदें महत्त्वाचीं आहेत असें सांगणें यावरून

एकपत्नीत्व कसें सिद्ध होतें कळत नाहीं. अनेक बायकांचा दादलाहि त्यांतील विशेष आवडत्या बायकोच्या चिरवियोगानें असाच शोक करील. यावरून आपल्या आवडत्या मताच्या सिद्धीकरितां कोणता तरी कल्पित मुद्दा पुढें करण्याशिवाय शास्त्रीबुवांस दुसरा मार्ग दिसत नाहीं. यांतील पुढील पुरावाहि असाच कवडीमोल आहे. शास्त्रीबुवा म्हणतात, "रामाच्या मागें जर अनेक बायकांचें लटांबर असतें तर त्यानें सीतेच्यापुढें इंद्र व अयोध्या यांची पर्वा नाहीं, असे उद्गार काढले नसते आणि माझेंहि प्रेम सर्वथैव सीतेवरच आहे असें तो म्हणाला नसता. अनेक स्त्रिया रामाच्या प्रेमाच्या विभाग वाटेकरणी असतांना जर तो असें म्हणेल, तर तो एक खोटें बोलणारा मनुष्य आहे असें ठरेल. पण राम खोटें बोलतहि नाहीं तर स्वतःला सीतेशिवाय दुसरी भार्या नाहीं असेंच म्हणत आहे."

### अनेक भार्यांत प्रेमाची वांटणी

वाहवा शास्त्रीबुवा, बहार केलीत! राजाला अनेक भार्या असल्यास त्यांच्यामध्यें प्रेमाची वांटणी सारखी करणें शक्य नसतें. कांहीं नावडत्या असतात. आवडती एखादीच असते. दशरथाची प्रीति जितकी कैकेयीवर होती तितकी कौसल्येवर व सुमित्रेवर नव्हती. बाकीच्या ३४७ ची गोष्टच सांगण्यास नको.

यापुढील शास्त्रीबुवांनीं दिलेले कि. कांड सर्ग ३०।४, सुं. कांड १५।५२ मारुतीचा विचार यावरून त्यांनीं काढलेलें अनुमान दोषपूर्ण आहे. रामानें सीतेचा अगदीं ध्यास घेतला म्हणून तो एकपत्नी असलाच पाहिजे हें शास्त्रीबुवांचें ठासून सांगणें हास्यास्पद आहे. यापेक्षां विस्तृत खंडनाची आवश्यकता नाहीं. उत्तरकांडांतील

मनोभिरामा रामास्ता रामो रमयतांवरः।
रमयामास धर्मात्मा नित्यं परमभूषितः॥ ४२ ॥ २२

या श्लोकाचा विचार शास्त्रीबुवांस करावा लागला आहे. रमयामास हें क्रियापद असून राम हा कर्ता व मनोभिरामा परमभूषिता रामाः ह्या रमविल्या गेल्या आहेत. रमयामास या क्रियापदाचा प्रयोग पुढें सीते-संबंधानेंहि आहे हें खरें असें शास्त्रीबुवा कबूल करतात. पण धातूनाम

अनेकार्थत्वात् या वचनाधारें दोन ठिकाणीं आलेल्या रमयामास या क्रियापदाचा अर्थ निरनिराळा करावा असें प्रतिपादन करितात. रम् धातूचे अनेक अर्थ आहेत हें खरें आहे. पण या ठिकाणीं जो अर्थ करावयाचा तो कालप्रसंग व संगति पाहून लावावयाचा असतो. येथें रामांना रामानें रमविलें आहे. त्या रामाहि मनहरण करण्यासारख्या रूपवती व नट्टापट्टा केलेल्या अशा आहेत. रामहि क्रीडा करणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ असलेला त्या मनोहर स्त्रियांना रमवूं लागला. या प्रसंगीं रम् धातूचा अर्थ कोणता योग्य हें व्यवहारज्ञ पुरुषास सहज कळेल. पण आमच्या शास्त्रीबुवांस राम एकपत्नीक होता हें सिद्ध करावयाचें आहे. हा श्लोक तर त्यांच्या मार्गांत मोठा अडथळा आला. तेव्हां सुपीक डोक्यांतून त्यांनीं अजब सबब काढिली. "तो राम त्या सर्व मनोहर स्त्रियांना ( म्हणजे नृत्य व गान करणाऱ्या अप्सरांना व किन्नर स्त्रियांना उत्तेजन देऊन वाहवा, ठीक आहे, बहोत अच्छा आहे असें म्हणून ) आनंद देऊं लागला." कंसांतील अजब शोध शास्त्रीबुवांचा पेटंट आहे. आम्हीहि शास्त्रीबुवांस 'शाबास' असें म्हणतों. रम् धातूचे प्रसंगानुसार अनेक अर्थ होतात. शरीरसंभोग करणें हा एकटाच अर्थ नाहीं, याबद्दल शास्त्रीबुवांनीं दोन कॉलमभर आधार दिले आहेत. पण त्यांची आवश्यकता नाहीं. अनेक अर्थ कोषांतच दिले असल्यानें त्याबद्दल वाद नाहीं. वाद वरील "रामास्ता रमयामास" या श्लोकांतील रमयामास या पदाच्या अर्थाबद्दल आहे, आणि तो अर्थ प्रसंग, काळ, वेळ, कर्ता, कर्म यांच्या अनुरोधानें लावावयाचा आहे.

### जनानखान्यांतले अजब प्रकार

सीतेच्या समक्ष रामाचा विलास चालला होता म्हणून त्यांत गैर कांहीं नसावें या मुद्यावरहि विशेष जोर देण्याचें कारण नाहीं. राजेलोकांच्या जनानखान्यांत काय प्रकार चालतात, याची थोडीदेखील माहिती ज्याला आहे तो या शास्त्रीबुवांच्या मुद्दयाला योग्य ती किंमत देईल.

रामाच्या अश्वमेधांत सुवर्णमयी पत्नी होती, मानव शरीरधारी यज्ञपत्नी नव्हती. रामाच्या अनेक पत्न्या असत्या तर त्यांतील एक यज्ञपत्नी झाली असती; जानकीची सुवर्णप्रतिमा करण्याची जरूर नव्हती. यावरून राम एकपत्नी होता असा शेवटचा बाण शास्त्रीबुवा सोडीत आहेत.

आमच्या यज्ञकांडांत यजमानपत्नीचें फार महत्त्व आहे. तिनें कांहीं कृत्य करावयाचें आहे. कोणतेंहि श्रौतसूत्र पाहिल्यास यजमानपत्नी ही केवळ शोभेची स्त्री नव्हे. विधुराला यज्ञाचा अधिकारच नाहीं; मग अश्वमेधाचा कोठून असणार? पत्नीविरहित यज्ञ करणारा हा आमच्या वेदमान्य असणाऱ्या आर्यसंस्कृतीचाच नव्हे असें निःशंक सांगावें. राम रोज हवन करीत होता असें वचन आहे. याचा अर्थ तो अग्निहोत्र पाळीत होता. पण आमच्या अग्निहोत्रांत पत्नीचें महत्त्व मोठें आहे. नवऱ्याच्याबरोबर किंवा त्याच्या गैरहजेरींत ती आहुति देते. रामाच्या आहुतीच्या वेळीं सीता हजर नसे. अन्य देवतांच्या पूजेंत गुंतलेली असे असें वर्णिलें आहे. राम हवन करून शिल्लक राहिलेलें तूप पिऊन टाकी इत्यादि गोष्टी लक्षांत घेतल्यास रामाचें अग्निहोत्र व अश्वमेध यज्ञ हे आमच्या संस्कृतीचे नाहींत. रामाची अग्नि–उपासना पत्नीनिरपेक्ष होती. म्हणून सुवर्णाची प्रतिमा शोभेकरितां ठेविली असती तर तेवढ्यावरून एकपत्नीत्व सिद्ध होत नाहीं. आमच्या श्रौताप्रमाणें जिवंत यज्ञपत्नी अवश्य आहे. रामाच्या संस्कृती-प्रमाणें ती हजर असणेंहि जरूर नाहीं. म्हणून या सुवर्णमूर्तीच्या कथेनें एक-पत्नीकत्व मानण्याची आवश्यकता नाहीं.

हनुमानाचें स्त्रीसुखपराङ्मुख ब्रह्मचर्य व रामाचें एकपत्नीत्व हे आदर्श वाल्मीकीला दाखवावयाचे नव्हते. तसे दाखविणें हा त्याचा उद्देश असता तर ह्याप्रमाणें स्वतंत्र विधानें त्यानें केलीं असतीं. तसें विधान कोठेंहि केलेलें नाहीं. यावरूनच ब्रह्मचर्यपालन व एकपत्नीत्व हे वाल्मीकीचे आदर्श नाहींत हें स्पष्ट आहे.

रामायणांत ठिकठिकाणीं जे उल्लेख आले आहेत त्यांवरून मारुतीचा पत्नीपरिवार होता व रामहि बहुपत्नीक असावा यास बळकटी येते असें मीं दाखविलेंच आहे. या मीं दिलेल्या उदाहरणांची छाननी करून मी करतों तसा त्यांतून अर्थ निघत नाहीं असें शास्त्रीबुवा म्हणतात. पण शास्त्रीबुवा म्हणतात त्याप्रमाणें ब्रह्मचर्य व एकपत्नीत्वहि त्यांतून त्यांस काढून दाखवितां येत नाहीं. असें असतांहि या दोन मुद्यांवर त्यांचा अट्टाहास आहे. सूज्ञ वाचक याचा निवाडा करतीलच.

–महाराष्ट्र–शारदा, जून १९३८

# आणखी कांहीं आक्षेप

यंदाच्या वसंत व्याख्यानमालेंत ता. १५ मे रोजीं माझें "वाल्मीकिकृत रामायण" या विषयावर व्याख्यान * झालें. त्यावर जीं भाषणें झालीं त्यांना तेथेंच उत्तरें दिलीं. परंतु अध्यक्ष रा. रा. करंदीकर यांच्या भाषणावर त्यावेळीं मला बोलणें शक्य नव्हतें. तें भाषण ता. २१ मेच्या केसरीच्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. तसेंच ता. २५ मे व ता. ४ जूनच्या अंकांतहि त्याचसंबंधानें लेख आले आहेत. या सर्वांना यथामति थोडक्यांत उत्तर देत आहे.

रामाला सुग्रीवाचें साह्य सीताशुद्धीकरितां पाहिजे होतें व पुढील लढाईतहि वानरसैन्याची त्यास जरूरी होती. यासाठीं रामानें सुग्रीवाचा शोध काढून त्याच्याशीं सख्य केलें. वालीनें रामाचा अपराध केला नसतांहि रामानें सुग्रीवास राज्य मिळावें म्हणून वालीचा खून केला ही गोष्ट किष्किंधा कांडांत स्पष्ट आलेली आहे. सुग्रीवास राज्याचा लोभ होताच. त्यासाठीं परक्याची मदत त्यानें घेतली हें गैरशिस्त झालेलें आहे. सुग्रीवाची बायको वालीनें काढून घेतली ही गोष्ट त्या काळच्या आचाराप्रमाणें सर्वमान्य होती. रावणानें वालीबरोबर अग्निसाक्षिक सख्य केल्याची कथा उत्तरकांड सर्ग ३४ यांत आहे. त्यांत ४२ वा श्लोक

ततः प्रज्वालयित्वाग्निं तौ उभौ हरिराक्षसौ ।
भ्रातृत्वमुपसंपन्नौ परिष्वज्य परस्परम् ॥

असा आहे. ४४ वे श्लोकांत रावण सुग्रीवासारखा एक महिना राहिला.

स तत्र मासमुषितः सुग्रीव इव रावणः ।

---

* सदर व्याख्यानाचा विस्तृत वृत्तांत पुणें येथील दैनिक ज्ञानप्रकाशनें ता. १० व ३० जून आणि ८ व २२ जुलै १९३७ या अंकांतून प्रसिद्ध केला आहे.

सुग्रीवासारखा याच्या अर्थाचा विस्तार ४१ वे श्लोकांत आहे. पहाः—

"दाराः पुत्राः पुरं राष्ट्रं भोगाच्छादनभोजनम् ।
सर्वमेवाविभक्तं नौ भविष्यति हरीश्वर" ॥४१॥

अर्थः—"हे वानराधिपते, दारा (लग्नाची बायको), पुत्र, नगर, राष्ट्र, भोग्यवस्तु, आच्छादन, भोजन हें सर्व आपलें समाईक असो." अग्निसाक्षिक सख्य करून जो भाऊ मानला त्याला जर या मित्राच्या बायकोचा उपभोग घेतां येई तर सख्या भावाला तो अधिकार असलाच पाहिजे, हें उघड आहे. वाली व सुग्रीव यांचें भांडण राज्याबद्दल होतें. बायकोबद्दल नव्हतें.

बिभीषणाला राज्यलोभ सुटला व म्हणून तो रामाकडे आला व आपल्या भावाचा त्यानें द्रोह केला.

नाशीकजवळ गेल्या दहा वर्षांत दोनदां बर्फ पडलें. या आधारावर रा. करंदीकर व मोडक यांनीं माझ्या टीकेवर कोरडे ओढले आहेत. माझी टीका बर्फ पडून सर्व प्रदेश पांढरा दिसण्याबद्दल आहे. या बर्फपातास हिमवर्षाव म्हणतात. नाशकास तसें हिम पडलें नव्हतें. पाण्याचें बर्फ झालें. यास इंग्रजींत frost म्हणतात. किष्किंधाच विंध्याद्रीच्या उत्तरेस होती, तर पंचवटी नाशकाजवळची असणेंच शक्य नाहीं. म्हणून या बर्फाच्या वादांत कांहीं हंशील नाहीं.

आतां रा. वाटवे यांच्या आक्षेपांचा विचार करूं. "राम आणि सीता पंचवटी मुक्कामीं असतांना रावणानें सीतेचें हरण केलें व तिला बळजबरीनें आपल्या राज्यांत तो घेऊन गेला. त्या अर्थीं ती पवित्र नसावी अशी चव्हाट्यावर बसणाऱ्या मंडळींनीं शंका प्रदर्शित केली" असें वाटवे म्हणतात. ही गोष्ट खरी असती तर राज्याभिषेक होण्याच्या वेळींच अडथळा आला असता. त्याच वेळीं सीता भ्रष्ट आहे, तिला अभिषेक करूं नका असें लोक म्हणाले असते. पण त्यावेळीं हरकत आली नाहीं. पुढें सीता गर्भार आहे असें कळल्यावरच केवळ चव्हाट्यावरच नव्हे तर सर्व ठिकाणीं गवगवा झालेला आहे. बरें, तो गवगवा साधा रावणाच्या घरीं राहण्याबद्दलचा नव्हता. वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सीतेस सोडून

देतांना लक्ष्मण सीतेला म्हणतो, "ते लोकापवाद, हे देवि, तुझ्यापुढें मी उच्चारणेंहि योग्य नाहीं." यावरून हे लोकापवाद सीतेला लंकेंतच कांहीं दिवस गेले असा लोकांचा समज झाला होता, त्यासंबंधीं असले पाहिजेत.

"सीतेच्या पावित्र्याबद्दल शंका घेतां येईल असें एखादें वाक्य श्री. जाधवरावांनीं दाखवावें" असें आव्हान रा. वाटवे देतात. सीता पवित्र आहे असेंच मीं माझ्या व्याख्यानांत सांगितलें. अग्निदिव्याच्या वेळीं सीता आपल्या शुद्ध मनाची ग्वाही देत आहे. शरीर पवित्र राहिलें असें ती म्हणत नाहीं. उलट ती म्हणते, "शरीर माझ्या स्वाधीन नसतांना मी पराधीन स्त्री काय बरें करणार !" यावरून शरीर भ्रष्ट झालें नाहीं असें ती म्हणत नाहीं हें स्पष्ट आहे. या दिव्याच्या वेळीं अग्नीहि काय सांगत आहे तें पहा. ( युद्धकांड सर्ग ११८ ) "हे रामा, ही तुझी सीता. हिचे ठिकाणीं दोषाचा संपर्क नाहीं. (५) वाणीनें, मनानें, बुद्धीनें व दृष्टीनें हिनें तुज सद्वृत्ताचें उल्लंघन केलें नसून हिचें वर्तन उत्कृष्ट आहे. (६) राक्षसीच्या बंदोबस्तांत असतांनाहि हिचें चित्त तुझ्याकडेच होतें... शुद्ध अंतःकरणानें युक्त असलेल्या या निष्पाप सीतेचा तूं स्वीकार कर. हिला उद्देशून तूं कांहीं एक भाषण करूं नकोस, अशी माझी तुला आज्ञा आहे." (१०) वाणीनें, मनानें, बुद्धीनें व दृष्टीनें हिनें सद्वृत्ताचें उल्लंघन केलें नाहीं असें अग्नि सांगतो. पण यांत शरीरानें ती शुद्ध आहे हें कथन नाहीं. शरीर पराधीन असल्यानें भ्रष्ट झालें असल्यास त्याबद्दलची जबाबदारी सीतेवर नाहीं असा अग्नीचा आशय; व तो योग्यच आहे. योगवासिष्ठांतहि रामाला या तत्त्वाचा उपदेश केलेला आहे.

मनः कृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतम् ॥

योगवासिष्ठसारांत रंगनाथस्वामी यावर व्याख्यान करतांना सांगतात : 'मनेंचि अतिशयें पापपुण्य । परदाराभिलाषी जरी मन । तरी तया नरकीं पतन । शरीरगमन न करितांही ॥ तेंचि मन जरी स्वस्वरूपीं लीन । झाल्या घडे अधर्माचरण । तरी तें शरीरकृत न करी पतन । नाहीं मन म्हणऊनिया ॥' ( १४०, १४१ मनोलय प्रकरण ).

आपलें मन पवित्र असून तें हमेश रामाच्याच ठिकाणीं असल्यानें

आपण निष्पाप अशी सीतेची समजूत. अग्नि व वाल्मीकि या उभयतांस हें तत्त्व मान्य होतें व ते तिला अपाप ठरवितात. यामुळेंच वाल्मीकि सीतेला ' पतिव्रते ' असें संबोधितो. लक्ष्मण सीतेला निर्दोषी म्हणतो.

येथें श्री. करंदीकर व मोडक यांच्या मतें ' रावणवध व सीताप्रसूति यामध्यें १६।१७ महिन्यांचा काल गेला ' याचा विचार करूं. सुग्रीवादि पाहुणे कोणत्या महिन्यांत गेले व ते अयोध्येंत किती दिवस राहिले होते हें प्रथम पाहिलें पाहिजे. उत्तरकांड सर्ग ३९ यांत २८ वा श्लोक ' रामहि वानर, राक्षस आणि ऋक्ष यांसहवर्तमान क्रीडा करूं लागला ' या अर्थाचा आहे. पुढील श्लोक

" एवं तेषां ययौ मासो द्वितीयः शिशिरः सुखम् ।
वानराणां प्रहृष्टानां राक्षसाणां च सर्वशः " ॥ २९ ॥

कै. भाऊशास्त्री याचें भाषांतर " याप्रमाणें आनंदित झालेल्या त्या सर्व वानरांचा व राक्षसांचा थंडीचा दुसराहि महिना सुखावह गेला " असें करितात. येथें ' दुसराहि ' या पदानें ते दोन महिने राहिले होते असें शास्त्रीबुवांचें मत आहे. याच सर्गाच्या २७ व्या श्लोकांत " याप्रमाणें तेथें वास्तव्य करीत असतांना जरी त्यांचा संपूर्ण महिना लोटून गेला तरी रामभक्तीमुळें त्या सर्वांनाहि एका क्षणासारखा भासला " असें आहे. तो महिना शिशिर ऋतूचा दुसरा म्हणजे फाल्गुन होता असें २९ व्या श्लोकांत आहे असें माझें म्हणणें आहे. परंतु याप्रमाणें ते अयोध्येंत एक महिना राहिले का दोन महिने राहिले या फरकास मोठेंसें महत्त्व नाहीं. वादाकरितां दोन महिने मी कबूल करितों. कसेंहि असलें तरी सुग्रीवादि शिशिर ऋतूच्या अखेरीस म्हणजे फाल्गुनांत गेले हें निश्चित आहे. यानंतर पुढल्याच सर्गांत त्यांची पाठवणी झाली आहे. पुढल्याच सर्गांत त्याच दिवसाच्या अपराह्णकाळीं पुष्पक विमान आलें, त्याला कुबेराकडे पाठविलें व नंतर लागलीच राम अशोक वनांत प्रवेशला आहे. बेचाळिसावे सर्गांत सीताराम यांच्या विहाराचें वर्णन आहे. त्या सर्गाच्या २५।२६ श्लोकांत शिशिर ऋतु संपल्याचें सांगितलें आहे. हा शिशिर ऋतु वानर-राक्षसांच्या पाहुणचाराचा कां त्यानंतरच्या एक वर्षाच्या अखेरचा ?

श्री. करंदीकर व मोडक २५ व्या श्लोकांतील चिरं या काडीचा आधार घेऊन मध्यें एक सबंध वर्ष गेलें असें प्रतिपादितात. 'चिरं' याचा अर्थ लेले शास्त्रीबुवांनीं 'पुष्कळ वेळपर्यंत' असा केला आहे. यावरून एक वर्ष आणि एक किंवा दोन महिने असा अर्थ घेतला पाहिजे असें नाहीं. एक किंवा दोन महिन्याच्या काळालाहि चिरं म्हणतां येतें. सीतेला हाकून दिल्यावर ती पांच महिन्यांच्या आंत प्रसूत झाली आहे यांत वाद नाहीं. पण राज्याभिषेकानंतर १।२ महिन्यांतच तिला रानांत पाठविली कां आणखी १२ महिन्यांनीं पाठविली यांत मतभेद आहे. सीता जवळजवळ बारा महिने लंकेंत होती ही गोष्ट सर्वांस माहित होती. लंकावास हेंच दूषण प्रबळ मानलें गेलें असतें तर तिला अभिषेक करतेवेळींच हरकत यावयास पाहिजे होती. पण तशी आली नाहीं. पुढें दोन महिने सुग्रीवादिक होते त्या सुमारास ही तक्रार आली नाहीं. पण पुढें एक वर्षानें सीता गरोदर आहे असें कळल्यावर लोकक्षोभ व्हावा हें आश्चर्य आहे. गर्भ राहिला नसता तर लोकांत गवगवा झाला नसता असें श्री. करंदीकर व मोडक यांचें मत दिसतें. पण गर्भ निर्विवाद रामाचा आहे असें दिसत असतांहि लोकांनीं गवगवा करणें संभवत नाहीं. गर्भ लंकेहून निघण्यापूर्वीचा आहे असें मानण्यास जागा असेल तरच लोकापवाद पसरेल. केवळ लंकेंत सीता राहिली एवढाच अपवाद असता तर त्याचा उच्चार सीतेपुढें करण्यास लक्ष्मणास संकोच वाटण्याचें कारण नव्हतें. पण तो म्हणतो, "तुझ्यापुढें मी उच्चारणेंहि योग्य नाहीं."

"खरोखरच सीता ६½ महिन्याच्या आंत बाळंत झाली असती तर लोकांत नुसती कुजबुज न होतां उघड जाहिराती लागल्या असत्या व सीतेलाहि तोंड दाखविण्यास जागा राहिली नसती" असें श्री. करंदीकर म्हणतात. चवाठे, बाजार, रस्ते, वनें आणि उपवनें यांमध्यें लोक या विषयाची चर्चा करीत होते असें भद्र सांगतो. ही कुजबूज म्हणतां येत नसून उघड जाहिराती लागल्यासारखीच स्थिति होती. सीतेला तोंड दाखविण्यास जागा नव्हती हेंच तिच्या पुढील वर्तनावरून दिसत आहे. जातांना ती कोणाहि सासूचा निरोप घेत नाहीं; म्हणजे सासूला तोंड दाखविणें तिला योग्य वाटलें नाहीं. तिच्याबरोबर एकहि दासी दिली नव्हती. यावरूनहि

कोणत्या स्थितींत तिचा त्याग केला हें उघड होत आहे. लंकेंतून निघाल्यापासून १७ महिन्यांचा काळ गेला असता तर सीतेच्याविरुद्ध ब्रहि काढण्यास कोणासच जागा राहती ना.

याच मुद्यावर श्री. मोडक यांनीं ता. ४ जूनच्या अंकांत १।२ जास्त पुरावे मांडले आहेत. त्यांचा विचार करूं. वेळेवर पाऊस पडतो या ७ व्या मुद्यावर ते म्हणतात, "राज्याभिषेक व हें भरताचें भाषण यांत कमींतकमी एक पावसाळा खास गेला होता." पुढें ९ व्या मागें मोजणें या शीर्षकाखालीं म्हणतात, "सीतात्यागापूर्वी रामाचा एक तरी पावसाळा अयोध्येंत गेला होता." याला आधार काय तर ६ व्या मुद्याच्या विवरणांत उत्तरकांडांतील ४१ व्या सर्गांतील १७-२१ श्लोक उध्दृत केले आहेत. या तीन श्लोकांत भरत रामास सांगतो, "पर्जन्य वेळच्यावेळीं पडतो व त्यानें पिकें उत्तम वाढतात." यावरून एक तरी पावसाळा गेला असला पाहिजे असा श्री. मोडकांचा निश्चय झाला आहे. श्रीयुत मोडकांनीं उध्दृत केलेला पहिला श्लोकार्ध

अनामयो मनुष्याणां 'त्वयि वीर प्रशासति'।

असा आहे. भाऊशास्त्री लेले यांनीं प्रकाशिलेल्या महाराष्ट्र तात्पर्यसहित प्रतींत हा श्लोकार्ध

अनामयश्च मर्त्यानां 'साग्रो मासो गतोह्ययम्'।

असा दिला आहे. श्री. मोडकांच्या पाठांतील 'त्वयि वीर प्रशासति' हा पाद त्या श्लोकाच्या पूर्वीच्या श्लोकाच्या पूर्वार्धांतच असल्यानें पुन्हां तो चरण येणें योग्य दिसत नाहीं. 'हा पूर्ण महिना लोटून गेला तरी' असा पाद तेथें असल्यानें राज्याभिषेकानंतर एक महिन्यानेंच भरताचा रपोट रामाकडे रुजू झाला असें होत आहे. यावरून श्री. मोडकांच्या सबंध वर्षास अवसर नाहीं. सत्रा महिन्यांतून बारा बाद करून पांचच महिने राहात आहेत. फार तर अकरा बाद होऊन सहा महिने राहतील. 'एकतरी पावसाळा लोटल्याखेरीज काले वर्षति पर्जन्यः हें म्हणणें मूर्खालाच शोभेल' असें श्री. मोडक म्हणतात. पण त्या भाषणांतच 'साग्रो मासो गतोह्ययम्'

असें स्पष्ट कथन असल्यानें श्री. मोडकांच्या तर्कास जागा राहात नाहीं. राजाची तारीफ करतांना दरबारी लोक तर्कशास्त्राची फारशी पर्वा करीत नाहींत हा अनुभव कोणत्याहि दरबारांत मिळण्यासारखा आहे.

वाल्मीकीच्या आश्रमाजवळ सीतेला सोडली त्यावेळीं ती लक्ष्मणास म्हणते,

निरिक्ष्यमाद्य गच्छत्वं ऋतुकालातिवार्तिनीम् ।

व यावर मोडक यांनीं विवरण केलें आहे. पण सर्ग ४२।३० यांत

अपत्यलाभो वैदेहि त्वय्ययं समुपस्थितः ।

असें रामच सांगत आहे. व नंतर त्यानें तिचे डोहाळे विचारून ते पुरविण्याचें वचन दिलें आहे. तेव्हां सीतेला कांहीं दिवस गेले आहेत ही गोष्ट लक्ष्मणास नवीनच कळावयाची राहिली होती असें नाहीं. सीता या प्रसंगीं लक्ष्मणाला जें जें बोलली त्यांतील कांहीं कांहीं वाक्यें महत्त्वाचीं व विचारणीय आहेत.

याहं शुद्धसमाचारा त्यक्ता नृपतिना सती ॥४८।४॥
जानासि च यथा शुद्धा सीता तत्त्वेन राघव ।
भक्त्या च परयायुक्ता हिताच तव नित्यशः ॥१२॥

आपण आचरणानें शुद्ध आहे, पतिभक्त आहे असें सीता म्हणत आहे व तें सर्वथैव खरें आहे. ती मनानें शुद्ध आहे. शरीरानें नसल्यास तो तिचा अपराध नव्हे.

कौसल्या ही दशरथाची बहीण नसून तीं दोघें एका कुळांतीलहि नव्हती असें श्री. मोडक म्हणतात. राजकन्येशिवाय इतर मुलीस देशाच्या नांवानें ओळखीत नाहींत हें श्री. मोडकांनीं ध्यानांत ठेवावें. सगोत्र विवाहाची बंदी अलीकडची आहे. पूर्वी ब्राह्मणक्षत्रियादीमध्यें सख्या बहिणीपासून संतति होत असे असा आचारधर्म होता व बुद्धधर्मी प्रदेशांत तो अगदीं अलीकडेच बंद झाला आहे. पूर्वीचीं उदाहरणें आहेत. त्यांतील कृप व कृपीचें एक उदाहरण मासल्याकरितां श्री. मोडकांपुढें ठेवितों.

—※—